थ-वाङ्मय-माला पुस्तक २

# ायक्लब अथवा सोनेरी टोळी

( दोन्ही भाग एकत्र )

लेखक

नाथ माधव

किंमत ५ रुपये

नवभारत प्रकाशन संस्था—मुंबई नं. ४.

# प्रस्तावना.

सर्व 'माला'त अग्रेसरत्व पटकावलेली 'हिंद एजन्सी एक आणा माला' ज्या शुभ मुहूर्तानें निघाली, त्याच शुभ मुहूर्तावर प्रस्तुतच्या '**रायक्लबा**'ची स्थापना झाली आहे. मालेच्या पहिल्या अंकात **रायक्लब** येऊन गेल्यावर पुढें सातव्या अंकापर्यंत **रायक्लब** प्रसिद्ध झाला नाहीं. तितक्या अवधींत दोन अडीचशें पत्रे आलीं. यावरून **रायक्लब** ने वाचकास चटक लावून सोडली आहे, असें त्यावेळीं केलेले अनुमान चुकीचें ठरणार नाहीं असें मला वाटते. त्यानतर आजपर्यंत ह्या **रायक्लब** संबंधीं महाराष्ट्रातील ठिकठिकाणच्या वाचकाकडून जवळ जवळ हजारापर्यंत पत्रे आलीं आहेत. यावरून **रायक्लब**च्या लोकप्रियतेची साक्ष सहज पटते.

ह्या **रायक्लब** मालेतून क्रमशः प्रसिद्ध होऊं लागताच 'अशा प्रकारच्या गोष्टी प्रसिद्ध करणें म्हणजे जनतेला वाईट वळण लावण्यासारखे आहे. ह्या '**सोनेरी टोळी**'च्या वाचनापासून लोकांची कुमार्गाकडे प्रवृत्ति होण्याचा संभव आहे, असे आक्षेप एका वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाले. ह्या आक्षेपांना उत्तर म्हणजे—'आरशात पाहिले असतां त्यात पाहणाराचें खरे प्रतिबिंब दिसतें' हेंच होय. आरशांत पाहणारा सुंदर असेल तर प्रतिबिंबहि सुंदरच दिसेल. आणि पाहणाराचें मुख—डोळे तिरळे, नाक फेंपटें, ओठ तुटलेले, दात पुढें आलेले असें बेढब असेल, तर प्रतिबिंब हिडीस दिसेल. ह्याच न्यायानें हातात वाचावयास घेतलेल्या पुस्तकरूपी आरशांत पाहणारा वाचक सन्मार्गावर्ती असेल तर त्याला त्या पुस्तकात सुंदर चित्र दिसेल. आणि वाचक दुराचारी असेल तर त्याला हिडीसच चित्र दिसेल.

मनोरंजनाबरोबर ज्ञान प्राप्त करून देणाऱ्या प्रत्येक पुस्तकांत लेखकाला नीति आणि अनीति यांचीं दोन चित्रे रंगवावीं लागतात. आणि नीतीचें चित्र जितकें उच्च प्रतीचें रंगविणें असेल, तितक्याच प्रमाणांत लेखकाला

अनीतीचे चित्र रंगवावें लागतें, कारण तसें केल्याशिवाय पहिलें चित्र उठावदार दिसत नाहीं. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें वाचकापुढें एकाच वेळीं दोन चित्रे माडली जातात. आणि वाचक ज्या चित्राचा स्वभावतः आवडता असतो, तेंच चित्र त्याला पसंत पडते, त्या चित्राचाच तो विचार करतो आणि त्याच चित्राचा त्याच्या मनावर परिणाम होऊन तो त्या चित्राला अनुसरण्याचा प्रयत्न करतो.

ह्या **रायक्लब** च्या वाचनानें माझ्या सुशील वाचकाच्या मनोभूमीवर केव्हाहि वाईट बीजारोपण होणार नाहीं; अशी माझी खात्री आहे. **रायक्लब** च्या मंडळीनी केलेल्या प्रत्येक कृतीत निम्म्यापेक्षा अधिक भाग बोधपर आहे; हे मी येथ निराळे लिहावयास पाहिजे असें नाहीं. आणि कावीळ झालेल्या वाचकास तेथे सर्वच पिवळे दिसल्यास त्यातहि नवल मानण्याचे कारण नाहीं.

हा **रायक्लब** म्हणजे माझ्या मित्रमंडळीनीं सांगितलेल्या गोष्टी, स्वतःचा अनुभव, निरीक्षण आणि कल्पना या सर्वांचे एकीकरण असून त्यात कल्पनेच्या ब्रशनें ठिकठिकाणी बरेच उठावदार हात मारलेले असे **हें स्वतंत्र चित्र आहे.** असो.

पितळे याचा बगला,
कावसजी पटेल तलाव, मुंबई.
विजयादशमी शके १८३७.
( १७ आक्टोबर १९१५. )

**नाथ माधव.**

# रायक्लब अथवा सोनेरी टोळी.

आजचा विजयादशमीचा दिवस! हा दिवस म्हणजे वरील क्लबचा वार्षिक उत्सवाचा दिवस! ह्या दिवशीं क्लबनें वर्षात मिळविलेल्या मिळकतीची वाटणी आणि कडाक्याचें गाणें बजावणें हे व्हावयाचें! आज जर आपण वरील मंडळीच्या क्लबवर गेलो आणि त्याचा भपक्याने चाललेला नाचरंग पाहिला तर सात वर्षांपूर्वी ह्याच मंडळीनें सबंध दिवस उपवास काढून रात्रीं फक्त बिनदुधाचा चहा पिऊन तो विजयादशमीचा सण साजरा केला, हे ऐकून आपणास खरे देखील वाटणार नाही. तेव्हा आजच्या विजयादशमीच्या दिवसाचें वर्णन करण्यापेक्षां त्या दिवसाची म्हणजे सात वर्षांपूर्वीच्या विजयादशमीची सविस्तर हकीकत येथे दिल्यास रायक्लबची वाचकाबरोबर चांगलीच ओळख होईल अशी खात्री आहे.

**विजया दशमी.**

"प्रधानजी, राज्याचा बंदोबस्त कसा काय आहे?" गजाभाऊ प्रधान आत आलेला पाहून राजाराम पडल्या पडल्या म्हणाला.

"आहे तुझ्या बोडक्यासारखा!" रागानें प्रधान म्हणाला, "इकडे सकाळपासून पोटात कावळे कोकलतात आणि हा म्हणे राज्याचा बंदोबस्त कसा आहे! कायरे राजा, तुझा जन्मच कारे थट्टा करण्यासाठी झाला आहे!" इतके म्हणून जवळच चिंताक्रांत बसलेल्या रायाकडे वळून तो पुढें म्हणाला, "राया, एखादी दिडकी तरी देरे! आणीन दिडकीचे चणेफुटाणे!"

"छेरे! एक फुटकी कवडी नाही शपथेला खिशात! असून मी देणार नाही असं का तुला वाटतं? तो गोप्या तर सकाळपासून सारखा विव्हळत आहे. त्या पोराकडे पाहून माझ्या पोटात सारखी कालवाकालव होत आहे, पण काय करणार? शेवटीं मघा मी त्याला खाणावळींत घेऊन गेलो. पण—"

इतक्यात तात्या आणि बापू आंत आले. त्याच्याकडे वळून रायाने विचारलें, "काय झाल तुम्हीं गेला होता तिकडे?"

"व्हायचं काय! युनिव्हर्सिटीचा ×× वर शिक्का बसलेला मनुष्य त्या साहेबाला पाहिजे."

"पण तीं सर्टिफिकेट्स् दाखविलींस काय?"

" होय—दाखविली. "

" आणि बापू तुझं काय झाल ? "

" सदरहूप्रमाणें—जवळच्या वळकटीवर हुश्श करीत अंग टाकून बापू म्हणाला, " हें काहीं नाहीं राया ! अस " नोकरी नोकरी " म्हणून जप करून ह्या मुंबईत वशिल्याशिवाय किंवा दाबादाबी केल्याशिवाय नोकरी मिळत नाही हेंच खर ! आता असं करून नाहीं उपयोग ! आज आहे विजयादशमी ! आज सोन लुटण्याची आहे पूर्ण मुभा ! तेव्हा ह्या चोराच्या घरांवर खरोखरीच दिवसाढवळ्या आपण दरोडेच घातले पाहिजेत ! काय मौज आहे पहा—आम्ही धट्टे कट्टे—वाटेल ती नोकरी करण्यास तयार असताना काहींना काहीं तरी कारणास्तव आम्हाला इमानाची मिठभाकरी मिळू नये काय ? ह्या पोटाला आग लागल्यावर दुष्काळातील माणसे चोरीला प्रवृत्त होतात, त्याना आपण दोष देतों, पण खऱ्या वस्तुस्थितीकडे कोणाचं लक्ष जातं का ?—काहीं नाही ते ?—उठा-राया, असं बसून 'येईल माझा हरी तर देईल खाटल्यावरी' म्हणून काही पोटाला अन्न मिळत नाही. आजच्या मुहूर्तानें या चोराची घर लुटायला लागा. चला—" असें म्हणून तो रायाला हालवूं लागला.

" काय बुवा म्हणतोस तू ? " त्रासानें राया म्हणाला.

" म्हणायच काय दुसरं !—असं केल्याशिवाय ह्या बकाल शहरात आपला निभाव लागणं कठीण ! 'सत्याने चाला'—चाललो. 'सदाचरणाची कास धरा' धरली. पण त्याला काही सीमा ?—चार चार दिवस उपवास पडूं लागले त्याचा काही विचार ! खरंच सागतो, आजकाल सरळ रस्त्यानें जाऊन या जगांत निभाव लागणं कठीण ! " बराच वेळ रायानें भाषण केलें नाहीं.

**पहिलें बिऱ्हाड.** बापूच्या वरील भाषणाचा विचार करीत तो स्वस्थपणें वळकटीला टेकून पडला होता. त्या सर्व मडळींत राया हा विद्येनें आणि वयानें मोठा होता, तो बापू आणि राजाराम हे तिघे पुण्यास एका कॉलेजमध्ये होते. त्या वेळीं क्षुब्ध झालेल्या वातावरणात त्याचीं मनें हेलकावे खाऊं लागलेलीं पाहून कॉलेजच्या प्रिन्सि-पॉल साहेबानीं त्याना युनिव्हर्सिटीच्या हॉलचा दरवाजा बंद केला. तेव्हा ते तिघे मुंबईत आले आणि झावबाच्या वाडींत एका चाळींत तिसऱ्या मज-ल्यावर एक लहानशी खोली घेऊन राहिले. तिघेहि घरचे चांगले सुखवस्तु ! परंतु कॉलेजमधून अर्धचंद्र मिळाल्यामुळे त्याना घरीं जाण्यास अगर घरून

मदत मागविण्यास तोंड नव्हते. मुंबईत राहून स्वतःच्या हिम्मतीवर विद्या शिकावी ही त्यांची इच्छा—परंतु !

मुंबईत खोली घेतल्यावर दोन महिन्यात त्यांची मित्रमंडळी गोळा होऊ लागली. त्यांपैकीं बहुतेकजण नोकरीच्या शोधात होते. नाही

**मंडळीची स्थिति.**

म्हणण्यास श्रीपादचा धाकटा भाऊ गोपाळ हायस्कुलात जाण्याकरिता नुकताच गावाहून आला होता. घरची निराश्रित स्थिति असल्यामुळें श्रीपाद प्रथम मुंबईत आला होता. त्याला पोष्टांत पंधरा रुपयांची नोकरी लागताच त्यानें आपल्या धाकट्या भावाला शिकण्याकरितां मुंबईत आणिलें होते. परंतु दुर्दैव त्या पोराचें ! दुसऱ्या महिन्याला सपाऱ्या वावटळींत सापडून श्रीपादची नोकरी सुटली; आणि त्याबरोबरच गोपाळाची शाळाहि सुटली ! आता राहता राहिली मंडळी—अण्णा, मनोहर ऊर्फ मन्या, चितामण, उर्फ चाऱ्या, बळवंत उर्फ बाप्पा आणि भाऊ. ह्यांपैकीं चितामणाला एका व्यापाऱ्याकडे नोकरी असून दरमहा बारा रुपये पगार मिळत होता. बाकीची मडळी अर्ज घेऊन सर्व दिवसभर निरनिराळ्या कचेऱ्यामधून हिडत होती; परतु हा वेळपर्यंत एकाचेहि बस्तान बसलें नव्हते. कुठे ‘ शिफारस ’ नाहीं म्हणून ‘ नन्ना, ’ ‘ कुठे युनिव्हर्सिटीचा ‘ शिक्का ’ नाहीं म्हणून ‘ नन्ना, ’ तर कुठे ‘ ब्राह्मण ’ म्हणून ‘ नन्ना, ’ असा प्रकार चालू होता. पंधरा दिवस झाले, बाप्पा एका छापखान्यांत कपाझिटरचें काम शिकण्याकरिता जाऊं लागला होता; आणि चितामणीनें ‘ जगवैभवाचे ’ अंक काखेंत मारून प्रत्येक नाक्यावर उभे राहून ओरडण्यास सुरवात केली होती. रायानें जवळजवळ एक महिना आपल्या खाणावळींत बहुतेक सर्वांना नेलें होते. परतु एकदम खाणावळीचें बिल चढताच खाणावळीणबाईनें सर्वांना खाणावळीचा दरवाजा बंद केला. हळूहळू मंडळीच्या खिशातील घड्याळें हातातील आंगठ्या, बटणें, डोक्याचे रुमाल इत्यादि वस्तु रोजच्या शिध्याकरिता नाक्यावरील मारवाड्याच्या पेटींत जाऊन बसूं लागल्या. शेवटीं चणेफुटाण्यावर दिवस येऊन होता होता सबंध दिवस उपवास पडूं लागले. परंतु वर लिहिलेला विजयादशमीचा दिवस आमच्या मंडळींना अतिशयच जाणवला ! शेजारपाजारची मंडळी ह्या टोळभैरवाच्या गरजा भागवितां भागवितां अगदीं टेकीस आली होती. आणि दुकानदारांनींहि ह्या मंडळींना आपलीं उधारीचीं खातीं बंद केली. त्यामुळें त्याना आज अत्यंत शोचनीय स्थिति प्राप्त झाली होती. आज बाराजणापैकीं एकाजवळहि एक पै देखील

शिल्लक नव्हती. गेल्या दोन दिवसापूर्वी रायानें आपला जरीचा रुमाल मारवाड्याकडे ठेऊन त्या पैशावर आपल्या सर्व मित्राचा परामर्ष घेतला. आता मात्र मंडळीजवळ अंगावरील कपड्याशिवाय कांहीं एक उरलें नव्हतें.

" राया, डोक खाजवून करतोस काय ? सांग एकदा म्हणजे झाले ! आता मी फाटके कपडे घालून नाक्यावर गटाराजवळ बसतों हात पसरून—' आधळ्याला दे दाता '—" असें म्हणून राजानें वेडेंवाकडें तोंड करून गजाभाऊ प्रधानापुढें हात पसरला. त्याचा अंगविक्षेप, त्याचा आवाज आणि वेड्यासारखे उभे राहून हात पसरण्याची तऱ्हा पाहून सर्वांना हसू लोटले. राजा ही व्यक्ती त्या मंडळींत खरोखरीच मोठी विनोदी होती. क्षणभर त्या सर्वांना चिंतारहित करून तो रायाकडे वळून म्हणाला, " कायरे बुवा, नाहीं का संपत तुझा विचार ! कर—पुष्कळ कर—डोक घासघासून कर विचार आन् आता बड्या साहेबान दिला आहे नुकताच राजीनामा त्या जागेवर कर एकदाचा अर्ज आन् दे उडवून वार ! "

" ऐकरे बुवा—"

" ऐकतो—साग लवकर काय ते ! इतका विचार करून आपल्या तोंडातून निघणारीं मुक्ताफळें ऐकण्याकरिता माझे कान केव्हापासून उघडे आहेत ह चालू द्या —पण राया, तुझे हे विचार काहीं सुटत नाहींत. इतका विचार तरी कसला चालविला आहेस ? —अरे वेड्या, तुझ्या या अगडबब विचारांच्या चरकांतून निघणारे व्याख्यान ऐकून का भरणार आहे आमचें पोट ? मुकाट्यानें आणून ठेव आमच्यापुढें ताट मग पाहूं दुसरी वाट ! "

" हं आता असच ?—" किंचित्कालानें राया एकदम म्हणाला, " बाबू तू म्हणतोस तेंच योग्य ! आता ह्या शिकण्याला रामराम !—इतकी उरस्फोड आन् हाडाचीं काड करून शेवटीं पाच पंचवीस रुपड्याकरितां खर्डेघाशीच करायची ना !—ठीक आहे—आतां असंच ! " असें म्हणून तो पुन्हां स्वगत विचारात गढला.

" हं आता असंच—" रायाकडे बोट दाखवून राजा वेडावीत म्हणाला.

" असंच तें कसें ? " भुकेनं व्याकुळ झाल्यामुळें केविलवाणे तोंड करून भाऊनें विचारलें.

' असं म्हणजे हें असेंच ! अरे, हें असं हा बसला आहे कीं नाहीं विचार करीत. तसेंच सर्वांनीं विचाराचे कडक फुटाणे खात स्वस्थ पडावें, असेंच कीं नाहीं राया ?"

" हो—असच केल्याशिवाय गत्यंतर नाहीं ! " राया पुनः स्वगत बोलला. विचारांत मग्न झाल्याकारणानें त्याला राजाचें भाषण ऐकूं आले नव्हते.

" अरे ' असं ? कस ' ते कस ते साग. मघापासून ' अस अस ' करतो आहे झालं ! पण कसं ते नाहीं सागत ? " राजा म्हणाला.

" तेंच सागतो राजा, तू फार उतावळा आहेस. ' उतावळा नवरा आणि गुडघ्यास बाशिंग, ही म्हण तुला माहीत आहे ना ? कोणतीही गोष्ट उतावळेपणानें करूं नये. अगोदर विचार आणि नतर कृति. कृति केल्यावर विचाराचा कांहीं उपयोग होत नाहीं. वेळ तर आली खरी ! पण शातपणानं पूर्ण विचार करून आपणाला ह्या प्रसगातून पार पडले पाहिजे. आपल्या जीवित साधनाची दिशा ठरविताना नीतितत्वाची पायमल्ली करिता कामा नये. हे ध्येय पुढे ठेऊन आपणाला वागले पाहिजे. तेव्हां आता आपण असें करू — तू आणि बापू असे दोघे, मी आणि बाप्या असे दोघे मिळून चौघानी जोडीनें निघायचं. तुम्हीं दोघानी ठाकूरद्वारपासून भुलेश्वरपर्यंत जाऊन प्रत्येक दुकानावरून निरनिराळ्या साखरेचे नमुने गोळा करून आणायचे; आम्ही दोघानी गिरगावापासून चिराबाजारापर्यंत चहाचे नमुने गोळा करून आणायचे काय समजलं ? पाच वाजण्याच्या आत मात्र तुम्ही परत आल पाहिजे. मग पुढे काय करायच त्याचा विचार करूं. "

" वाः छान ! युक्ति पण युक्ति सोळा आणे युक्ति आ–णि–म्हणा–व–क्रुति–" असे हेल काढीत म्हणून राजानें आनदातिशयानें जवळ बसलेल्या गजाभाउच्या पाठीवर थाप मारिली. त्याबरोबर तो ' ओय—ओय—! ' म्हणून मोठ्याने ओरडला.

**नमुने.**

पांच वाजण्याच्या सुमारास त्या दोन जोड्या परत आल्या. राजा आणि बापू ह्या जोडीनें आपापले दोन्हीं खिसे भरून, प्रत्येक दुकानावर मिळालेला चिमटी चिमटी नमुना असे निरनिराळ्या जातीच्या साखरेचे अनेक नमुने आणले होते ते सर्व एकत्र केल्यावर चौदा पंधरा शेर साखर जमली. त्याचप्रमाणे राया आणि बाप्या यानीं आणलेले चहाचे नमुने दोन अडीच रत्तल झाले.

" ह, उठा आता—मनुबाई, पेटवा चूल आणि ठेवा हा चहा चुलीवर ! ! " मनोहररावाकडे डोळे मिचकावित पाहून राजा म्हणाला, " आज बिन दुधाच्या चहावर विजयादशमी येऊन बसली आहे. "

" पण राजा, चूलरे कशानें पेटविणार ?—लाकडें कुठे आहेत ? अण्णानें विचारले.

" होय—आहे खरा प्रश्न ! " क्षणभर विचार करीत राजा पुढे म्हणाला, " पण थांबा—गोप्या, हळूच जाऊन भय्या कुठे आहे तेवढं पाहून ये पाहू. त्याची आहे मोडकी खुर्ची. आज त्या मोडक्या खुर्चीवर चहा करायचा !—का मंडळी, आहे ना विचार पसत ? "

" वेड्या पसत म्हणून काय विचारतोस ! सोळा आणे पसत आणि अ-ग-दी—पसत - " असे म्हणून गजाभाऊने थोड्या वेळापूर्वी आपणास मिळालेल्या थपडेची सव्याज फेड केली.

**रायक्लबची स्थापना.**

थोड्या वेळाने चाळीचा भय्या जवळपास नाहीं असे पाहून राजाने त्याची मोडकी खुर्ची आणिली. आणि लवकरच त्याची चुलहि पेटली. चहा तयार झाल्यावर प्रत्येकानें तो बिनदुधाचा चहा पोट भरून घेतल्यावर पुन: सर्व मडळी खोलींत वर्तुळाकार बसून ' पुढे काय करावयाचे ' ? ह्या बिकट प्रश्नाची फोड करू लागली. अकरा वाजले तरी मंडळीचा खल चालू होता. शेवटी सर्वांनी रायाला आपला मुख्य नेमून त्याच्या हुकुमात रहावयाचे आणि त्याचे नाव क्लबला देऊन विजयादशमीच्या सुमुहूर्तावर '**रायक्लब**' ची स्थापना केली.

**पुढची बेगमी.**

दुसऱ्या दिवसापासून प्रत्येकाचा वर्तनक्रम बदलला. रायाने प्रत्येकाला निरनिराळें काम वाटून दिले. सकाळच्या प्रहरी पुन: बिनदुधाचे चहापान झाल्यावर राया, बापू, अण्णा, भाऊ आणि तात्या ह्या पाच जणानी एक जुने उपरणे फाडून त्याचे आपापल्या कोटाला आंतून मोठाले खिसे शिवले, आणि रात्रीं ठरल्याप्रमाणें स्वाऱ्या बाहेर पडल्या. राया, बापू आणि आण्णा हे तिघे निरनिराळ्या दाणेवाल्याच्या दुकानावरून तांदुळाचे नमुने गोळा करू लागले. त्याचप्रमाणें भाऊ आणि तात्या हे दोघे दुसऱ्या बाजूनें, डाळ, मूग, चणे आदिकरून जिनसा आपल्या चोर खिशांत नमुना म्हणून भरून घेऊं लागले. तीन दिवसात त्यानीं ग्रांटरोड, भायखळा, येथपर्यंत फिरून बाराजणाकरिता दाणा, चहा, साखर, ह्या वस्तु एक महिना पुरतील इतक्या जमविल्या. आणि लाकडांकरिता खोलींत सामान ठेवण्याकरिता फळ्याचा केलेला माळा

त्याच्या फळ्या काढून त्याचा चुलीला लांकडें म्हणून उपयोग करण्याचा विचार केला.

चार दिवसानीं चिंतामणाचा बारा रुपये पगार आला. तो त्यानें रायाच्या स्वाधीन केला. त्यापैकीं दोन रुपये मिठमसाला, दूध तेल इत्यादि किरकोळ जिनसाकरिता मनोहराच्या स्वाधीन करून पाच रुपये गिरगावात घेतलेल्या नव्या खोलीचं भाडे देण्याकरिता राजाला दिले. अशा रीतीनें सात रुपयांची व्यवस्था लावल्यावर बाकी राहिलेल्या पाच रुपयात रायाने मोठीच इमारत रचण्याचा विचार केला. त्याचा उल्लेख पुढें हळुहळू होईलच ! असो. आता त्याना कोठल्याच गोष्टीची काळजी नव्हती. दोन वेळ चहा, साधे पण छानदार जेवण इतका थाट जमल्यावर पुनः सर्वांची मने प्रसन्न झालीं यात मोठेंसे नवल नाहीं.

**मारवाड्याला चोप**

दोन दिवस लोटल्यावर सायंकाळी बाहेर जाताना गजाभाऊने ज्याच्याजवळ आंगठ्या, घड्याळें, रुमाल इत्यादि जिन्नस गहाण ठेविले होते त्या मारवाड्याकडे जाऊन ' उद्या हिशोब घेऊन खोलीवर ये ' असें त्याला सांगितले.

ठरल्याप्रमाणं दुसऱ्या दिवशी वरील मंडळीचा शोध करीत मारवाडी चाळीवर आला. आजुबाजूच्या मंडळीनं त्याला खोली दाखवितांच दरवाजाजवळ जाऊन त्यानें ' गज्याभाऊ प्रधान घेरमदी है काय ? ' असें विचारलें, तेव्हां एक तरुण स्त्री दरवाजाआड उभी राहून म्हणाली, " नाहीत, बाहेर गेले आहेत. आणखी एक तासानें तुम्हाला यावयास सांगितले आहे. "

मारवाडी परत फिरला आणि पुनः एका तासाने आला. त्यावेळी त्या स्त्रीनें ' त्याचा यावयाचा वेळ झाला आहे. आता इतक्यात ते येतील. तुम्ही आत येऊन थोडा वेळ बसा ' असे सांगून तिनें मारवाड्याला आत घेतलें. मारवाडी खोलीत जाऊन दहाच मिनिटें झालीं असतील, इतक्यांत खोलींतून एक मोठी किंकाळी आणि ' धांवा-धावा ' अशी एकच ओरड बाहेर ऐकूं आली. त्याबरोबर आजुबाजूच्या खोलींतील लोक धावले. तोच त्या गर्दीतून मार्ग काढून बापू आणि अण्णा आंत घुसले. मारवाडी एका कोपऱ्यात भयचकित उभा होता, आणि दुसऱ्या कोपऱ्यात ती स्त्री तोंडावरून पदर घेऊन सारखे हुंदके देत होती. सर्व खोलींत एकच गर्दी झाली.

" वहिनी–अहो वहिनी, झालं तरी काय ?–तुम्ही अशा ओरडला का ?–सांगा--अहो सांगा ?–सांगा ?–वहिनी, भिऊं नका--" अण्णा विचारूं लागला.

" त्या-त्या-मेल्यानें-मला एकटीला पाहून-माझ्या-माझ्या अंगावर हात किहो टाकिला ! " ती स्त्री अस्पष्ट आवाजांत हुदके देत देत म्हणाली

इतके शब्द ऐकताच बापूनें मारवाड्याच्या अंगावर वाघासारखी उडी टाकिली आणि त्याच्या तीन शेंड्या धरून त्याची पाठ रगडण्याला सुरवात केली.

" अरे, हमी नै—मारतो कसाला ?—अरे बाबा, तुझा पाव पडते हमी नै—ए बायडी खोटा सांगते—"

" बायडी !—मादरचोद तुझी ती आई—बायडी म्हणतोस तिला ? सुव्वर–"

" हा—हा –बाबा—आमचा मा— '

इतका प्रकार होईपर्यंत क्लबची इतर मडळी भराभर गोळा झाली. प्रत्येकानें मारवाड्याला यथेच्छ बडविलें; इतक्यात रायाहि आला. त्याला पाहताच बापूने त्याला सर्व हकीकत सागण्यास सुरवात केली. ' वहिनी घरांत एकटी होती आणि हा मारवाडी एकदां आला. घरात कोणी नाही असें याला सांगितलें तरी तो पुनः आला आणि तिला एकटीला पाहून यानें तिच्या अंगावर हात टाकला ! तेव्हां ती ओरडली. मी जिन्यावरून ओरड ऐकताच धावत आलो. ही मडळी जमली आहे याना पाहिजे तर विचार. ' ह्या बापूच्या सागण्याला जमलेल्या मंडळींची पुष्टि मिळाली. मग काय ? रायानें तात्काळ पोलिसला बोलावण्याकरितां मनुष्य पाठविला. ते पाहून मात्र मारवाड्याचें धाबे दणाणले. त्यानं बोलण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परतु त्याचें कोणीच ऐकून घेईना. अशा रीतीनें अर्धा तासपर्यंत त्या खोलीत एकच गोंधळ माजून राहिला होता. थोड्या वेळाने पोलिस शिपाई घेऊन बापू आत आला. परतु आत येण्यापूर्वी बापूनें त्याच्यावर रौप्यनाण्याचा प्रयोग केला होता, त्या जोरावर आत येताच त्याने मारवाड्याला प्रथम दोन तडाखे दिलेच ! नतर सर्व हकीकत ऐकून घेतल्यावर पोलिसाने मारवाड्याला धक्का देऊन बाहेर ओढलें. त्याच्यामागून रायाहि बाहेर पडला.

वाचकहो, हा झालेला प्रकार कदाचित् तुमच्या लक्षात आला नसेल, करिता त्याचा येथें खुलासा करूं. रायक्लबवर एकाएकीं ती स्त्री

**गोपिकाबाई**

कोठून आली हे तुम्हांला गूढ पडलें असेल परतु इतक्यातच असे आश्चर्यात पडूं नका. कारण आश्चर्य करण्यासारखे रायाच्या कल्पकतेचे मोठमोठे प्रसंग अद्यापि पुढें आहेत. तुम्ही त्यांच्या खोलींत पाहिली ती स्त्री खरी नसून तो स्त्रीवेषधारी गोप्या होता. हा

सर्व रायानें रचलेला व्यूह होय. चिंतामणीच्या पगारातून राहिलेल्या पांच रुपयापैकीं चार रुपयात लुगडें, चोळी, बांगड्या इत्यादि वस्तु आणून त्यानें गोपाळाची गोपीकाबाई बनविली होती. आणि आपला कोणाला संशय येऊं नये म्हणून गोप्यानें अगदीं तोंडावर पदर ओढून घेऊन रडून ओरडून आणि हुंदके देत आपली भूमिका अगदी बरोबर वठविली. आजुबाजूच्या मंडळीना देखील त्या टोळभैरवाच्या खोलींत बायको मनुष्य पाहून प्रथम आश्चर्य वाटले. परतु ' ती आमची वहिनी-गजाभाऊ प्रधानाची बायको, कालच रात्रीं ११ च्या गाडीने पुण्याहून आली आणि आतां ती दुपारीं बडोद्यास जाणार ' असे सागून बापूने सर्वांची शंका दूर केली होती.

असो. थोड्या वेळाने एक बोचके घेऊन राया परत आला. त्याला पहाताच मारवाड्याचें काय झाले म्हणून चाळींतील मंडळी त्याला विचारू लागली. तेव्हा तो म्हणाला, " दिला सोडून झाल ! रडू लागला, हातापाया पडू लागला, तेव्हा म्हटल जाऊ द्या ! "

" अरेरे ! उगाच सोडलात त्या तीनशेंड्याला !-अशी तबी द्यावयाची होती की जन्माची आठवण -"

परतु त्याचें भाषण ऐकत राया तेथे उभाच राहिला नाहीं. मुकाट्यानें बोचके घेऊन तो खोलींत शिरला. आत येताच त्याने खूण केली, त्याबरोबर अण्णानें आतून दरवाजा बद करून घेतला.

" वेल्-सक्सिडेड् ? " राया आत आलेला पाहून राजानें विचारले.

" एस्—पण आजचे सर्व श्रेय गोप्याला आहे. बहार उडविली पोरान ! "

गोपाळाने बहार उडविली यात बिलकूल शका नाही. रायाने व्यूह रचल्याप्रमाणे मारवाडी त्याच्या पूर्णपणें कचाट्यांत सापडला. ' भीक नको पण कुत्रा आवर ' अशी त्याची 'दे माय धरणी ठाय, स्थिति होऊन शेवटीं त्या लफड्यातून सुटण्यास रागाने गहाण ठेवलेल्या सर्व वस्तु व्याज मुदलावर पाणी सोडून त्याला परत द्याव्या लागल्या आणि गरीबाना रडविणाऱ्या मारवाड्याला साठ रुपये ' बुडित खात्यांत ' माडतांना स्वतःच्या कपाळावर हात मारून ध्यावा लागला ! महिना भरण्यास आणखी चार दिवसांची अवधी होती, तेव्हां भय्यानें एकवेळ येऊन मागील दोन महिन्याचें भाडें एकदम देण्याविषयीं

**नवीन बिऱ्हाड.** गजाभाऊ प्रधानाला खरमरीत ताकीद दिली. ती खोली गजाभाऊच्या नांवावर होती, हें आतां वाचकांच्या लक्षांत

आलेंच असेल ! हळुहळू चार दिवस सरले. पहिल्या तारखेस सकाळी भय्या खोलीच्या दरवाजावर भाड्याच्या वसूलीकरितां उभा ! बराच वेळ दरवाजा उघडत नाहीं असें पाहून आंत मंडळी निजली असेल, असे समजून त्याने हाका मारण्यास सुरवात केली. दोनचार हळू, दोनचार मोठ्यानें अशा पाच पंचवीस हाका मारल्या तरी दरवाजा उघडत नाहीं असें पाहून त्यानें दरवाजाला धक्का दिला. त्याबरोबर दरवाजा खडकन् उघडला. पण आंत काय ?—खोली रिकामी !

भय्याला धाब्यावर बसवून मंडळीनें गिरगावात नवीन बिऱ्हाड केल्याला पधरा दिवस झाले. आता मंडळीजवळ धान्याचा पुरवठा चागलाच होता. परंतु हातात खेळती रक्कम मात्र नव्हती. ती मिळविण्याकरिता बिन भाडवलाचा धदा सुरू करण्याच्या खटपटींत मंडळी गढली होती. एके दिवशीं सायंकाळीं साताच्या सुमारास राजाने एक व्हिक्टोरियागाडी बोलावून तीत दोन भगवीं वस्त्रे घातलेले बुवा बसविले. त्याच्याबरोबर भगव्या वस्त्रात गुडाळलेले एक मोठे पुडकेहि त्याने गाडींत ठेऊन गाडी चालविण्यास सागितली. थोड्या वेळानें ती गाडी गिरगावात 'शारदाश्रमा' च्या दरवाजाजवळ येऊन उभी राहिली आणि त्या दोन ब्रह्मचारी व्यक्ति गाडीतून खालीं उतरल्या. त्यांची आश्रमात व्यवस्था लावीपर्यंत राजाच्या तोडचें यंत्र सारखे चालू होते. 'हे स्वामि-कोण ! कोठून आले ! त्याची आपली भेट कशी झाली, ते काय करतात ? कोठला हेतु धरून येथें आले' इत्यादि सर्व गोष्टींची खुलासेवार माहिती कोणीहि न विचारता आपण राजाने सर्व आश्रमाला करून दिली. ती तेथें सविस्तर रीतीनें न देतां दुसऱ्या दिवशीं प्रसिद्ध 'जगवैभवानें' स्पेशल पुरवणी वाटून त्यात जी हकीकत दिली तीच येथें वाचकाकरिता देतो —

**दोन ब्रह्मचारी व्यक्ति.**

## हिमालयांत वास्तव्य करणाऱ्या दोन विभूतींचें शुभागमन

( आमच्या खास बातमीदाराकडून )

" काल सायंकाळीं येथील रेशमाचे प्रसिद्ध व्यापारी शेठ राजारामपत रेशीमवाले चौपटीवर हवा खात बसले असता जवळच बसलेल्या दोन ब्रह्मचारी व्यक्ति त्याच्या दृष्टीस पडल्या. विशेष चौकशी करिता त्या थोर विभूति हिमालयाच्या बर्फाच्छादित शीतल प्रदेशात वास्तव्य करणाऱ्या आहेत, असें कळताच

याची प्रसिद्धि व्हावी, आणि त्यांच्या गुणाचा नागरिकजनास लाभ व्हावा म्हणून त्याना ‘ शारदा आश्रमात ’ ते घेऊन आले. त्यांपैकी एक विभूति बालवयाची असून मुक्की आहे. परतु सर्व विद्येचें केवळ भाडार आहे. इतक्या बालवयांत इतकी अलोट विद्या संपादून ही बालमूर्ती हिमालयाच्या उदरात वास्तव्य करणाऱ्या आपल्या परमपूज्य गुरु आज्ञेवरून बरोबर एक गुरुबंधु घेऊन काहीं विवक्षित हेतुनें फिरतीवर निघाली आहे. ह्या विभूतीचा आहार म्हटला म्हणजे हिमालयातून आणलेली कांहीं चमत्कारिक कदमुळें आणि पाण्याऐवजीं वनस्पतींच्या पाल्याचा रस हा होय. त्यांचा येथे येण्याचा हेतु फारच प्रशंसनीय आणि अत्यत उदात्त आहे. सर्व आर्यावर्तात धर्मजागृति व्हावी म्हणून हिमालयाच्या पायथ्याशीं एक भव्य वेदशाळा बाधण्याकरिता ते फड गोळा करीत असून वीरभंग्याचा महाराणा, जसलामपूरकर महाराज, काशीविश्वेश्वराचे राजेसाहेब, गोगदचे सचिव, धनिक, नगरशेट आदि करून धर्मदात्यानीं हजारों रुपयांची मदत केली असून त्याच्याजवळ श्रीची आज्ञापत्रे, हुकुमपत्रे आणि विनतीपत्रेहि आहेत. शिवाय त्या शीतल प्रदेशात असाध्य ठिकाणीं वास करण्याऱ्या कैलासपतीच्या जीर्ण झालेल्या देवालयाचा जीर्णोद्धार आणि नंदादीप शिवाय गोरक्षफड या करिताहि ते द्रव्यसहाय्य मागत आहेत. कोणाजवळूनहि एक पै न घेता भूत पिशाचादि बाधा त्याचप्रमणें कोठलाहि असाध्य रोग ते आपल्या अचाट योगसामर्थ्यानें बरा करितात गरजूनीं दुःखमुक्त होण्याला ही आलेली पर्वणी व्यर्थ दवडूं नये, अशी आमची अत्यंत आग्रहाची शिफारस आहे.

ए. ज. वे. ”

**शारदा आश्रम**

कोण भयंकर ही गर्दी ! ‘ शारदा आश्रमा’त मुंगीला आंत जाण्यास मार्ग नाहीं, असा मंडळींनीं तोबा उडविला होता. पहिले दोन दिवस म्हणण्यासारखी विशेष गर्दी नव्हती. परतु तिसऱ्या दिवसापासून मात्र कहर उडाला ! चवथ्या दिवशीं ‘शारदा आश्रम’ चा मोठा दरवाजा मोडला; कित्येकांचे हातपाय मोडले तर कित्येक चेंगरून मृत्युपंथाला लागले. ह्यावरून तेथें होत असलेल्या गर्दीची वाचकांना सहज कल्पना होण्यासारखी आहे. शेवटीं रस्त्यातहि मडळीची रहदारी इतकी वाढली कीं, पोलिससाहेब मजकुरास काहीं जादा पोलिस पाठवून तेथे व्यवस्था करावी लागली. पांचव्या दिवसापासून मुंबईतील वाणी, भाटचे, मुसलमान,

पाशीं, याच्या देखील गाड्या, मोटारगाड्या, 'शारदा आश्रमा' च्या दरवाजा-जवळ येऊन उभ्या राहूं लागल्या. आठ दिवसात वेदशाळेचा फंड नऊ हजार, कैलासपतीच्या देवळाकरिता जीर्णोद्धार फंड पाच हजार आणि गोरक्ष फंड जवळजवळ तीन हजार मिळून निव्वळ रुपये सतरा हजार जमले. वाचकहो, तुम्हीं असे स्वस्थ काय बसला? चला–उठा हा अलभ्य लाभ व्यर्थ का दवडिता! काय?—त्या गर्दीतून जाता येणार नाहीं म्हणतां! –मजबरोबर चला. तो पहा आपला गजाभाऊ 'शारदा आश्रम' च्या दरवाजावर उभा आहे. मजबरोबर तो तुम्ही सर्वांना बिनहरकत आत स्वामीच्या चरणाजवळ नेऊन सोडील. चला–हं, ह–त्या बाजूनें जाऊ नका. ती स्त्रियांकरितां आत जाण्याची खास जागा आहे. पण थाबा-ती पहा गर्दी स्वामीचे दर्शन घेऊन घामाघूम होऊन बाहेर आली आहे. त्याचे भाषण ऐकत आपण क्षणभर येथेच उभे राहू म्हणजे आंत चाललेल्या प्रकाराची आपणास विशेष चागल्या रीतीनें अटकळ करिता येईल.

"झाल बुवा एकदाचे दर्शन! दोन तास बाहेर तिष्ठत उभा राहिलो, तेव्हां कुठे आत जाण्यास मार्ग मिळाला. बाकी बळवतराव, कांही म्हणा—तेज आहे खर!"

"आहे म्हणून काय म्हणतोस! उगाच का ते वाणी आणि भाटये स्वमीच्या चरणावर हजारो रुपयाची खैरात करतात ती? पण कृष्णराव, तो माझ्या बाजूला एकजण बसला होता, तो तू पाहिलास कां? तो सागत होता, माझा जन्माचा कुष्ठरोग स्वमीने फक्त आगावरून हात फिरविताच नाहींसा झाला—"

"कोठला तो? तो का एकसारखा स्वामीच्या चरणावर डोकं ठेवित होता तोच का?"

"होय होय तोच! का नाहीं ठेवणार डोकं? तसच मी काल ऐकलं, कीं त्या दीक्षिताची सून--तिला म्हणे कांहीं पिशाचबाधा झाली होती. परतु स्वामीजवळ आणताच त्यांनीं क्षणभर तिच्याकडे रागीट मुद्रेनें पाहिलें तोच तिने मोठयानें किंकाळी फोडिली आणि जमिनीवर आंग टाकिलें. थोडया वेळाने स्वामीनीं तिच्या मस्तकावर हात ठेविला आणि तिला उठावयास सांगितलें. झालं—भूतबीत पार नाहींसं झालं!"

वाचकहो! चला आता आंत. आपणाला स्वामींची बरीच कीर्ति ऐकूं

**गोप्या आणि तात्या**

आली. आता आंत जाण्यास काहीं हरकत नाहीं. परतु आंत जाण्यापूर्वी तुम्हाला एक नम्र सूचना आहे ती मात्र लक्षांत ठेवा. तुम्हीं गेल्यावर तुम्हाला ते बालस्वामी हिमालयाच्या शीतल प्रदेशातच वास करणारे दिसतील. परतु यदाकदाचित् झावबाच्या वाडींत मारवाड्याला मंडळी बडवीत असता कोपऱ्यात उभी असलेली गोपिकावहिनी ऊर्फ गोप्या याची प्रतिमा दिसली तर मात्र आश्चर्यचकित होऊं नका. मुकाट्यानें लोकलज्जेस्तव स्वामींच्या पाया पडून बाहेर पडा. नाहीं तर रायानें रचलेला सर्व व्यूह ढांसळेल आणि शेवटी त्याचें पर्यवसान तुम्हाला साक्षीदार म्हणून पोलिसबरोबर फिरावें लागेल. परतु इतकी मजल येणार नाही अशी आमची खात्री आहे. कारण रायानें ' मेकिंग बॉक्स ' च्या साह्यानें आपले सर्व कौशल्य खर्चून गोप्या आणि तात्या ह्या दोघांना गंभीर आणि मोहक स्वरूपाचे ब्रह्मचारी बनविले होते.

' शारदा आश्रमा 'त एका मोठ्या दालनांत आसनावर शांतचित्तानें वेषधारी गोप्या बसला होता. त्याच्या मागे तात्या आपल्यापुढें बसलेल्या गोप्याकडे एकाग्रतेनें पहात बसला होता. जवळच तीन पेट्या आणि बटवा होता. एखादा भाविक किंवा रोगी आला म्हणजे गोप्या त्याच्या अंगावरून अगर तोंडावरून हात फिरवी किंवा त्याच्या मस्तकावर हात ठेवी. एखादे वेळीं मागे बसलेल्या आपल्या साथीदार तात्याला काही खूण करी म्हणजे तात्या चिमूटभर राखाडी ऊर्फ विभूति पुढे करी. अशा रीतीनें स्वामींचें दर्शन आणि प्रसाद मिळाला म्हणजे भाविक रोगी आपल्या शक्तीप्रमाणें त्या तीन पेट्यांपैकीं एकांत काहीं तरी रौप्य नाणीं टाकीत. प्रत्येकवेळीं तिन्ही पेट्या मिळून एका रुपयाचें प्रमाण पडत होतें. परतु आजचा नूर काहीं निराळाच होता. आज बहुतेक बडी बडी मंडळी दर्शनाला येत होती, तेव्हा पेटींत पडणाऱ्या रौप्य नाण्याचाहि नूर बदलून त्यांत सुवर्ण नाणीं पडूं लागली होती.

**९ वा दिवस.**

स्वामी ' शारदा आश्रमा 'त येऊन नऊ दिवस झाले. रात्री नवाचा सुमार झाला होता. आश्रमांत गर्दी ' मी ' म्हणत होती. अशा समयीं स्वामीची स्वारी एकाएकीं धरणीवर आग टाकून धाडकन् पडली. त्याबरोबर सर्व मंडळी एकदम चपापली ! परंतु मागे बसलेल्या' तात्यानें मंडळीला मोठ्या शर्तीनें दूर केलें आणि स्वतः स्वामीपुढें गुडघे टेकून एकाग्र चित्तानें हात जोडून तो बसला. दहा मिनिटे

तेथ इतकी विलक्षण स्तब्धता झाली कीं, खरोखरील त्या वेळचा देखावा अत्यंत गंभीर असा दिसूं लागला. क्षणभरानें भूमीवर निचेष्टित पडलेली बाल-मूर्ति हातानें खुणा करूं लागली. त्या खुणा आपणास कळल्या अशा अर्थाचा आविर्भाव दुसरा ब्रह्मचारी—तात्या—करू लागला. थोड्या वेळानें ती बाल-मूर्ति सावध झाली. आणि अंगाला दोन चार झटके देऊन हात पुढे करूं लागली, तोंच तात्यानें आपल्या कफनीचा पदर पुढे केला. त्यांत बालस्वामीनें एक मूठभर राख टाकली. नंतर तात्यानें स्वतः स्वामीच्या पायावर डोके टेकलें. ते पाहून इतर मंडळींनींहि त्याचें अनुकरण केलें.

" पाव पडो, अंगारा लेवो, और इधरसे जावो " तात्या हातवारे करून बोलू लागला. " गुरुमहाराजका हुकम हुवा, हम अभी कासी विस्वेश्वरको जायगे—उठो—जाव, हमको रजा देव—इधरका हमारा काम खलास हुवा. " असें म्हणून तात्या आपलें चबुगवाळें आटपूं लागला.

एकाएकीं स्वामी जाण्याकरिता निघालेले पाहून सर्व मंडळी आश्चर्यचकित झाली. अकल्पित रीतीनें स्वामी का जातात हें कोणालाच कळलें नाहीं. जो तो पुढे होऊन विचारूं लागला तेव्हा तात्या म्हणाला, " हमको गुरुमहाराजका संदेश आया, और एकदम कासी विस्वेस्वरको जानेका हुकम हुवा. तुम लोग अंगार लेव और आनंद करो. गुरुमहाराज सबका अच्छा करेगा. "

मोठमोठे धनिक, शेट सावकार लोक आपली भीड खर्च करू लागले.

**तयारी.**

स्वामींनीं आणखी एकच दिवस मुक्काम करावा असा सर्वांचा आग्रह पडला. परंतु छे! वेशधारी तात्या म्हणाला, "नहीं बाबा, गुरुमहाराजका संदेश हमकूं रहनेका नहीं हय्. हम रहेंगे तो गुरुमहाराज कोपायमान होंगे ! बस्स–अभी हमकूं यहांसे जाना चाहिये. " सर्वांचा नाइलाज झाला. पुष्कळ जणांची निराशा झाली. कोणी म्हणाले, "अहो, मी आमच्या तिला आज किती दिवस म्हणतों आहे, " अग, चल चल, स्वामी-महाराजाचं दर्शन तरी घे ! एकदा तूं चल म्हणजे खात्री होईल.' पण नाहीं ! आली असती, तर दर्शन नसतं का घडलं ? पण तें तरी दैवीं पाहिजे ना ? अहो, अशा थोर विभूति, आपल्या कोठून दृष्टीस पडायला ! हें एक भाग्यच म्हणा-यच ! " तोंच दुसऱ्यानें म्हटलें, " असं तर खरंच ! मी देखील आज आमच्या कुटुंबाला घेऊन येणार होतों. आणि तिचीहि येण्याची फार इच्छा होती. पण मध्येंच तिला अडचण आली ! तेव्हा ' दैवीं पाहिजे ' असें जे तुम्हीं म्हणत

तेच स्वर ! " हें ऐकून तिसऱ्यानें मध्येच तोंड घातलें. " मीहि माझ्या एका मित्राला कालच पत्र लिहिलं आहे, तो बहुत करून उद्या येईल. पण आता काय उपयोग ? " अशा रीतीने प्रत्येकाच्या तोंडून निराशेचे उद्गार निघू लागले. शेवटी त्याना तितक्या अल्पावकाशात स्वामींच्या जाण्याची तयारी करावी लागली. आज दर्शनाकरिता बडी बडी मंडळी जमली असल्यामुळे पैशाचा प्रश्न नव्हता. आणि इतर मंडळींनीं अंगमेहनत करण्याची कसूर केली नाहीं.

थोड्या वेळानें तयारी होताच स्वामी बाहेर पडले. परंतु 'शारदा आश्रमा'च्या दरवाज्यापर्यंत यावयास त्याना एक तास लागला. मंडळी

**स्वामींचें प्रयाण.**

एकसारखी त्यांच्या चरणावर लोटांगणावर लोटांगणं घालीत होती. दरवाजावर एक धनिक भाटयानें आपली मोटार आणिली. स्वामी मोटरमध्ये बसेपर्यंत मंडळीनीं धावपळ करून पुष्पहार आणून ते स्वामींच्या गळयात घातले. शेवटी मोठ्या प्रयासानें मोटर गाडी चालू झाली. तरी देखील मोटर मागून मंडळी धावतच होती. बोरीबंदरच्या स्टेशनवर पुनः गर्दी जमली. स्वामीकरितां मेलचें एका भाटयाने फर्स्ट क्लासचें टिकीट काढले. मेल चालू होईपर्यंत फंडाच्या पेटींत रुपयाची सारखी भर पडतच होती. असो.

कल्याणचें स्टेशन येताच हळूच फर्स्टक्लासमधून दोन व थर्ड क्लासमधून दोन अशा चार व्यक्ति खाली उतरल्या, आणि मुंबईस परत येणाऱ्या गाडींत बसल्या. वाचक हो, त्या चार व्यक्ति कोण होत्या त्या तुमच्या लक्षात आल्याच असतील ! गोप्या आणि तात्या हे दोघे फर्स्टक्लास मधून उतरले आणि राया व दुसरा बापू हे थर्डक्लास मधून उतरले. मुंबईत येणाऱ्या गाडीत बसल्यावर बापूनें पुनः एकदा खालीं उतरून आपल्या डब्यात दुसरी कोणी मंडळी आहे किंवा काय याची नीट टेहळणी केली. परंतु त्याना भिण्याचें काहींच कारण नव्हते. कारण त्याच्या सबंध डब्यात त्यात चौघाशिवाय दुसरें कोणीच नव्हतें. रायानें बरोबर आणलेले कपडे घालून गोप्या आणि तात्या पुनः आपल्या पूर्व वेषात आले.

क्लबवर आल्यावर त्याच रात्रीं फंडाच्या रूपाने गोळा झालेल्या रकमेचा हिशेब झाला. एकंदर वीस हजार रुपये जमले. 'शारदा

**अनुकरणपटु.**

आश्रमा'त असताना इतर क्लबपैकीं कोणी तरी एकादा मंडळीच्या नकळत तात्याजवळून त्या दिवशीं गोळा झालेली रक्कम घेऊन येत असे. स्वामी आणखी काहीं दिवस आश्रमांत राहते

तर काहीं हजार त्यांना जास्त मिळाले असते यात शंका नाहीं. तरी ' अति तेथे माती ' हें तत्त्व रायानें प्रत्येकाच्या मनावर चांगल्या रीतीनें बिंबविलें होतें-शिवाय त्यांनीं एकाएकीं शारदाश्रमातून बाहेर पडण्याचा बेत केला. त्याचेंहि कारण हेंच कीं, इतर मंडळींना कोठल्याहि गोष्टीचा शोध करण्याचा अवसर सापडूं नये. असो सर्व मंडळी पुनः क्लबवर जमली. हिसोब झाल्यावर इतर मंडळीनीं पूर्वीच आणून ठेविलेल्या फळावर ताव मारण्यास सुरवात केली. त्यावेळीं नऊ दिवसात केलेल्या धाडसाबद्दल चर्चा चालू होती.

" राया, तुझे डोके सुपीक यात काहीं शंका नाहीं. नुसती टोपी ठेवण्याची खुंटी नव्हे काहीं !-इतक्या मंडळीच्या डोळ्यात धूळ फेकिलीस खरी ! " बापू तोंडातील घांस चावित चावित म्हणाला.

" अरे ! यात माझे डोकें कसलें ?-या मुंबईतील लोकांची ही अनुकरणवृत्ति ! हे लोक केवळ मेंढरासारखे आहेत. एकाने खड्डयात उडी टाकिली, कीं मागून सर्वांनी त्याचे अनुकरण केलेंच म्हणून समजावे ! अरे ! सहज एखादा मनुष्य तळ्यात किंवा आकाशाकडे शून्य दृष्टीने पहात असलेला दृष्टीस पडला की, काहीं कालाने त्याच्या भोंवती ह्या अनुकरणपटुंची गर्दी झालीच म्हणून समजावी. सगळेजण त्या विवक्षित जागीं ' आ ' पसरून पहात राहातात. पण आपण का पाहतो हें त्याचें त्यानाच कळत नाही. "

" होय-होय राया. " मध्येच चिंतामण म्हणाला, " तू म्हणतोस ती गोष्ट अगदीं खरी ! परवा मीं एक गमत ऐकिली !-हासतोस काय राजा ! तुझाच तो सर्व प्रताप ! "

" मग हासूं नको तर काय-रडूं वाटतं ? " राजा म्हणाला, " केली जराशी गंमत झाल—"

" काय केलीस ते साग तरी ? "

" अरे गंमत गंमत म्हणून काय विचारतोस ? ती गंमत म्हणजे अशी-" राजा बोलूं लागला. " परवा संध्याकाळीं मी आणि गोपाळ गिरगावांतून येत होतों. तेथे गाधर्व महाविद्यालयाजवळ एका घरांत दुसऱ्या मजल्यावर एक गृहस्थ खिडकीकडे पाठ करून काहीं वाचीत होता. साहजिक माझी दृष्टि वर गेली. तेव्हां त्या गृहस्थाची बोटभर शेंडी वाऱ्याने वर उडत होती. मी त्याकडे बोट दाखवून गोपाळाला थट्टेने म्हणालों, " गोप्या, तो पहा खिडकीत नारद उभा आहे. "

**शेंडें नक्षत्र.**

गोपाळ वर पाहूं लागला. परंतु मी कोठल्या उद्देशानें बोललों, हे प्रथम त्याच्या लक्षात आलें नाहीं तेव्हा मी तेथें क्षणभर थाबून त्याला स्फोट करून सागितलें. गोपाळाच्या तें लक्षात येताच ' आहे खरी त्याची नारदासारखी शेंडी ! ' असें तोहि म्हणाला. त्याच वेळीं आमच्या बाजूनें एक सभ्य गृहस्थ जात होते. आम्ही वर बोट दाखविल त्यावरून तोहि स्वाभाविक वर आकाशाकडे पाहू लागला. तोंच गोपाळने उच्चारलेली ' शेंडी ' हा शब्द त्याच्या कानी पडला. आणि झाल ! – त्याबरोबर त्या गृहस्थानें ' ध ' चा ' मा ' करून ' शेंडी ' चे ' शेंडें-नक्षत्र ' बनविल ! मग काय ? हा हा म्हणता गर्दी जमली. आणि जो तो डोळे फाडफाडून आकाशात ' शेंडेंनक्षत्र ' पाहू लागला. इतक्यात त्या गर्दीतील एक दीडशहाणे म्हणाले, ' काल मी ' टाईम्स ' मध्ये वाचलं कीं, हे शेंडेनक्षत्र मद्रासच्या बाजूला सध्याकाळीं दिसू लागल आहे. तेव्हां तेच हे शेंडेंनक्षत्र असेल. ' तो बाजूला उभे असलेले एक वृद्ध कपी आपल्या डोळयावर हात ठेऊन ' शॉर्ट साईट ' च्या चष्म्यांतून आकाशाकडे पहात म्हणाले. ' आलं बुवा काहीं तरी राज्यावर अरिष्ट ! मी लहान होतों तेव्हा एकदा अस ं लं लांब शेंडें नक्षत्र दिसूं लागलं. त्या सालीं तर आमचं अगदी वाटोळं झाल ! वडील गेले, कुटुंब मेलं—' तोंच त्याच्या बाजूचा दुसरा एक व्रात्य मनुष्य म्हणाला, ' खरं कीं काय ? त्या शेंडें नक्षत्राने तुमचं अगदीं वाटोळं केलं हं ! अरेरे ! वाईट गोष्ट झाली !---पण म्हातारे बुवा, आतां काहीं इतकं भिण्याचं कारण नाहीं. कारण आपले वडील नर गेलेच ! तेव्हा आता पुनः वडील जाण्याची कांहीं भीति नाहीं. पण काय हो, दुसरं लग्नबिग्न केल आहे का ?—दुसरं कुटुंब असेल तर त्याला आणि मुलांना साभाळा. नाहींतर हे आता दुसरं आलं आहे शेंडें नक्षत्र ! तेव्हां त्याच्या मनात आलं, तर करील सर्वत्र निसतान - हो, काय नेम सागावा ह्या शेंडे नक्षत्राचा ? '—अशा रीतीनें आमच्या सहज लीलेनें उत्पन्न झालेल्या त्या शेंडें नक्षत्राची मौज पहात आम्ही तेथें अर्धा तास उभे होतों. "

" ठीक केलंत ! आपण गुरूच आहांत तेव्हा आपल्या सुपीक डोक्याची काय सांगावी थोरवी ? " बापू म्हणाला.

" अर्थात् ! आमच्या सुपीक डोक्याची थोरवी तुझ्या डोंगराळ डोक्याला सागतांच येणार नाहीं. "

" नाहीं येणार खरी ! कारण त्या दिवशीं धोबीतलावावर तूं जशी पोलीसची धादल उडविलीस तशी आम्हाला केव्हांच उडविता आली नसती—"

" काय काय उडविली धादल ? राजा, साग तरी ! आतां गोष्ट ओघाला आली तेव्हा ! " मध्येंच गोऱ्या म्हणाला.

" अरे पोरा ! ती मौज तर और आहे ! " श्रीखडाचा भुरका मारून मोठ्या ऐटीनें राजा म्हणाला. आणि क्षणभरानें तो पुढें म्हणाला,

**माणुस पडला.** " त्या दिवशी काय झालं राया ! — मी आणि बापू असे दोघेजण कोटात जात होतो. आतां ट्राम येईल मग येईल असें करता करता आम्ही धोबीतलावापर्यंत गेलो. परंतु ट्राम काहीं आली नाही. म्हणून आम्ही मैदानाच्या कोपऱ्यावर झाडाच्या सावलींत उभे राहिलो. तेथे दोन तीन विहिरी आहेत. त्या तुम्हाला माहिती आहेतच ! मी सहज त्यापैकी जवळच्या एका विहीरींत डोकावूं लागलों; इतक्यात बापूला काय वाटले असेल ते असो. तेथे जवळच पडलेला एक मोठा धोंडा त्याने उचलला आणि त्या विहिरींत दिला टाकून ! त्याबरोबर मोठा आवाज झाला. तो आवाज ऐकताच बाजूच्या ' फुटपाथ ' वरून जाणारा एक मनुष्य घाबऱ्या घाबऱ्या विहिरीजवळ येऊन " काय झाल हो ? " असें विचारीत आत डोकावूं लागला. तेव्हा त्याची थोडी थट्टा करावी ह्या उद्देशाने मीहि घाबऱ्या घाबऱ्या पुढें झालो. आणि म्हणालो, ' अहो, काय झाल म्हणून काय विचारता ? माणूस पडला आत. तुम्ही नाही का ऐकला आवाज ? '—' हो ऐकला तर ! आणि हे पहा. पाणी केवढ उसळल आहे ते ! ' असे त्यानें उत्तर देतांच मीही मुद्दामच म्हटले, ' अहो, आम्ही त्याला आता धरणार तोच तो असा पडला—! "

" वा: राजा, फार चागली तुझी थट्टा ! ह्या थट्टेच्या पायी किती मोठ-मोठे अनर्थ झाले आहेत, ते आहेत का ठाऊक तुला ? "

" नाहीं बुवा. अनर्थ झालेले नाहींत ठाऊक पण मनसोक्त मौज मात्र पहावयास मिळाली आहे, इतकं आहे ठाऊक. "

" पण-पण, पुढें काय झालं ? "

" मग पुढें-तिकडे गर्दी जमली. आणि शेवटीं पोलिस शिपाई आला. आम्ही दोघेहि तिकडेच, त्या गर्दीत एका बाजूला पुढे

**डोळयांनीं पाहिलें !** काय मौज होते, ती पहात उभे राहिलो. पोलिसाने चौकशी सुरू केली. शेवटीं एका मनुष्यानें विहिरींत जीव दिला, अस ठरलं ! तात्काळ पोलिसाने धोबीतलावावर पहाऱ्यावर असलेल्या आपल्या जोडीदार शिपायास पोलिस स्टेशनवर पाठविलें. थोड्या वेळाने

कॉन्स्टेबलसाहेब आले. पुनः चौकशी सुरू झाली. तेव्हा पोलिसशिपाई बहादूराने छातीला हात लावून ' हा साहेब, हम उधर पहारेपर खडे थे. उधरसे हम खुद्द आंखसे देखा, ओ आदमीने कुवेमे कुदी मारा. "

" भले बहादूर !–अस शिपायाने उत्तर दिलें म्हणतोस ? " चिंतामणीने विचारले.

" अरे, हे शिपायाने उत्तर दिलें, पण आम्हाला प्रथम विचारणाऱ्या मनुष्याने तर ह्यावरहि कडी केली. " बापू म्हणाला, " तो पुढें होऊन म्हणाला, ' साहेब, त्याने उडी टाकली तेव्हां त्याच्या कंबरेला एवढा मोठा धोंडा बांधलेला मला दिसला. ' असें म्हणून त्याने आपल्या हातानें धोंडा केवढा मोठा होता. ते दाखविले. "

" हे त्याने मोठ्या फुशारकीनें सागितल खरे पण ते त्याच्या अंगाशीं आलें ! ' गजा पुढें म्हणाला, " कारण कॉन्स्टेबलनें त्याला विचारले, ' तुम आखसे देखा ?—ठीक है !—शिपाई, ए आदमी साक्षीदार है, उसका नाम लिखके लेना ' इतके कॉन्स्टेबलने म्हणताच—"

त्या बढाईखोराचे तोंड जोडा मारल्यासारखे झाले असेल ! " गजाभाऊ म्हणाला.

**पहारा बसविला.**

"मग कॉन्स्टेबलाने दोघांना आंत विहिरीत उतरवून जीव दिलेल्या मनुष्याचा अर्धा तासपर्यंत शोध करविला. पण आत मनुष्य असेल तर त्याना शोध लागणार ना ? बिचारे एक सारखे पाण्यात बुडया मारीत होते. शेवटीं नाइलाजास्तव जीव देणारा मनुष्य फुगून वर येईल ह्या आशेनें एका शिपायाला त्या विहिरीवर पहाऱ्यावर ठेऊन कॉन्स्टेबल त्या साक्षीदार मनुष्याला बरोबर घेऊन चालता झाला. आणि आम्ही बिन पैशाने मौज पाहिली यांत आनंद मानून एक ट्राम गाठली !"

" मग आता तुम्हींच सांगा !—" राया आपल्या पूर्व विषयावर येऊन म्हणाला, " असे हे मेंढरासारखे अनुकरण करणारे आम्हाला भेटल्यावर आम्ही त्याचा का फायदा घेऊं नये ? शिवाय तुम्ही स्वामी बनला, त्या गोष्टीला ह्या वृत्तपत्रकाराचा आम्हाला पूर्ण पाठिंबा मिळाला ! साधारण मानाने हे वर्तमानपत्राचे संपादक म्हणजे इतरापेक्षा ज्ञानवृद्ध, तपोवृद्ध असायचे असा सार्वत्रिक समज असतो. तेव्हां अशा बडया माणसांच्या मोठेपणापासून होणारा लाभ आम्ही मिळविला, तर त्यात काय वाईट झाले ? "

" वाईट नाहीं तर काय ? " मुद्दामच उलट पक्ष घेऊन राजा जोराने म्हणाला, " इतक्या सगळया लोकाना फसवून आम्ही आपली तुंबडी भरली हें चागल केलं वाटत ? "

" राजा तू, तरी बराच सत्त्वशील हरिश्चंद्रच दिसतोस रे ! आम्ही यात लोकांना काय फसवल साग पाहूं ? उलट अस पहा–विश्वास आहे तेथे देव आहे. धर्मांचें मुख्य तत्त्व विश्वास. एकाद्या दगडाला देव मानून त्यावर विश्वास ठेविला तर तो देखील नवसाला पावतो. मग लोकानी विश्वासाने–आदरबुद्धीने इतकेच नव्हे तर भक्तिभावाने दिलेले पैसे त्याना फसवून घेतले असें कसे बरे होईल ? त्याचा आमच्यावर विश्वास बसला, म्हणून त्यानी आपल्या श्रद्धाळू मनाचे समाधान करण्याकरिता आम्हास पैसा दिला. आणि त्यापासून त्यांना पुण्यच लागणार आहे. कारण आपण त्याची ही विरोधी भक्तिच करीत आहोत."

**मतलब सिंधुंतील तत्त्वें.**

" असं ! एकूण राया, मतलबसिधुचें तुझे अध्ययन बरेच झालेले दिसतें !" बापूने विचारले.

" अरे बाबा ! आज काल ह्या मुबईत दिवस काढणाऱ्याला ह्या मतलब-सिंधूतील तत्त्वांचाच अवलब करायला पाहिजे. "

" आणि जो कोणी ह्या तत्त्वाचा अवलंब करणार नाहीं, त्याला ह्या मुंबईत श्रीखंडाचे भुरकेच मारता येणार नाहींत. " असें म्हणून राजाने एक भुरका मारिला.

अशा रीतीनें हासत खेळत जेवण आटोपल्यावर मडळी पुन्हां खल करण्यास बसली. वास्तविक त्यावेळीं बरीच रात्र झाली होती. तथापि पुढे दिवाळीचा सण असल्यामुळें मंडळींना पुढला विचार करणें अवश्य होते. शेवटीं त्या खलांत असें ठरलें कीं, राया आणि बापू ह्या जोडीनें मुंबईत रहावें आणि बाकीच्या दहा जणांनीं पंधरा दिवसपर्यंत दिपवाळीकरितां आपआपल्याला घरीं जावे.

दिपवाळीचे पंधरा दिवस संपल्यावर पुनः सर्व मंडळी एकत्र झाली आणि पुनः क्लबच्या कामाला सुरवात झाली. ह्या रायक्लबविषयीं एक विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही होती कीं, रायाच्या कडक अमलामुळे आजकाल सर्वसाधारण झालेलें असें क्षुल्लक विडीचें व्यसनसुद्धां त्यांच्या क्लबमध्यें शिरलें नव्हते. यावरून त्यांच्या क्लबची शिस्त वाचकांच्या लक्षांत येईल. त्याचप्रमाणें प्रत्येक गोष्टीची गुप्तताहि

**शिकार पहिली.**

अत्यत सावधगिरीनें राखली जात असे. बाकीची मंडळी दिपवाळी झाल्यावर परत आल्यानतर बापू आपल्या बहिणीला भेटण्याकरिता—भेटण्याकरिता म्हणण्यापेक्षा भाऊबिजेला न गेल्यामुळें तिला आलेला राग घालविण्याकरिता पन्नास रुपयाचा अहेर घेऊन पुण्यास गेला.

रायक्लबातील प्रत्येक व्यक्तीच्या ठायी प्रसगावधान आणि समयसूचकता किती दाडगी असे, याचे पुढील एक चित्र आहे. आपल्या बहिणीचा राग घालवून बापू परत मुबईस येत होता. तो ज्या डब्यात बसला होता, त्या डब्यात दुसरे दोन ब्राह्मण उतारू, एक मराठा आणि घाटावरील भाजी खरेदी करून मुंबईस पाठविणारा व्यापारी असे चार मुंबईस येणारे उतारू होते. पुण्याहून गाडी सुटल्यानतर प्रत्येक उतारूनें आपापली टोपी, फेटा, पगडी काढून बाका वर पाय ताणले. बापूनें एकदा आजुबाजूला—आपल्या प्रवासी बधूकडे—दृष्टि फेकिली आणि खिडकीच्या तावदानावर डोकें टेकलें. थोडया वेळानें बापूच्या बाजूला बसलेल्या ब्राह्मणानें चची सोडिली आणि त्याच्या गप्पा सुरू झाल्या. बराच वेळ त्यांच्या भाषणाकडे त्याचे लक्ष होतें; परंतु त्यात त्याला कांहींच गम्य वाटेना. तेव्हां त्याचे डोक्यातील विचारयत्र सुरू झाले. आपण चार दिवस पुण्यांत असतांना आपल्या मंडळीनें मुबईत काय काय उलाढाल्या केल्या असतील हेच त्याच्या डोक्यातील विचारयंत्रात फिरणारे विचार होते. बराच वेळ झाला, बापू आपल्या विचारात मग्न होता इतक्यात बाजूला आपलें नाव घेतल्याचा त्याला भास झाला. त्याबरोबर चटकन त्यानें आपले कान त्या दिशेला वळविले, तेव्हा शेजारीं बसलेल्या ब्राह्मणांचा खालीं लिहिलेला संवाद त्याच्या कानी आला.

"त्या बापूसाहेबाचंहो काय विचारता? श्रीमंत—मग त्याच दुखणं तरी का श्रीमंत नसाव ! पण अलीकडे त्याच्या डोक्यात शिरलं आहे भलतंच वेड ! त्याना कोणी सागितलं आहे कीं, तुमचा रोग हिप्नाटिझमच्या प्रयोगानीं साफ बरा होईल—"

"कसल्या प्रयोगांनीं म्हटलंत रामभाऊ ?"

"अहो हिप्नाटिझमच्या ! म्हणजे मोहिनी विद्येच्या."

"एकूण मंत्रतंत्राकडे लागलं का लक्ष बापूंसाहेबांचं !"

"तंत्रमंत्र नव्हे हो—ही मोहिनी विद्या म्हणजे एक चमत्कारिक विद्या आहे. अमेरिकेंत ह्या विद्येच्या प्रयोगानें रोगी मनुष्याला झोंप आणून त्याचा कसाही असाध्य रोग बरा करतात."

“ म्हणजे तंत्रमंत्र नव्हे तर काय ? ”

“ मंत्रतंत्र म्हणा, कीं छांछू म्हणा—काहीं म्हटल तरी एकच ! ”

“ बर, मग असा कोणी मिळाला का बापूसाहेबाना मांत्रिक ! अहो त्यांना काय ? त्याच्याजवळ पैसा आहे रगड्डन, त्याना वाटेल तो मांत्रिक भेटेल ! ”

“ अद्यापि नाहीं मिळाला, पण शोधत आहेत. मागे एक कलकत्त्याहून कोणी प्रोफेसर आला होता परंतु त्यावेळी बापूसाहेबाना ह्या विद्येचं इतक महत्त्व आहे अस माहीत नव्हत. ”

“ मग आता त्या प्रोफेसराला बोलवा म्हणून सांगावे की नाहीं तुम्हीं बापूसाहेबांना ! ”

“ अहो, सांगायचं काय ? त्याचाच कलकत्त्याला जाण्याचा विचार आहे अस मी काल ऐकलं. ”

बापूने हा वरील संवाद लक्षपूर्वक ऐकला, तेव्हा त्याच्या मनात एका मागून एक विचार येऊं लागले. शिकार सांपडली परंतु तिला आटोक्यात कशी आणावी याचा काहीं वेळ विचार करून तो रामभाऊकडे वळून म्हणाला, ‘ कायहो रामभाऊ, ओळख नसता मीं आपणास विचारतो म्हणून राग येऊं देऊं नका. पण कायहो, हे बापूसाहेब कुठले ? ”

क्षणभर बापूकडे पाहून रामभाऊ म्हणाले, “ अहो, विचारलत त्यात राग काय मानायचा ! पण तुम्हाला माहीत नाही का हे बापूसाहेब देशमुख इनामदार—सदाशिव पेठेत हौदाजवळ राहतात ते ? ”

“ अस्स काय ! त्यांना काय होत म्हणालात ? ”

“ त्याच्या आज कैक वर्षे पोटात दुखते. शेकडो डॉक्टर झाले, वैद्य झाले, हजारो रुपये खर्च झाले, परंतु गुण म्हणून नाहीं. ”

“ मग ते आतां हा हिप्नाटिझमचा प्रयोग करूं इच्छितात वाटतं ? ठीक ठीक —माझी पूर्ण खात्री आहे, कीं त्या प्रयोगाने वाटेल तो रोग हा हा म्हणता बरा होईल मग ह्या बापूसाहेबांच्या दुखण्याची काय कथा ! अहो फार कशाला ? परवाचीच गोष्ट- आमचे शेठ—कदाचित् तुम्हीं ओळखत असाल मुंबईचे प्रसिद्ध शेठ जगजीवनदास नारायणदास—त्याच्या मुलीचे डोके चार वर्षे झाली अस ( स्वतःचे डोके हालवून ) सारखं हालत असे. नाहीं म्हणायला ती झोपे तेव्हा मात्र त्या डोक्याला विश्रांति ! नाहींतर सदानकदा आपलं हे अस डोक्याचं यंत्र चाल-

लेल ! शेवटीं पुष्कळ उपचार केले, तुम्हीं म्हणता त्याप्रमाणें शेकडो डॉक्टर झाले, हजारो वैद्य झाले, लाखो रुपये खर्च झाले आणि आहेतहि लक्षाधिश म्हणा— त्याना काय कमी आहे परतु इतकेहि करून गुण नाहीं तो नाहीच ! परतु म्हणतात ना—' भोग सरता आणि वैद्य पुरता ' मोठ्या आढ्यतेचा आव आणून बापू बोलत होता. ' तो परवां प्रोफेसर राय म्हणून एक बंगाली गृहस्थ मुंबईत आले. त्याना आमच्या शेठजीनीं बोलविले. त्या प्रोफेसराने एकदांच प्रयोग केला परंतु काय चमत्कार सागावा ? खाड्दिशी मुलीचे डोके थाबले ! आणि हा सारा पाचच मिनिटांचा खेळ ! आपण तर बुवा नव्हती अशी विद्या पाहिली त्याने तिला अशी समोर खुर्चीवर बसविली — मुलगी काही फार मोठी नाही, सारी अकरा वर्षाची आहे—आणि त्याने आपल्या खिशांतून घड्याळ काढून ते तिच्या हातात दिले व पाच मिनिटे कांटा कसा चालतो, ते पहाण्यास सागितले. मुलगी घड्याळाकडे पाहू लागली, तेव्हा त्याने मागे उभें राहून तिच्या मानेवरून वर खालीं असे दोन चारदा हात फिरविले. तोच मुलीनें मान मागे टाकिली आणि डोळे मिटले. मग हळूच उचलून त्याने तिला कोचावर निजविले आणि म्हणाला, ' आजपासून तुझे डोक पूर्वीप्रमाणें कधीहि हालणार नाही. बोल — नाहीना कधी हालणार ? ' तेव्हां काय चमत्कार सांगावा ? त्या मुलीनें झोपेतून ' नाही ' असें स्पष्ट उत्तर दिले. मग तिला ' उठ ' म्हणून म्हणताच मुलीने चटकन् डोळे किहो उघडले ! आणि मौज ही कीं, डोके हालायच जे बंद झाले ते कायमच ! मग काय विचारता आमच्या शेटनीं त्या आनदाने मिठीच मारिली ! बरोबरच आहे. का नाही होणार आनंद ! तुम्हींच सांगा ? मग शेटनी आपल्या बोटातील बहुमोल हिऱ्याची आगठी आणि रोख रुपये हजार मिळून दोन अडीच हजाराची त्या प्रोफेसराला बिदागी दिली ! ''

" अहो रोग बरा झाल्यावर खुषीने कोण नाहीं देणार ? '' रामभाऊच्या मनावर बापूच्या लाघवी भाषणाचा बराच परिणाम झाला. ते पुढे म्हणाले, " मग ते प्रोफेसर आहेत का सध्यां मुंबईत ? "

" ते काहीं नक्की मला ठाऊक नाहीं. त्या दिवशीं जाणार होते ते अयोध्येला. तिथल्या बेगमच्या पोटात म्हणे गोळा उठला आहे. त्याना काय हो, पैसा मिळाला कीं चालले हे समुद्रापलीकडे ! धंदाच त्यांचा तो ! बाकी तुमच्याकरिता म्हणून मुंबईस गेल्यावर चौकशी करीन पाहिजे तर. अहो म्हणतात ना — आपल्या हातून होत असेल तर हस्ते परहस्ते तरी कोणाचें

काम करावे ! म्हटलं परोपकाराचं काम आहे हें ! आणि परोपकाराच्या कामांत मागे घ्यावयाचं नाहीं हा तर आहे माझा बाणा ! ”

“ मग कराच इतकं काम. तुम्हीं आता सांगितलं त्या हकीकतीच सविस्तर पत्र मी उद्यां लिहितो बापूसाहेबाना ! तुम्हीं म्हणता हे प्रोफेसर राय मुंबईत असल्यास—”

पण हें पहा रामभाऊ, प्रोफेसर साहेब मुंबईत आले असले तर ते पुण्यास जातील. कारण मघा म्हटलंच कीं त्यांचा तो धंदाच आहे. आणि बापूसाहेबांचा रोगहि खात्रीनें बरा करतील. पण हे पहा, प्रोफेसर साहेबांची भूक आहे फार मोठी ! ”

“ अहो सांगितलंना, रोग बरा झाल्यावर पाचशें काय आन् आठशे काय ? कोणीहि खुषीनं देईल —”

“ बस्‌बस्—अहो आणखी काय घेणार ? मग आता अस करा, तुमचा मुंबईतला द्या मला पत्ता. म्हणजे एकदोन दिवसात प्रोफेसर साहेब येथे आहेत किंवा काय तें येऊन तुम्हाला अवश्य कळवितों. ”

रामभाऊकडून त्यांचा मुंबईतील पत्ता लिहून घेतल्यावर बराच वेळ बापूने इतर विषयांवर आडव्या तिडव्या परंतु विषयाला धरून गप्पा मारल्या आणि डब्यांतील सर्वांना गार करून टाकलें. कल्याणचं स्टेशन आल्यावर त्यांच्या डब्यात थोडी गर्दी झाली, त्यामुळें त्याचे भाषण बंद झाले. डब्यांत गर्दी झाली हें बापूच्या फायद्याचेंच झालें. कारण हातीं घेतलेल्या कामाचा स्वतंत्र रीतीने विचार करण्यास त्याला मुबलक वेळ मिळाला. संध्याकाळीं साताच्या सुमाराला गाडी बोरीबंदर स्टेशनवर आली. रस्त्यावर येतांच प्रथम चहापान करून गिरगांवांत जाणारी ट्राम त्यानें गाठली. त्यावेळीं मंडळीचे जेवण तयार झाले असून सर्वजण बापूच्या येण्याचीच वाट पहात होते. बापू आत आलेला पाहातांच राया पुढें होऊन म्हणाला, “ या बापूसाहेब पुणेकर. कशी काय आहे पुण्याची खबर ? ”

“ खबर काय विचारतां ! मी आणली आहे जाळ्यांत पकडून शिकार फक्त बार भरण्याची खोटी—”

“ अहो पंडित, प्रथम आमच्या पोटात बार भरूं द्या मग उडवूं तुमचा बार ! ” राजा मध्येंच म्हणाला.

सर्वांचें हांसत खेळत जेवण झाल्यावर मंडळी एकत्र बसली. परंतु मन्या आणि

च्याच्या याना मडळींत येऊन बसण्याला थोडा वेळ लागला. कारण मंडळीच्या स्वयपाकाची कामगिरी त्याच्याकडे होती. सर्व एकत्र झाल्यावर बापूनें गाडींत गाठलेल्या शिकारीची सर्व हकीकत त्याना सागितली. बराच वेळ विचार केल्यावर राया म्हणाला, " आहे खरी शिकार ! बाकी कांहीं म्हणा बापू, हा सर्व खुळ्यांचा बाजार आहे. खर म्हणशील तर ह्या गोप्याकडे पाहिलें कीं, त्यानें शारदा आश्रमात उडविलेल्या गोधळाची आठवण होऊन मला सारखं हसू लोटतं ? म्हणतात ना, 'दुनिया झुकती है लेकिन झुकानेवाला चाहिये.' अद्यापि आमच्या बालस्वामीच्या प्रशंसेची पत्रें वर्तमानपत्रात प्रसिद्ध होतातच ! "

" पण राया, असे कसे रे हे लोक अगदींच दुधखुळे ! इतका देखील सारासार विचार त्यांना असू नये काय ? " श्रीपादनं विचारलें.

" आमच्या लोकाना सारासार विचार कमी म्हणून तर त्याच्या अकलेची हीं प्रदर्शन आपल्या दृष्टीस पडतात. त्यातल्या त्यात शहराच्या ठिकाणीं जास्तच ! अशा ह्या अतिशहाण्या पण मेंदू बिघडून खुळ लागलेल्या लोकांच्या डोळ्यांत झणझणीत अंजन घालण्याकरिता मधून मधून आमच्या गोप्यासारखे बालब्रह्मचारी स्वामी त्याच्याकडे पाठविले पाहिजेत. अलीकडे ह्या मुंबईत पहावे तो जिकडे तिकडे रगीबेरगी पाट्या प्रत्येक घराला लागलेल्या ! हे कोण तर म्हणे प्रसिद्ध प्राणाचार्य वैद्यराज ! पण इतकं बर आहे, की गाढवाच्या लेकाला ठेच लागूनच त्याचा प्राण जातो ! दुसरी पाटी पहावी तो मसण्यासाहेब सामुद्रिक, तिसरी पहावी तो प्रोफेसर दगडसाहेब काकडे हिप्नाटिझमवाले; तोच मध्ये एकादा दीडशहाणा उठतो आणि आपण कोण ? तर म्हणे, सामुद्रिक, ज्योतिषी, वैद्यराज इत्यादि अठरा धान्याचं कडबोळं असून शिवाय मेस्मरिझम् शिकवितो, हिप्नाटिझम्चा क्लास काढला आहे, योगाचीं साधनं करतो आणि रात्रीं गल्ली कुचींत शेण देखील खातो—"

**बकाल मुंबई**

" जाऊं दे रे राया, ह्या बकाल मुंबईतील बकाल लोकांच्या गोष्टी करून डोक्याला का उगाच विकल करतोस ? " राजा म्हणाला.

" अस तर खरंच ! ह्या बकाल गोष्टींचा खल करून स्वतः मात्र बकाल होण्याची वेळ यावयाची ! बाप्या म्हणाला.

" पण राया, मला एकच गोष्ट सांग. खरंच कायरे मी दिलेल्या आगाऱ्याचा लोकाना गुण आला ? " गोप्यानें जिज्ञासेनं विचारल.

"काय गुण? ह-ह-हं—" असें म्हणून सर्व जण खो खो करून हसूं लागले.

"एकूण तुला, आपण खरोखरीच ब्रह्मचारी—योगाभ्यासी साधु आहोत असं वाटतं कीं काय?" राजा म्हणाला "वेड्या, असा जर विवक्षित व्यक्तीची भूमिका घेऊन गुण येता तर तुझ्याचमारखी तुकाराम महाराजाची भूमिका घेणारे आमचे नाटकी नट प्रत्येक प्रयोगाला खरोखरीच स्वर्गाला जाऊन आले असते—"

"मग वर्तमानपत्रकर्ते काय लिहितात की, इतक्या लोकाना गुण आला? इतके—"

अस असं! वर्तमानपत्रकर्त्यांची सर्टिफिकेट्स् मिळाली म्हणून म्हणतोम काय?" राया म्हणाला, "अरे वेड्या, ह्या वर्तमानपत्र-

**राक्षसी मूल.** कर्त्यांच्या लेखणीवर कधींहि शहाण्यानें विश्वास ठेवूं नये. त्याचें काय? बातमी देणारा जसें सांगेल तसें लिहावयाचें! त्यात खरं खोट पाहतो कोण? आता तुझ्या बाबतींत त्याना बातमी देणारा 'खास बातमीदार' आपले सन्माननीय प्रसिद्ध रेशिमाचे व्यापारी राजारामपत हे होते. झाल—जसा खरा बातमीदार त्याचप्रमाणें खरी खोटी बातमी! वास्तविक सरळ बातमी द्यावयाची ती सोडून राजानें काय बातमी दिली बर? हिमालयाच्या बर्फाच्छादित शीतल प्रदेशात वास्तव्य करणाऱ्या दोन विभूतींपैकी बालवयाची विभूति मुकी आहे. आहेस का तू मुका? त्याचप्रमाणं तुझ्या अंगाऱ्याची गोष्ट फार कशाला? मी एक उदाहरण देतो—आमच्या गावची गोष्ट. एका बाईचा प्रसूतीचा काळ जवळ आला होता. तिचा तो प्रथम प्रसंग होता, त्यामुळें प्रसूत वेदना तिला असह्य होऊन ती विव्हळूं लागली. बिचारीचा नवरा किंकर्तव्यमूढ होऊन सैरावैरा पळूं लागला. त्याला वाटेत एक स्नेही भेटला त्यावेळीं समर्पक उत्तरं देण्याचंहि भान नव्हत. त्यामुळें त्या मित्राचा समज भलताच झाला. त्याला दुसरा एकजण भेटला तेव्हा त्याच्याजवळ सागताना या मनुष्यानें पदरचें मीठच लावून ती बातमी त्याला सांगितली. पुढे त्या दुसऱ्या मनुष्याला तिसरा मनुष्य भेटला. त्यानें ती बातमी सागताना त्या बातमीला आपल्या पदरची मिरची लावली, अस होतां होता एका अर्ध्या तासात सर्व गावात अशी बातमी पसरली कीं, गोपाळरावाच्या बायकोला एक राक्षस मूल झालं, त्याला लांब लांब जटा आहेत, अक्राळ विक्राळ दाढी आहे आणि हातांत गदा आहे." अशा तऱ्हेची बातमी पसरते तों दुसरा एक मनुष्य तेथें येऊन सांगूं लागला, 'अहो

त्या राक्षसी पोरान गोपाळरावाच्या बायकोला नखांनी फाडफाडून मारल आणि आता ते आईचं प्रेत खात बसल आहे, हें मी प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिल.' अशी ही प्रत्येकानें स्वचक्षूनी पाहिलेली अगदी खरी खरी बातमी बाहेर पडते न पडते तों स्वतः गोपाळराव तेथे धावत आले. बिचारा अगदीं वेडा बनला होता. कारण प्रसूतवेदना असह्य होऊन त्यातच त्याच्या बायकोचा अंत झाला होता. त्याला धावत आलेला पाहून मडळी विचारू लागली. तेव्हां त्यानें 'झाला - आमचा ससार आटोपला!' इतक उत्तर दिल. परंतु मडळी काय समजली 'झाला' ह्या शब्दाच्या ऐवजीं 'आला—' हा शब्द ऐकून 'अरे पळा पळा आला राक्षस आला,' असें म्हणून ती सर्व मडळी धूम पळत सुटली, त्याच्या मागून सर्व गाव पळत सुटला. हीच बातमी दुसऱ्या दिवशीं प्रसिद्ध वर्तमापत्रात रकानेच्या रकाने भरून का! आहे कीं नाहीं वर्तमानपत्रकर्त्यांच्या खास बातमीदाराची बातमी?"

"पण राया मी सागितल त्या गोष्टीच काय। ही पुण्याची शिकार तू साधणार कीं नाहीं!" बापूनें मध्येच विचारल.

"साधणार म्हणजे आतां काहीं प्रश्न उरला आहे कीं काय?" क्षणभर विचार करून राया पुढें म्हणाला, "हिप्नाटिझमच्या प्रयोगानें बापुसाहेबाचा रोग बरा करावयाचा ना?—ठीक आहे तें काम माझं! अरे, यात काय आहे? हा सर्व फसवेगिरीचा खेळ आहे."

"अस कसं म्हणतोस राया?" बापूने विचारल, "किती झाल तरी तें मानसिक शास्त्र आहे ना?"

"असेल! नाहीं कोण म्हणतो! शास्त्र ह्या दृष्टीने ते उत्तमच आहे. पण ह्या मुंबईतील प्रोफेसरांनीं त्या शास्त्राचा कसा उपयोग माडला आहे, तो तुला ठाऊक आहे काय?"

"नाहीं बुवा!"

**प्रोफेसरांची शिष्य मंडळी.**

"म्हणूनच म्हणतों ह्या शास्त्राचा उपयोग मुंबईत निव्वळ फसवेगिरीकरिताच होतो. कारण ह्या मुंबईत असा एक प्रोफेसर नाहीं कीं ज्यानें छातीला हात लावून 'आपण ह्या शास्त्राचा पूर्ण अभ्यास केला आहे' असें सांगेल. बोलून चालून हें मानसिक शास्त्र? यांत प्रथम मनाची शुद्धता लागत असते. आणि ती शुद्धता आमच्या मुंबईतील प्रोफेसराच्या ठायीं एक हजारांश हिश्शानें

असेल किंवा नसेल, हाच पहिला प्रश्न आहे, फक्त तें शास्त्र वाचून जर त्या शास्त्रात मनुष्य पारंगत होतो, असें असते तर मग सरकारला युनिव्हर्सिट्या स्थापन करण्याचा इतका खटाटोप तरी कशाला पडला असता ?"

"असं जर आहे, तर मग राया, हे प्रोफेसर दुसऱ्या माणसावर प्रयोग करतात तें कसं ?"

"हीं जी तूं दुसरी माणसं म्हणतोस, तीं त्या प्रोफेसरांची शिष्यमंडळीच असते."

"असं कसं होईल ? आपण पाहतों ना, कीं एकाद्या सभेत हे प्रोफेसर प्रयोग करीत असता भर सभेतील वाटेल त्या मनुष्याला उठवून त्याच्यावर प्रयोग करून दाखवितात."

"होय, कबूल. तू म्हणतोस त्याप्रमाणे ते भरसभेंतून ज्या मनुष्याला उठवितात, तो मनुष्य त्याचा शिष्यच असतो. आता लांब

**मानसिक शक्तीचीं** कशाला ? परवा गिरगावात त्या 'सारस्वत विद्यावर्धक

**लोकोत्तर कामें** समाजाचे' गॅदरिंग होते. त्या ठिकाणीं एक प्रोफेसर आणले होते. परंतु मौज अशी की, जी मंडळी गॅदरिंगला बोलाविली होती, त्यांना पासीस दिल्या होत्या. अर्थात् ही गोष्ट प्रोफेसरसाहेबांना माहिती नव्हती. ते आले, तेव्हा त्याच्याबरोबर फक्त दोनच गृहस्थ आले होते. त्याना पासाशिवाय आत जाता आले. परतु थोड्या वेळाने त्याचे एक शिष्य सभ्य पोषाख करून तेथे येऊं लागले. त्याना वाटल कीं आपण इतर मंडळी-बरोबर सहज आंत जाऊं व निरनिराळ्या ठिकाणीं बसूं. परंतु तसं काहीं त्याना साधलं नाहीं. शेवटीं 'आम्ही प्रोफेसरसाहेबांच्या ओळखीचे आहोत, आम्ही त्याचे शिष्य आहोंत, त्यानीं आम्हाला बोलाविल आहे.' असें जेव्हां त्यानीं सांगितले, तेव्हा त्यांना आत जाऊं दिले. पुढें प्रयोगास सुरवात झाली. प्रोफेसर साहेब उठले. आणि 'आतां मी आपणापैकी एखाद्या गृहस्थावर प्रयोग करून मानसिक शक्तीनें किती लोकोत्तर कामें करता येतात तीं दाखवितो असें म्हणून ते जमलेल्या जनसमूहाकडे न्याहाळून पाहूं लागले. थोड्या वेळानें एका गृहस्थाकडे बोट दाखवून ते म्हणाले, 'अहो, आपण जरा इकडे या भिण्याचें कांहीं कारण नाहीं. या—' तेव्हां तो गृहस्थ कचरत कचरत इकडे तिकडे पहात उठला. नंतर तो गृहस्थ जवळ आल्यावर प्रोफेसरसाहेबानीं त्याला आपणासमोर एका खुर्चीवर बसविले, आणि आपल्या डोक्याकडे पहावयास

सांगून ते त्या गृहस्थाच्या डोक्यापासून खाली थोड्या अंतरावरून ' पासीस ' करूं लागले. थोडा वेळ ही क्रिया झाल्यावर ' आतां तुम्हाला झोंप आली. तुम्हीं आतां झोपाल. ते पहा तुमचे डोळे मिटले. तुम्हांला गाढ झोंप लागेल. तुम्हाला झोप आलीच पाहिजे.' अशी प्रोफेसरसाहेबांची बडबड सुरू असताना त्या गृहस्थानें डोळे मिटले. आणि तो झोंपी गेला. थोड्या वेळानें ' आतां तुम्हीं घोरूं लागलां. ' असें प्रोफेसरसाहेबानीं म्हणताच तो गृहस्थ घोरूहि लागला ! "

" हे कसे रे राया ?—तू म्हणतोस ही फसवेगिरी आहे मग त्या गृहस्थावर प्रोफेसराच्या मानसिक शक्तीचा परिणाम होऊन तो झोंपला कसा ? "

" फसवेगिरीनेंच झोंपला ! आणि फसवेगिरी कशी तेंहि सागतों. " राया म्हणाला. " नंतर त्या प्रोफेसराने झोंपलेल्या गृहस्थास वर उठावयास सागून त्याला नाना प्रकारचे वेडे चाळे करावयास लाविले."

" काय काय करावयास सागितलें तें तरी आम्हाला ऐकूं दे. "

**सभ्य फसवेगिरी.**

" त्यात काय ऐकावयचं ?—त्यानें उलट्या खुर्चीवर त्यास बसावयास सागितलें आपण बायको आहोंत अशी कल्पना करून पदर सावरित, मुरडत आणि लाजत चालावयास सागितलें. त्याचप्रमाणें आपण मोठे तिस्मारखा गवई आहोत अशी त्याची कल्पना करवून मोठ्या ऐटीनें त्यास गावयास बसविले. तों मध्येंच मोठमोठ्यानें ओरडावयास सांगितलें. असा हा प्रयोग चालू असताना मंडळींची चागलीच करमणूक होऊन त्यांचीं हसता हसता पोटें दुखलीं. अशा रीतीनें प्रोफेसर साहेबांचा प्रयोग ऐन रंगांत येत चालला होता इतक्यांत दरवाजावर असलेला मनुष्य प्रोफेसर साहेबाजवळ जाऊन म्हणाला, ' अहो, प्रोफेसरसाहेबाचे पट्ट शिष्य, उठा आतां फार झोप घ्याल तर आळशी व्हाल. उठा—एवढ्या मंडळीपुढें मघापासून ओरडता काय, आरडतां काय, बायकांसारखे नखरे काय करता ? तुम्हाला लाज नाहीं वाटत ? ' त्या मनुष्यानें असे म्हणताच प्रोफेसरसाहिब रागानें उठले. तोंच तो मनुष्य पुढें म्हणाला, " जाऊं द्या आतां प्रोफेसरसाहेब. उगाच परीक्षा नका पाहूं ! तुमची ही फसवेगिरी माझ्या पूर्णपणें लक्षांत आली आहे. हा आपला शिष्य आहे."

" पण खरोखरीच का तो प्रोफेसराचा शिष्य होता ? "

" होता म्हणजे अद्यापि तुला शंका आहे कीं काय ? अरे, असे हे शिष्य

२

प्रोफेसरसाहेबांच्या प्रयोगाच्या दिवशीं गर्दीत प्रेक्षक म्हणून यावयाचे, आणि मग त्यानाच निवडून प्रोफेसराचे त्याच्यावर प्रयोग चालावयाचे ? ”

“ काय हें भयंकर धाडस ! ”

“ अरे यांत धाडस कसल ? ही सभ्य रीतीनें फसविण्याची सभ्य प्रोफेसराची सभ्य फसवेगिरी ? काय ममजलास ? ”

“ मग पुढे काय झालं त्या प्रोफेसरसाहेबाचं ? ”

“ व्हायच काय ? मंडळींना ही गोष्ट कळताच त्यानी प्रोफेसरसाहेबाची पक्की रेवडी उडविली. तेव्हा तोंडात शेणानें भरलेला जोडा बसल्याप्रमाणें तोंड करून स्वारीनें तेथून पळ काढला. त्या दिवसापासून त्यानें प्रोफेसर हें नाव अजिबात टाकून दिलें. ”

“ मग आतां ते प्रोफेसरसाहेब काय धदा करतात ? ”

“ कोणास ठाऊक—करीत असतील गावांत ‘ भिक्षान्देही ’ पण बापू, मी पहा ह्या तुझ्या पुण्याच्या बापूसाहेब इनामदाराकडून पाचशे रुपये कसे खिशात उतरवितो तें ! ”

नंतर दुसऱ्या गोष्टींचा खल होऊन मडळी स्वस्थ चित्तानें झोपली. दुसऱ्या दिवशीं ठरल्याप्रमाणें सायंकाळी बापू रामभाऊच्या बिऱ्हाडीं गेला. प्रोफेसर राय साहेब अद्यापि मुंबईतच आहेत, परंतु परवां ते अत्यत जरूरीच्या कामाकरितां लखनौला जाणार आहेत. तरी देखील वेळात वेळ काढून त्यांनीं पुण्यास जाण्याच अभिवचन दिलं आहे, वगैरे बातमी सागून त्याने रामभाऊंना पुण्यास पत्र लिहिण्यास सागितलें. त्या पत्रात प्रोफेसरसाहेब शनिवारी बरोबर चार वाजता येतील. फी रुपये पाचशें द्यावी लागेल वगैरे हकीकत लिहावयास सागितली. रामभाऊंनींहि त्याप्रमाणें बापूसाहेबाना ताबडतोब पत्र लिहिले.

शनिवारीं अकरा वाजता पुण्याच्या स्टेशनवर साध्या पोशाखाची सहा मंडळी उतरली. त्यांच्या बरोबर एक लहानशी ट्रक होती.

**प्रोफेसर राय.** ही सर्व मंडळी वाचकांनीं ओळखलीच असेल !—हे सहाजण म्हणजे राया, राजा, गजाभाऊ, अण्णा, तात्या आणि बाप्पा होते. सर्वजण प्रथम स्टेशनजवळील एका उपहारगृहांत उतरले. चहापान झाल्यावर गजाभाऊ आणि अण्णा हे दोघे इनामदाराच्या घराचा भेद काढण्यास बाहेर पडले. घराचें तोंड कोठल्या दिशेला आहे, रस्ता कोठून आहे, खिडक्या कोठें आहेत, इनामदारांची बैठक कोठें असते वगैरे सर्व

गोष्टींचा तपास करून एका तासांत दोघे परत आले. नंतर स्नान करून त्यांनी भोजन उरकून घेतलें आणि पुनः एक वेळ त्यांची मिटींग जमली. दोहोंच्या सुमारास राया ट्रंक उघडून कपडे करू लागला. फर्स्ट क्लास इंग्लिश स्टाईलच्या सूट-बूट शिवाय डोळ्याना सोन्याचा चष्मा आणि हाताला सोन्याचें रिस्टवॉच अशा थाटाने तो प्रोफेसर बनला. इतकी तयारी झाल्यावर त्याने ट्रंक मधून 'मेकिंग बॉक्स' काढून तोंडाला किंचित् ठिकाणीं बेमालूम रीतीनें रंग लाविला. त्यामुळें त्याच्या चर्येत इतका फरक पडला कीं तो प्रति यूरोपियनच दिसू लागला. अशा रीतीने स्वतःची तयारी झाल्यावर त्याने आपल्या साथीदाराना निरनिराळे वेष दिले. त्याविषयीं पुढे उल्लेख होणारच आहे. नंतर हातांत बॅग आणि छत्री घेऊन राया बाहेर पडला. जातांना त्यानें पुनः एकवेळ सर्वांना त्यानीं घेतलेल्या भूमिकेची आठवण देऊन 'टाईम चूकवूं नका' असे तिनतिनदा बजाविलें.

सध्याकाळीं बरोबर चार वाजतां सदाशिव पेठेत हौदाजवळ बापूसाहेब इनामदाराच्या घरापुढे एक गाडी येऊन उभी राहिली. गाडी आलेली पहातांच घरातून एक गृहस्थ पुढे आला. दरवाज्यांत इनामदाराचीं मुलें उभीं होतीं. तो मनुष्य पुढे आलेला पाहातांच प्रोफेसर साहेबांनीं विचारलें, "बापूसाहेब देशमुख इनामदार इथेंच राहतात.

"होय. आपण कोण रायसाहेब काय ?"

"होय." गाडींतून उतरत असतां राया म्हणाला.

दुसऱ्या मनुष्यानें प्रोफेसरसाहेबांची बॅग घेतली. आणि ते घरात जाऊ लागले. जातां जाता 'बापूसाहेबाची प्रकृति कशी काय आहे ?' असा रायाने प्रश्न केला. तेव्हा आज सकाळपासून पोट अतिशय दुखत असून बापूसाहेबाना चैन नाहीं, असें त्यानें उत्तर दिलें. पुनः रायाने विचारलें—'आपण कोण ?' मी त्यांचा खाजगी कारकून.' इतकीं प्रश्नोत्तरें होईपर्यंत प्रोफेसरसाहेब वरल्या दिवाणखान्यांत बापूसाहेब झोपले होते तेथें गेले.

"गुडमॉर्निंग बापूसाहेब." राया म्हणाला.

"गुडमॉर्निंग प्रोफेसरसाहेब." बापूसाहेब उठत असता म्हणाले, "या. बसा."

पुढें केलेल्या खुर्चीवर बसल्यावर राया म्हणाला, "हा किती दिवसाचा आजार आहे ? कळूं द्या पाहूं सगळी तुमची हकीकत ?" टोपी काढून बाजूला

वळून कारकुनाला राया पुढें म्हणाला, " हें पहा, थोडं स्वच्छ– निर्मळ पाणी घेऊन या—हा कोण तुमचा मुलगा वाटत ?—ये बाळ, येथें ये. मी तुला मौज दाखवितों. " दरवाजांत उभा असलेल्या आठ वर्षांच्या मुलाला पाहून, " तुझं नांव काय साग पाहूं ? शाळेत जातोस का ? काय शिकतोस बाळ ? – दुसरी इयत्ता ! वा: गुड बॉय." असें म्हणून रायानें मुलाच्या पाठीवर हात फिरविला.

बापूसाहेब आपली कर्मकथा सांगतच होते. थोड्या वेळाने पाणी आल्यावर रायाने हात धुतले. आणि टॉवेलने हात पुसत पुसत तो म्हणाला, " अशी आहे म्हणतां तुमची हकीगत. काहीं काळजी करूं नका. आपणास मी एका प्रयोगांतच बरे करतो—काय समजलां ? मला ही तुमची हकीगत ते कोण– रामभाऊ नाहीं का त्याचें नाव—होय –रामभाऊच. त्यानीं मला सांगितली. हे पहा बापूसाहेब, आमच्या ह्या प्रयोगाचा परिणाम रोग्याच्या मानसिक शक्ती-वर मुख्यत्वेकरून अवलबून असतो. आता आपणाला मी बरा तर करणारच, यांत कांही शंका नाहीं—पण आपल्या मनाचीहि तशी तयारी झाली पाहिजे. ह्या पूर्वी आपण असे प्रयोग कदाचित् करूनहि घेतले असाल आणि त्यापासून काहीं गुण आला नसेल तर हा दोष ह्या विद्येचा नव्हे. ही एक अत्यंत उप-योगी विद्या उल्लु माणसाच्या हातात पडल्यामुळे तिचा असा चुथडा झाला आहे. करितां आपण असें लक्षात ठेविलें पाहिजे, कीं ही विद्या म्हणजे प्रत्यक्ष अश्विनीकुमाराकडून म्हणा किंवा त्याच्याही पेक्षां अत्यंत उच्च पायरीकडून म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वराकडून आम्हाला ही अमृतसंजिवनी प्राप्त झाली आहे. ज्याप्रमाणें जालीम विष मारक आहे अन् तारकहि आहे त्याचप्रमाणें ही विद्याहि आहे. परंतु त्यात मौज ही कीं, ती लायक आणि योग्य माणसाच्या हातीं पडली पाहिजे. आतां ह्या विद्येला लायक म्हणजे खरोखरच त्याला ही विद्या अवगत आहे किंवा नाहीं याची पारख कशी करावी हा एक प्रश्न असतो " असें म्हणून रायाने आपल्या खिशातून सिगारेटची बॉक्स_काढिली आणि एक सिगारेट पेटवून काडी टाकण्याकरितां तो उठला. खिडकींतून काडी टाकल्यानंतर क्षणभर खिडकीजवळ उभें राहून तो बापूसाहेबांकडे वळून म्हणाला, " आतां ह्या लायक मनुष्याची पारख कशी करावी तें सांगतो. इकडे या. मी तुम्हाला त्याची प्रचीति दाखवितों. " बापूसाहेब उठले आणि खिडकी जवळ गेले. तें पाहून मुलें, कारकून आणि बायका दुसऱ्या खिडकीजवळ मोठ्या जिज्ञासेनें जाऊन उभ्या राहिल्या.

" हा रस्ता काहीं विशेष वाहता नाहीं म्हणायचा ! " रायाने विचारलें.

" म्हणण्यासारखा नाहीं. तरी सायकाळीं जरा जास्त रहदारी असते. " बापूसाहेबांनीं उत्तर दिलें. थोड्या वेळानें एक गाडी येताना दृष्टीस पडली.

" ह्या अशा ब्रूम गाड्याहि आहेत का पुण्यात ! वाः मग आमच्या कलकत्त्यासारखंच ! एक्का – ब्रूम — पण काय हो, आपणाला लायक मनुष्याची पारख करावयाची आहे ना ? तर ह्या गाडीवरच मी प्रयोग करतो म्हणजे माझ्याविषयींची आपली खात्री होईल. काय समजला ? हातच्या कांकणाला आरसा कशाला पाहिजे ? पहा हं आता—"

गाडी भरधांव येत होती. आत एक फेटा बाधलेला वयस्क गृहस्थ बसला होता. रायानें क्षणभर हात चोळून खिडकींतून त्या गाडीकडे पाहिलें आणि म्हणाला, " माय् उईल—मस्ट स्टॉप धी क्यारिएज. ( माझी इच्छा—गाडी उभी राहिलीच पाहिजे ) राया असें म्हणताच ती भरधाव गाडी रस्त्यात खाडकन् उभी राहिली. तें पाहून बापूसाहेबाना व इतर मडळींना अत्यत आश्चर्य वाटले. नंतर राया म्हणाला; " आमच्या बापूसाहेबाच्या पोटात कशी कळ येते तें पाहण्याची माझी इच्छा आहे, " इतकें राया खिडकींत म्हणताच गाडींत बसलेल्या गृहस्थाच्या पोटात कळा येऊन तो गाडींतच तळमळू लागला. त्याबरोबर गाडीवानानें उतरून त्यानें आत बसलेल्या गृहस्थाचें पोट दाबून धरले. त्याची क्षणोक्षणीं वाढत असलेली तळमळ पाहून बापूसाहेबांची खात्री पटूं लागली. ते एकदम म्हणाले, " अशीच हो अशीच, माझ्याहि पोटात अशीच कळ येते. अरेरे ? काय दुःख हें ! ! प्रोफेसरसाहेब, पुष्कळ झाल—माझी खात्री पटली—पूर्ण खात्री पटली. तुम्हीच हा माझा रोग बरा कराल—"

**हिप्नाटिझमचा प्रयोग १ ला.**

" बस्स—! " रायानें हुकूम सोडताच त्या गृहस्थाच्या कळा थांबल्या !

" जाऊंद्या गाडी " रायानें दुसरा हुकूम सोडतांच गाडीवान मुकाट्यानें गाडीवर बसून गाडी हाकूं लागला. थोड्या वेळानें गाडी त्याच्या घरावरून पूर्वीच्या गतीने भरधांव चालती झाली.

सर्व मंडळी आश्चर्यचकित झाली. रस्त्यात दूर अंतरावर असलेली गाडी थाबविणें, आंतल्या मनुष्यावर प्रयोग करणें आणि आपल्या दुःखाची स्वतः नव्हे परंतु दुसऱ्या—केवळ अगदीं अनोळखी मनुष्याकडून साक्ष पटवून

देणें वगैरे गोष्टी बापूसाहिबांना अगदींच अद्भुत वाटूं लागल्या. ते म्हणाले, "प्रोफेसरसाहेब, धन्य आहे आपल्या सामर्थ्यापुढें ! तुम्हीं आता केलेल्या अद्वितीय गोष्टी मी दुसऱ्याला सागितल्या तर त्याला त्या खऱ्या देखील वाटणार नाहींत. इतकच कशाला, मला कोणी अस सांगितलं तर मी देखील त्याला खोट्यांत काढलं असत."

"ह - यात काय आहे ? याच्यापेक्षाहि अद्भुत गोष्टी करता येतील."

राया मोठ्या आढ्यतेने म्हणाला, "आता तुमची खात्री होईल कीं, मी तुमचा रोग सहजच बरा करू शकेन म्हणून !"

"खात्री म्हणून काय विचारतां हो ?"

हा इतका प्रकार होईपर्यंत बापूसाहेबाच्या कळा थाबल्याच होत्या. त्याची प्रोफेसर साहेबांवर पूर्ण श्रद्धा बसली. आणि रोग्याची वैद्यावर श्रद्धा बसणें, हेच एक गुण येण्यास रामबाण औषध असतं हें सर्वाना माहीत आहेच ! थोड्या वेळाने रायानें बापूसाहेबाना कोचावर पडावयास सागितले. आणि 'मी बरा झालो !' हा मंत्र मनात जपून वर टागलेल्या हडीकडे एकाग्रतेनें पहावयास सागितले. त्याच्या मनावर पूर्वी चागलाच परिणाम झाला असल्यामुळे लवकरच रायाने सागितलेल्या गोष्टीत त्यांचा लय लागून थोडयाच वेळांत ते जवळ जवळ शुद्धिरहित झाले ! नंतर रायाने त्याच्या पोटावर काही अंतरावरून हात फिरविण्यास सुरवात केली. पाच मिनिटानी राया म्हणाला, "तुम्हीं आतां साफ बरे झालां. हा रोग तुम्हाला पुनः कधीहि होणार नाहीं. सागा पाहूं तुम्हाला कस वाटत तें ?"

**हिप्नाटिझमचा प्रयोग २ रा.**

"मी साफ बरा झालों !" एकदम बापूसाहेब ओरडून म्हणाले.

"उठा."

वाचकहो, '' लांडगा आलारे आला ' अशी थट्टा करता करता ज्याप्रमाणें एके दिवशी खरोखरच लाडगा आला त्याप्रमाणें ही वरील प्रयोगाची गोष्ट झाली. मोहिनीविद्येला ज्या आवश्यक गोष्टी त्या तेथे एकवटून आणि रोग्याच्या मनाचा विश्वास आणि मानसिक शक्तीची एकाग्रता ह्या अनुकूलतेमुळे रायाच्या म्हणण्याप्रमाणें खरोखरीच बापूसाहेब रोगमुक्त झाले. परतु अशी खरी वस्तुस्थिति होती तरी रायाला मात्र त्या गोष्टीचा विश्वास नव्हता. बापूसाहेब तर रायाकडे एकसारखे वेडयाप्रमाणें पहात राहिले होते. असो.

थोड्या वेळानें चहा आणि फराळाचें ताट आलें. रायानें चहापान केल्यावर बापूसाहेबांनीं आत जाऊन रामभाऊच्या पत्रात ठरल्याप्रमाणें पाचशें रुपये बाहेर आणले.

" प्रोफेसरसाहेब, आज आपण जे मला आरोग्य दिलें त्याच्याबद्दल मी ही फूल नव्हे पण फुलाची पाकळी देत आहें. आणि ही माझी अल्पशी एक खूण-" असें म्हणून त्यानीं आपल्या बोटातील हिऱ्याची आगठी रायाच्या बोटांत घातली आणि पाचशें रुपयाच्या नोटा त्याच्या हातात दिल्या. पुढें त्याच्या बऱ्याच वेळ गोष्टी झाल्या. आजची रात्र राहून आपल्या घरचा पाहुणचार घ्यावा म्हणून इनामदारानीं रायाला आग्रहाची विनंति केली. परतु त्यानें हजारों अडचणी सागून ती विनति मोठया दुःखानें नाकारली. नंतर रायाने पुनः एकदा सिगारेट पेटविली. आणि काडी टाकण्याकरिता तो उठला. खिडकीजवळ क्षणभर उभे राहून तो सहजच बापूसाहेबाकडे वळून म्हणाला, " आतां बापूसाहेब, मला रजा द्या. माझ्या विद्येचा तुम्हाला फायदा झाला म्हणून मला आनद आहे आणि तुम्हांलाही आनंद झालाच. परतु—" दरवाजात उभी असलेलीं मुलें पाहून-" ह्या मुलांना-पण नाहीं. ह्या मुलानाही मी आनंदी करतो. कायरे तुम्हाला काय आवडत ? एकाद्याची मारामारी किंवा लठ्ठालठ्ठी पाहून तुम्हाला आनंद होतो नाहीं रे ? बर तर आता पहा हं—ते पहा एक लफ्फेबाज पगडीवाले अंगावर उपरणे घेऊन झोकात येत आहेत आणि हा एक येथून फक्त सदरा घालून पुण्याचा भामटा जात आहे. आता ह्याची आपण लावून देऊ लठ्ठालठ्ठी—"

असे म्हणून रायानें खिडकींतून हातवारे करण्यास सुरवात केली. थोडया वेळानें वर वर्णन केलेले ते दोघेजण जवळ जवळ आले.

**हिप्नाटिझमचा प्रयोग ३ रा.** इतक्यात त्या सदरेवाल्या मनुष्याने लफ्फेबाज पगडी वाल्याला धक्की दिली. त्याबरोबर त्याची पगडी गोलाटया खात दूर अंतरावर जाऊन पडली. मग काय विचारतां ? झालीच लठ्ठालठ्ठीला आणि शिवीगाळीला सुरवात ! ती मौज पाहण्याकरितां रस्त्यांत बरीच गर्दी जमली. थोडया वेळाने राया मुलाकडे वळून म्हणाला, " कां आहे ना गम्मत ? बस्स आतां पुष्कळ झाल—नाहीं तर आपल्या मौजेकरिता त्यानीं रस्त्यावर धांदल केल्याबद्दल त्याना पोलीस पकडून न्यावयाचा ! " असें म्हणून पुनः " बस्स—जा तुम्ही आपापल्या रस्त्यानें."

असा रायाने हुकूम सोडला. त्याबरोबर रस्त्यातील लठ्ठालठ्ठी बंद ! दोघेही मारामारी करणारे, झाला हा प्रकार केवळ स्वप्नवत् झाला असें समजून मुकाट्यानें आपापल्या मार्गानें चालते झाले !

वाचकहो, हें वर्णन केलेले गूढ तुम्हाला उकललेंच असेल ! ही सर्व मंडळी रायाबरोबर आलेले त्याचे मित्र होत. रायाने इनामदाराकडे असताना काय काय करावयाचें तें ठरवून त्याना बरोबर वेळ नेमून दिला होता. त्याप्रमाणें प्रथम तात्या सभ्य गृहस्थाचा पोशाख करून गाडींतून आला. नंतर राजा आणि गजाभाऊ यांनीं येऊन आपली लठ्ठालठ्ठीची भूमिका पार पाडली. हा इतका प्रकार होईपर्यंत सहज दोन तास झाले. इनामदारानीं मोठ्या प्रेमानें रायाला निरोप दिला. सहा वाजण्याच्या सुमारास पुनः ती मित्रमंडळी स्टेशन जवळील उपहारगृहात एकत्र जमली. तेथें यथास्थित भोजन झाल्यावर अकराच्या गाडीने मडळी मुंबईस येण्याकरिता निघाली.

**शिकार दुसरी.**

आमची मंडळी ज्या डब्यात बसली होती, त्या डब्यांत गर्दी होती. तरी देखील राजाने एका बाकावर हातपाय पसरलेच ! त्याच्या शेजारीं एक रेल्वेंतील नोकर बसला होता. त्याचें नाव दिनकरपंत आठवले. राजाने हळुहळू बोलतां बोलतां तो कोण, कोठल्या स्टेशनवर काम करतो " वगैरे सर्व माहिती विचारून घेतली तेव्हां दिनकरपंतहि खुल्या दिलाने भाषण करूं लागले. ते म्हणाले, " आतां कांहीं नाहीं हो ह्या रेल्वेच्या नोकरींत राम राहिला. आज अठरा वर्षे झालीं ह्या रेल्वेत, पण चाळिसएके चाळीस आंकडे गिरवीत आहें. दुसऱ्या एखाद्या ठिकाणीं असतो तर आजवर शंभर रुपये पगार खाल्ला असता. पण म्हणतात ना—आपल नशीब ! आणि तेंहि असं गाढ़ आहे कीं काहीं विचारू नका ! म्हटलं एखादी लाख दोन लाखाची ' डर्बीची लॉटरी ' आली असती तर—"

" एकूण इच्छा आहे तर लाख दोन लाखांची ! " राजा म्हणाला.

" अहो इच्छा कोणाला नाहीं ! तुम्हाला आता कोणी एक लाख रुपये देऊ केले तर तुम्ही मागें हात घ्याल काय ? "

" अहो पण देतो कोण आणि घेतो कोण ! "

" कां ?—मी तर बुवा, त्याच्या सात वेळां पायां पडून घेईन. "

" मग भरत कां नाहीं नंबर ? लागेल नशीबानें एखादी लॅाटरी ? "

" केव्हां लागेल ?—मी मेल्यावर लागेल तर नकळे ! अहो राव, आज

दहा वर्षें झालीं, पोटाला चिमटा घेऊन बायकोच्या शिव्या खाऊन सारखे पाच पांच रुपये महिन्याला भरत आहें. पण एक नंबर लागेल तर हराम ! आतां तुम्हींच सांगा—नशिब गाढ नाहीं तर काय ? नाहीं तर तोच आमच्या रेल्वेंतला ट्वाईजसाहेब पहा—बिन लॉटरी भरतां लॉटरींत पैसा मिळवितो —'

" लॉटरी न भरतां लॉटरींत पैसा मिळवितो, तो कसा काय बुवा ? "

" त्याचीं लफडीं आहेत कांहीं निराळीं ! लेकाचा करतो काय, तेथें कलकत्यालाच त्यानें सर्व संधान बांधून ठेविलें आहे. तेथून त्याला जिंकणाऱ्या घोडयाची आणि त्या नंबरची खाजगी तार येते. त्याप्रमाणें ज्याच्या जवळ त्या नंबराचें तिकिट असेल त्याच्याकडे जाऊन अल्प किमतींत तो तें तिकिट विकत घेतो. "

असं असं—आता आलं लक्षात ! "

इतकें भाषण झाल्यावर राजानें हळुहळू त्या साहेबांचा पत्ता, नाव सर्व कांहीं विचारून घेतले, आणि रायाने तें आपल्या स्मरणवहींत टाचण करून ठेविलें. पुढें थोडया वेळानें प्रत्येकाला डुलकी येऊं लागली. तरी त्यांच्यापैकीं दोघेजण आळीपाळीनें मुंबईस येईपर्यंत जागत होते.

**लॉटरीचीं टिकिटं.**

मुंबईत आल्यावर रायानें डर्बीच्या लॉटरीसंबंधानें सर्व चौकशी करून ती उघडणार केव्हा, बंद होणार केव्हां वगैरे माहिती मिळविली. तिकिटा जानुआरी अखेर मिळण्याच्या बंद होऊन शर्यती मार्चच्या २८ व्या तारखेस सुरू होणार आणि बक्षिसांचा निकाल एप्रिल महिन्याच्या १ ल्या तारखेस लागणार ही सर्व माहिती मिळवून झाल्यावर सर्व मंडळीनीं एकत्र खल करून पुढें काय करावयाचें तें ठरविलें. दुसऱ्या दिवशीं गिरगावच्या आसपास आडवाटेला एखादी खोली घेण्याचा विचार केला आणि त्याप्रमाणें बटाटयाच्या चाळींत आपल्या मंडळींपैकीं एकाच्या परंतु भलतेच नांव—बळवंत अनंत ठोसर या नांवावर पहिल्या मजल्यावर चार रुपये दरमहाची एक खोली भाड्यानें घेऊन टाकली. नंतर एका पाट्या रंगविणाराकडे जाऊन रायानें ' मि. ठोसर बी. ए. ऊड एन्ग्रेव्हर—आर्टिस्ट ' अशी पाटी तयार करण्यास दिली. तेथून गिरगाव पोष्टांतून खालील पत्त्यावर एक डर्बीचें तिकिट पाठविण्यास कलकत्त्यास पत्र लिहून त्याबरोबर दहा रुपये मनिआर्डरनें पाठ-

विले. रायानें तिकिट मागविलें तो पत्ता—मि. ठोसर बी. ए., ऊड एन्ग्रेव्हर आर्टिस्ट. कादेवाडी बटाट्याची चाळ १ ला मजला, मुंबई.

**पुढची व्यवस्था**

आपण मोठे धाडस करीत आहोंत हें राया पूर्णपणें जाणून होता. त्यानें हातीं घेतलेल्या कामाचा पूर्ण विचार केला होता. चार दिवस गेल्यानंतर तो आणि राजा कलकत्त्यास जाण्याकरिता निघाले, परंतु मुंबई सोडण्यापूर्वीच आपल्या मडळींपैकीं चौघाना बटाट्याच्या चाळीत घेतलेल्या नवीन खोलींत जाऊन राहण्यास त्याने सागितले. कलकत्त्यास गेल्यावर काय काय गोष्टी करावयाच्या त्या त्यांनीं पूर्वी ठरविल्या होत्या. तेथे आठ दिवस राहून आपणास योग्य ती सर्व बातमी एखाद्या गुप्त पोलिसाप्रमाणें काढून त्या दोघांनीं सर्व कलकत्ता पाहिला आणि नवव्या दिवशीं ते पुनः मुंबईस येण्याकरितां निघाले.

**सुक्याबरोबर ओलें देखील जळतें**

मुंबईत आल्यावर आपल्या मडळींना कसें वागावयाचे त्याबद्दल योग्य सूचना देऊन राया पुनः मार्च महिन्याच्या २८ व्या तारखेस कलकत्त्याला निघून गेला. राया देऊन गेलेल्या सूचना सर्वांस पसंत पडल्या आणि बहुतकरून त्यानें दिलेल्या सूचना अगर विचार यावर मडळी कधींहि प्रतिकूल मत देत नसे, इतके त्याचे विचार आणि सूचना साधक बाधक गोष्टींचा पूर्ण विचार करून केलेल्या असत. त्याचप्रमाणें त्याने मंडळींना लावून दिलेली शिस्त फारच वाखाणण्यासारखी होती. सर्वजण त्याच्या अगदीं आज्ञेत वागत असत. कारण त्याचे प्रत्येक विचार फारच अनुकरणीय असत. होता होईल तों दुसऱ्याचे नुकसान होऊं नये ही त्याची मनापासून इच्छा. परतु प्रसंगीं एखादा गरीब देखील नागवला जात असे. त्याला मात्र त्याचा इलाज नव्हता. त्याबद्दल रायाचे मत असे होते कीं ‘ सुक्याबरोबर ओले देखील जळते, ’ दुसरी विशेष लक्षात ठेवण्यासारखी त्या मंडळींत ही गोष्ट होती, कीं सर्वांची एकी आणि एकमत ही त्यांनीं आपल्या क्लबचें मुख्य आधारस्तंभ करून ठेविलीं होतीं.

**बारा हजार रुपये**

२८ व्या तारखेला राया पुनः कलकत्त्याला गेला. त्या दिवशीं सायंकाळीं ४ च्या सुमाराला त्यानें तेथून टूवाईज साहेबास तार केली ती तार मुंबईत साहेबमजकुरास मिळताच स्वारी आपल्या डॉगकार्टमध्यें बसून ठोसर आर्टिस्टचा पत्ता काढित कांदेवाडींत आली. गजाभाऊ आपल्या इतर दोन साथी-

दारासह त्याची वाटच पहात होता. ' ठोसर ' ह्या नांवाची पाटी पाहतांच साहेब तेथेंच उभा राहिला आणि तो घरात आहे काय ? म्हणून त्याने विचारले. राजाभाऊ पुढे आला.

' आर् यू मिस्टर ठोसर आर्टिस्ट ? "

\ " एस सर. " गजाभाऊनें उत्तर देताच साहेबाने आपल्या खिशांतून नोटबुक काढले आणि त्यास पाहून विचारलें, " यू गॉट डर्बी नं. २२०९५ इज इट नॉट ? आर यू गोईंग टू सेल इट फॉर टेन थाउजड ? "

" एस-नो-सर-आय-पुअर-आर्टिस्ट—"

" नॉट पुअर बट् लकी आर्टिस्ट से, व्हाट यू उइश फार इट ? "

" ट्वेल्व्ह थाउजंड-क्याश—" किंचित् विचार करून गजाभाऊ म्हणाला.

" आल राइट-हिअर इट इज." असें म्हणून साहेबाने दुसऱ्या खिशांतून नोटींचें पुडके काढले. आणि नोटी मोजून झाल्यावर गजाभाऊने डर्बीची तिकिट साहेबाच्या हातीं दिली. तेव्हाच त्यानें ' आपण ही तिकिट मि. टूवाईजसाहेबांस स्वसंतोषाने विकली. ' असें गजाभाऊकडून सहीनिशीं लिहून घेतलें.

साहेब निघून गेल्यावर थोड्या वेळाने गजाभाऊने खोलीला कायमचे टाळें मारिलें. सर्व मंडळी परत आपल्या बिऱ्हाडी आल्यावर टूवाइजसाहेब आपणाकडून पूर्णपणें बारा हजाराला फसल्याबद्दल त्याच्या गोष्टी सुरू झाल्या. वाचकहो, मंडळीच्या मताप्रमाणे साहेब खरोखरच १२ हजाराला फसला.

जिकणाऱ्या घोड्याचा नंबर व तिकिट नंबर याची कलकत्त्याहून टूवाइजसाहेबाच्या एजन्टाने तार देण्यापूर्वीच रायाने त्याला नंबर २२०९५ हा नंबर १ ला आला आहे अशी कलकत्त्याहून खरी तार दिली. तो नंबर ठोसरच्या नांवाचा होता. असो.

त्याच रात्रीं साहेब मजकुरास कलकत्त्याहून खरी तार येताच आपण फसलों असे त्यांस कळलें. त्याने मि. ठोसर आर्टिस्टचा पुष्कळ शोध केला परंतु व्यर्थ !

असो. विजयादशमीच्या सुमुहूर्तावर स्थापन झालेल्या ' रायक्लब 'ची पहिल्या वर्षाची हकीकत वर दिली आहे. त्यानंतर वरील क्लबनें काय

**दुसरें वर्ष.**

काय कारस्थानें केली ते जाणण्याविषयीं वाचकवर्ग फारच उत्सुक झाला आहे हे जाणून आहोंत. टूवाईज साहेबाला बारा हजाराला फसविल्यानंतर वरील मंडळींनीं लहानमोठे असे बरेच उद्योग केले परंतु ते सर्व सविस्तर रीतीने सांगण्यास येथें जागेचा बराच अभाव आहे;

करिता दुसऱ्या वर्षात त्यांनीं जीं ठळक ठळक कारस्थानें केली त्याची येथे हकीगत देण्याचा विचार आहे.

" गजाभाऊ, तूं जर खरोखर आर्टिस्ट असतास तर तुला पुष्कळ काम मिळेल अशी मला युक्ति सुचली होती. " गोप्या म्हणाला.

" मग मी आर्टिस्ट नाहीं असं तुझं म्हणणं आहे कीं काय ? वेड्या, मी फक्त आर्टिस्ट आहें, इतकेंच नाहीं तर युनिव्हर्सिटीच्या चरकातून पिळून निघालेला—"

" आणि शिक्का बसलेला ' बी. ए. ' आहें हें पहा —" गोप्या आणि गजाभाऊ याचें भाषण ऐकून राजाराम आंत आला आणि ' ठोसर बी. ए. आर्टिस्ट ' च्या कोपऱ्यात पडलेल्या पाटीकडे बोट दाखवून म्हणाला " पण गोप्या, आमच्या ' प्रधानजी आर्टिस्टला पुष्कळ काम मिळेल अशी तुझ्या छोट्या पण सुपीक टाळक्यात काय युक्ति आली आहे ती तरी मला कळूं दे ? "

" मी म्हणतों—आतां आला आहे शिमगा ! "

" बरं मग–आहे का तुझी इच्छा शख करायची ? बोल–मर्जी असेल तर कर आताच सुरवात ! "

" तस नव्हेरे ! काल मी रायाबरोबर येत असतां पालव रोडपासून गिरगावपर्यंत सहज पाट्या मोजू लागलो. एकदर साडेतीनशें पाट्या मोजल्या. त्यांत अर्ध्या अधिक पाट्या वकील आणि डाक्टराच्या ! तेव्हा मनांत विचार आला कीं — "

" ह्या सर्व वकील आणि डॉक्टरांना होळींत घालावें असेंच ना ? "

' वाः राजा, त्याना कसा होळींत घालणार ? " हासत हांसत गोप्या म्हणाला, " त्यांच्या पाट्या–अस तरी म्हण. "

" अरे त्याचा अर्थ तोच ! एकूण गोप्या तुझी युक्ति आहे खरी ! एकदा ह्या पाट्या होळींत गेल्या, कीं पुनः आपल्या नांवाच्या पाट्या तयार करण्याकरितां त्यांना आर्टिस्ट आणि पेंटर शोधावे लागतील खरे ! "

झालें ! मंडळीपैकीं एकाद्यानें केलेली सूचना बहुमतानें पास होताच अंमलांत यावयाचीच ! ताबडतोब प्रत्येकानें निरनिराळे रस्ते वांटून घेऊन आपल्या कार्याकरितां मोठ्या होळीचा दिवस मुक्रर केला. त्या दिवशीं प्रत्येकानें आपापल्या रस्त्याची नीट टेहळणी करून ठेविली. ' एखादी पाटी आपणास कशी काढतां येईल. तिला नेण्याचा

**शिमगा.**

मार्ग कोठून आहे, जवळची होळी कुठे आहे, पोलिसाचा पहारा कोठल्या नाक्यावर असतो.' इत्यादि सर्व गोष्टी नीट ध्यानात ठेऊन त्यानीं मोठ्या होळीच्या दिवशीं मध्यरात्रीनंतर आपल्या कामाला सुरवात केली. त्या दिवशीं बहुतेक मंडळी आपापल्या होळीजवळ गाण्याबजावण्यांत गर्क असल्यामुळे आमच्या मंडळीला अडथळा करण्यास प्रतिस्पर्धी कोणीच नव्हते.

"काय तुम्हीं घोंटाळा केला हा! माझ्या राज्यांत असा फाजीलपणा मुळींच क्षम्य नाहीं!" दुसऱ्या दिवशीं राजा म्हणाला, "आपल्या पाऱ्या जाळल्या म्हणून नवीवाडी, पालव, गिरगांवांतील वकील, डॉक्टर आणि दुकानदार तुमच्या नावानें शंख करीत आहेत—"

"आता शंख करून काय उपयोग? शिमगा संपला!"

आमच्या मंडळीने आपली शिमग्यातील कामगिरी कशी पार पडली, त्याची कल्पना वरील भाषणावरून वाचकास होईल. बराच वेळ वरील विषयावर संभाषण झाल्यावर चाच्या म्हणाला, "राया, अशा रीतीनें कामे करणें मला बिलकुल पसत नाहीं. कारण त्यामुळे केव्हा कसा प्रसंग येईल तें सांगतां येत नाहीं. म्हणून मी म्हणतों कीं, मंडळीची अशी फाकाफाक करण्यापेक्षां कोठल्या तरी एकाच दिशेनें आपण उद्योग करावा म्हणजे ठीक."

"होय, तू म्हणतोस ते खरें! परंतु आपलीं अशीं काय बांधलेली आणि नेमलेलीं कामे आहेत कीं, जीं आपणास एकाच धोपट मार्गानें करतां येतील?" बापू म्हणाला.

"अशीं नेमलेलीं आणि बांधलेलीं कामे नाहींत म्हणून मी म्हणतो कीं, त्या कामाला काही तरी ठराविक दिशा असावी. आणि अशी ठरलेली दिशा असली म्हणजे एखादी घोरपड गळयांत आली तरी त्यातून पार पाडण्यास फारसें कठीण जावयाचें नाहीं."

"पण अशी घोरपड गळयांत येईल तेव्हा ना? आपण अस्मादिक काय कमी बहाद्दर आहोंत!" नुकत्याच उगवणाऱ्या मिशावर हात फिरवीत श्रीपाद म्हणाला.

"अशी स्वतःबद्दल तुमची इतकी खात्री आहे हें ठीकच आहे. परंतु सर्वच वेळ सारखी नसते हेंहि आपण विसरतां कामा नये!" राया म्हणाला, "परवांचीच गोष्ट घ्या. त्यावेळीं गोप्यानें प्रसंगावधान वापरलें नसतें तर खात्रीने पांचपन्नास रुपये दंड झाला असता—"

"अरे हो! बरी आठवण झाली." पुढें होऊन मनोहर उत्सुकतेने म्हणाला, "गोऱ्या, आम्हाला नाहींरे सांगितलीस ती हकीकत?"

सर्व मंडळीकडे एकवेळ दृष्टि फेकून गोऱ्या हांसत पुढें होऊन म्हणाला,

**बायसिकलची टक्कर.**

"परवाच्या दिवशीं संध्याकाळी मी रायाची बायसिकल घेऊन फिरावयास गेलो होतो. बराच वेळ चौपटीवर फिरल्यानंतर राणीच्या बागेत जावें अशी मला इच्छा झाली. व त्याप्रमाणें मी बायसिकल गिरगावांतून भायखळ्याकडे वळविली. बायसिकल घेऊन पुलावरून जाण्याचा तो माझा पहिलाच प्रसंग होता. प्रथम चढण चढताना मला बराच त्रास झाला. आणि पुलावर पाणी सिंपडलें होते. थोड्याच वेळाने माझी बायसिकल चढण चढून उतरणीला लागली. वीस पंचवीस हात गेलो नाहीं तोच बायसिकलला वेग आला. इतक्यात मागलें एक चाक ट्रामच्या रुळात गेलें. प्रत्येक क्षणाला बायसिकलचा वेग त्या उतरणीवर जास्त वेगाचा होऊं लागला आणि चाकहि रुळातून बाहेर निघेना. तेव्हा मला भीति वाटूं लागली. बाजूला उडी मारली तर सर्व चिखल! पाय घसरून आपटण्याची भीति! इतक्यात माझें लक्ष पुढें गेलें. माझ्या पुढें एक युरोपियन आणि एक मडम हळुहळू बायसिकलवरून जात होती. त्यांच्या बाजूला सामानाचा एक खटारा होता ह्या सर्व संकटातून सुरक्षित रीतीनें मी कसा पार पडतो हा विचार मनात येतो न येतो तोच मागून ट्राम गाडी आली त्याबरोबर माझ्या छातीत धस्स झाले. मी जोर जोराने घंटा वाजविली, मोठमोठ्यानें ओरडलो, परंतु खटारेवाला खटारा बाजूला घेईना की पुढें असलेली मडमहि आपली बायसिकल बाजूला घेईना, आणि मलाहि अशा वेगात जमिनीवर उडी मारण्याचें धैर्य होईना! झालें—एका क्षणार्धात माझी बायसिकल मडम साहेबांच्या अंगावर जाऊन आदळली! त्याबरोबर तिनें गोलांटी खाली ती थेट साहेबमजकुराच्या बायसिकलवर! तिच्या मागून मीहि खाली गोलांटी ती बरोबर मडम साहेबाच्या छातीवर! मला कांहीं विशेष लागलें नाहीं, परंतु मडमसाहेब बऱ्याच ठेचल्या! चिखलानें तिचा पोशाख खराब झाला, तिच्या बायसिकलचे पहिलें चाक वाकडें होऊन मधल्या काड्याहि मोडल्या. माझी बायसिकल मात्र सुरक्षित होती. थोड्या वेळानें आम्ही उठलों. माझी दृष्टि साहेबाकडे गेली. तो तो रागानें लाल झालेला मला दिसला. आतां आपलीं शंभर वर्षे पुरीं भरलीं हें मीं मनांत समजून

चुकलों, आतां पुढे काय प्रकार होईल तो मला काहींच कळेना. साहेबाने माझी बायसिकल धरली तेव्हां मी समजलों कीं, आतां हें प्रकरण पोलिसापर्यंत जाणार आणि आम्हाला काहीं तरी टिळा लागणार ! मधून मधून तो मजकडे पाहून रागाने दात ओठ खाई आणि मधून मडमसाहेबाची समजूत करी. इतक्यात नाक्यावर वर्दी जाऊन एक कॉनूस्टेबल दोन पोलिस शिपाई घेऊन तेथे आला. त्याना पाहताच माझे धाबे दणाणलें ! साहेबाने थोडावेळ गोष्टी केल्यावर कॉनस्टेबलाने माझी बायसिकल पोलिसला धरण्यास सागितलें, आणि खिशातून नोटबुक काढून मला नाव विचारले. तोच मोठा आणीबाणीचा प्रसंग होता."

"पण तू इतका वेळ तेथे थाबलास कशाला ?" मध्येंच बापूनें विचारले. "चटकन् बायसिकलवर बसायचं आणि करायचा सूंबाल्या !"

"तुम्हाला तस वाटत पण तो प्रसंग कसा होता चमत्कारिक ! चारी बाजूनें दाट गर्दी—पळणार कोठून ?"

"मग पुढे काय झाल ?".

**न्यायमूर्तींचा पुतण्या.**

"मी चट्कन् माझे नाव गोपाळ असं सागितलें. इतक्यात मला काय वाटले ते वाटले ! - मी न्यायमूर्ती * * याचा पुतण्या आहे असें सांगितलें. त्याबरोबर सर्वच मनू बदलला ! कॉनस्टेबलानें माझी बायसिकल सोडली. आणि क्षणभर माझ्या तोडाकडे तो पहात राहिला. त्याप्रमाणे साहेब-मजकुरांसहि विचार पडलेला दिसला."

**गोळी लागू पडली.**

गोपाळनें प्रसगावधान साधून 'मी न्यायमूर्तींचा पुतण्या आहें.' असे सांगताच कॉनस्टेबल विचारात पडला, त्याप्रमाणें साहेबही विचारात पडण्याचें कारण ते एक ब्यारिस्टर होते. ज्या न्यायमूर्तींचें नाव गोप्याने घेतलें होते त्याच्या पुढे उभे राहण्याचा त्या ब्यारिस्टर साहेबांना वरच्यावर प्रसंग येत असे. त्यामुळें गोप्याला पकडावें कीं सोडावे हा विचार त्याच्या मनात घोळू लागला. गोप्याचा पोशाखहि चांगला नीटनेटका असून मूळचा तो गोरा असल्यामुळें त्याच्याविषयीं जास्त संशय घेण्यास जागाच नव्हती. शेवटीं पुनः अशा दाडगाईने बायसिकल चालवूं नये असें सभ्य शब्दात त्यानीं गोप्याला सागितलें आणि सोडून दिलें.

" पण गोऱ्या, तूं बाजू तर मोठ्या बहारीनें सांभाळलीस. गोळी तर मोठ्या झोकात लागूं पडली यात शंका नाहीं. " राजा मध्येंच म्हणाला, " तुझ्या-ऐवजीं आपला गजाभाऊ प्रधान असता तर—

" तर-तर—कायरे राजा ? " कोपऱ्यांत बसलेला गजाभाऊ प्रधान ताडकन् पुढें होऊन वेडावीत म्हणाला, " तुला येतां जाता मीच तोडाशीं लावायला मिळतों नाहींरे ? "

" अरे वेड्या, तुझ्याशिवाय माझं चालेल कसं ? अरे तूं माझा प्रधान—तुझ्याशिवाय माझी काडी देखील हालायची नाहीं. "

आता आपण राजा आणि प्रधान याचें भाषण बंद केले नाहीं तर त्याचें रहस्य फारच वाढत जाईल असें जाणून राया मध्येंच म्हणाला, " बर मग मंडळीचा पुढें काय विचार ठरला तो तरी कळूं द्या ? "

" पण राया माझी एक सूचना आहे. " अण्णा म्हणाला.

" हं—या असें रणात ! तरीच म्हटलं आमचा अण्णा कसा नाहीं बोलत ? " राजा हासत हांसत म्हणाला, " हं—बोला काय आहे तुमचा आमच्या दरबारात अर्ज ? "

" येथें एक टेलिफोन घ्यावा—"

" कशाला ? " मोठें अवसान आणून राजा म्हणाला.

" कशाला म्हणजे ? तुमच्यासारखे निष्काळजी राजे असले म्हणजे केव्ह घोरपड गळ्यात बांधून घेतील, त्याचा नेम नाहीं ! म्हणून ठाण्यावर बातमी देण्याकरितां येथें टेलिफोन असणें अत्यंत जरूर आहे. "

" योग्य सूचना—सर्वानुमतें पास. " राजा म्हणाला.

" अण्णाच्या सूचनेप्रमाणें येथे टेलिफोन घ्यावा, परंतु मी म्हणतों की, आपल्या मंडळींना कामाची एक ठराविक दिशा असावी म्हणून तुम्हीं म्हणता ती दिशा माझ्या मतें टेलिफोनवरूनच आपण ठरवावी. " बाप्पा म्हणाला.

" अहो पंडित, जरा स्पष्ट बोला. आपण काय बोलतां ते आम्हाला समजत नाहीं ! " राजा म्हणाला.

**बेत केला.**

नुकताच शिमगा आटोपला होता. आज रविवार असल्यामुळें जेवणाचा बेतहि जाडाच होता. सर्वांचीं जेवणें आटपून मंडळी एकत्र वर लिहिल्याप्रमाणें गप्पा गोष्टी करीत बसली होती. प्रथम आपल्या कामाला कांहीं दिशा असावी हा प्रश्न निघाला.

पुढें टेलिफोनवरून गोष्टी होतां होता टेलिफोनवरून आपणास कसा फायदा घेता येईल याची चर्चा सुरू झाली. मुंबईमध्यें मोठमोठ्या सरकारी कचेऱ्यांमधून, त्याचप्रमाणें सावकारी पेढ्यांवर आणि कित्येक लक्ष्मीपुत्राच्या घरीं टेलिफोन असतो! त्याचा आपल्या फायद्याकरितां कसा उपयोग करून घेता येईल, याचा खल सुरू झाला. शेवटी बराच वेळ भवति न भवति होकून जे कजुष, अनीतीनें पैसे मिळविणारे, धर्मावर ज्याची श्रद्धा नाही आणि गरिबाना व्यर्थ नाडणारे अशा श्रीमत मडळींना–ज्यांच्याकडे टेलिफोनचें यत्र आहे—त्यांना त्या यत्राच्या सहाय्यानें फसविण्याचा त्यांनीं बेत केला.

वर लिहिलेली कुळें शोधून काढण्याकरिता दुसऱ्या दिवशीं चितामण, बळवत, अण्णा, मनोहर आणि भाऊ ही पंचकडी बाहेर पडली.

**टेलिफोन.** ज्यांकडे टेलिफोन आहे अशी मडळी आपल्या जाळयांत कशी अडकली जातील. याचा त्यानी आदल्या दिवशीं चागलाच विचार केलेला होता. बळवत आणि अण्णा प्रथम दोन तीन टेलिफोन सेंटरमध्यें जाऊन आपणास पाहिजे ती माहिती त्यानीं मिळविली. त्याचप्रमाणे चितामण आणि भाऊ सर्व दिवसभर मोतीबाजार, सट्टयाचा बाजार आणि कोट इत्यादि ठिकाणीं फिरून रात्रींच्या सुमारास परत बिऱ्हाडीं आले. दुसऱ्या दिवशीं रायानें अर्ज करिताच दुपारपर्यंत त्याच्या बिऱ्हाडाला तारा लावण्याकरितां टेलिफोन कंपनीची मंडळी आली. सध्याकाळ होईपर्यंत एका खोलींत यंत्र बसवून मंडळीच्या इच्छेप्रमाणें त्याच्या ठाण्यावर टेलिफोन आला.

"पाहिलंत गोप्या, प्रथम अशी घटी वाजवावी आणि ही टोपी कानावर ठेवावी. थोड्या वेळानें आपली घंटी वाजूं लागते. आणि

**एप्रिल फुल.** आपणास अगदीं हळू पण स्पष्ट असा आवाज ऐकू येऊ लागतो." नवीन घेतलेल्या टेलिफोनची गोपाळाला माहिती देत असतां बापू म्हणाला, "आता समज कीं, आपणास एकाद्याला टेलिफोन करावयाचा आहे, तर त्याचा नंबर पाहून तो नंबर मागावा, म्हणजे आपणास त्या नंबराबरोबर बोलतां येतें—"

"बापू, परवां एप्रिलची १ ली तारीख!" एकदम ओरडून मध्येच चितामण म्हणाला.

"बर मग? त्यात काय सागितलेंस?"

"गाढव आहेस झालं?...वेड्या तो 'एप्रिल फूलचा' दिवस ना!"

हें भाषण ऐकून जवळ बसलेल्या रायाचें डोकें विचारांत गुरफटलें. क्षणभरानें तो म्हणाला, " स्प्लेंडिड सजेशन्! चाऱ्या यू आर राईट. छानदार कल्पना! चाऱ्या, तुझी सूचना योग्य आहे. परवां शिमग्यांत आपण बऱ्याच जणाना शंख करायला लावल. तसच, काहीं बड्या घेडाना शंख करायला लावण्यास हा परवाचा ' एप्रिल फूल डे ' बरा आहे. "

तात्काळ सर्वांच्या विचाराचा ओघ बदलला! थोड्या वेळाने राया आत आला. मडळींनीं त्याला आपला नवीन विचार कळविल्यावर त्यानें आपली किंचित् नापसती दर्शविली. तेव्हा राजा म्हणाला, " आपण थोडंच कोणाच नुकसान करीत आहोत."

" नुकसान नाही तर काय! परवा होळीत पाट्या जाळून तुम्ही त्याचा काय फायदा केला? "

" कां बर पेन्टर लोकाचा फायदा नाही केला? अरे हे वकील डॉक्टर इतका पैसा कमवितात, पण चार चार वर्षे काहीं आपल्या नावाची रस्त्यावर लावण्याची पाटी रगवून आणीत नाहीत. मग आता तूच साग--ह्या पेन्टर लोकाना कामें मिळावी कशी आणि त्याचा धंदा चालावा कसा? "

" आपण फार परोपकारी आहात—"

" आहात म्हणजे गड्या तुला काहीं शका आहे कीं काय! आपला काही नफा नाहीं तोटा नाहीं, असं असता त्यात जर दुसऱ्याचं कल्याण होत आहे तर मग ती गोष्ट करण्यात परोपकार आहे असच म्हटल पाहिजे. बर जाऊ द्या त्या गोष्टी! असे म्हणून राजानें बाजूला पडलेलें टेलिफोनचें पुस्तक उचललें. आणि क्षणभर त्या पुस्तकाचीं पाने चाळून तो मोठ्या ऐटीनें म्हणाला, " प्रधानजी येथे या आणि यातील डॉक्टरांच्या नावाची टेलिफोनच्या नबरासह एक यादी तयार करून द्या. "

" कशाला? "

" कशाला? " वेडावून राजा म्हणाला, " यू ब्लॅक् नीग्रो? तुमच काळ्या लोकांच चुकतं तें इथेच! सागितल ते काम मुकाट्यानं कराव. "

थोड्या वेळानें गजाभाऊ प्रधानानें राजारामाच्या इच्छेप्रमाणें यादी तयार केली. राजा आता पुढें काय सागणार तें ऐकण्याविषयीं रायासुद्धा सर्वजण अगदीं उत्सुक झाले होते. यादी पुढें धरून राजा म्हणाला, राया, सी धी फन् नाऊ? हे डॉ. हुक एम्. डी. मोठं घेड आहे, मी ह्या डॉक्टर साहेबांस

**यादी तयार झाली.**

भलत्याच एका ठिकाणाहून उद्या असा टेलिफोन करतो की, उद्यां सायंकाळी पाच वाजता आपणाकडे मोठमोठे डॉक्टर एकत्र जमून प्लेगप्रतिबंधक इनॉक्युलेशनचा खल करण्याचा विचार झाला आहे. आपण तयारींत असावे.' आणि तुम्ही बाकीच्या डॉक्टराना असा टेलिफोन करा की, उद्या प्लेगप्रतिबंधक इनॉक्युलेशनचा विचार करण्याकरिता शहरातील नामांकित डॉक्टर अमुक अमुक डॉक्टरांकडे एकत्र जमणार आहेत, तर आपण पाच वाजता तेथे अवश्य येण्याची कृपा करावी.' हा एक प्रकार झाला. आणि दुसरी एक जगी सभा कावसजी हॉलमध्ये भरवू."

"ती कशी भरणार? कदाचित् पहिली गोष्ट आपणास साध्य होईल, पण ही सभा कशी भरविणार?"

"तूं तर सदाचा रड्या आहेस? तुझ्या डोक्यात आहेत बटाटे? मेंदु असता तर अशी शंकाहि काढली नसतीस." असें म्हणून मोठ्या आढ्यतेनें रायाकडे वळून राजा पुढें म्हणाला, "वेल् राया, आय डिस्चार्ज धीस प्राइममिनिस्टर. आय डोन्ट वॉन्ट हीम! गुड फॉर नथिंग फेलो!" (राया, मी ह्या प्रधानाला रजा देतो. मला हा नको, अगदी कवडी कामाचा मनुष्य!)

सर्व मंडळीत एकच हशा पिकला! थोड्या वेळानें डॉक्टराना 'फूल' कसें बनवायचें आणि सभा कशी भरवायची त्याबद्दल विचार ठरला.

**डॉक्टरांची सभा.**

असो. आज एप्रिलची १ ली तारीख! पाच वाजण्याचा सुमार! डॉ. हुक एम्. डी. याच्या बंगल्यावर मोटारगाड्या आणि डॉग-कार्टस येऊन उभ्या राहूं लागल्या. अर्ध्या तासात जवळ जवळ पचवीस तीस नामांकित डॉक्टर दिवाणखान्यात जमले. इतक्यांत एक पोष्टाचा शिपाई आत आला आणि त्यानें डॉ. हुकच्या नांवाचें एक पत्र त्यांच्या हातीं दिले. डॉक्टर साहेबानीं ते पत्र फोडले. मजकुरावर त्याची दृष्टि फिरतांच त्याच्या तोंडावर इंद्रधनुष्याचे रंग स्पष्टपणें उमटूं लागले. सर्वांचें लक्ष त्याच्याकडे होते. मजकूर वाचून डॉक्टर साहेबाचा गोरामोरा झालेला चेहरा पाहून ती सर्व जमलेली डॉक्टर मंडळी किंचित् काळजीत पडल्यासारखी दिसली. त्याच्याकडे पाहून डॉक्टर म्हणाले, "हा कोणीतरी फाजीलपणा केला आहे." नंतर त्यांनीं तें पत्र मोठ्यानें वाचलें. त्यात एकच ओळ लिहिली होती. आणि ती ओळ म्हणजे '**येथें जमलेले सर्व डॉक्टर एप्रिल फूल आहेत!**'

हा मजकूर ऐकून प्रत्येकाचीं तोंडें खरकन् उतरलीं !

वाचकहो, चला आता कावसजी हॉलमध्यें भरणाऱ्या सभेला आपण जाऊ. पण थाबा ! तो पहा, कोपऱ्यांत डॉक्टरसाहेबाना पत्र आणून देणारा पोष्टाचा शिपाई एकटाच हासत उभा आहे. अरे – हा तर गोप्या !

**हिंदुस्थानवासी जनांस संदेश.**

मडळी मारखी येत होती ! इतकी मडळी जमा होईल अशी आमच्या रायक्लबच्या उपद्यापी सभासदास वाटले नव्हते. परतु इतकी गर्दी झाली त्यात काही विशेप नवल नव्हते. कारण राजानें तयारीच तशी केली होती. अंगात भव्य भगवी कफनी, लाब दाढी आणि भगवी छाटी अशा थाटाने त्याने प्रथम ' कीर्तिप्रकाश ' च्या एडिटरसाहेबाची भेट घेतली आणि ' आपले पूज्य गुरु स्वामी अभगानद यानीं हिंदुस्थानवासी जनांकरिता पाश्चात्य देशातून पाठविलेल्या सदेशाचे पहिले वाचन स्वामीचे पट्टशिष्य आनदानद मुबईत एका सार्वजनिक ठिकाणी करणार आहेत,' असें सागितले, पाश्चात्य देशात दिग्विजय मिळविणारे स्वामी अभगानद याचे नाव येथे प्रत्येक आबालवृद्धाच्या तोंडी असल्यामुळे व राजाने सव्वाहात लाब मारलेल्या गप्पाना भुलून एडिटरसाहेब खुलले. त्यानीं पहिल्या तारखेला कावसजीहॉल मिळविण्याची व आपल्या वृत्तपत्रात त्याचप्रमाणें इतर पत्रात ' स्वामी अभगानद याचा हिंदुस्थानवासी जनास संदेश ' ह्या नावाखालीं जाहीर खबर देण्याची सर्व कामगिरी आपल्या शिरावर घेतली.

सध्याकाळ होत आली, अद्यापि व्यासपीठावर कोणीच उभे रहात नाहीं असे पाहून जमलेल्या असंख्य मडळींत अस्वस्थता उत्पन्न झाली. ' कीर्तिप्रकाश ' च्या एडिटरच्या नादीं लागून जी मडळी ह्या खटपटींत पडली होती त्याची एकसारखी आत बाहेर अशी धांदल सुरू होती. सर्व मंडळी स्वामीच्या आगमनाची वाट पहात होती. परतु स्वामी कुठे आहेत ? थोड्या वेळाने काळोख पडला म्हणून हॉलच्या मध्यभागी असलेला किटसनचा दिवा लावण्यास एक मनुष्य वर गेला. अर्थात् बहुतेकाचे लक्ष दिवा लागत आहे त्याकडे वेधलें. किंचित् कालानें दिवा पेटून त्याचा लख्ख प्रकाश पडला. तोंच त्या प्रकाशात टागलेला, मोठया ठळक अक्षरानें लिहिलेला बोर्ड सर्वांच्या दृष्टीस पडला.

**' येथें जमलेली सर्व मंडळी एप्रिल फूल ! '**

ही त्या बोर्डावर लिहिलेलीं अक्षरे वाचून प्रत्येकाची तोंडांत मारल्यासारखी

स्थिति झाली ! मुकाट्यानें एक एकजण उठून जाऊ लागला. थोड्या वेळानें हॉल रिकामा ! पुढें ह्या गोष्टीची बरीच वाच्यता झाली. परंतु ह्या कृत्याच्या मुळाशीं कोण होते याचा मात्र शोध लागला नाही. बिचारा 'कीर्तिप्रकाश' चा एडिटर सर्वांच्या रागाचा आणि शिव्याशापाचा केंद्र बनला. असा असा एक मनुष्य आपणाकडे आला आणि त्याने आपणास असे सांगितले ह्या पलीकडे त्या बिचाऱ्याला कांहींच सांगता येईना ! असो. एकंदरींनं एप्रिलच्या १ त्या तारखेस सर्व मुंबईत आमच्या रायक्लबनें बरीच दांडगी चळवळ उडवून सोडली !

"राया, हा पहा १०२२ नंबर लिट्ल ॲण्ड लार्ज कंपनीचा आहे." टेलिफोनच्या नंबराची माहिती दिलेल्या पुस्तकात पाहून बापू म्हणाला, "ह्याच कंपनींत मी गेल्या वर्षी नोकरीकरिता अर्ज घेऊन गेलों होतो परंतु मला युनिव्हर्सिटीचें शेपूट नाहीं म्हणून त्या मिजामखोर म्यानेजरानें बाहेर हाकून दिलें.

"मग तुझी काय इच्छा आहे ?" राजानें विचारलें.

"इच्छा काय ? ह्या म्यानेजरला चांगला पेचांत आणून त्याच्याबरोबर कंपनीलाहि चांगलाच हात दाखवावा ही इच्छा !"

"ठीक आहे. उद्यां त्या कंपनीसंबधानें सर्व माहिती मिळवा मग पाहू ?" राया म्हणाला.

**लिट्ल ॲण्ड लार्ज कंपनी.**

त्या दिवशीं माहिती मिळवून आणल्यावर दुसऱ्या दिवशीं दुपारी दोन प्रहरीं मांडवीतील लद्धा धरमसीच्या मोठ्या दुकानावर एक मनुष्य आला. शेट तक्याशीं टेकून बसले होते. जयगोपाळ झाल्यावर त्या मनुष्यानें खिशातून दोन लहान पिशव्या काढून त्या शेटच्या पुढें ठेविल्या.

"दोन नमुने आणले आहेत." तो मनुष्य म्हणाला, "आपण मला ओळखलें नसाल पण मी लिट्ल ॲण्ड लार्ज कंपनीचा नवीन मार्केट एजन्ट आहें. आपण कपाशीचें बी आणि आळशीचें बी याची साडे सात हजारांची आमच्याकडे आर्डर नोंदविली आहे, त्याप्रमाणें हे त्या मालाचे सॅंपल आणले आहेत."

शेटनीं दोन्ही नमुने हातात घेऊन पाहिले. त्याना त्या दोन्ही जिनसा पसंत पडल्या. इतकेंच नव्हे तर लिट्ल ॲण्ड लार्ज कंपनीबरोबर जो दर ठरला आहे त्या दरात असा नमुन्याबरहुकूम माल मिळाल्यास त्यात आपणांस पुष्कळ फायदा होईल अशी शेटजीस खात्री वाटूं लागली. क्षणभरानें त्यानीं ते दोन्ही

नमुने आपल्या मुनिमाजवळ दिले आणि थोडा वेळ त्या दोघाचें कच्छी भाषेत भाषण झाले. ते नमुने पाहून मुनिमाचेहि मत शेटप्रमाणे पडले. इतक्यात बाजूच्या खोलींत असलेल्या टेलिफोनची घंटा वाजू लागली. वाचकहो, टेलिफोन-मध्ये विचारलेला प्रश्न बाजूच्या मनुष्याला ऐकू येतो परंतु टेलिफोनमधून आलेले उत्तर मात्र ऐकू येत नाही हे आपणास माहिती आहेच! परंतु आपणास टेलिफोनमधून झालेले सर्व भाषण कळावे म्हणून येथे प्रश्न आणि उत्तरें दिली आहेत.

" कोन हय ? " मुनिमानें विचारलें.

त्याचे उत्तर मिळताच नमुने घेऊन येणाऱ्या मनुष्याकडे वळून मुनिम म्हणाला, " हा तुमच्या कंपनीतून टेलिफोन आला आहे."

" काय म्हणणं आहे त्याचं ? असे म्हणून तो मनुष्य पुढें झाला आणि त्यानें टेलिफोनजवळ तोंड नेऊन विचारलें—" हॅलो !—मी आहे गंगाधर—मार्केट एजन्ट. "

" आपण ते दोन्ही नमुने शेटजीना दाखवून त्याचें काय मत पडतें तें आतां कळवा. साहेब खोटी आहेत ! "

" नमुने पसंत आहेत ! "

क्षणभरानें टेलिफोनमधून उत्तर आलें. त्याला " ऑल राइट सर ( ठीक आहे महाराज. ) "

**सौदा पटला!** वळून म्हणाला, " शेटजी, आपणास या नमुन्याप्रमाणे माल रवाना करण्याविषयीं आमचे म्यानेजरसाहेब आतां एजन्टला तार करतील. आपल्याला मालाचीं पोती आजपासून २१ दिवसानीं येथे येतील परंतु आपल्या हिशोबापोटीं पांच हजार आतां आपणास भरावे लागतील, असे साहेब सांगतात. ह्या रुपयाची मी कच्ची पावती आतां देतो. तुम्हीं कंपनीच्या नांवें लिहून ठेवा. मग माल आल्यावर हिशोबाच्या वेळीं तितक्या दिवसाच्या व्याजासह ही रक्कम वाळती करूं. "

" ठीक आहे. लिहा तुम्ही पावती " शेट म्हणाले. " पण पुन्हा एकदा ते नमुने मला पाहूं द्या. "

शेटजीनें ते दोन्ही नमुने हातांत घेऊन पुनः बारकाईनें पाहिलें आणि ते आपल्या मुनिमाकडे वळून कच्छी भाषेत म्हणाले, " नमुना अगदीं चोख

आहे. आपण फक्त साडेसात हजाराची आर्डर नोदविली आहे. पण असा माल मिळत असेल तर आर्डर वाढविण्यास काय हरकत आहे ? "

" हरकत कसली ? " मुनीम म्हणाला, " करा दहा हजाराची आर्डर. "

" मग हे पहा गगाधरपत ! " एजन्टकडे वळून शेटजी म्हणाले, " आमची आर्डर आम्ही वाढवित आहोत. आपण ही आता २॥ हजाराची दुसरी आर्डर घेऊन आमच्या नावे दहा हजाराचा माल रवाना करा—"

" पण आता—"

" त्याची नको तुम्हाला काळजी ! तुमचे दोन टक्के कमिशन आमच्याकडे लागले, मग तर झाल ना ?—"

" बस् बस् ! आणखी काय पाहिजे शेठ ! ठीक आहे. मी नोदवितो आर्डर."

सशयाला जागाच नव्हती. उलट थोडक्या दरात उत्तम माल आपणास मिळत आहे ह्या आनदात शेट गर्क होते. लिट्ल ॲन्ड

**शिकार साधली.** लार्ज कपनीकडून त्या वर्षात साडेसात हजराचे कपाशी आणि आळशीचे बी खरेदी करण्याचे कॉन्ट्रॅक्ट ठरले होते ही बातमी बापूने मिळवून तो स्वतः त्या कपनीचा मार्केट एजन्ट बनून लद्धा धरमशीच्या पेढीवर आला होता. पेढीवर येण्यापूर्वी रायाबरोबर वेळ वगैरे सर्व गोष्टी ठरवून बाजारातून त्याने उत्तमपैकीं कपाशीचें आणि आळशीचें बीं नमुना दाखविण्याकरितां खरेदी केले होते. ते नमुने बापू शेटजींना दाखवीत असता टेलिफोनची घंटी वाजली ती रायानें आपल्या नवीन घेतलेल्या टेलिफोन मधून वाजविली होती. मुनिमाने ' कोन हय ? ' म्हणून प्रश्न करताच ' आपण लिट्ल ॲन्ड लार्ज कपनींतील टेलिफोन क्लार्क आहोत ' असे त्यानें उत्तर दिलें. त्यामुळे त्याची खात्री पटून त्यांनीं योजल्याप्रमाणें सर्व गोष्टी घडून आल्या आणि कच्च्या पण खोट्या पावतीवर पांच हजार रु. खिशात घालून बापू बाहेर पडला.

ठरल्याप्रमाणें शेटजींनी २१ दिवस वाट पाहिली. परंतु तितक्या अवधींत लिट्ल आणि लार्ज कपनीकडून कांहींच हकीकत त्यांना कळली नाहीं. २१ दिवस झाल्यावर, आज माल येईल, उद्या काल येईल, अशा समजुतीखालीं आणखी चार दिवस लोटले. अद्यापि शेटजींला कांहींच सशय येण्याचें कारण नव्हते. परतु मुदत टळून आणखी चार दिवस झाल्यावर मात्र त्याना स्वस्थ बसवेना त्यानीं लिट्ल आणि लार्ज कपनीच्या म्यानेजरास मुदतीप्रमाणें माल आला नाहीं म्हणून खरमरीत पत्र लिहिलें. परतु त्या पत्राला काय उत्तर

मिळणार हें वाचकानीं ताडलेंच असेल ! आपल्या पत्राला असे चमत्कारिक उत्तर आलेलें पाहून शेटजी अतिशय घोटाळ्यांत पडले. ही भानगड काय हेंच त्याना कळेना. अखेर त्यानीं आपल्या मुनिमास कंपनीत पाठविलें. परंतु तोहि बिचारा मूर्ख ठरून तेथून परत आला. तेव्हा मात्र, येथे काहीं तरी दगा आहे, असे समजून शेटजीच्या तोंडचे पाणी पळालें. लगेच ती कच्ची पावती घेऊन ते कंपनींत आले. म्यानेजर साहेबाने त्याची भेट घेऊन सर्व खुलासेवार हकीकत विचारली. शेवटीं सर्व वृत्तांत कळतांच म्यानेजर म्हणाला, " शेटजी, तुम्हाला कोणत्या तरी एखाद्या अट्टल भामट्यानें फसविले असे मला वाटते. "

" पण तुमचा मार्केट एजन्ट कुठे आहे ! "

म्यानेजरानें कॉलबेल वाजवून आपल्या मार्केट एजन्टाला आत बोलाविलें.

" हा पहा आमचा मार्केट एजन्ट. " म्यानेजर म्हणाला, " याचे नाव मोहन. "

" छे ! हा नव्हे तो मनुष्य. मजकडे आलेल्या मनुष्याचे नाव गंगाधर आहे. "

" आमच्या कंपनींत गंगाधर ह्या नांवाचा कोणीच मनुष्य नाही. "

" नाहीं कसा ? तो आमच्या पेढीवर नमुने दाखवित बसला असता त्याला तुमच्या कंपनींतून तुम्ही टेलिफोनसुद्धा केला, तेव्हा आता तुम्ही नाही म्हणता तर हें आश्चर्यच म्हणायचे ! "

" शेटजी, तुम्हाला अजून संशय येत असेल, तर आमच्या कंपनींतील सर्व कारकून लोक तुम्हाला दाखवितों. सर्व मंडळी आपण पाहिल्यावर त्यांतून त्या मनुष्याला तुम्ही ओळखाल ना ? "

" हो हो, ओळखीन यात काय संशय ! "

**आणखी थोडी मौज.**

म्यानेजरसाहेब मजकुरानीं आपल्या कंपनींतील सर्व कारकून आणि इतर नोकर शेटजींना दाखविले. परंतु शेटजींना पाहिजे होता, तो मनुष्य गंगाधर काहीं यात नव्हता. त्यावेळीं त्याचा चेहरा गोरा मोरा झाला. पाच हजाराला आपणास एका अट्टल सोद्यानें फसविले अशी आता त्याची बालंबाल खात्री झाली. त्याच्या डोळ्यांपुढें हिरव्या पिवळ्या रेघा दिसू लागल्या. म्यानेजरसाहेबानें समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु फुकट ! अखेरीस शेटजी जेमतेम उठून व्हिक्टोरियात बसले आणि पेढीवर आले. गाडींतून उतरतांना त्यांच्या डोळ्यापुढें अंधेरी आली आणि उतरतां उतरतां

त्यांचा झोंक जाऊन ते पुनः गाडींतच पडले. त्याबरोबर पेढीवरील मंडळीची एकच धादल उडाली. हा सर्व प्रकार पहात एक व्यक्ति जवळच उभी होती. शेटजी बेशुद्ध झालेले पहाताच त्या व्यक्तीच्या डोक्यांत कांहीं विचार आले. "ह—असच! आणखी थोडी मौज करूं ?" असें सस्मित शब्द उच्चारीत ती व्यक्ति तेथून निघाली.

इकडे मुख्य मुनिमानें इतर मंडळीच्या साह्यानें शेटजीस उचलून पेढीवरील गादीवर आणून निजविलें. आणि मुनीम त्याना शुद्धीवर आणण्याच्या प्रयत्नाला लागला. इतक्यात त्या गर्दीला दूर करीत करीत एक 'सुदरमुख तुंदिलतनु' शेटजी 'काय झाले, काय झाले ?' म्हणून विचारीत पुढें आले.

"अरे लद्धाशेट शू थयू ? गर्मी बहु थाय छे—केम चक्कर आयवी के ?"

"सानी चक्कर ! मारा शेट, आजे हु पाच हजार रुपयामा खाली फसी गयो शुं करूं रे मारा बाप ?" नुकतेच शुद्धीवर आलेले शेटजी रडके तोंड करून म्हणाले.

**दोन डॉक्टर**

इतके त्यांचें भाषण होत आहे, तोंच एक गाडी त्याच्या पेढीजवळ येऊन उभी राहिली. घोडेवाल्यानें 'लद्धा धरमसीचीं पेढी हीच काय ?' असें विचारून होकारार्थी उत्तर मिळताच गाडीचा दरवाजा उघडला. गाडींतून एक गोरा डॉक्टर खालीं उतरला. तोंच दुसरी एक गाडी येऊन पहिल्या गाडीजवळ उभी राहिली त्या गाडींतूनहि एक नेटिव्ह डॉक्टर शेटजींच्या नावाची चौकशी करीत पुढें आला. अशा रीतीनें दोन्ही डॉक्टर पेढीवर चढले. त्यांनीं आपल्या शिरस्त्या-प्रमाणें वर येताच आपल्या रोग्याची चौकशी केली. परतु एकावर एक असे दोन डॉक्टर एकाच वेळीं बोलावण्याइतकी शेटजीची मजल गेलीच नव्हती. तथापि गोऱ्या डॉक्टरानें चौकशी करून शेटजीची प्रकृति आता बरी आहे, असें पाहून मुनिमास विचारलें, Well, I am glad to see your shett is alright, but what about my fee ?" (तुमचे शेट बरे आहेत हें पाहून मला आनंद झाला पण माझ्या फीची व्यवस्था ?)"

"आणि माझी फी ?" नेटिव्ह डॉक्टर पुढें होऊन म्हणाला.

"फी–" तोंड वासून शेटजी म्हणाले, "फी कशाची ?–पण तुम्हांला बोलाविलं कोणी ?–मेथाजी, तुम्ही हा काय घोंटाळा केला ! एकदम दोन डॉक्टर आणलेत तर मी असा कांहीं मरतच होतों कीं काय ?–काय म्हणाव तुम्हाला !"

" शेटजी मी नाहीं याना बोलाविल."

" नाहीं कस ? " मध्यें नेटिव्ह डॉक्टर म्हणाला, " तुमच्या पेढीवरून एक कारकून धावत धावत माझ्या डिस्पेन्सरींत आला."

' आमच्या पेढीवरून कारकून ! आश्चर्यानें पेढीवरील प्रत्येक कारकुनाच्या तोंडाकडे पहात मुनीम म्हणाला."

" होय, तुमच्याच पेढीवरून-गगाधर नावाचा कारकून—"

" अरे मारो बापरे ! " एकदम शेटजी म्हणाले, " ए सालो गगाधरनें ए शूं घुमाकूळ माडयो छे ! "

शेवटीं बऱ्याच वेळानें डॉक्टराची समजूत पटली. तेव्हां हातपाय आपटीत डॉक्टरसाहेब खिशात फी टाकीत जाता जाता म्हणाले " Some one must have played mischief! Dam his face!') कोणी तरी ही थट्टा केली आहे. मूर्ख मनुष्य ! ! "

डॉक्टर निघून गेल्यावर लद्धा शेटजींची चौकशी करण्याकरिता आलेले ' सुदरमुख तुंदिलतनु ' शेटजी हासत हासत म्हणाले, ' लद्धाशेठ, आज तमारी घणी सारी बोणी थई छे ? "

" शू-वेलाशेट, शू तमे भी मारी मस्करी करो छो ? मारासाहेब, आजे मारा पांच हजार रुपिया गमाई—"

" जवादे ! साहेब, तमे एम केम रंजिम थाय छो ? ए रुपिया गयो, तो एम समजो के तमारो पाप नासी गयो ! "

हा हा ! ए बात ठीक. पण तमुने ज्यारे मारा जोवा गगाधर मळशे त्यारे खबर पडशे."

" अरे जा-जा !-"

घेलाशेट मोठ्या फुशारकीनें बोलत होते, परतु पेढीच्या खालीं रस्त्यावर वेड्याचें सोंग पाघरून तुसरी एक व्यक्ति ते सर्व भाषण ऐकत होती. ही व्यक्ति आणि ह्याच्या पूर्वी डॉक्टरसाहेबाना बोलावून आणणारी दुसरी व्यक्ति, अशा ह्या दोन व्यक्त्या कोण होत्या, हे कळण्याची इच्छा असल्यास, वाचकहो,

**ह्या दोन व्यक्त्या कोण ?**

वला आपण त्याच्या मागून जाऊं इकडे लद्धा शेटजवळ बढाई मारून घेला शेट पेढीवरून उठले. त्यांच्या मागून एक व्यक्ति जाऊं लागली.

सध्याकाळच्या सुमारास आमची मंडळी बिऱ्हाडीं गप्पागोष्टी करीत असतां

राजा आणि बापू आत आले. त्यांना पाहताच गजाभाऊ म्हणाला, "कायरे ! तुम्ही जे एवढे मजा पाहण्याच्या उद्देशाने आज तिकडे गेला होता, तर काय अशी मौज पाहिली, ती सांगा तर खरी !-का आलात तोंड हिरमुसले करीत ? वेड्यानो, तो लद्धा धरमसी एवढा काही मूर्ख नाहीं कीं पाच हजार रुपयाकरिता केवळ तुम्हाला मौज दाखवावी म्हणून नाटक करून दाखवील !"

"अरे, नुसते नाटकच नाहीं तर नाटकात नाटक करून दाखविलें. तुम्ही आहात कुठे !—बसा असेच इथे माशा मारीत !" असे म्हणून त्यानें डॉक्टरांना बोलावून आणले येथपर्यंत सविस्तर हकीकत सागितली. आणि पुढें म्हणाला, "जेव्हा डॉक्टराने आपणास बोलावण्याकरिता गगाधर नावाचा कारकून आला होता असें सागितले, तेव्हा तर शेटजीने मजाच केली, तो एकदम ओरडून म्हणाला, 'अरे मारो बापरे ! ए सालो गगाधरने ए शुं धुमाकूळ माडयो छे !'

हे ऐकून सर्वजण एकदम हसू लागले.

"गज्या, असं हे नाटक तर आम्हीं पाहिलच ! शेवटीं शिकारहि मिळविली."

"खर कीं काय ?—मग सागा तरी पुढे काय काय प्रताप गाजविले ते !'

वर वर्णन केलेल्या प्रसगांत दोन व्यक्ति होत्या, त्या कोण हें आता वाचकाच्या लक्षात आलेच असेल. डॉक्टराना बोलावून आणणारा राजा होता आणि दुसरा बापू होता. सर्व हकीकत सागितल्यावर राजा म्हणाला, "ही दुसरी शिकार म्हणजे घेलाशेट त्रिकमजी. त्यानीं मोठी बढाई मारिली आहे. परतु पोटाचा 'घीनो डब्बो' झालेल्या त्या घेलाशेटला आमची कारवाई काय माहिती ? चागला तोंडघशी पाडीन तेव्हा समजेल, गगाधर कोण तो !"

**घेलाशेट त्रिकमजी**

या ठिकाणीं घेलाशेटची ओळख करून दिल्यास ती अप्रासंगिक होणार नाही, अशी खात्री आहे. ह्या शेटची पेढी मांडवींतच होती. त्याची इस्टेट बरीच मोठी होती. खोकाबाजारात त्याच्या चार मोठ्या चाळी होत्या. प्रत्येक चाळ चारचार मजल्याची व प्रत्येक मजल्यावर दहादहा खोल्या होत्या. प्रत्येक बिऱ्हाडकरूच्या खोलीला तीन गाळे असून त्याचें भाडें महिना आठ रुपये होतें. सर्व चाळी भाडोत्र्यानीं गच्च भरल्या होत्या. त्या चाळींचें महिना सव्वा हजाराचे उत्पन्न होतें. ही सर्व माहिती राजानें त्याच दिवशीं मिळविली. आणि आता पुढें काय करावयाचें त्याविषयीं त्याचा सर्व विचार ठरला. अशा

रीतीनें चार दिवस लोटल्यावर अठ्ठाविसावी तारीख आली. त्या दिवशीं राया, बापू आणि राजा असे तिघेजण आपल्या नव्या मोहिमीवर निघाले. खोकाबाजारांत घेलाशेटच्या चाळीवर येताच पहिल्याच खोलीवर हे त्रिवर्ग उभे राहिले. त्याना पाहताच त्या खोलींतील भाडोत्री बाहेर आला.

" कोण पाहिजे ? "

" तुम्ही येथें किती महिने भाड्यानें आहात ? मला तुमची भाडेचिट्ठी दाखवा. किती महिन्याचें भाडें बाकी आहे ?" राजानें एकदम बोलण्यास सुरवात केली.

" आम्हाला झालें एक वर्ष. आमच्या अंगावर आता दोनच महिन्याचें भाडें आहे. " तो भाडोत्री म्हणाला, " पण तुम्हीं कोण ? "

" मला घेलाशेटजींनीं ह्या भाडें उगवण्याच्या कामावर ठेविले आहे. त्याच्या मेथानें भाड्याच्या पैशात फार अफरातफर केली म्हणून त्याला कामावरून दूर केले आहे. मी आजपासून चार्ज घेतला आहे आपणाकडे बाकी आहे ती ह्या दोन दिवसात मिळालीच पाहिजे. हे बरोबर बेलिफसाहेब आणले आहेत. आज दहा जणावर केसा काढला आहे. ह— बोला तुमचं नाव — किती बाकी आहे—आज काय देतां—बोला—बोला झटपट, परवाच्या आत बाकी आली नाही तर जड जाईल. मला हे जुने भाडोत्री ठेवायचेच नाहींत. "

**धूमश्चक्री उडविली !**

अशा रीतीनें दोन तासात त्या तिघानीं सव चाळी हिंडून आपण नवीन मेथा आहोत, असे सर्वांना भासविले. घेलाशेटचा मेथा सर्व चाळीचीं उग्रणी करण्याकरिता चौथ्या किंवा पाचव्या तारखेपासून पुढें आठ दिवस येत असतो, हे आमच्या मंडळींना ठाऊक होते. ह्या गोष्टीचा फायदा घेऊन राजानें हा वरील व्यूह रचला होता. आणि तो सर्वस्वी पारहि पडला. कोणाला नोटिस देण्याची भीति दाखवून तर कोणाला बेलिफाची धास्ती दाखवून तर कोणाला भाड्यापैकी एक दोन रुपये सोडून चारही चाळींतून सातशें साडे सातशें रुपये त्यानें वसूल केले. तो सर्व दिवस राजानें तेथें अगदीं धुमश्चक्री उडविली. इतकं जरी राजानें केले, तथापि त्याच्याविषयीं एकहि भाडोत्र्याला संशय आला नाहीं असें त्यानें आपलें काम बेमालूम रीतिनें पार पाडलें. ज्या ज्या भाडोत्र्याजवळ त्यानें भाड्याची जुनी बाकी वसूल केली, त्या सर्वांना ' गंगाधर एजन्ट ' ह्या सहीची कच्ची पावती दिली आणि सांगितलें कीं, ' एक

दोन दिवसात माझ्या नांवाचीं 'बिल बुक' तयार होऊन येताच ही कच्ची पावती मी परत घेऊन छापील पावती तुम्हाला देईन.' आणि ही गोष्ट सर्वांना खरी वाटली.

वरील गोष्टीला चार दिवस लोटले. नव्या महिन्याची चौथी तारीख उगविली, तेव्हा सकाळच्या प्रहरी नित्य नियमाप्रमाणे घेलाशेटचा मुनीम भाड्याच्या वसूलीकरिता चाळीवर आला. तेव्हां पहिल्या एक दोन भाडोत्र्यानी त्याला झिडकारिले. एकानें तर त्याला तोंडावर लुच्चा म्हणून देखील म्हटले. तेव्हा

**अफरातफर केली.**

हा प्रकार पाहून मुनीम घोटाळयात पडला. आज सर्वत्र भाडोत्री आपणावर बिथरले कसे हेंच त्याला कळेना ! त्याने सामोपचारानें सांगून पाहिले. धाकदपटशाहि दिला, इतकेच नव्हे तर "आता शेटजींना घेऊन येतों, म्हणजे कळेल." असेंहि तो रागाने म्हणाला.

"शेटजींना घेऊन या. तुम्हाला विचारतो कोण ! तुम्हीं भाड्याच्या पैशात अफरातफर केली आहे, तुम्हांला शेटजीसमोर जाण्यास तोंड कुठे आहे ? शेटजींनी तुम्हाला कामावरुन दूर केले आहे," असें एका भाडोत्र्यानें उत्तर दिले.

"मला शेटजींनीं कामावरुन दूर केल आहे ? आणि मी पैशांत अफरातफर केली आहे !" आश्चर्याने म्हणाला.

"हो हो ! तुम्हाला कामावरून दूर केल आहे."

हा काय प्रकार आहे हें मुनिमाच्या लक्षात येईना. शेवटीं नाइलाजास्तव हातपाय आपटीत तो निघाला आणि शेटजीच्या घरीं आला. त्याच सुमाराला शेटची स्वारी नुकतेंच पोष्टानें आलेले पत्र वाचीत बसले होते. आपण काय वाचतों, हेच शेटजींना कळत नव्हते. त्यानीं दोन चारदा तें पत्र वाचलें परंतु त्याना अर्थबोध होईना. इतक्यात वर लिहिल्याप्रमाणें त्याचा मुनीम तेथें गेला, आणि त्यानें चाळीभर अनुभवलेली सर्व रडकथा शेटला सांगितली. त्याबरोबर शेट म्हणाले "हां—हमणा समज पडी ! ए सालो गंगाधर—सालाने मने पण फसाव्यो !"

वरील सर्व गोष्टी आमच्या चाणाक्ष वाचकाच्या लक्षात आल्याच असतील. शेटजींना जे पत्र आले होतें तें आमच्या मंडळीनेंच लिहिलें होतें. आणि त्या पत्रांतील मजकूर येणें प्रमाणें होता--

**घेलाशेट त्रिकमजी यांस —**

**वि. वि. लद्धाशेट जवळ फार फुशारक्या मारल्या परंतु गंगाधर एजन्टाची कर्तबगारी अजिबात विसरलां होतां, म्हणून ही थोडीशी मौज केली आहे. मी काय केलें तें सर्व आपले मेथाजी आपणास सांगतीलच ! पण पुनः सांगून ठेवतों कीं, उगाच घर्मेडींत जाऊं नका. व्यर्थ फसाल आणि शंख करीत बसाल.**

**गंगाधर एजन्ट.**

बिचाऱ्या घेलाशेटनीं पुष्कळ धामाधूम केली. परतु गगाधराचा काहीं त्याना पत्ता लागला नाहीं. शेवटीं साडेसातशे रुपये गेले असें समजून निमूटपणें ज्या भाडोत्र्यानीं गगाधराला भाडे दिले होतें, त्याना खऱ्या पावत्या देणें भाग पडलें !

**मंडळी वात्रट आहे.**

वरील गोष्टीला आठ दिवस होऊन गेले होते. आमची मडळी दुपारचें भोजन उरकून स्वस्थपणें गप्पा मारीत बसली होती. बापू मात्र त्या मडळींत नव्हता. तो एकटाच एका बाजूला काही विचार करीत बसला होता. ते पाहून राजा म्हणाला, " कायरे बुवा बापू ? का आज अस का ? डोकं दुखतं वाटत ? "

" छेरे ! त्याचं डोक नाहीं दुखत. अलीकडे त्याला एक निराळाच रोग जडला आहे. कालच तो मला सागत होता—"

" खर कीं काय—? अरे, मग वैद्याकडे किंवा डॉक्टरकडे का नाही जात ! " स्वाभाविकपणे राजा म्हणाला. आणि त्याच्याजवळ जाऊन त्याने बापूचा हात धरून विचारले, " बापू, काय होतं तुला ! येतोस का डॉक्टराकडे ? "

" राजा, येतोस का म्हणून काय विचारतोस ? " बाप्पा मध्येच म्हणाला " कडेवर घे आणि घेऊन चल ! ",

" पण होत आहे काय तुला बापू ! "

" अरे आज दोन दिवस झाले त्याच्या पोटातल्या पोटांत जुलाब होतात, आणि त्यामुळेंच तो अगदी हैराण झाला आहे. "

बाप्पाचे उत्तर ऐकून राजा अगदीं गप्प झाला. इतर मंडळी मात्र हसू लागली. आजपर्यंत त्यानें इतरांची थट्टा केली होती परतु आज त्याच्या मित्रमडळीनीं त्याला शह दिला. आपली आज मंडळीनीं सोळा आणे थट्टा केली हें पाहून राजा प्रथम खजील झाला ! तें पाहून इतका वेळ मुकाट्यानें बसलेला बापू म्हणाला, " जाऊंदेरे राजा, ती मडळी वात्रट आहे. तूं त्याचें बिलकुल

ऐकू नकोस ! मी जो मघापासून विचार करीत होतो, तो एका शेटजीबद्दल काल सायकाळीं मोतीबाजारात एक नवीन कुळ माझ्या अवलोकनात आले ! ”

“ कोण आहेत हे शेटजी ? ”

“ आहेत बडे बापके बडे बेटे ! ”

“ पण त्याच नाव ? ”

“ त्याच नाव रामजीशेट करमाळी.

वाचकहो ! आपण ह्या ठिकाणीं वर उल्लेख केलेल्या शेटजीची ओळख करून घेऊं. सर्व मोतीबाजारांत मोठी पेढी म्हटली म्हणजे

**रामजी करमाळी** रामजी करमाळी ह्याची होय. गरीबांच्या माना मोडून प्रथम करमाळी शेट व्याजबस्याच्या धद्यावर गबर झाल्यानतर पेढी काढून बसले. त्यानीं धद्यामध्ये जितके पातक केले होते तितके सर्व आपल्या वृद्धापकाळी हजारों रुपये दानधर्म करून फेडले होते. त्यावेळीं त्याचे चिरजीव रामजीशेट एकवीस वर्षांचे होते. वडिलाचा हा बेसुमार दानधर्म पाहून त्याना दानधर्माचा इतका तिरस्कार आला कीं, वडिलाच्या मार्गे त्यानीं एक पैही भिकाऱ्याला दान करताना आजपर्यंत कोणी पाहिले नाही पेढीवर त्याचा मोठा दरारा असे. परतु इच्छागौरीपुढे मात्र त एखाद्या गुलामाप्रमाणें होते इच्छागौरी ही त्याची बायको. तिच्याकरिता त्यानीं महालक्ष्मीवर एक बगला घेतला होता. तीन बायका झाल्या परतु एकीपासूनही सतानप्राप्ति न होता तिघीही आपलें सौभाग्य घेऊन गेल्या. आता इच्छागौरी ही चौथी ! त्यातून गरोदर आहे असे कळल्यापासून रामजी शेटनीं तिला तळहातावरील फोडाप्रमाणे ठेविले होतें !

महालक्ष्मीपासून पेढीपर्यंत शेटनीं अगदीं स्वतत्र टेलिफोन घेतला होता. ह्या टेलिफोनचा त्यांना फारच उपयोग होत असे. सकाळीं

**स्वतंत्र टेलिफोन.** पेढीवर आल्यापासून तो परत घरीं जाईपर्यंत शेटचें पत्नीवियोग दुःख हरण करणारा हा टेलिफोनच होता. पेढीवर काम नसल्यास पाच पाच मिनिटानीं शेट त्या टेलिफोनजवळ जाऊन आपल्या लाडक्या इच्छा गौरीला काय इच्छा आहे त्याची चौकशी करीत असत.

आमच्या काकदृष्टीच्या मडळीनीं रामजी शेटजींना तेव्हाच हुडकून काढलें ! शेटसारखें कूळ आपल्या टेलिफोनच्या जाळ्यातून निसटूं द्यावयाचें नाहीं असा विचार करून मंडळी त्या उद्योगाला लागली. जाळें कसे पसरावें

म्हणजे त्यात शिकार अचुक सापडेल हें कसब रायाला पूर्णपणें अवगत होतें. कोठल्या वेळेस कोठली युक्ति लढविली असता आपला कार्यभाग सहज साधेल हें त्याला चांगलें ठाऊक होतें. रायाचें डोकें म्हणजे युक्तीचें एक भांडार! असे क्लबातील प्रत्येकाला वाटत होते आणि तें खरेंहि होतें. रामजीशेटना आपल्या जाळ्यांत पकडण्याकरिता रायानें जी युक्ति योजिली, तीवरून आमच्या लिहिण्याची वाचकाना सहजच कल्पना होईल अशी आमची खात्री आहे.

अकरा वाजण्याची वेळ. रखरखीत उन्हांतून झपझप पावले टाकीत एक व्यक्ति महालक्ष्मीवरील रामजीशेटच्या बागेंत शिरली.

**शेट कुठें आहेत?** दरवाज्यावर भय्या उभा होता. आणि आतल्या दिवाणखान्यांत नुकतीच जेवून आलेली इच्छागौरी बैठकीवर बसून स्वतःकरिता विडा तयार करीत होती.

"शेट कुठे आहेत?" आंत आलेल्या मनुष्याने घाबऱ्या घाबऱ्या एकदम विचारलें.

त्याचा आवाज, त्यानें एकदम विचारलेला प्रश्न आणि त्याची भयभीत झालेली मुद्रा पाहून इच्छागौरीला बरेंच चमत्कारिक वाटले. ती पुढें होऊन म्हणाली शेट मघाच पेढीवर गेले—"

"अरेरे आता काय करावं!" एकदम हताश होऊन तो मनुष्य म्हणाला, "घात होण्याची वेळ आली."

त्या मनुष्यानें उच्चारलेले शब्द ऐकतांच इच्छागौरीच्या छातींत धस् झाले! तिनें कांपत कापत विचारले, "ही आहे काय गडबड?"

"गडबड कसली बाईसाहेब! एक मोठी हुंडी आली आहे कलकत्त्याहून! बाराच्या आत जर ही पटविली नाहीं तर मात्र भयंकर प्रसंग आहे. आतां काय करावं! अकरा तर वाजले! सारा एकच तास राहिला. इतक्या थोड्या वेळांत मी पेढीवर जाणार कसा आणि शेटजीना ही हकीकत सांगणार तरी केव्हा—"

"हा पहा येथे टेलिफोन आहे, सांगा येथून–" चटकन् इच्छागौरी म्हणाली.
"टेलिफोन आहे येथें! वाः—" एकदम आनंद झाल्याचा आविर्भाव आणून तो मनुष्य म्हणाला आणि चटकन् टेलिफोनच्या खोलींत शिरला. आंत गेल्यावर त्यानें आतून दरवाजा बंद केला आणि जोराजोरानें घंटी वाजविण्यास सुरवात केली.

" कोण ?—गौरी–लाडके गौरी काय आहे ? काय आहे ?—" टेलिफोन-मधून आवाज आला.

" महाराज–शेटसाहेब–" चमत्कारिक आवाज काढून तो मनुष्य टेलिफोन-मधून म्हणाला.

" तू कोण आहेस ?"

' शेटसाहेब—मी आपलाच–पण काय सागूं महाराज—"

" पण तूं कोण आहेस ?"

" शेटसाहेब, मी आपलाच आहे हो ! पण–या–मोठा बिकट प्रसंग ओढवला आहे. महाराज या—"

" हा काय प्रकार आहे ! नीट साग–काय झालं ? सांग–काय झालं ? साग—पण तूं कोण आहेस ?"

" शेट, मी आपलाच आहे हो. काय सागू ? महाराज, कोटातून लवकर मोठा गोरा डॉक्टर घेऊन या—अरेरे ! बाईसाहेब—देवा — देवा – काय हा प्रसंग ! आतां काय करावें ? घात झाला. शिव, शिव, महाराज—शेट—या—या—कोण हो बाईसाहेबाची अवस्था ! धावा हो धावा, शेटजी—धावा, लवकर—"

काहीं तरी वाईट प्रकार घडला आहे खास ! आपल्या लाडक्या इच्छा-गौरीला काहीं तरी कमीजास्त झाले असावें, असें शेटजींना वाटलें; नव्हे, त्यांची पक्की ग्वात्री झाली ! टेलिफोनमधून बोलणाऱ्या

**झालें काम !**

त्या मनुष्यानें आपली कामगिरी अगदीं सोळा आणे बजाविली ! असो. वर लिहिल्याप्रमाणें टेलिफोन करून तो मनुष्य बाहेर पडला. इच्छागौरी दिवाणखान्यात विचार करीत बसली होती. तिच्या मनांत नानाप्रकारचे तर्ककुतर्क येत होते. आपल्या पतीवर हुंडीबद्दल काहीं तरी संकट आलें आहे, असे तिला वाटलें. ती अगदीं गोंधळून गेली. अशा रीतीनें ती आपल्या पतीवर आलेल्या संकटाच्या विचारांत गुरफटून गेली असतां खोलीचा दरवाजा उघडून तो मनुष्य बाहेर आला. त्याला पाहतांच ती झटकन् कोचावरून उठली आणि पुढें होऊन म्हणाली, " काय झाल काम ?—आतां शेटजीवर नाहीं ना काहीं संकट येणार ?"

" बाईसाहेब, काम तर झाल ! आतां पाहूं पुढें काय होतें तें !" तो मनुष्य म्हणाला.

" मग आता मी कांहीं काळजी करूं नको ना ? "

" छे, बाईसाहेब तुम्हाला कसली काळजी ! अहो, हा बोलून चालून व्यापार ! त्यांत अशा घडामोडी ह्या व्हायच्याच !—बर बाईसाहेब, मी आता येतों. खरोखर हा टेलिफोन घेतला आहे, म्हणून आज किती काम झाल म्हणून सागूं ! बर—जातों मी. " असे म्हणून तो मनुष्य बाहेर पडला.

**अरेरे ! घात झाला !**

इकडे पेढीवर काय प्रकार झाला. तो आपण पाहू. आपल्या हातातील टेलिफोनची टोपी खुटीला अडकवून रामजीशेट एकदम बाहेर आले. आपल्या लाडक्या इच्छागौरीला काय झाले आहे. हे घरी गेल्याशिवाय कळण्याला त्याना मार्ग नव्हता. शेट अगदी गोंधळून गेले. आपली इच्छागौरी पडली किंवा तिला दुसरा कांहीं प्रकार झाला याची त्याना अटकळ करता येईना. शिवाय इच्छागौरीला काहीं महिने लोटले होते. तेव्हा चार बायकातून तिच्या पोटीं जन्म घेणाऱ्या वारसावर त्याची सर्व आशा होती. आणि घरून तर काय विलक्षण टेलिफोन आलेला ! तेव्हा त्याच्या तोडचें पाणी पळालें. यात मोठेंसें आश्चर्य नाहीं. बाहेर येतांच त्यानीं गाडी जोडण्यास सागितले, आणि स्वतः कपडे घालण्याकरतां ते खोलीत गेले. त्यावेळीं शेटची मुद्रा, गाडी जोडण्यास त्यानीं मोठ्या तानडीने दिलेला हुकूम आणि त्याची धावपळ पाहून पेढीवरील प्रत्येकाला चमत्कारिक वाटलें. थोड्या वेळानें गाडी येऊन दाराजवळ उभी राहिली. शेटजींनें एखाद्या लहान पोराप्रमाणे गाडींत उडी मारली !

गाडी जाऊन थोडा वेळ झाला नाहीं, तोच एक व्हिक्टोरिया गाडी रामजीशेटजीच्या पेढीजवळ येऊन उभी राहिली. एका मनुष्याने गाडींतूनच पेढीच्या पायरीवर ताडकन् उडी मारिली. ही त्याची कृति पाहून पेढीवरील कारकून आणि मुख्य मुनीम आश्चर्यचकित मुद्रेनें त्याच्याकडे पहात राहिले.

" रामजीशेट आहेत ? " खाड्खाड् पायऱ्या चढून वर येत असता त्या मनुष्यानें विचारलें.

" नाहीं. " मुख्य मुनिमानें उत्तर दिलें.

" अरेरे ! घात झाला !—आता शेटची केव्हां भेट होणार ? प्रत्येक क्षण लाखाचा जातो—मी आताच कलकत्याहून आलों. आतां काय करावे ? मोठाच प्रश्न ! " असें म्हणून तो मनुष्य अशा चमत्कारिक आणि चिताक्रान्त

वृत्तींत उभा राहिला कीं, त्याच्याकडे पाहून पेढीवर मुनीम आणि इतर मंडळी क्षणभर गोंधळांत पडली. थोड्या वेळापूर्वी आलेला टेलिफोन, शेटचे तातडीनें जाणें, ह्या सर्व गोष्टी मनात येताच आपल्या शेटवर कांहीं तरी संकट ओढवलं आहे असें सर्वांना वाटू लागलें.

" शेट गेले कुठे ? "

" आताच ते घरीं गेले. पाच मिनिटेंहि नाहीं झालीं. "

" ते घरीं जाताच त्यांना माझा निरोप कसा कळेल ? "

" येथे टेलिफोन आहे—" असे म्हणून मुनिमानें टेलिफोन रूमकडे बोट दाखविलें. त्याबरोबर तो मनुष्य झटकन् आत शिरला आणि मागून धाडकन दरवाजा बंद करून घेतला. पेढीवरील सर्वजण त्याच्याकडे वेड्यासारखे पहातच राहिले, परंतु त्याकडे त्यानें बिलकुल लक्ष दिलें नाहीं. आत जाताच त्यानें जोराजोरानें घंटी वाजविली.

"कोण प्राणपति !" थोड्या वेळानें टेलिफोनमधून इच्छागौरीचे उत्तर आलें.

" इच्छागौरी ! लाडके पेढीवर मोठ संकट आलं आहे. अब्रु जाण्याची —पेढीचें दिवाळें निघण्याची वेळ आली आहे, हाय ! हाय ! काय करूं ! " तो मनुष्य टेलिफोनमध्यें म्हणाला.

" माझे लाल, असे भिऊ नका. काय झालं—मला सांगा !" टेलिफोनमधून आपले पतीच आपणाबरोबर बोलत आहेत असें समजून इच्छागौरी म्हणाली.

" कलकत्त्याहून मोठी हुंडी आली आहे. पेढीवर पैसा शिल्लक नाहीं. आता कसं होईल ? "

' पण असा धीर काय सोडता ! व्यापारात तेजी मंदी ही चालायचीच ! पेढीवर नाण नाहीं तर मी माझे दागिने पाठवितें. त्याचे आतांच्या आता टक्के करा. पण धीर काय सोडता ! आपण आहात हेच माझे दागिने आहेत ! "

क्षणभर तो मनुष्य आवाज बदलून म्हणाला, " लाडके आता मी पेढीवरुन एक विश्वासू मनुष्य पाठविला आहे. तुझे सोन्याचे दागिने आणि तिजोरींतील शिल्लक त्याला दे—त्याला खोळंबून ठेऊ नको. "

" ठीक आहे. "

इतकें म्हणून इच्छागौरी टेलिफोनच्या खोलींतून बाहेर पडते तोंच एका मनुष्यानें त्यांच्या बंगल्याच्या दरवाजाजवळ सायकलवरून उडी मारिली.

" बाईसाहेब, मला शेटजींनीं पाठविलें आहे. "

" थांबा—मी आतां आलें. "

" क्षणभरानें इच्छागौरी आतून जाऊन आली. तिच्या हातांत एक नकशीदार पेटी आणि एक पुडकें होतें. वाचकहो, त्या पेटींत आणि पुडक्यात काय होतें ते आपण जाणलेंच असेल. पेटींत इच्छागौरीचे कांहीं ठळक सोन्याचे दागिने आणि पुडक्यात तिजोरींतील शिल्लक होती. दोन्ही वस्तु हातात पडताच त्या मनुष्यानें गडबडीनें पुनः बायसिकलवर उडी मारिली आणि क्षणार्धात तो बागेच्या बाहेर पडला !

**लाडके तुझी प्रकृति कशी आहे.**

तो मनुष्य पन्नास हजाराचा ऐवज मोठ्या सभावितपणाने काखेंत मारून गेल्याला दहाच मिनिटें झालीं असतील ! इच्छागौरी आपल्या पतीवर आलेल्या संकटाचा विचार करीत तळहातावर डोके टेकून दिवाणखान्यात एका मऊ कोचावर सचित बसली होती, इतक्यात बागेच्या दरवाजाशीं शेटची गाडी येऊन उभी राहिली. घोडे अगदी घामानें चिंब भिजले होते. त्यावरून गाडीवाल्यानें घोड्याच्या जिवाकडेहि न पहातां दयामाया गुंडाळून ठेऊन सारखे चाबूक ओढीत त्याना पिटाळविले असावे असे स्पष्ट दिसत होतें, आणि वस्तुस्थितिहि तशीच होती. पेढीवरून निघताच शेटनी प्रथम गाडी कोटात नेली आणि पंचवीस रुपये फीच्या एका गोऱ्या डॉक्टराला बरोबर घेऊन थेट महालक्ष्मीला गाडी आणिली होती. शेट गाडींतून उतरतांच मागून डॉक्टर साहेबहि उतरले. आपल्या यजमानाबरोबर एक साहेब आलेले पाहून इच्छागौरी चटकन् उठून आत जाऊं लागली. परतु शेटनीं तिला आत न जाऊं देता पहिला प्रश्न विचारला—

" लाडके, तुझी प्रकृति आतां कशी आहे ? हे पहा डॉक्टर आले आहेत, तुला एकाएकीं काय झाल !—"

" मला काय झालं ! " आश्चर्यातिरेकानें इच्छागौरी म्हणाली, " हे डॉक्टर कशाला आणले ?—पण तुमच काय झाल ?—हुंडी पटविली काय ? "

" लाडके हुडीचं काय घेऊन बसली आहेस ! प्रथम तुझी प्रकृति कशी आहे ते साग ? मी येथे येईपर्यंत माझ्या जीवात जीव नव्हता."

" पण असं घाबरण्यास झालं तरी काय ? एक हुंडी आली म्हणून इतके घाबरून जायचं ! "

आपण विचारतों काय, आणि ही उत्तर देते काय ! याचा शेटला काहींच

**हा काय प्रकार आहे ?**

उलगडा होईना ! ते वेड्यासारखे इच्छागौरीच्या तोंडाकडे पहात राहिले. डॉक्टरसाहेब एका बाजूला उभे राहून हा सर्व प्रकार मुकाट्यानें पहात होते. आपणास एक मोठी 'सिरिअस् केस' पहावयास मिळेल असें त्याना प्रथम वाटलें होतें; परतु येथें येऊन पाहतात तो प्रकार कांहीं निराळाच.

"मजकडे असं वेड्यासारखं काय पाहाता ? डॉक्टराना बसायला तरी सागा. त्याना कशाला आणलं बरोबर ?"

"कशाला म्हणजे ! तुझी एकाएकीं प्रकृति बेसुमार बिघडली असें कळलें म्हणून ?"

"माझी प्रकृति बिघडली ! मला काय झालें आहे ?"

"येथून टेलिफोन केलास ना पेढीवर ?"

"कोणी ?—मी—नाहीं उलट मीच विचारते तुम्हाला—"

"हा काय प्रकार आहे ?" शेट चमत्कारिक स्वरानें पुनः म्हणाले.

"मग हुडी पटविली का ?—माझे दागिने पोचले ना ?"

"दागिने ? कुठें आहेत ?"

"हुडी पटविण्याकरिता दागिने पाठवून दिले ते."

"कोणी ?"

"कोणी म्हणजे ? मी ! आतां टेलिफोन मधून—"

**जंग जंग पछाडलें !**

वाचकहो, क्षणभर शेट आणि इच्छागौरी याना येथेच परस्परांच्या शंका निरसन करण्यास सोडून देऊन आपण दुसऱ्या बाजूला वळू. ह्या गोष्टींत महालक्ष्मीवर आपण दोन आणि शेटच्या पेढीवर एक अशा तीन व्यक्ति पाहिल्या. त्या तीन व्यक्ति म्हणजे आमच्या प्रसिद्ध रायक्लबचे सन्मानीय सभासद राया, बापू आणि राजाराम हे होत. ह्या मंडळींतील मन्या, अण्णा, चाच्या, बाप्पा आणि श्रीपाद ही मंडळी एखाद्या गोष्टीचा शोध करण्यांत, टेहळणी करण्यांत आणि हातीं घेतलेल्या कामाला इतर आवश्यक गोष्टी जुळवून आणण्यात थोड्याशा अवधींत इतकी तरबेज झाली होती, कीं एखाद्या नावाजलेल्या गुप्त पोलिसालाहि ती मंडळी सहजच चकवून सोडतील. अशी आमची खात्री आहे. त्यांनीं रामजी शेटच्या घरावर आणि पेढीवर सारखी टेहळणी ठेविली होती. प्रथम बापूनें बंगल्यावर जाऊन तेथून पेढीवर टेलिफोन केला.

त्या टेलिफोनचा शेटच्या मनावर कसा परिणाम झाला हें वर सांगितलेंच आहे. गाडी जोडून शेट बाहेर पडतात न पडतात तोंच राजाराम व्हिक्टोरियांत बसून पेढीवर आला. त्याची व्हिक्टोरिया बराच वेळ थोड्या अंतरावर एका बाजूला उभी होती. शेटजीची गाडी जाऊन थोडा वेळ झाल्यानंतर त्यानें आपली व्हिक्टोरिया पेढीवर आणली होती. पेढीवर येऊन त्यानें इच्छागौरीबरोबर केलेले भाषण वाचकांनीं वर वाचलें आहेच ! त्यानें आपली कामगिरी बजावली तोच इकडे दुसऱ्या खेपेस राया महालक्ष्मीला बायसिकलीवर जाऊन स्वखुशीने इच्छागौरीनें त्याच्या स्वाधीन केलेला ऐवज घेऊन बाहेर पडला. तो गेल्यावर डॉक्टरसह शेट बंगल्यात आले ही हकीकत वर दिलीच आहे. त्यानीं परस्पराना विचारलेल्या प्रश्नावरून येथें कांहीं तरी दगा आहे, असा डॉक्टरसाहेबास संशय आला. त्यांनीं पुढें होऊन शेट आणि इच्छागौरीला मुळापासून घडलेली हकीकत विचारली. तेव्हा त्यांच्या लक्षांत आलें का, शेटच्या खासगी टेलिफोनचा उपयोग करून त्याना मोठ्या चातुर्याने कोणी तरी धाडशी मडळीनें फसविले आहे. ताबडतोब ही गोष्ट पोलिस चौकीवर कळविण्यात आली. पोलीस सुपरिन्टेन्डेन्टसाहेब आपल्या सैन्यासह शेटच्या बंगल्यावर येऊन हजर झाले. गुप्त पोलिसाची एक तुकडीहि आली. आणि त्यांच्या कामाला सुरवात झाली. पंधरा दिवस त्यानीं जग जग पछाडलें परंतु चोरीचा पत्ता लागला नाहीं. शेवटीं हताश होऊन शेटजीनीं पोलिसमधून केस काढून घेऊन गेलेल्या ऐवजावर पाणी सोडले. सोळाव्या दिवशीं शेट पेढीवर जाण्याकरता तयार होत असता पोष्टाच्या शिपायानें त्याच्या नावाचें एक पार्सल आणि एक पत्र आणून दिलें.

**पार्सल आणि पत्र**

इच्छागौरी जवळच होती. पार्सल कोणी पाठविलें ते पाहण्याकरितां त्यांनीं पार्सलचा कागद पाहिला, त्यावर पाठविणाराने देखील ' रामजी करमाळी ' असेंच नाव लिहिलें होतें. पार्सल कलकत्त्याहून आलें होतें. ' पाठविणारा आणि घेणारा ह्या ठिकाणीं आपलेंच नांव पाहून शेटला चमत्कारिक वाटले. क्षणभरानें इच्छागौरीला पार्सल फोडण्यास सागून पत्रात काय आहे तें पाहण्याकरतां त्यांनीं प्रथम पत्र फोडले. पत्र पाठविणारा कोण हें पाहण्याकरिता त्यांनीं पहिल्याने पत्राच्या शेवटीं पाहिले. 'क्ष' अशी सही होती. हें काय गौडबंगाल आहे याचा ते विचार करीत स्तब्ध राहिले असतां इच्छागौरीचे शब्द त्यांच्या कानीं पडले.

" हे पहा गडे माझे दागिने ! "

खरोखरच ते इच्छागौरीचे दागिने होते ! इच्छागौरीनें ज्या स्थितींत ती दागिन्यांची पेटी दिली होती त्याच स्थितींत ती पार्सलच्या रूपानें त्याना परत आली होती. ' सर्व दागिने बरोबर आहेत ' असें पाहून क्षणभर त्या दोघांना आनंद झाला. कारण ते सर्व दागिने पंचेचाळीस हजारांचे होते. नाहीं म्हणायला तिजोरींतील शिल्लक साडेचार पांच हजार रुपये गेले ! परतु त्याबद्दल त्याना विशेष काहीं वाटले नाहीं. ' शेपटीवरच गेलें ! ' असें मनाचें समाधान करून शेटनी पत्र वाचण्यास सुरवात केली. तें पत्र वाचकांकरितां येथे दिलें आहे.

## संपत्तीचा सदुपयोग करा.

' शेटसाहेब यास जयगोपाळ–ह्या पत्रासोबत आपल्या प्रिय पत्नीचे दागिने परत करीत आहोत. आपले दागिने परत आलेले पाहून आम्ही घाबरलों अशी शकाहि मनात आणू नका. आपल्या वडिलानीं कंजुषपणानें आणि आपल्या गरीब बाधवाना बुडवून पैसा जमविला परंतु वृद्धापकाळीं पुष्कळ दानधर्म आणि तें देखील सत्पात्रीं दान करून अंशतः तरी आपल्या पापांची त्यानीं फेड केली. त्यांच्यामागें आपण शेट बनलां. आजपर्यंत आपण सत्पात्री दान किती केलें असें विचारल्यास आपण काय उत्तर द्याल ? पुत्रप्राप्तीकरिता ज्याना महाराज किंवा गुरु म्हणतां आणि आम्ही ज्यांना ऐतखाऊ किंवा तुमच्या डोळयात धूळ फेंकणारे ढोंगी म्हणतों त्याना आजपर्यंत हजारों रुपये तुम्ही चारले परतु त्याचा काय उपयोग झाला ? त्या गुरूंच्या अंगी सामर्थ्य असतें तर तुमच्या एक नव्हे दोन नव्हे तिनहि बायका निपुत्रीक निवर्तल्या असत्या काय ? हेच रुपये आजवर जर तुम्ही सत्पात्रीं दान केले असतेत तर ? तुम्ही आता आहात त्याहिपेक्षां जास्त सुखी असता, आता आपल्या इच्छागौरीला काहीं महिने गेले आहेत. हा तिच्या पातिव्रत्याचा जोर होय. परतु तिच्या पोटीं येणाऱ्या सतानानें आपल्या वैभवाचा भोग घ्यावा अशी आपली इच्छा असल्यास सत्पात्रीं दानानें काहीं पुण्य पदरीं बांधा नाहींतर आपणास पश्चात्ताप होईल. हें माझें सागणें आपण आपल्या अंतःकरणावर खोदून ठेवा, तुमच्यासारख्या लक्ष्मीपुत्रांनीं गरीब दुबळ्यांचा परामर्ष घेतला नाहीं तर तुमची लक्ष्मी तुम्हाला लवकरच पारखी होईल. करितां अद्यापि तरी सावध होऊन आपल्या कर्तव्याला जागा. यापुढें आपल्या हातून सत्पात्रीं दान होत नाहीं असें जर दिसून आलें तर आपणास योग्य धडा घालून देण्यास समर्थ असलेला—क्ष. "

वरील पत्राचा शेटजीवर काय परिणाम झाला तो रायक्लबच्या मंडळींच्या पुढील संभाषणावरून वाचकांच्या लक्षांत येईल.

" राया, तुझ्या पत्रानें तर अगदीं सोळा आणे काम केलें." सर्वजण एकत्र बसले असता गजाभाऊ म्हणाला.

" पण कायरे राया, तें पत्र आणि पार्सल करण्याकरिता तू कलकत्त्यासच का गेलास ? " गोप्यानें मध्येंच विचारलें.

" का गेलों सांग. तूंच स्वतःशीं विचार करून सांग. मी मुंबईहून जरी पत्र आणि पार्सल पाठविलें असतें, तरीहि चालण्यासारखे होतें; परंतु इतका द्राविडी-प्राणायाम करून मी कलकत्त्यास गेलों त्याला तसेंच काहीं तरी सबळ कारण पाहिजे हें तू देखील कबूल करशील. आतां तें काय कारण असावें तें तूं स्वतःशीं विचार करून शोधून काढ."

बराच वेळ गोपाळनें स्वतःशीं विचार केला परंतु पत्र आणि पर्सल करण्याकरिता रायाला कलकत्त्यासच जाण्याचें कारण काय असावें हें त्याच्या लक्ष्यांत येईना. तेव्हा राया म्हणाला,

**कलकत्त्यास जाण्याचें कारण**

" हें पहा, प्रथम आपण कलकत्त्याहून हुंडी आली आहे असें इच्छागौरीला सांगितलें. ती गोष्ट तिनें आपल्या नवऱ्याला म्हणजे रामजीशेटला सांगितली असेल. त्यांनीं पोलिसामध्ये वर्दी देतांना कलकत्त्याचा उल्लेख केलाच असेल, पण त्याकडे पोलीसने बिलकूल लक्ष दिलें नाहीं. कारण ही काहीं तरी फसवाफसवी आहे असेंच पोलिसाला वाटलें. आणि त्याप्रमाणें त्यांनीं दहा पधरा दिवस मुंबईतच जारीनें शोध चालविला होता. ' मुंबईतच आपणासारखी मंडळी आहे ' असा येथल्या पोलिसांचा ग्रह होणें आपणांस घातक आहे म्हणून मी मुद्दाम कलकत्त्याला जाऊन तें पत्र आणि पार्सल पाठविलें. आतां पुनः ही पत्राची गोष्ट शेटजी पोलिसांच्या कानावर घालतील, अशी माझी खात्री आहे. खरोखरच दागिने पार्सलनें कलकत्त्याहून आलेले पाहून रामजीशेटला फसविणारी मंडळी कलकत्त्याची आहे असाच पोलिसांचा ग्रह होईल आणि ते आपला मोर्चा त्या बाजूला वळवितील. असं झाल म्हणजे आणखी कांहीं दिवस ह्या अफाट मुंबई शहरांत आपणास ढवळाढवळ करण्यास काहीं हरकत नाहीं."

रायानें केलेला तर्क अगदीं खरा होता. त्यानें पत्रांत लिहिल्याप्रमाणें रामजीशेटनीं आपलें वर्तन सुधारलें, परंतु पुनः ती गोष्ट पोलिसच्या कानावर

घालण्यास ते विसरले नाहींत. पत्र आणि पार्सल कलकत्त्याहून आलेलें पाहून आपण पंधरा दिवस मुंबईत व्यर्थ धावधाव केली याचें पोलिस सुपरिन्टेंडेंट-साहेबास वाईट वाटलें. त्यानीं कलकत्त्यास रिपोर्ट लिहून रामजीशेट यांस फस-विणाऱ्या मंडळीचा शोध करण्यास तेथील पोलिस अधिकाऱ्यांस लिहिलें.

दुसऱ्या दिवशीं मंडळी आपल्या बिऱ्हाडीं बसली असता गोष्टी निघाल्या-वरून राजानें विचारलें, " पण राजा, तू इच्छागौरीचे दागिने परत का पाठ-विलेस, ह्या माझ्या शकेचें निरसन होत नाहीं. "

" कारण तें स्त्रीधन. स्त्रीधनाचा आपण केव्हाहि अपहार करू नये. शिवाय इच्छागौरी म्हणजे खरोखरीच ती शिवकाता गौरी आहे. आपल्या पतीकरतां तिनें आपल्या बहुमोल दागिन्याचीहि पर्वा केली नाहीं. अशा सज्जनांना लुबाडून आपलें कल्याण होणार नाहीं. "

" अस जर आहे तर मग गेकड रुपये का ठेवून घेतलेस ? "

" अरे, ते शेटजींचे. समुद्रातलें एक ओंजळभर पाणी काढून घेतलें म्हणून तो काहीं कोरडा ठणठणीत पडत नाहीं समजलास ! त्यांच्या एवढ्या अवाढव्य सपत्तींतून साडेचार पांच हजार रुपये गेले तर कांहीं रामजी करमाळी शेट आजच भिकारी होत नाहीं. "

" आणि समजा–यदाकदाचित् तो भिकारी झाला आणि तुझ्या दारीं आला तरी तू त्याला थोडीच भिक्षा घालणार आहेस ? " मध्येंच चिंत्या म्हणाला.

" ए राया; आता कशाला त्या गोष्टीची उठाठेव ! " बाप्पानें विषय बद-लण्याच्या उद्देशानें उत्तर दिलें, तोंच बापू म्हणाला, " राया, जार्ज जॉन कप-नीचे मॅनेजर आज बरेच दिवस आजारी आहेत. "

" मग तुझी इच्छा आहे का त्यांच्या गैरहजिरींत कंपनीचा मॅनेजर बनण्याची ? "

" कदाचित् झाली असती इच्छा ? पण हे मॅनेजर साहेब आहेत कर्जबा-जारी ! मी त्याच्या जागीं मॅनेजर झालों तर त्यांच्या कर्जाचे मला मॅनेजर व्हावें लागेल. " बाप्पा म्हणाला, " पण मला काल अशी बातमी लागली कीं, ह्या साहेबबहाद्दरावर वॉटसन् हॉटेलचें गेल्या दोन महिन्याचें सहाशें रुपये बिल चढलें आहे. ह्या कंपनीचा पगार होतो तिसऱ्या तारखेला म्हणजे उद्यां. तेव्हां मी बनतों वॉटसन् हॉटेलचा बिल कलेक्टर आणि तूं साहेबाच्या नांवानें कंपनींत टेलिफोन कर. "

" पण साहेबाच्या घरीं टेलिफोन आहे का ? "

" आहे तर–म्हणून तर ही शिकार पकडायची जाळ्यात ! "

**वॉटसन् हॉटेलचें बिल.**

दहांचा सुमार झाला होता. जॉर्ज जॉन कंपनीच्या ऑफिसातील सर्व कारकून हजर होते. फक्त मॅनेजर साहेब आजारी असल्यामुळे आज आठ दिवस ऑफिसात येत नव्हते. आज कंपनीचा पगाराचा दिवस असल्यामुळें पेक्लार्क बऱ्याच गडबडींत होता. इतक्यांत शेजारच्या खोलींत घंटा वाजली. ती ऐकून ' ऑफिसांत पाय नाहीं ठेविला तों टेलिफोनला झाली सुरवात ? ' अशी कुरकुर करीत एक कारकून उठला आणि टेलिफोन रुममध्यें गेला.

" ओलो ! हू आर यू ? " ( कोण आहेस तूं ? )

" मॅनेजर उईकमाईड. सेंड धी पेक्लार्क हीअर. " ( मी मॅनेजर उईकमाईड साहेब आहे. येथें पेक्लार्कला पाठवा. )

थोड्या वेळानें पेक्लार्क टेलिफोन जवळ आला.

" आय से पेक्लार्क, इफ् धी बिलकलेक्टर फ्रॉम वॅाटसन् हॅाटेल कम्स, प्लीज पे रुपीज सिक्स हंडरेड टू हिम ऑन माय अकाउंट ( जर वॅाटसन् हॅाटेलचा बिल कलेक्टर आला तर माझ्या हिशोबावर त्याला सहाशे रुपये दे. )

" ऑल राईट सर. " ( ठीक आहे महाराज. )

पेक्लार्क आपल्या जागेवर येऊन बसला. त्याने साहेबाच्या हुकुमाप्रमाणें त्यांच्या पगारातून सहाशें रुपये काढून बाजूला ठेविले. आणि तो दुसऱ्या कामाला लागला.

अकराचा सुमार होतांच मॅनेजर साहेबाची चौकशी करीत वॅाटसन् हॅाटेलचा बिल कलेक्टर आला. पेक्लार्कने एका कागदावर त्याची पावती लिहून घेऊन सहाशें रुपये त्याच्या हवाली केले. त्या मनुष्यानें पैसे खिशात टाकून मुकाट्यानें आपला रस्ता धरला. पुढें विशेष काही प्रकार न होतां संध्याकाळपर्यंत वेळ निघून गेला. चाराच्या सुमारास मॅनेजर उईकमाईड साहेब–जरी आजारी होते तरी–आपल्या गाडींत बसून पगार घेण्याकरिता ऑफिसमध्यें आले. पेक्लार्कने त्याच्यापुढें त्यांच्या पगारातून बिल देऊन बाकी राहिलेले रुपये चारशें ठेविले. ते पाहतांच इतकेच रुपये का ? असा साहेबानें प्रश्न केला.

" आपण सांगितल्याप्रमाणें मी सहाशे रुपये वॅाटसन् हॅाटेलच्या बिल कलेक्टरला दिले." पेक्लार्क म्हणाला.

" मी सांगितलें ! केव्हां ? "

" सकाळीं टेलिफोनमधून सागितलें !—"

" नाहीं —मी आज टेलिफोनहि केला नाहीं. "

" पण साहेब आपण केला—"

" नाहीं—" पाय आपटून गर्जना करीत साहेब म्हणाला.

" साहेब, टेलिफोनक्लार्कला विचारा—"

हातपाय आपटीत साहेबाने टेलिफोन क्लार्कला विचारलें. तेव्हा त्यानें ' टेलिफोन आला ' असेंच सागितलें. त्यावेळीं मात्र साहेबाचें मस्तक गरम झालें. त्यानें पाच दहा मिनिटें हातपाय आपटून सर्व ऑफिसभर बराच धिंगाणा केला. शेवटीं त्याला काय वाटले असेल तें असो त्यानें तात्काळ टेलिफोनमधून वॉटसन् हॉटेलमध्यें चौकशी केली. परंतु तेथून त्याला काय उत्तर मिळणार !—आमच्या बाप्पानें वसूल केलेलें बिल वॉटसन् हॉटेलला थोडेंच मिळणार होतें ! बिचाऱ्या उईकमाईड साहेबाला सहाशें रुपये गेल्याबद्दल चुरमुरे खात बसावें लागले !

**उईक माईड साहेब**

असो. दुसऱ्या दिवशीं मडळी एकत्र जमली असतां बापू म्हणाला, " बाप्पा तुझ्याकडून हें काम व्हावयाच नाहीं आणि उगाच का ही धडपड ! तू करायला जाशील एक आणि होईल भलतंच ! शहाणा असशील तर तूं ह्या फदात पडणार नाहींस ! "

" योग्य–अगदीं योग्य—फार पोक्त ! " आढ्यतेचा आव घालून बाप्पा म्हणाला, " एकूण आपल्यामते आम्ही अगदीं कुचकामाचे ठरलो ! "

" तस नव्हेरे ! तुझ्या ह्या धादल्या स्वभावावरून मी हें सागतों. " बापू म्हणाला, " विचार कर–तुझ्या हातून एखादी चुकी झाली तर त्याचा परिणाम भोगावा लागेल सर्वांना—"

" म्हणजे पर्यायें आम्हीं ठरलों मेषपात्रच ! "

" रागावूं नको. मी तुला राग यावा—"

इतक्यात राजा आत आला. त्यानें बापूचें वाक्य ऐकलें होतें. त्यावर तो म्हणाला " बापू, प्रथम दरवाजा बद कर म्हणजे राग आत येणार नाहीं. तुम्हांला माहिती आहे कीं, आपल्या क्लबमध्यें तेरावा इसम घ्यावयाचा नाहीं अस असून ह्या रागाला कोण बोलावितो ? "

राजानें आंत येतांच प्रथम ‘ दरवाजा बंद कर, ’ असें सांगितल्यावरून त्यानें काहींतरी नवीन शिकार आणली असावी असें मंडळींना वाटलें त्याप्रमाणें खरोखरच दरवाजा बंद करण्याकरिता बापू उठतहि होता. परतु त्याचें पुढचें वाक्य ऐकताच त्याच्या म्हणण्याचा अर्थ त्या सर्वांच्या लक्षांत आला. क्षणभरानें राजा पुढें म्हणाला, बापू, आज हा नवीन प्रकार काय आहे ? आपल्या क्लबची शिस्त मोडण्याचा विचार आहे कीं काय ? कोठलीही गोष्ट जमविण्यास किती श्रम पडतात हें मी तुम्हांला सांगितलें पाहिजे काय ? आपला क्लब सुरळीतपणें चालावा अशी इच्छा असल्यास राग, मत्सर, हेवा इत्यादि आपल्या क्लबमध्यें शिरता उपयोगी नाहीं, हें तुम्हीं विसरलां काय ? जोंपर्यंत मंडळींत एकमत आहे तोंपर्यंत—”

“ आणि आतां एकमत नाहीं, अस तूं कशावरून म्हणतोस ? ”

“ मी तसं म्हणत नाहीं. मंडळींत एकमत आहे हें मला माहीत आहे. परतु एकीची बेकी एका शब्दानेंच होत असते. ”

“ तेंहि खरेंच आहे, परतु तसा प्रकार आपणामध्यें होणार नाहीं ही माझी खात्री आहे. ” भाऊ म्हणाला.

“ माझेंहि मन सदरहूप्रमाणें. ” बाप्पा म्हणाला.

“ आणि माझेंहि त्याचप्रमाणें. ” चाच्या म्हणाला.

“ अने, हुं पण टेकू आपूं छूं. ” शेवटीं राजा म्हणाला.

अशा रीतीनें काहीं वेळ विनोद झाल्यावर ‘ रागाचा प्रश्न प्रथम उपस्थित होण्यास काय कारण झालें ? ’ असें राजानें बाप्पाला विचारलें. तेव्हा तो म्हणाला, “ माझ्या मनांतून रायचंद सुखचंदच्या दुकानावरून एक हुडी पटवावी असें आहे. परंतु माझ्याकडून हें काम होणार नाही, असें हा म्हणतो. ही पहा मी हुंडी देखील लिहून तयार केली आहे. ”

**रायचंद सुखचंद**

राजानें तो हुडीचा कागद हातात घेऊन नीट पाहिला. ती हुंडी पंधराशे रुपयांची असून चार महिन्याच्या मुदतीची लिहिलेली होती. क्षणभर त्या कागदाकडे पाहून तो म्हणाला, “ मग ही हुंडी तूं कशी पटविणार ? ”

“ टेलिफोननें ! रायचंद सुखचंदाच्या दुकानावर टेलिफोन आहे—”

“ बाप्पाकडून हें काम होणार नाहीं, असें तूं कां म्हणालास बापू ! तुला काय शंका आली ? ” क्षणभरानें बापकडे वळून राजानें विचारलें.

शका कसलीरे ! ह्याचा स्वभाव आहे घादल्या तेव्हा जरा कुठें त्याची पायरी चुकली तर एकदम्याकरितां सबंध जिना कोसळावा लागेल आपणाला !

" ही तुझी शंका अगदीं योग्य आहे. परंतु आपल्या बाप्पाची इच्छाच आहे. तेव्हा कांहीं तरी त्याच्या मनासारखें केलेच पाहिजे. " असे म्हणून त्याने डोकें खाजविण्यास सुरवात केली. बराच वेळ विचार केल्यावर, बाप्पा हुंडी पटविण्यास गेला, तर कांहीं कमीजास्त प्रकार होईल असें त्याला वाटेना. क्षणभराने त्यानें आपले विचार मडळीला कळवून बाप्पाला कपडे घालण्यास सांगितले. आणि पुढें काय करावयाचे त्याचा बेत करून ते दोघेजण बाहेर पडले.

दुपारची वेळ झाली होती. रायचद सुखचदाच्या दुकानावर गिऱ्हाइकांची गर्दी जमली होती. सोन्याहिऱ्याचा सौदा पटविण्यात मुनिम अगदीं गढून गेले होते. इतक्यात बाजूच्या कोपऱ्यांत टेलिफोनची घटा वाजू लागली.

" कोण ? दिनकरराव ! " टेलिफोनमधून प्रश्न आला.

" होय शेट, काय हुकूम आहे ? " मुनिमानें उत्तर दिलें.

" पधराशेंची हुंडी पाठविली आहे. चार टक्केप्रमाणें साठ रुपये व्याज कापून आता पटवून द्या. "

" ठीक आहे. "

**हुंडी**

अर्धा तास झाला. अद्यापि दुकानांतील गर्दी मोडली नव्हती. थोड्या-वेळापूर्वी मुनिमाला आलेला टेलिफोन कोणी केला याची वाचकाना कल्पना झालीच असेल ! शेट दुकानांत नाहींत, अशी सधी साधून राजानें तो टेलिफोन शेटच्या नावें केला होता. टेलिफोन करून अर्धा तास झाल्यावर बाप्पा दुकानावर चढला व दिनकरपताला नमस्कार करून बाप्पानें हुडी बाहेर काढिली. हुंडीचा कागद हातात घेऊन दिनकरपंतानें एका कारकूनाला हांक मारली आणि हुंडीचे पैसे भरण्यास सांगितले. हुकुमाप्रमाणें कारकून आपल्या जागेवर जाऊन त्यानें व्याज कापून घेऊन चौदाशें चाळीस रुपये बाप्पाच्या पुढें ठेविले. त्यात बहुतेक सर्व नोटाच होत्या. बाप्पानें नोटाचें बंडल केले. कारकून आपल्या खाते वहींत ती रक्कम लिहूं लागला. ती रक्कम कोणाच्या नांवें लिहावी तें त्याला समजेना. कारण ज्या कंपनीकडून ती हुंडी आली आहे असें दाखविलें होतें ती कंपनी त्या कारकूनाच्या माहितींतील नव्हती. त्यानें मुनिमाजवळ येऊन आपली शंका त्यास कळविली. तेव्हां मुनिमालाहि तोच प्रश्न पडला. इतक्यांत बाप्पाच्या

दुर्दैवानें शेटची गाडी येऊन दुकानाच्या दरवाजाजवळ थडकली. रायचंद शेटला बाप्पा ओळखत होता. शेटला दुकानांत चढताना पाहून आपला वार चुकला असें पाहून त्याचें धाबे दणाणलें! आतां प्रसंग मोठ्या आणीबाणीचा आहे असें समजून चुकला. परंतु करतो काय? आजुबाजूला त्यानें एकवेळ दृष्टि फिरविली—कारकुन, भय्या, मुनिम आणि शेट ही सर्व मंडळी जवळ उभी! त्याची दृष्टि चुकवून दुकानांतून निसटण्यास मार्गच नव्हता!

**मी एक गुप्त पोलिस आहें**

मुनिमानें हुंडीची हकीकत शेटजवळ सांगताच त्यांना मोठे आश्चर्य वाटलें. आपण टेलिफोन केलाच नाहीं. आणि हुंडीबद्दल आपणास काहींच माहिती नाहीं, असें त्यांनी सांगितलें. तें ऐकतांच दुकानांतील सर्वजण बाप्पाकडे पाहू लागले. हा काहीं तरी बनावट प्रकार आहे, असें प्रत्येकाला वाटू लागलें. शेटनीं बाप्पाला जवळ बोलाविलें. इतक्यांत एक मनुष्य दुकानावर चढला. आणि दुकानांतील मंडळीकडे बिलकुल लक्ष न देता एकदम जाऊन त्यानें बाप्पाचा हात पकडला.

"शेटसाहेब, तुमच्या दुकानावर काही तरी घोटाळा झाला आहे, अशी माझी खात्री आहे." तो मनुष्य शेटकडे वळून म्हणाला.

"होय. ही खोटी हुंडी ह्या इसमानें पटविण्याकरितां आमच्या दुकानावर आणली आहे. रक्कम पंधराशेंची आहे—"

असं काय? एकूण मला आलेला संशय खरा ठरला आहे तर?"

"पण आपण कोण!" शेटनें विचारलें.

"मी एक गुप्त पोलिस आहें. ह्या मनुष्याचा मला संशय आला होता, म्हणून आज चार दिवस मी ह्याच्या मागे आहे; आज मला हा मनुष्य मुद्देमालासह पकडतां आला. ठीक आहे शेट. आपण काळजी करूं नका, मी आताच रिपोर्ट देतों." असें म्हणून त्याने टेलिफोनजवळ जाऊन घंटा वाजविली. थोड्या वेळानें त्याचें उत्तर येताच तो म्हणाला, संशयी मनुष्य पकडला आहे, आपण लवकरच यावें." इतकें टेलिफोनमधून म्हटल्यानंतर त्यानें आणखी काहीं खुणेचे शब्द उच्चारले.

अद्यापि त्या मनुष्यानें बाप्पाचा हात धरलेलाच होता. त्याला एक दोन हिसके देऊन तो मनुष्य म्हणाला, "ही डांबिसगिरी केव्हापासून सुरूं केली?

चागला सभ्य पोषाख करून हा धंदा करता याची तुम्हाला शरम वाटायला हवी. कुठे आहे ती रक्कम काढा बाहेर —"

बाप्पानें हातांतील नोटाचें पुडकें पुढें केलें, तें घेऊन तो मनुष्य शेटकडे वळून म्हणाला, "शेटसाहेब, तो हुडीचा कागद आणि ही रक्कम आतां आमच्याजवळ राहूं द्या. आता इन्स्पेक्टरसाहेब येतील. ह्या मनुष्यावर आता पोलीस केस होऊन लगेच ही रक्कम तुम्हाला परत मिळेल—"

अशा रीतीनें तो मनुष्य बाप्पाला दम देत आणि शेटची समजूत करीत आहे, तोंच एक व्हिटोरिया येऊन दुकानाजवळ उभी राहिली. पोलीस इन्स्पेक्टर खालीं उतरले. त्याच्याजवळ जाऊन त्या गुप्त पोलिसानें सर्व हकीकत सांगितली. तेव्हा रागाने साहेबानें बुटाची ठोकर मारण्याचा आविर्भाव दाखवून बाप्पाला दोन चार शिव्या हासडल्या.

शेट तुम फिकीर मत करो. हम ए बदमाषको अच्छा शिखायेगा—चलो. ए हुडी और पैसा किधर हय ?" असे म्हणून गुप्तपोलिस म्हणविणाऱ्या मनुष्याकडून ते पैसे आणि हुडी साहेबानें आपल्या ताब्यात घेतले. "शेट अभी हम ए बदमाषकू लेकर जाता हय पोलिस स्टेशनपर. तुम चार बजे आकर हमकूं स्टेशनपर मिलना." असें म्हणून त्यानें बाप्पाला एक धक्की देऊन पुढें केलें.

"ठीक आहे' म्हणून शेटनें इन्स्पेक्टर साहेबास जाण्याची परवानगी दिली. आज आपलें दीड हजार रुपयाचें नुकसान होत होते, परतु सुदैवानें तो प्रसग आपल्या येण्यामुळेंच टळला. आणि ऐन वेळेवर पोलिसच्या येण्यानें चोर देखील सापडला ह्या आनंदात शेट होते. इन्स्पेक्टर साहेबानें शेटला सलाम करून बाप्पाला आपणापुढें व्हिक्टोरियात बसविलें आणि गाडी हांकण्यास सांगितलें.

वाचकहो, क्षणभर आपण त्या व्हिक्टोरियांत बसलेल्या इन्स्पेक्टर साहेबांकडे वळूं म्हणजे आपणास वरील गोष्टीचा जास्त उलगडा होईल. त्याची गाडी मोठ्या रस्त्यावर येताच गुप्त पोलीस म्हणविणारा मनुष्य बाप्पाकडे वळून म्हणाला, "पाहिलंस बाप्पा, शेवटीं बापू म्हणाला त्याचप्रमाणें झालं !"

"होय, आली होती खरी तशी वेळ, पण थोडक्यात चुकलं !" मी अगदीं बरोबर जुळविलें होतें, पैसे हातांत घेतले सर्व कांहीं झालं, तोंच शेटची स्वारी आली—"

"तेव्हाच मी समजलों कीं, आतां बाप्पा गडबडला. मलाहि प्रथम कांहीं

**इन्स्पेक्टर कोण?** सुचेना परंतु अशा शुल्लक गोष्टीनें का ह्या राजाला शह लागणार आहे! तावडतोब मला युक्ति सुचली. त्याबरोबर गुप्तपोलिस म्हणून शिरलों एकदम दुकानात!" राजा म्हणाला, आणि वाचकहो, खरोखरच तो राजाराम असून इन्स्पेक्टर बनून आलेला साहेब दुसरा तिसरा कोणी नसून राया होता. दुकानांतून राजानें टेलिफोन केला तो आपल्या बिऱ्हाडीं केला. त्याच वेळीं राया बाहेरून आला होता टेलिफोनमध्यें राजानें बापावर आलेल्या सकटाची रायाला खुणेच्या शब्दांनीं ओळख करून दिली. त्याबरोबर आपल्या वेषाची बतावणी करण्याकरितां ' मेकिंग बॉक्सनें ' स्वतःला इन्स्पेक्टर बनविलें. आणि तात्काळ व्हिक्टोरिया बोलावून राया दुकानावर येऊन थडकला. त्याच्या पोशाखावरून आणि त्याच्या एकंदर बोलण्या चालण्यावरून त्याच्याविषयीं शेटला किंवा दुकानातील इतर कोणाला शंका येण्याचें कारण नव्हतें.

संध्याकाळीं चार वाजण्याच्या सुमारास शेट पोलिस स्टेशनवर गेले व तेथील इन्स्पेक्टरला भेटून आपल्या येण्याचें कारण त्यास सागू लागले, परंतु त्याच्या म्हणण्याचा कांहींच मतलब साहेबाच्या लक्षांत येईना. तेव्हा आपल्या दुकानात घडलेली सर्व हकीकत ऐकल्यावर सर्व प्रकार साहेबाच्या लक्षांत आला. थोड्या वेळानें तो म्हणाला, "शेट, तुम्हीं म्हणता तो इन्स्पेक्टर ह्या पोलिस स्टेशनमधून गेलेला नाहीं. मी आता दुसऱ्या स्टेशनवर टेलिफोन करून विचारतों."

दहा मिनिटात मुंबईतील प्रत्येक पोलिसस्टेशनवर ती हकीकत जाहीर झाली. परंतु हुंडी पटविणाऱ्या चोराला, हुंडी पटविलेल्या रुपयासह नेणारा इन्स्पेक्टर कोण होता हें मात्र कळलें नाहीं!

**बेत बदलले** दुसऱ्या दिवशीं हा सर्व मजकूर वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाला. इंग्रजी दैनिक पत्रांनी ह्याबद्दल बरीच ओरड केली, शिवाय ह्या दोन चार महिन्यात टेलिफोनच्या द्वारें फसलेल्या मंडळींची यादीहि प्रसिद्ध करण्यांत येऊन टेलिफोन कंपनीने या गोष्टीचा कांहींतरी योग्य बंदोबस्त करावा म्हणून सणसणीत लेख प्रसिद्ध होऊ लागले. तेव्हा पोलिसनेंहि फार बारकाईनें चौकशीला सुरवात केली. ही गोष्ट आमच्या मडळीच्या लक्षात येतांच एके रात्रीं त्यांचें कौन्सिल भरलें.

"आतां ह्या टेलिफोनचा खेळ पुष्कळ झाला!" राया प्रथम म्हणाला,

त्या दिवशीं झाला तो प्रकार थोडक्यांत निभावला. नाहीं तर बाप्पाच्या हातात लोखंडी सलकडीच झळकायची ! ”

“ मग आतां पुढें उद्योग ? ” गजाभाऊनें मंडळीकडे पहात विचारलें, “ आपणाला तर बुवा स्वस्थ बसून चैन पडणार नाहीं—”

“ पण तुला स्वस्थ बैस म्हणून सागतो कोण ? उद्योगाची हौसच असेल तर कर उद्यापासून मंडळीचा स्वयंपाक म्हणजे चाऱ्याला तरी विश्रांति मिळेल. ”

“ आणि तूं काय करणार ! ”

मीं !—वाळकेश्वरीं बंगला घेऊन स्वस्थपणें अशी विश्राति घेत पडणार ! स्वस्थपणे हातपाय ताणून मागें असलेल्या बिछान्याच्या बळकटीला टेकीत राजाराम म्हणाला. हें वाक्य बोलून थोडा वेळ झाला नाहीं, तोंच त्याच्या मनांत कांहीं विचार येतांच तो ताडकन् उठला आणि रायाकडे वळून म्हणाला, “ राया, आता आपण असंच करू या ! खरोखरच वाळकेश्वरीं एक मोठा बंगला भाड्यानें घेऊं—”

“ आणि करूं काय ? ”

“ उडवूं एक बार ! ” राजा आनंदानें आपल्या मनात आलेल्या विचाराला अनुसरून हें वाक्य उच्चारतो तोंच त्याच्या पाठीवर मोठ्यानें थाप मारून गजाभाऊ म्हणाला, “ हा पहा त्या बाराचा आवाज ! ”

शेवटीं सर्वानुमतें वाळकेश्वरीं बंगला भाड्यानें घेण्याचा बेत ठरला. तेथें गेल्यावर मंडळीनें काय करावयाचें आणि कसा बार उडवायचा याचा बराच खल होऊन रायानें नवीन कामाची प्रत्येकाला वांटणी करून दिली. दुसऱ्या दिवशीं

**नवीन तयारी.**

शे दोनशें रुपयाचें सामान खरेदी करण्यांत कांहीं जणांचा दिवस गेला, तों संध्याकाळपर्यंत राजाराम वाळकेश्वरीं एक बंगलाहि ठरवून आला. मंडळीची बहुतेक सर्व तयारी झाली. त्यांत राया, राजाराम, गोप्या, आणि भाऊ हे चौघेजण एखाद्या इनामदाराप्रमाणें सजले आणि बाकीच्या आठ जणांना निरनिराळीं कामें वाटलीं होतीं.

चाऱ्या, तुम्ही आतां सर्वजण बंगल्यांत जाऊन प्रथम व्यवस्था करून ठेवा. राया म्हणाला, “ तेथल्या माळ्यानें किंवा आजुबाजूच्या मंडळीनें विचारल्यास शीरपुरचे इनामदार येणार आहेत असें सांगायचें—राहिल ना लक्षांत ! ”

“ आणि तुम्ही केव्हां येणार ! ”

" रात्रीं मी दोन घोड्यांची शिग्रामगाडी एका महिन्याच्या बोलीनें ठरविली आहे. ती गाडी बोरीबंदर स्टेशनवर रात्रीं येईल. आम्हीं अलिकडे प्लॅटफॉर्मवर बसून पंजाब मेल आली कीं बाहेर येऊं. म्हणजे त्या गाडीवानास संशय येणार नाहीं. तेथून मग आम्हीं वाळकेश्वरीं येऊं. तुम्हीं जेवणाचा बेत नामी करून ठेवा. मन्याबापूजवळ मी पैसे देऊन ठेविले आहेत. "

**शीरपूरचे इनामदार.**

ठरल्याप्रमाणें कोणी आचारी, कोणी शागीर्द तर कोणी कारकून अशा थाटानें चाच्या आपल्या आठ मित्रासह सकाळीं वाळकेश्वरावरील बंगल्यांत आले. त्यांच्याबरोबर सामानाचें ओझेंहि बरेंच म्हणजे दहा ट्रंका होत्या. परंतु त्यांपैकीं भरलेल्या अशा दोनच लहान ट्रंका होत्या. आपणाबरोबर सामान पुष्कळ दिसावें, म्हणून त्या त्यांनीं बरोबर घेतल्या होत्या. परंतु वेळ पडल्यास त्या एकांत एक घालून बंद केल्यास एका मोठ्या ट्रंकमध्यें त्याचा समावेश होऊन एकाच मनुष्याचें तें ओझें होईल, अशा सोईनेंच त्या विकत घेतल्या होत्या. चाच्या आदिकरून मंडळी बंगल्यांत आल्यावर त्यांनीं तो बंगला आपल्या गडबडीनें इतका गजबजून सोडला कीं, आजुबाजूच्या बंगल्यातील मंडळींना त्या इतके दिवस रिकामा पडलेल्या बंगल्यांत कोण आलें, ते पाहण्याची साहजिकच जिज्ञासा उत्पन्न झाली. तास दोन तासांत मंडळींना आपल्या शेजारीं शीरपुरचे श्रीमंत जहागीरदार येणार असें कळलें.

रात्रीं ९ च्या सुमारास दोन घोड्यांची शिग्राम खाड्खाड् करीत बंगल्याच्या बागेजवळ येऊन उभी राहिली. त्यावेळीं बंगल्यांतील मंडळीनें दिवा-हिलाल यांची अशी गर्दी उडविली कीं, खरोखरच कोणी मोठा राजा आला आहे, असें बाजूच्या मंडळींना भासलें. अशी गडबड अर्धा तास चालू होती. पुढें एकदम सामसूम होऊन गेलें.

**मंडळीची ओळख.**

आपल्या बंगल्याच्या बाजूला कोक कोण मंडळी राहतात. याचा शोध मंडळीनें केव्हांच करून ठेविला होता. त्यांच्या डाव्या बाजूला जे दोन बंगले होते, त्यांत मोठे धनिक भाटये गृहस्थ रहात असून उजव्या बाजूला एका बंगल्यांत एक नामांकित पारशी घराणें व त्यांच्या बाजूला एका गिरणीचे मालक वाणी शेट्या रहात होते. दुसऱ्या दिवशीं सकाळीं चांगल्या मोठ्या ताटांत उंची रेशमी रुमालाखालीं झांकलेली मिठाई, फळफळावळ

आणि उत्तमपैकीं दोन चार प्रकारची भाजी अशी भेट घेऊन कारकून बनलेला मनोहर दोन पेशवाई थाटाचे पट्टेवाले बरोबर घेऊन—हे पट्टेवाले आण्णा आणि बळवंत होत—प्रत्येकाच्या घरीं गेला. अशा रीतीनें ही भेट आलेली पाहून प्रत्येक शेजाऱ्याच्या मनांत आमच्या मंडळीविषयीं प्रेम आणि आदर उत्पन्न झाला असेल यांत कांही नवल नाहीं, प्रत्येकानें नवीन राहावयास आलेल्या जहागीरदाराविषयीं चौकशी केली, तेव्हां त्यांना कळलें कीं, 'शीरपूरचे जहागीरदार हवा बदलण्याकरितां आणि औषधोपचाराकरितां मुंबईत आले असून शिवाय आपल्या मुलीच्या लग्नाकरितां मुंबईतून काही जवाहिर उंची कपडे इत्यादि ते खरेदी करणार आहेत, आणि त्यांची एकुलती एक उपवर मुलगी चंद्रकला ही देखील त्यांच्या बरोबर आली आहे.' वाचकहो, ही चंद्रकला कोण म्हणून तुम्ही कदाचित् घोटाळ्यांत पडाल, परंतु पूर्वी येऊन गेलेल्या गोपिकाबाईची तुम्हाला आठवण होतांच ही चंद्रकला कोण हें तात्काळ तुमच्या लक्षांत येईल.

मनोहरानें आपल्या जहागीरदाराविषयीं अशी साखर पेरून ठेविली कीं,

**छाप बसविली.**

दुसऱ्या दिवसापासून बाजूच्या मंडळींची घरांतील बायकां-मुद्धां इनामदाराच्या घरीं जा ये सुरू होऊन भेटीही जाऊ येऊं लागल्या. प्रथम शेठ लल्लुभाई मुरारजी आणि शेठ जीवनलाल मोतीलाल हे दोघे गृहस्थ भेटीकरितां आले. त्यावेळीं राया दिवाण-खान्यांत बसला होता. बाजूला राजा आणि बापू असून इतर मंडळी दूर मोठ्या आदबीनें उभे होते. ही सर्व व्यवस्था रायानें अगदीं नाटकी थाटावर जमविली होती. शेट मंडळी भेटीकरिता येतांच इतर मंडळीनें त्यांना मोठ्या मानानें रायाच्या जवळ आणून बसविलें. राया बसला होता त्याच्या बाजूला एक उंची लाल भरजरी शाल पडली होती. यावरून त्यांनी जमविलेल्या नाटकी थाटाची वाचकांना सहज कल्पना होणार आहे. बराच वेळ गप्पागोष्टी झाल्यावर दोन दुधाचे पेले त्याच्यापुढें आणून ठेवण्यांत आले. इतक्यांत बाजूच्या दुसऱ्या बंगल्यांतून 'शेट वल्लभदास सामळदास येतात' अशी वर्दी देण्याकरितां त्या शेटचा मनुष्य आला. त्याला 'घर आपलें आहे, आपण यावें' असा निरोप बापूनें शेटजींना सांगण्यास सांगितला. थोड्या वेळानें वर्दीप्रमाणें शेट आले. बराच वेळ त्यांच्या गोष्टी झाल्यावर त्या मंडळीवर रायानें आपली छाप बसविली. जेव्हां ती मंडळी जाण्याकरितां निघाली, तेव्हां

मनोहरानें उत्तम पैकीं उंची अत्तर त्यांच्या हाताला लावून त्यांची बोळवण केली. एकंदरीनें हा जहागीरदाराचा थाट पाहून ती मंडळी भाळली यात शंका नाहीं !

दुपारच्या प्रहरी शेजारच्या सक्करबेन, जमनाबाई आणि तापीबाई ह्या आमच्या वेषधारी चंद्रकलेला भेटण्याकरितां आल्या.

**चंद्रकला.** गोप्याला सजविण्याकरिता रायानें सकाळीं एक तास मोडला होता. त्याच्याकरिता रायानं मुद्दाम वीस रुपयाचा एक केसाचा टोप खरेदी केला होता. तो नैसर्गिक केसाप्रमाणें डोक्यावर बसत असे. शिवाय गहिलेला थोडा कृत्रिमपणा गोप्यानें डोक्यावरुन पदर घेऊन साफ झांकला होता. त्याचप्रमाणें तिच्या अंगावर दोन चार कृत्रिम पण ठळक दागिने होते. मुळचा गोपाळ सुदर असल्यामुळें त्याला तो स्त्रीवेष अगदीं हुबेहूब दिसून त्याचे आंगविक्षेप, त्याची बोलण्याची ढब आणि त्याची गाला-तल्या गालात हासण्याची तऱ्हा, हे सर्व प्रकार एकाद्या कसलेल्या कसबिणीला खाली पाहावयाला लावून जवळ असणाराचें मन तेव्हा मोहून टाकीत.

तास अर्ध्या तासाच्या परिचयात शेजारच्या आलेल्या स्त्रिया चंद्रकलेबरोबर इतक्या मोकळ्या मनाने वागू लागल्या कीं, त्याच्या आदिकरून नोकर बनलेल्या त्याच्या मित्रास त्या स्त्रीवेषधारी गोप्याविषयीं कौतुक वाटूं लागलें. बराच वेळ चद्रकलेच्या त्याच्याबरोबर गोष्टी झाल्यावर तिनें ' दिवाणजी, दिवाणजी ' अशा हाका मारिल्या. त्याबरोबर मनोहर आत आला आणि एखाद्या राणीला मान द्यावा, त्याप्रमाणे आपलें डोकें वांकवून हुकुमाची वाट पहात तो एका बाजूला उभा राहिला.

" दिवाणजी, फराळाचीं ताटं पाठवा. "

" हुकुम ताईसाहेब. " असे म्हणून पुनः मान वाकवून मनोहर बाहेर पडला. ह्या हुकूम देण्यात जो एक प्रकारचा गंभीरपणा आणि दिवाणजीनें दाखविलेला लीनपणा दिसून आला. तो पाहून आमच्या गुजराथी घेला-बायका अगदीं गार होऊन गेल्या. कारण हा प्रकार म्हणजे त्यांनीं दया-शंकराच्या नाटकांत राणीच्या महालांतील पाहिलेला एक देखावाच आहे, असा त्याना भास झाला. इतकेंच नव्हे तर अशा मोठ्या जहागीरदाराच्या मुलीबरोबर इतक्या थोड्या वेळांत आपण वाजवीपेक्षां जास्त सलगीनें वागूं लागलों, असेंहि त्याना वाटूं लागलें. सक्करबेन तर मनात खजील होऊन

चंद्रकलेजवळून किंचित् सरकून बाजूलाहि झाली. परतु हा प्रकार त्या चाणाक्ष गोप्याच्या तेव्हाच लक्षात आला. त्यानें हांसत हांसत तिचा हात धरून तिला जवळ ओढलें आणि म्हणाली, "का सक्करबेन, अशा दूर का मरतां ?"

इतक्यात फराळाचीं चार ताटें घेऊन आचारी त्याच्या आत आला. त्या ताटात गोडाचे शेलके पदार्थ होते. चद्रकलेनें आग्रह करून ते पदार्थ त्यांच्याकडून खावविले. हात धुवून झाल्यावर मनोहराने चार सहा विडे एका लहानशा ताटात आणून ते ताट चद्रकलेपुढें केलें. वाचकहो, आमच्या इनामदाराकडे भेटण्याकरितां येणाऱ्या स्त्रीपुरुषाचें स्वागत कसें होत होतें, त्याची कल्पना व्हावी म्हणून हा पहिल्या दिवसाचा प्रकार येथें मुद्दाम दिला आहे.

तिसऱ्या दिवशीं संध्याकाळीं सक्करबेननें आपल्या शेजारच्या पारशी मैत्रिणी शिरीनबाई आणि फिरोजबाई यांना चद्रकलेच्या भेटीकरितां आणलें. बायकांची ओळख होताच जहागीर शेट पारशी त्याच रात्रीं इनामदाराच्या भेटीला आले. अशा रितीनें आठ दिवसात आजुबाजूच्या मडळीची ओळख होतांच रायानें त्याच्या सभोंवती आपलें जाळें पसरण्यास सुरवात केली.

"मग शेटजी, उद्यां बेत कायम केलाना ?" रात्रीं शेटमडळी जमल्यानंतर राया म्हणाला.

"भाऊसाहेब—" रायाला सर्वजण भाऊसाहेब ह्या नांवानें ओळखत होते.

"भाऊसाहेब, आपण सागाल तेव्हां आम्हीं तयार आहोंत. पण ह्या आमच्या जहांगीरशेटचा काय विचार आहे, तो आपण पहा—"

"काय जहांगीरशेट, तुम्हीं येणार ना उद्या आमच्याकडे जेवायला ! माझ गरिबाचं आमंत्रण ! तुमच्यासारखी मंडळी तरी कधीं मला लाभणार आहेत !" पुनः जीवनलाल शेटकडे वळून राया म्हणाला, "आणि शेट, तुम्हीं काल म्हणाला त्या तुमच्या येतील ना ?"

"हो—हो—येतील ! त्यांत काय झालं ? आपण सागू तेव्हा ती हजर होईल. मलाहि तिला एकदां येथें आणावयाची होती !"

त्याप्रमाणें बेत सजला ! रायानें आपल्या शेजारच्या सर्व मंडळीला आपणाकडे दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं जेवावयास बोलाविलें. परंतु हा समारंभ करण्याच्या मुळाशीं वेगळेंच कारण होतें. आणि तें कारण म्हणजे शेट जीवनलाल यांची नायकिण हेंच होय.

**व्यूह रचला.**

जीवनलाल शेट लक्षाधीश होते. घरांत दुसरी बायको, पण बिचारी क्षयानें अंथ-

रुणाला चिकटलेली ! मुल नाहीं बाळ ! आणि संपत्ति अलोट ! तेव्हा अशा धनिकांच्या धनाला ह्या बाहेरच्या गोचड्या आणि जळवा लागल्या म्हणून आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं ! दोन दिवसांपूर्वी बोलतां बोलतां त्यानीं आपल्या कृष्णाजीची गोष्ट रायाला सांगितली. शेट तिला दरमहा दोनशें रुपये देत होते. शिवाय महिन्याकाठीं हजार पांचशेंचा दागिना किंवा एखादी वस्तु शेट-कडून तिला मिळत असे तें वेगळेंच ! ही सर्व हकीकत ऐकतांच रायानें कृष्णाजीला प्रथम आपल्या पकडींत पकडण्याचा विचार केला. त्याप्रमाणें त्यानें ती गोष्ट आपल्या साथीदारांना सांगितली. आणि त्यानीं हा व्यूह रचला होता.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं शेटमंडळी इनामदारांकडे जमली. स्वयंपाकघरात चाच्याची अगदीं तिरपिट उडाली होती. इतक्या मंडळीचा स्वयंपाक तो एकटाच करीत होता. त्या बाराजणाशिवाय परका कोणीहि त्यांच्या बंगल्यांत गेला नव्हता. इतकेंच नव्हे तर माळी किंवा गाडीवान् हे सुद्धा आंत न येतील अशी त्यांनीं खबरदारी घेतली होती. कधीं एखादे वेळीं ते आंत आल्यास 'आपले सोवळें जाईल' ह्या सबबीवर चाच्या त्यांना बाहेरच उभे करीत असे. एक दोनदां असें झाल्यावर 'बामन लईच सवला' असें म्हणून ते आंतहि जात नसत. आमच्या मंडळींना इतकी दक्षता राखण्याचें कारण वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल ! कारण त्याचा चोरटा व्यवहार आणि दुसरें गोप्याचा स्त्रीवेष ! असो. आज गोप्यानेंहि विशेष शृंगार केलेला दिसत होता. कृष्णाजीला शह देण्याची कामगिरी आज त्याच्याकडे होती.

सात वाजण्याच्या सुमारास कृष्णाजी आपल्या आयुधानिशीं बंगल्यावर आली. तिच्याबरोबर आलेले तिचे बजवय्ये बाहेर बसून राहिले, परंतु मनोहरला पाठवून गोप्यानें कृष्णाजीला आंत नेलें. त्यावेळीं तिच्या अंगावर दहा पंधरा हजारांचा ऐवज होता. वयाने ती तीस बत्तीस वर्षांची असून वर्णानें गोरी आणि बांध्यानें सडपातळ होती. जातीनें ती नायकीण असल्यामुळें तिच्या पोशाखाचें आणि नखऱ्याचें वर्णन करण्यापेक्षां वाचकांना त्याची कल्पना सहजच होण्यासारखी आहे. आतां ती आपल्या कसबांत कितपत तरबेज होती याची कल्पना होण्या-करितां तिनें ह्या दोनचार वर्षांत जीवनलाल शेटकडून वीस बावीस हजारांचा ऐवज उपटला होता, इतकी गोष्ट सांगितली कीं पुरे आहे. आतां तिचें तें कसब गोप्यासारख्या पोरापुढें किती टिकतें तें पाहणें आहे.

**कृष्णाजी.**

" या–बसा. " कृष्णाजीला मनोहरानें आंत आणल्यावर चंद्रकला तिला म्हणाली, " आणि दिवाणजी, तो दिवा जरा मोठा करा आणि पान लावून पाटवा. "

" आज्ञा ताईसाहेब." असें म्हणून मनोहरनें लीनतेनें मान वांकविली, आणि हुकूमाप्रमाणें दिवा किंचित् मोठा केला. त्याच्या ह्या अदबीच्या वर्तनाकडे पाहून कृष्णाजी आश्चर्यांत पडली. तिनें एकवेळ चंद्रकलेकडे नीट न्याहाळून पाहिलें. एवढ्याशा पोरीला इतका मान दिलेला पाहून ' ही मंडळी कोण आहेत ! हें जाणण्याची तिला जिज्ञासा उत्पन्न झाली. थोड्या वेळानें मनोहरानें एका लहान चांदीच्या ताटात चार सहा विडे आणून ते चंद्रकलेच्या पुढें केले.

" आज तुम्हीं गाणार ना ?—तुम्हीं कशाहो गाता ? मी किनई बायकांचं गाणं नव्हतं हो आजपर्यंत ऐकलं !–मला गाणं फार आवडतं, पण आमच्या भाऊसाहेबांना किनई त्याचं फार बाई वेड—" एखाद्या भाबड्या पोरीप्रमाणें गोप्या बोलूं लागला. परंतु असें बोलण्यात त्याचा मतलब निराळाच होता !

" भाऊसाहेब कोण ? " कृष्णाजीनें विचारलें.

" भाऊसाहेब जहागीरदार–माझे वडील. आमच्या आईसाहेब वारल्या-पासून भाऊसाहेबांची करमणूक म्हणजे गाणंच ! " असें म्हणून गोप्या क्षण-भर कृष्णाजीच्या तोंडाकडे पहात राहिला. क्षणभरानें त्यानें चटकन् पुढें होऊन म्हटलें, " खरंच गडे, तुम्हीं हा पदर घ्या पाहूं डोक्यावरून !–थांबा मी देतें हो ! " असें म्हणून त्यानें कृष्णाजीच्या डोक्यावरून पदर दिला. तिनेंहि मुकाट्यानें गोप्या करतो त्याप्रमाणें करूं दिलें, क्षणभर कृष्णाजीकडे एकचित्तानें पाहिल्यासारखें करून गोप्या पुढें म्हणांला, " अगदीं थेट तसाच चेहरा–आमच्या आईसाहेब अगदीं अशाच किं हो दिसत होत्या–" असें म्हणून किंचित् कालानें गोप्यानें तिच्या खांद्यावर आपली मान टेकली. आणि हुंदके देण्यास सुरवात केली !

झालें ! लोणी विरघळलें !! गोप्यानें बाजू जिंकली आणि कृष्णाजीला शह लागला !!! तिनें एवढ्या मोठ्या जहागिरदाराच्या मुलीचें तें हृदय विरघळणारें वर्तन पाहून चंद्रकलेच्या पाठीवरून हात फिरविला आणि तिला आपणाजवळ ओढलें. थोड्या वेळानें कृष्णाजीला सव्वा हात बात ठोकून कामापुरतीच आपणाविषयीं तिला माहिती देऊन चंद्रकला म्हणाली, " खरंच गडे, तुम्हांला आतां पाहून

**शाह दिला.**

आमच्या भाऊसाहेबाना आमच्या आईसाहेबांची आठवण होईल.

हें भाषण ऐकतांच कृष्णाजीच्या मनांत एकदम खळबळ उडाली !

जेवणाचा समारंभ आटोपला ! सर्व मडळी दिवाणखान्यांत येऊन बसली. सारंगीचा मंजुळ आवाज आणि तबल्याची धडपड सुरू झाली. घेतलेल्या वेषानुसार राया सर्वांच्या मध्यभागीं बसला होता. त्याला आपणासमोर बसलेला पाहून आणि त्याचें ऐश्वर्य, त्याची भरज्वानी आणि त्याच्याविषयीं चंद्रकलेनें सांगितलेली हकीकत ह्या गोष्टी तिच्या मनांत येऊन खरें प्रेम आणि त्याला ऐश्वर्याकरिता आटोक्यात आणण्याकरितां धडपडणारें लटकें प्रेम याचें कृष्णाजीच्या मनांत युद्ध सुरू झालें.

**भाषण झालें.** बारा वाजल्यानंतर विश्राति घेण्याकरिता गाणें थाबविण्यांत आलें. तात्काळ नोकर आणि आचारी दुधाचे पेले घेऊन बाहेर आले. गाण्यांत कृष्णाजीनें अगदीं बहार उडवून दिली होती यात शंका नाहीं ! दूध वगैरे घेऊन झाल्यावर पुनः गाण्यास सुरवात झाली. ह्या वेळीं मात्र मधून मधून राया एखादा राग कृष्णाजीला सुचवीत होता आणि तीहि तोच राग गावून आपलें कसब दाखवीत होती. दोन वाजता गाणें बंद झालें. जीवनलालशेट शिवाय इतर मडळी रायाची परवानगी घेऊन आपापल्या बगल्यावर गेली.

" आतां रात्र फार झाली आहे—" कांहीं वेळ गोष्टी झाल्यावर कृष्णाजीकडे पहात जीवनलालशेटजीकडे वळून राया म्हणाला, " आपली हरकत नसल्यास आमच्या ताईसाहेबांच्या सोबतीनें ह्या येथेंच झोंपतील—"

" काय भाऊसाहेब म्हणता—आमची कसली हरकत ? मी काय हें दुसऱ्यांचें घर समजतों काय ! " हातवारे करून जीवनशेट म्हणाले, " पण कृष्णा, आज तूं मोठी बहार केलीस.—काय भाऊसाहेब खरं ना ! "

रायानें उत्तराऐवजीं फक्त हास्यमुद्रेनें कृष्णाजीकडे पाहिलें आणि बाजूला उभा असलेल्या मनोहराला सांगितलें—" दिवाणजी, ह्यांची झोंपण्याची व्यवस्था ताईसाहेबांच्या महालांत करा. "

थोड्या वेळानें जीवनलालशेटहि आपल्या बंगल्यावर निघून गेले. हलुहळू राया आणि कृष्णाजी यांचें भाषण सुरू झालें. बऱ्याच वेळानें राया म्हणाला. " आज आपणास पाहून व आपला आवाज ऐकून माझ्या मनाची कांहीं चमत्कारिक स्थिति होऊन गेली आहे. "

" असं का व्हावं ?—मजपासून आपणास त्रास पोंचला अस दिसत ! " स्वतः तयार केलेली पानाची पट्टी पुढें करीत कृष्णाजी म्हणाली.

" छे, छे, त्रास नाहीं. फक्त एका गतगोष्टीची आठवण झाली इतकेंच ! असो. जाऊ द्या त्या गोष्टी. कोण आहे तिकडे ? दिवाणजी, जा ताईसाहेबांना येथे पाठवा. "

थोड्या वेळानें चंद्रकला बाहेर आली. आणि त्या दोघामध्यें लडिवाळपणानें बसून म्हणाली, " भाऊसाहेब, मला किनई आजचं गाणं फार फार आवडलं. तुम्हाला आवडलं ना भाऊसाहेब !—कसं हो ह्या मजुळ गातात—खरंच बाई, किती तरी सुंदर ह्यांचा गळा आहे ! "

" तुला आवडलं ना गाणं ? मग त्याना बक्षीस काय देणार ? "

रायाच्या तोंडून हे शब्द बाहेर पडतात न पडतात तोंच चद्रकलेनें आपल्या गळ्यातील मोठी मोत्यांची माळ काढून ती पटकन् कृणाजीपुढें केली.

" शाबास—" राया म्हणाला, " ह्याला म्हणतात गुणग्राहकता—"

" हें काय बाई भलतंच ! " असें म्हणून कृष्णाजीनें पुनः मोठ्या शर्तीनें ती माळ चंद्रकलेच्या गळ्यांत घातली.

" बरं आतां राहूं दे—तुझ्या लग्नात त्या येतील, तेव्हा आपण त्यांची योग्य सभावना करूं ! पण काय हो, याल का तुम्ही आमच्या ताईसाहेबांच्या लग्नाला ? "

" म्हणजे !—अस काय विचारतां ? "

बराच वेळ राया, चद्रकला आणि कृष्णाजी याचा विनोद चालू होता. ह्या प्रथम भेटींनच कृष्णाजीला पूर्णपणें आटोक्यांत आणण्याचा रायानें विचार केला होता. क्षणभरानें त्यानें एकदां घड्याळाकडे पाहिलें. तों त्यात तीन वाजून गेले होते. आतां गोप्यानें आपणाजवळून उठावें म्हणून त्यानें त्याला डोळ्यानें खूण केली. ती खूण त्या चाणाक्ष पोराच्या तेव्हांच लक्षांत आली. रायानें आपणास उठून जाण्यास खूण केली हें तो समजला. परंतु एकदम तेथून उठून न जातां तो हळूहळू जांभई देऊं लागला.

**गतगोष्टीची आठवण**

" भाऊसाहेब, मी जातें गडे आतां. " क्षणभरानें जाभई देत देत चंद्रकला म्हणाली, " मला किनई आतां झोंप येते. " असें म्हणून ती उठत उठत कृष्णाजीकडे पाहून म्हणाली, " तुम्हीं बसा कीं, थोडावेळ भाऊसाहेबांजवळ. "

चंद्रकला उठून गेल्यावर थोड्या वेळानें आपणासमोर विचारांत मग्न होऊन

बसलेल्या रायाकडे किंचित् सलज्ज दृष्टीनें पहात कृष्णाजी म्हणाली, " मघां आपण काय म्हणालां तें मला कांहींच कळलं नाहीं. मला पाहून व माझा आवाज ऐकून आपणांस अशा कोठल्या गत गोष्टीची आठवण आली ? "

रायानें उत्तर दिलें नाहीं. खरोखरच आपण पूर्वी अनुभविलेल्या स्थितीचा विचार करीत आहोंत असेंच त्यानें दाखविलें. बराच वेळ त्याच्याकडून उत्तर येत नाहीं असें पाहून ती पुढें म्हणाली, " असं काय आपणास दुःख होत आहे ! मला तरी सांगा माझ्या हातून होण्यासारखं असेल तर मी काहीं करीन—"

**दोघींची साम्यता.**

" कृष्णाजी, काय सांगूं ! तुम्हाला ? आपणास मी पाहिलं नसतं — आपला हा कर्णमधुर आवाज मी ऐकला नसता तर आजच्या या आनंदाच्या दिवशीं मला माझ्या चंद्रकलेच्या आईची इतकीं वर्षें बुझलेली आठवण झाली नसती. "

" म्हणजे !—कृष्णाजी काय सांगूं ! तुमच्या डोळ्यांतील चमक, तें आवाजांतील माधुर्य, ह्या रेखलेल्या भुंवया, नाकाचा हा बाक, हांसतांना उजव्या गालांत पडणारा खाडा-किती म्हणून साम्य सांगूं ! अरेरे ! गेली बिचारी ! आठवण झाली, कीं मी अगदीं वेडा बनतों ! मजबरोबर बोलताना तिच्या प्रत्येक शब्दाबरोबर बाहेर पडणारा प्रेमरस आपले एक एक शब्द ऐकून त्या तिच्या शब्दांची आठवण देत आहेत ! पण आता त्या गोष्टी कशाला ! "

इतकें बोलून राया पुनः सचित बसला. परंतु त्याच्यासमोर बसलेल्या कृष्णाजीला मात्र स्वस्थ बसवेना. ती हळूंच म्हणाली, " पण इतके हताश का होतां ! प्रत्येक गोष्टींत जर त्यांची माझी इतकी साम्यता आहे तर-तर मी काहीं आपणांस परकी-परकी नाहीं—" असें म्हणून तिनें हळूचच रायाच्या मांडीला स्पर्श केला !

परंतु त्या स्पर्शापासून त्याला काय भावना झाल्या असतील ! त्या स्पर्शापासून त्याला प्रेम-भावना झाल्या काय ? छे ! त्याचा तो विषयच नव्हता. फक्त कृष्णाजी आपल्या जाळ्यांत पूर्णपणें अडकली हें खात्रीपूर्वक सुचविणारा तिचा तो स्पर्श आहे असें त्याला वाटलें. क्षणभरानें निश्वास टाकून तो म्हणाला, " काय म्हटलं तुम्हीं कृष्णाजी ! "

**बेसण हातीं आली.**

" काय म्हणायचं मी ! म्हटलं इतकं वाईट वाटून घेण्याचं कांहीं कारण नाहीं. " असें म्हणून ती किंचित् पुढें सरकली परंतु रायानें तिला जास्त

उत्तेजन दिलें नाहीं. कारण त्याचें लक्ष मुद्यावर होतें. बराच वेळ त्यांच्या गोष्टी झाल्या. पुढें कृष्णाजीनें भाऊसाहेबाबरोबर त्यांच्या जहागिरीच्या गांवीं-शीरपुरास जाण्याची आपली तयारी दर्शविली. क्षणभरानें विचार करीत करीत राया म्हणाला, " पण येथें हें जुळावं कसं ? आमच्या शीरपूरास कांहीं काळजी करण्याचें कारण नाहीं. कारण तेथें माझा मीच मालक आहें. परंतु येथें तुमचे जीवनलाल शेट आहेत ना ? त्याना ही गोष्ट कळल्यास माझ्यावर त्यांचा राग होईल. म्हणतील माझं माणुस ह्या भाऊसाहेबांनीं फितवून पळवून नेलं—"

" पण त्याची काळजी तुम्हाला कशाला ? मी आपलं माझं पाहून घेईन !"

बर पण येथें मलाहि असं उघड तुमच्या घरीं येतां येणार नाहीं. येथें सर्व मडळी मला ओळखतात !"

" पण घरीं बोलावून कुठें आपणास संकटात घालूं इच्छितें ! मीच फिरण्याच्या निमित्तानें संध्याकाळीं मधून मधून येथे येत जाईन. मग तर झालं ना ! "

" वाः मग तर ठीकच ! "

प्रभातकाळ झाला. अद्यापि राया आणि कृष्णाजी बोलत होते. कृष्णाजीला अशा रीतीनें पहाट होईपर्यंत बोलत बसविण्यांत रायाचा दुसरा एक मुख्य उद्देश होता. आणि तो उद्देश म्हणजे कृष्णाजी गोप्याजवळ झोंपली असतां कदाचित् झोंपेमध्यें त्याच्या डोक्यावरील केसांचा टोप इकडे तिकडे सरकला किंवा एखाद्या अन्य कारणानें गोप्याला दिलेल्या स्त्रीवेषाचा गौप्यस्फोट झाला तर सर्व गोष्टी फसतील, अशीहि त्याला भीति होती. हलुहलू सर्व मंडळी उठूं लागली. तेव्हां राया म्हणाला, " पहा, बोलतां बोलतां रात्र तर निघून गेली. आतां तोंड धुवून चहा वगैरे घ्या इतक्यांत तुमची मंडळी उठतात. अरे, कोण आहे रे तेथें ! " असें म्हणताच मनोहर आंत आला. त्याच्याकडे वळून राया म्हणाला, " यांच्या प्रातर्विधीची व्यवस्था करून यांना तोंड धुण्याकरितां पाणी द्या."

**चंद्रकला—चंद्रसेन.**

कृष्णाजी उठून मनोहराबरोबर जातांच राया आत गेला. गोप्या आळस देत नुकताच उठून बिछान्यावर बसला होता.

" गोप्या, गाढवा किती निष्काळजी आहेस तूं ! तो टोप पहा किती सरकला आहे तो ? कदाचित् कृष्णाजी आंत असती तर तिला ' ही चंद्रकला

की चंद्रसेन ' म्हणून शका आली असती मग ?–उठ—" असें म्हणून रायानें त्याचा टोप सारखा केला, थोड्या वेळानें कृष्णाजीची जाण्याची तयारी झाली. दरवाजावर गाडी येऊन उभी राहिली. दिवाणखान्यात मंडळी चहा घेत बसली होती. गोप्या आणि कृष्णाजी जवळ जवळच बसले होते. गोप्या तिला चहाचा आग्रह करीत असता म्हणाला, " तुम्ही सर्व रात्र हें जागरण केलें. तुम्हाला त्रास कसा होत नाहीं बाई ?

" असं हें कुठं गाण असल म्हणजे बहुतकरून त्या रात्रीं मला झोंप मिळत नाहीं. पण हें काय ? मला हा चहा तरी देता किती ! " गोप्या अधिक चहा ओतताना त्याचा हात धरून कृष्णाजी म्हणाली.

" आतां तुमची भेट कधीं होईल ! खरच बाई; माझा किनई जीव आतां तुमच्याकडे लागला. मीच आलें असतें रोज तुमच्याकडे पण—"

" मी समजलें. तुम्हीं नाहीं आलां तरी आतां मीच मधून मधून एकाद्या दिवशीं संध्याकाळीं फिरण्याच्या उद्देशानें येथें येत जाईन. मग तर झाल ? " असें म्हणून तिनें तिरक्या दृष्टीनें किंचित् हास्य मुद्रेनें रायाकडे पाहिलें.

" खर का हें ! मग मला किती आनद होईल म्हणून सागू ! पण खरंच ना तुम्ही येत जाल ? मला किनई तुमच्याजवळ बसूनच राहवंसं वाटतं ! " असं म्हणून गोप्यानें आपल्या बोटातील आगठी काढून आपल्या हातात असलेल्या कृष्णाजीच्या हातांतील बोटात घातली. " ही माझी आठवण ! "

" हें काय ! आतां मीच उलट तुम्हाला आठवण म्हणून कांहीं द्यायचं पण आतां नाहीं मजजवळ काहीं. आता परवा येईन तेव्हां तुमच्याकरिता एक आठवण राहील अशी वस्तु घेऊन येईन."

रात्रीं जागरण झालें असल्यामुळें सर्व मंडळींना त्या दिवशीं जेवणाकरिता बराच वेळ झाला. जेवण अगदीं स्वस्थपणानें चाललें होतें.

**प्रयोगाला सुरवात**

कृष्णाजीबरोबर ठरलेल्या गोष्टीची राया सर्वांना माहिती करून देत होता. होतां होतां पुढला कार्यक्रम कसा ठरवावा याविषयीं गोष्टी निघाल्या. रायानें पूर्वीपासून योजलेले विचार मंडळींना सांगितले आणि त्याप्रमाणें करावयाचें असें त्या सर्वांनीं ठरविलें. रात्रीं आठांच्या सुमारास आजुबाजूची मंडळी जमूं लागली. जीवनलाल-शेट सर्वांच्या पूर्वी आले. त्यांच्याबरोबर त्याचे दोन श्रीमंत व्यापारी मित्र आले होते. त्यांच्या मागून लल्लूभाईशेट नंतर वलभदास अशी सर्व मंडळी जमल्यावर हलुहळू रायानें प्रयोगाला सुरवात केली.

" मग आतां मंडळीचें ठरलेंच! तुम्ही सर्व मंडळीने आमच्या ताईसाहेबांच्या विवाहाला चार दिवस आगाऊ वऱ्हाडी म्हणून यावयाचं!"

" यावयाचं म्हणून आतां काय विचारतां आम्हीं तर घरांतील मंडळी!"

" वाः इतकी भावना असल्यावर मीं तर स्वतःला धन्य समजतों." असें म्हणून रायानें नम्रपणें छातीला हात लावून किंचित् मान वाकविली. " बरं मग जीवनलालशेट, आता ह्या ताईसाहेबांच्या विवाहाकरितां मला पाच पंचवीस हजाराची खरेदी करावयाची आहे तेव्हा—"

" हें पहा भाऊसाहेब, त्याविषयीं आता तुम्हीं काळजी करूं नका. तुम्हांला जवाहिराचे घडविलेले काहीं दागिने पाहिजे असतील तर आपले वल्लभदास शेट आहेत; चोख चांदीसोने पाहिजे असल्यास लल्लुभाई आहेत. सुटे हिरे-मोतीं ह्या आमच्या करसनदास शेटकडे मिळतील—" एका मित्राकडे पाहून जीवनलालशेट म्हणाले.

" आम्ही सर्व आहोंत परंतु तुम्हीं स्वतः काय करणार ते सांगा?" वल्लभदासशेट म्हणाले.

" माझें दुकान आहे तें भाऊसाहेबांचेंच आहे! वाटेल तें हलकें भारी कापड—"

" मग आता असं करा–मी तयार केलेली यादी तुम्हाला दाखवितो म्हणजे ठीक पडेल. अरे, कोण आहे तिकडे?–दिवाजीजवळून यादी घेऊन ये."

थोड्या वेळानें यादी आली. ही यादी जेवण झाल्यावर रायानें तयार करतांना आपणांस कोणाजवळून काय काय वस्तू मिळतील याचा प्रथम विचार करूनच ती बारा हजार रुपये किंमतीच्या मालाची यादी तयार केली होती. जीवनलालशेटनीं ती यादी रायाच्या हातातून घेऊन एकवेळ त्यावरून आपली दृष्टि फिरविली व क्षणभर विचार करीत ते म्हणाले, " भाऊसाहेब, आमच्या दुकानावरून तर तुम्हीं फारच थोडा माल घेणार असें या यादीवरून दिसतें। एक काश्मीरी शाल पाऊणशें रुपये आणि दोन जरीचे काळे शालू तीनशें रुपये हेच दोन नग मोठे आहेत. बाकी बारा जरीचे रुमाल, बारा चायना सिल्कचे तागे, शर्टिंग क्लॉथ सहा ताके वगैरे किरकोळ माल आहे,"

**मालाची यादी.**

" हें तुम्हीं स्वतःचें सांगितलें?" वल्लभदासशेट, " पण आमच्या दुकानावरून काय जिन्नस पाहिजेत?"

" चाळीस तोळे सोनें चोख, तेरा हिऱ्याचे खडे, तीस लहान आणि तीन मोठे मोती-पण भाऊसाहेब हे मोती काय चवाचे पाहिजेत ! "

" ते पसंत केल्यावर जसे भरतील तसे घेऊं. "

" पण कायहो भाऊसाहेब, यादींत घडविलेल्या हिऱ्यामोत्याच्या दागिन्याचीं नांवें नाहींत ती ? "

" ते सर्व दागिने घरीं तयार आहेत. फक्त आतां जावईबोवाकरिता एक मोत्यांचा कंठा-तीन साडेतीन हजारापर्यंत पसंत करावयाचा आहे. आम्ही येथें येण्यापूर्वी एका व्यापाऱ्यानें एक दोन कंठे आणले होते, परंतु ते मला पसंत पडले नाहींत ! "

" मग उद्यां मी एक कंठा पाठवून देतो. " वल्लभदासशेट म्हणाले, " माझी खात्री आहे कीं, तो कंठा तुम्हाला खात्रीनें पसंत पडेल. "

" बरें तर पाठवून द्या. " राया निष्काळजीनें म्हणाला, " पण कायहो जीवनलाल शेट, हे सर्व यादींतील नग तुम्ही उद्यां पाठवूं शकाल काय ! "

" हो-त्यांत काय आहे ! उद्या दुपारपर्यंत सहज. "

यादीचा निकाल लागतांच रायानें मनोहराला हांक मारून फराळाचे जिन्नस, दूध आणि काफी इत्यादि वस्तु मागविल्या.

**गुप्तबेत.**

आपणाकडे आलेल्या मंडळीचा मान मरातब ठेवून त्यांना कसें आळवावे, हें उत्तम तऱ्हेनें राया जाणत होता. स्वतः त्याचें बोलणें आणि वर्तन दुसऱ्याचें मन ओढून घेणारें होतेंच, परंतु त्यात अशा सढळ हातानें खाण्यापिण्याचा बेत उडवून त्यानें सर्वांचीं मनें चांगल्या रीतीनें आपणाकडे ओढून घेतलीं होतीं. आधल्या दिवशीं गाणें झालें त्यावेळीं तर जीवनलाल शेटचा रायाविषयीं इतका उत्तम ग्रह झाला कीं, ते त्याला आपला एक जिवलग दोस्त समजूं लागले. फराळ वगैरे झाल्यावर मंडळी निरोप घेऊन निघून गेली, त्यावेळीं रात्रीचे दहा वाजून गेले होते. मंडळी गेल्यावर बाप्पानें दरवाजा लावून घेतला.

" येथपर्यंतत तर बस्तान बरोबर बसलें ! " आपली सर्व मंडळी दिवाणखान्यांत एकत्र जमल्यावर राया म्हणाला.

" पण तूं कृष्णाजीबद्दल जी युक्ति योजली आहेस ती कशी यशस्वी होईल याची आम्हाला काळजी वाटते. कारण तें कृत्य जरा धाडसाचेंच आहे. " गजाभाऊ म्हणाला.

" ' तूं तर सदाचा रड्या आहेस ! " राजा वेडावित म्हणाला, " ' आम्हाला काळजी वाटते '—गाढवा, तुला एकट्याला काळजी वाटते, तर करीत बैस काळजी एकटाच ! तुझ्या बरोबर आम्हा सर्वांना. कशाला ओढतोस ! "

" तसं नव्हेरे ! चांगलं प्रसंगावधान ठेवलं पाहिजे म्हणजे कांहीं नाहीं. नाहीं तर भलताच परिणाम मात्र व्हावयाचा ! "

" पण वेड्या, ही गोष्ट कोण करणार आहे हा तूं विचार केला आहेस का ! तूं जर ही गोष्ट करणार असलास तर मात्र आम्हाला काळजी करणें भाग होतें. रायाविषयीं जर अद्यापि तुझें मन खात्री देत नाहीं, तर मग तूं इतके दिवस त्याच्या संगतींत राहून काय केलेंस ? "

" जाऊं द्यारे त्या गोष्टी ! उगाच का एखाद्या क्षुल्लक गोष्टीबद्दल वितंडवाद ! " असें म्हणून राया गजाभाऊकडे वळून म्हणाला, " गजा, तू मजविषयीं बिलकूल काळजी करूं नको. ह्या कृष्णाजीला मी आतां चांगलीच पकडींत पकडली आहे. माझ्या हातून ती आता सुटेल अशी कोणी शंकाहि घेऊं नये. बरं आतां अस करा—मनोहर, उद्या तूं जीवनलालशेटकडून ते शालू आल्यावर त्यापैकीं एक उद्या रात्रीं तिच्याकडे घेऊन जा आणि तिला असें सांग, कीं रात्र झाल्यावर केव्हां तरी भाऊसाहेबांची आपल्या घरीं येण्याची इच्छा आहे, तर त्यांनीं कोठल्या दिवशीं यावें व केव्हां यावें ! परंतु तिला अशी सूचना दे कीं, मी येणार आहें ही गोष्ट तिसऱ्या कानाला कळता उपयोगीं नाहीं. "

" तें काम माझें ! "

**माल आला.** ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं दुपारीं जीवनलालशेटकडून त्याचा मेथा आला. थोड्या वेळानें वल्लभदासकडून त्यांचा मुनिमहि आला. त्यांनीं आपणाबरोबर रायानें यादींत दिलेले सर्व नग आणले होते. दिवाणजीनें—मनोहरानें त्या सर्व वस्तु नीट तपासून त्यांची नोंद करून घेतली आणि आंत दाखविण्याकरितां नेली. आज सकाळपासून राया खोलींतून बाहेर आला नव्हता. त्याचा सर्व व्यवहार आज आतच चालला होता. क्षणभरानें मनोहर बाहेर येऊन म्हणाला, " मुनिमसाहेब, आमच्या भाऊसाहेबांची प्रकृति रात्रींपासून अस्वस्थ झाली आहे. परवांचें जाग्रण त्यांना नडलें असें दिसतें. कारण जाग्रण करण्याची त्यांना बिलकूल संवय नाहीं. आपण आणलेले हे यादींतील नग मी आतां

त्यांना दाखविले, परंतु प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें त्यांचें लक्ष लागत नाहीं. आपण आता ही माझी पावती घेऊन नग येथेच राहूं द्या. मग उद्यांच भाऊसाहेब स्वतः ते पाहून—"

" मग पावती कशाला ? आम्ही आतां घेऊन जातों आणि उद्यां पुनः आणूं—"

" म्हणजे तुम्हाला आमचा विश्वास नाहीं कीं काय ? असा हा कितींचा माल ? " असें म्हणून रागानें मनोहरानें बैठकीजवळ असलेली तिजोरी उघडली " हें घ्या-ह्या प्रॉमिसरी नोटा तुम्ही घेऊन जा—एवढा विश्वास नाहीं—"

" छेः छेः दिवाणजी अस काय हें ? अहो ही गोष्ट तशी नाहीं, तुमच्या भाऊसाहेबाचा विश्वास आहे म्हणूनच तर आमच्या शेटजींनीं मला हा माल घेऊन पाठविलें. तुम्ही उगाच आम्हावर रागावता—"

" रागावतां म्हणजे ? तुम्ही म्हणतां कीं, येथें आणलेला माल पुनः परत दुकानावर न्यायचा म्हणजे हा आमच्या धन्याचा—भाऊसाहेबांचा अपमान नव्हे काय ? "

" नाहीं-नाहीं. दिवाणजी, मी त्या अर्थानें बोललो नाहीं. "

" तें कांहीं असो. तुम्ही ह्या प्रॉमिसरी नोटा घेऊन चला—" असे म्हणून मनोहरानें नोटांचें बंडल त्यांच्यापुढें उडविलें !

**आमचा मेथा दिवाणा आहे !**

पुष्कळ वेळ त्यांची बोलाचाली झाली. मनोहर नोटांचें पुस्तके परत घेईना अगर त्यांचा माल त्यांना परत नेऊं देईना ! शेवटीं शेवटीं नोटांचे नंबर आणि पावती देऊन मेथा आणि मुनीम निघून गेले. ते गेल्यानंतर मनोहरानें सर्व नग किती किमतीचे होतील याचा अंदाज काढला. तेव्हां त्यांची किंमत जवळ जवळ वीस हजारापर्यंत झाली. परंतु त्यानें आपला विश्वास पटण्याकरितां दिलेल्या प्रॉमिसरी नोटा फक्त दहा हजारांच्या होत्या. रात्रींच्या प्रहरीं नियनियमाप्रमाणें सर्व मंडळी एकत्र जमली. रायानें त्यावेळीं डोक्याला चंदन फांसलें असून गळ्यासभोंवती शाल गुंडाळली होती.

" भाऊसाहेब, तुम्ही आज प्रॉमिसरी नोटा कां पाठविल्या ? " क्षणभरानें रायाच्या प्रकृतीविषयीं चौकशी केल्यावर जीवनलालशेटनीं विचारलें.

" मी ?—आणि प्रॉमिसरी नोटा पाठविल्या ! केव्हां ? "

" मीं पाठविल्या सरकार ! " नम्रतेनें पुढें होऊन मनोहर म्हणाला.

" प्रकृति ठीक नाहीं म्हणून आपण शेटजीकडून आलेले नग ठेऊन घेण्यास सांगितलें परतु शेटजींच्या मेथ्याला विश्वास पटेना म्हणून मी—"

" अरेरे ! दिवाणजी, तुम्हीं हें काय बोलतां ! आमच्या भाऊसाहेबाचा आम्हाला विश्वास नाहीं ?—असें कसें होईल ? " असें म्हणून जीवनलाल-शेटनीं खिशातून नोटाचें बडल बाहेर काढलें. " ह्या घ्या—ठेवा आपल्या नोटा. भाऊसाहेब, माझा माल पंधरा दिवस आपणाकडे राहिला म्हणून काय आहे ? आमचा मेथा दिवाणा आहे, त्याला काय व्यवहार कळतो ! "

मनोहरानें मुकाट्यानें नोटाचें बंडल उचलून तिजोरींत ठेवलें. तेव्हा राया म्हणाला, " मग शेटजी, दोन दिवस आपला माल मजकडे राहिला तरी हरकत नाही ना ? मला जरा बरें वाटू लागताच मी तो सर्व माल स्वतः पाहून मग काय ते नक्की करू. "

" ठीक आहे. चार दिवस जास्त लागले तरी काय हरकत आहे !—पण तुम्ही एकदा बरे व्हा. "

पुढें थोडा वेळ गोष्टी झाल्यावर थोडा फराळ करून मडळी उठून गेली.

**सामान लांबविलें**

रायानें पूर्वी ठरविल्याप्रमाणें एक उंची शालू घेऊन मनोहराला कृष्णाजीकडे पाठविलें. तो शालू पाहून ती फार प्रसन्न झाली. परतु तिला पाठविलेला शालू केवळ लालूच होती, हें मात्र तिच्या लक्षात आलें नाहीं. आपणास एक मोठी शिकार मिळाली असें तिला वाटत होते. तिनें मनोहराला थोडा वेळ बसवून घेऊन सांगितलें कीं, ' परवा रात्रीं मजकडे कोणी येणार नाहीं. त्यावेळीं रात्रीं दहा वाजल्यानंतर भाऊसाहेब आले असता चालेल ' हा निरोप घेऊन मनोहर परत फिरला.

एका दिवसाची अवधी मिळाली हें एका अर्थी आमच्या मंडळीच्या पथ्यावर पडलें. दुसऱ्या दिवशीं दुपारीं बापू आणि चाच्या ह्या दोघानीं पाच सहा ट्रंक्स कोणाच्या लक्षांत न येतील अशा रीतीनें आपल्या बिऱ्हाडाच्या खोलींत नेऊन ठेविल्या. त्यांचा पुढें काय विचार झाला होता, तें कळण्यास ही हकीकत शेवटपर्यंत वाचली पाहिजे. कारण अलीकडे त्याचे बेत फारच गुप्त रीतीनें होत असत. असो. दोन प्रहरीं जीवनलालशेटजींचा मेथा आणि वल्लभदासशेटचा मुनीम पुनः आला. परंतु ' भाऊसाहेबांची प्रकृति अद्यापि नादुरुस्त आहे ' अशी खबर सांगून मनोहरानें त्या दोघांना थोडें फराळाचें व दुधाचे पेले देऊन वाटेला लावलें. रात्रीं देखील मंडळी जमली असता

राया फार वेळ त्यांच्यांत न असता प्रकृतीची सबब सांगून आंत निघून गेला. दुसराहि दिवस त्याचप्रमाणें गेला. परंतु त्या दिवशीं दोनप्रहरीं आमच्या मंडळीनें तेथें असलेलें सर्व सामान मोठ्या युक्तियुक्तीनें लांबविलें.

**मी आपलीच आहे.**

रात्रीं दहाचा सुमार झाला होता. एका व्हिक्टोरिया गाडींतून राया कृष्णाजीच्या घराजवळ उतरला. त्यावेळीं त्यानें विशेष भपक्याचा पोषाख केला होता. त्यानें डोक्याला असा पिळदार फेटा बाधला होता कीं, त्याला पाहतांच खरोखरीच हा कोणी राजघराण्यातील पुरुष असावा असें पाहणारास वाटे. राया वर चढून जाताच कृष्णाजीनें हास्यमुद्रेने त्याचें स्वागत केलें. आणि त्याच्या मागून तिनें दरवाजा बंद करून घेतला. त्या दिवशीं तिनें देखील अंगावर दोन दागिने जास्त घातले होते. हे दागिने तिला जीवन लालशेटकडूनच मिळाले होते. आपणाकडे आज भाऊसाहेब येणार तेव्हां तिनें आपल्या घरांत कोणालाच थारा केला नव्हता. घरात काम करणाऱ्या नोकरचाकरांना देखील त्या दिवशीं तिनें रजा दिली होती. आज तिचें सर्व लक्ष्य भाऊसाहेबांकडे लागलें होतें. शीरपुरास जाण्याच्या विचारानें तिला आता मुंबईचा कंटाळा आल्यासारखा दिसत होता. चंद्रकलेचें प्रेम पाहून शीरपुरास गेल्यावर आपणांस घरातील माणसांसारखें वागतां येईल, आपल्या हातात त्यांच्या घराची सर्व सूत्रें येतील इत्यादि मनोराज्यात ती दंग झाली होती.

" मला कोणी पाहिलें तर नाहीं ना ? " आंत आल्यावर आजूबाजूला पहात राया म्हणाला, "कृष्णाजी, तुमच्या घरात दुसरें तिसरें कोणी मनुष्य नाहीं ना ? "

" छे ! आपणां उभयतांशिवाय घरांत कोणी नाहीं. आणि आज आपण येणार तेव्हां मी घरांत कोणाला ठेवीन असं का आपणास वाटतं ? "

" तसं नव्हे ! पण म्हटलं कदाचित् तुमच्या घरांतील नोकर—"

" कोणी नाहीं. इतकं काय पण भ्यायचं ? "

" भिऊं नको तर काय ?—असा प्रकार कधीं जन्मांत केला नाहीं; तेव्हां भीति वाटणें साहजिकच आहे. शिवाय ह्या मुंबईत मला ओळखणारी वडीवडी मंडळी पुष्कळ आहे. पण कृष्णाजी, आज मी येथें कां आलों याची तुम्हांला कांहीं कल्पना आहे का—"

" हें काय पण ! मला ' कृष्णाजी ' ' कृष्णाजी ' आणि ' तुम्हांला ' असें बहुमानानें काय म्हणतां ? ही कृष्णा आतां आपलीच ना ? "

" हेच शब्द तुझ्या तोंडून ऐकण्यास उत्सुक झालेला हा भाऊसाहेब इतके धाडस करून आज येथें आला आहे."

" आतां मी सर्वस्वी आपलीच आहें." असें म्हणून कृष्णाजी जरा पुढें झाली, तरीदेखील राया तिच्यापासून बराच दूर होता. त्याच्या बाजूला पानाचें ताट होतें तें जवळ ओढून रायानें त्यांतील उत्तम कळीदार अशीं दोन पानें उचललीं.

" हें काय गडे! मी देतें करून."

" पण मी विडा केला म्हणून काय झालें! खरंच कृष्णा, आजपर्यंत मी लहानाचा एवढा मोठा झालों परंतु स्वतः हातानें असा कधींच विडा केला नाहीं. थांब–मला करूं दे. आज मीच वेडावांकडा करतों —" असे म्हणून रायानें विडा करण्यास प्रारंभ केला. मधून मधून तो कृष्णाजीची थट्टा करीत होता, बोलता बोलतां ' काहीं फराळाचें आणूं का? दूध तरी देऊं का?' असें तिनें फारच आग्रहपूर्वक लडिवाळपणानें विचारलें. परंतु जाग्रण केल्यापासून आपली प्रकृति बिघडली आहे, शिवाय नुकतेंच भोजन झालें आहे, इत्यादि सबबी सागून त्यानें वेळ मारून नेली. शेवटीं एकदांचे वेडे वांकडे असे दोन विडे तयार झाले!

**विडा केला.**

" कृष्णा, तूं तर आतां मला नेहमीं आपल्या नाजूक हातानें बनविलेले विडे तयार करून देणार परंतु आपली ही पहिली भेट-ह्या गोष्टीची आठवण राहण्यासाठीं मी बनविलेला हा विडा घे."

असें म्हणून रायानें आपल्या हातानें कृष्णाजीच्या तोंडांत विडा दिला. त्यावेळीं तिनें हास्यमुद्रेनें मानेला असा चमत्कारिक हिसका दिला कीं, खरोखरच जर एखादा उल्लू मनुष्य तेथें असता तर विषयाधतेनें बेहोष होऊन त्याच्या छातींत धसका मात्र बसला असता! परतु आमचा राया खंबीर गडी होता. थोड्या वेळानें राया उठला.

" कृष्णा, चला आतां उगाच जाग्रण करण्यात अर्थ नाहीं. आणि मला जाग्रणहि सोसत नाहीं."

कृष्णाजी उठून आंत गेली व थोड्या वेळानें शुभ्र पातळ नेसून मुरडत मुरडत बाहेर आली. ' चला आतां आंत कपडे काढूं! पलंगावर बेतलें! असें म्हणून तिनें रायाचा हळूंच हात धरला व त्याला आपल्या शयनगृहांत नेलें. आंत गेल्यावर कपडे काढीन

**पलंगावर बेतलें!**

असता रायानें सभोवार एकदां दृष्टि फेंकली, एक बाजूला पलंग, कोपऱ्यात एका लहानशा मेजावर आरसा व केंस विंचरण्याचें साहित्य, बाजूला आरसा असलेलें मोठें कपाट आणि मध्यंतरी टांगलेला दिवा होता. कपडे काढून झाल्यावर राया पलंगावर बसला, आणि कृष्णाजींचा हात धरून तिला जवळ ओढून म्हणाला, "कृष्णा, आज हा किती अकल्पित योग जुळून आला आहे पहा! मी मुंबईत कोठल्या निमित्तानें आलो, माझी आणि जीवनलालशेटची ओळख झाली आणि शेवटीं आज हा दिवस उगवला-खरोखरच-पहा कसे चमत्कारिक योगायोग जुळून येतात ते!" असे म्हणून रायानें दिव्याची वात कमी केली व कृष्णाजीला आपणाजवळ पलंगावर घेतलें. दिवा कमी होत जाऊन क्षणभरानें साफ विझला. कृष्णाजीलाहि तेच पाहिजे होतें. दिवा जाताच तिनें एकदम रायाच्या गळ्याभोंवती आपल्या सुकुमार हातानें वेष्टन दिलें. रायानें कांहींएक गडबड न करितां तिला हळुंच बिछान्यावर निजविलें. उशीला डोकें लागताच डोक्यांत जबरदस्त धक्का बसल्याचा कृष्णाजीला भास झाला! तिनें बोलण्याचा प्रयत्न केला. परंतु काय? तोंडातून शब्द उच्चारण्यास ती शुद्धीवर होती कुठें!

**चित्त आणि वित्त**

क्षणभर वाट पाहून कृष्णाजीची कांहीं हालचाल दिसेना, असे पाहून राया हळूंच उठला. उठतांना त्यानें कृष्णाजीला एकवेळ हळूं हाक मारून आपल्या मनाची खात्री करून घेतली व पुनः दिवा लावला. नंतर त्यानें कृष्णाजीकडे पाहिलें. तिला गाढ झोंप लागली आहे असे दिसत होतें. राया तिच्याकडे पहात म्हणाला, "कृष्णाजी, आजपर्यंत तूं कैकजणाचें चित्त आणि वित्त हरण केलें असशील परंतु आज तुला मी तुझ्या सवाईनें भेटलों. तुझे मृदु बोल, मधुर गाणें, हृदय भेदणारे नेत्रकटाक्ष आणि चटका लावणारे अंगविक्षेप या सर्वांचा मजवर मात्र कांहींच परिणाम झाला नाहीं, उलट मीच तुझें चित्त हरण करून आता तुझें सर्व वित्तहि घेऊन जाईन."

असे म्हणून रायानें सर्व खोलींत टेहळणी केली. तेथें जवळच मेजावर त्याला किल्ल्या आढळल्या. त्याच्या साह्यानें त्यानें प्रथम कपाट उघडलें. कृष्णाजीची आजपर्यंतची सर्व कमाई त्याच कपाटांत होती. पहिल्या खणात दागिने असलेले रायाला आढळून आले. दुसऱ्या खणांत कांहीं रोकड व

नोटा होत्या. हळुहळू रायानें सर्व कपाट तपासून पाहिलें. परतु इतर महत्त्वाचें असें त्याला कांहींच दिसलें नाहीं. तेव्हा इतर खण बंद करून त्यानें पहिल्या दोन खणातील वस्तु बाहेर काढल्या रोकड आणि नोटा मिळून तीनशें रुपये होते. आणि दागिने जवळजवळ आठपासून दहा हजारांचे होते. तो सर्व ऐवज नीट व्यवस्थेनें घेऊन रायाने कपडे चढविले.

कपडे घालून झाल्यावर रायाने कृष्णाजीकडे पाहिलें त्यावेळीं तिला शांत झोंप लागल्यासारखी दिसत होती. परतु लक्षपूर्वक पाहाणारास तिला ती झोप एखाद्या मादक पदार्थाच्या गुंगीमुळें लागली असून तिचा श्वासोच्छ्वास जड जड होत आहे असे आढळून आल्यावाचून राहिलें नसतें. रायानें असें काय केलें, कीं ज्यामुळें कृष्णाजीला उशीवर डोकें टेकतांच अशी चमत्कारिक रीतीनें एकदम मूर्च्छा येऊन गाढ झोंप लागली ?

वाचकहो, कृष्णाजीची अशी स्थिति करण्याचा प्रताप रायाने तिला दिलेल्या विड्यांत होता. आज प्रथम भेटीचा विडा आपण तयार करून द्यावा असें जें रायानें तिला सांगितलें, त्याच्या मुळाशीं त्याला विड्यांची अदलाबदल करावयाची होती.

**विड्याचा प्रताप.**

हा विडा रायानें तयार करून आणला होता. विडा पोटात गेल्यापासून एक तासाच्या आंत विडा खाणारानें आपलें डोकें बिछान्यावर टेकताच वर दिल्या-प्रमाणें कृष्णाजीसारखी स्थिति व्हावयाची, अशा मादक पदार्थाचा त्या विड्यांत समावेश केलेला होता. असो. रायानें पलंगावर झोंपलेल्या कृष्णाजीकडे पुनः पाहिलें आणि क्षणभरानें तो म्हणाला, " कृष्णाजी, आता तूं ह्या स्थितींत आठदहा तास राहशील. मग चांगली शुद्धीवर आल्यानंतर हा सर्व प्रकार तुझ्या लक्षात येईल. मी तुझ्या आटोक्यात आलों असें समजून माझ्या जहागिरी-विषयीं तुझीं मनोराज्यें ढांसळून कोसळलीं हें त्यावेळीं तुझ्या लक्षात येईल आणि तुझ्या मनाची चमत्कारिक स्थिति होईल. परंतु तुझे सर्व वित्त मी—भाऊसाहेबानें हरण करून नेलें, असें जेव्हा तुला कळेल त्यावेळीं मात्र तूं मला बोटें मोडून शिव्याशाप देशील. परंतु तुझ्या शिव्याशापापासून माझं कांहींच वाईट व्हावयाचं नाहीं. जसं तूं हें वित्त दुसऱ्यांपासून आपल्या सौंदर्याचा मोह पाडून घेतलंस तसंच मी तुला माझ्या करामतीचा मोह पाडून हें आतां घेऊन जात आहें."

क्षणभरानें रायानें दिवा अगदीं बारीक करून कृष्णाजीच्या अंगावर ब्लँकेट

टाकलें. कृष्णाजीचा उजवा हात उशीजवळ होता. त्या हाताकडे लक्ष जाताच तिच्या बोटांत चमकणारी आगठी रायाच्या दृष्टीस पडली. ती गोप्यानें तिच्या हातात घातली होती. त्या आंगठीकडे पहात राया म्हणाला, “ कृष्णाजी, ही आगठी काढून घेण्याकरिता तुझ्या अंगाला स्पर्श करण्याची माझी इच्छा नाहीं. तुझ्या अंगाला स्पर्श न करता सर्व गोष्टी कराव्या व येथून जावें अशी माझी प्रथमपासून इच्छा होती, परतु तूच होऊन माझ्या गळ्याला मिठी मारिल्यामुळें माझा नाइलाज झाला तरी देखील काहीं विशेष बिघडलें नाहीं. ही गोप्यानें तुला दिलेली आगठी तुझ्याजवळ राहिल्यापासून ह्या भाऊसाहेबांची त्याच्या जहागिरीची आणि त्याच्या कारवाईची तुला नेहमीं आठवण होईल ! ”

रायानें पुनः अशा रीतीनें तिच्या अंगावर ब्लँकेट घातलें, कीं कदाचित् दुसऱ्या दिवशी तिला उटण्यास वेळ लागला तरी घरातील नोकरांना काहीं सशय न येतां जाग्रणामुळें ती आपली धनीण इतका वेळ झोपली आहे असे त्याना वाटावे. नंतर त्याने दिवा अगदीं बारीक केला आणि बाहेर जाऊन दरवाजा घट्ट बद करून घेतला. त्यावेळीं बाहेरच्या घड्याळात बाराचे ठोके पडताना त्याला ऐकूं आले.

‘ चला आता. बिऱ्हाडी मंडळी वाट पहात असतील. ’ असें स्वतःशीं पुटपुटत राया हळूच बाहेर पडला. तो वाळकेश्वराच्या

**तिकडे काय केलें ?** रस्त्याला न जाता आपल्या बिऱ्हाडाच्या रस्त्याकडे वळला. कारण आतां त्याला वाळकेश्वरी जाण्याचें कांहींच कारण राहिलें नव्हते. त्याची सर्व मित्रमंडळी तो हवेशीर बंगला सोडून एका तासापूर्वीच आपल्या मठींत येऊन दाखल झाली होती. त्यांचें सर्व लक्ष रायाच्या वाटेकडे लागलें होतें. रायाला दरवाजा उघडून आत येताना पाहून गजाभाऊ एकदम ताडकन् उठून उत्कंठेने म्हणाला, “ राया, उजवी कीं डावी ! ”

“ उजवी. ”

“शाबास–जीते रहो पट्ठे !” असें म्हणून गजाभाऊनें रायाची पाठ थोपटली !

वाचकहो, रायक्लबची ही सर्व मंडळी समुद्र किनाऱ्यावरील भाड्यानें घेतलेला तो भव्य बंगला सोडून पुनः आपल्या बिऱ्हाडीं आलेली पाहून तुम्हांला आश्चर्य वाटलें असेल यांत शंका नाहीं. आणि ह्या मंडळीनें तिकडे पुढें काय केलें ? कसा घोटाळा उडविला हें सर्व जाणण्याचीं तुम्हाला अतिशय उत्कंठा लागली असेल. करितां आपण तिकडेच वळूं.

आपली प्रकृति नादुरुस्त आहे, अशी रायानें सबब सांगून सर्व मित्रमंडळीची रवानगी केल्यावर कृष्णाजीला वचन दिल्याप्रमाणें तिच्याकडे जाण्यास तो तयार झाला. तेथें गेल्यावर त्यानें आपली कामगिरी कशी बजावली त्याचें सविस्तर वर्णन वर येऊन गेलेंच आहे. तो गेल्यावर राजा बाहेर पडला. आणि बागेंत माळ्याच्या खोलीजवळ गेला. त्यावेळीं मोतद्दार आणि माळी एकत्र गोष्टी बोलत बसले होते. राजाला आलेला पाहून ते दोघेहि झटकन् उठून उभे राहिले. त्याने मोतद्दाराला खूण करून जवळ बोलाविलें आणि हळूच विचारिलें, " रामा, मी आता तुला कांही सांगतो तें तूं आमच्या मंडळींत कोणाला सांगणार नाहींस ना ? "

" छेः छेः धनीसाहिब, अस कसं व्हईल ! "

" होणार नाहीं पण उगाच विचारून ठेवतो. "

" असें म्हणून खिशांत हात घालीत राजा पुढें म्हणाला, " पण कायरे रामा इकडे ' विलायती ' मिळते कायरे ? "

" विलायती काय ?–दारू व्हय ! "

" अरेरे ! वेड्या केवढ्या मोठ्याने ओरडतोस ! होय–मिळते काय येथें ? "

" हिकडं जवळ तर नाहीं–पण माळीदादाला माहित असल ! "

" विचार पाहूं विचार त्याला. "

रामाने माळ्याला हाक मारून विचारलें तेव्हा माळी म्हणाला, " इकडे विलायती जवळ कुठे नाहीं मिळत पण--पण ह्या नाक्यावर गावठी मिळते. "

" छे--गावठी नको विलायती पाहिजे. " एकदम राजा म्हणाला. " हें पहा माळी–हे घे आणि तीन साडेतीन रुपयापर्यंत एक बाटली घेऊन ये. आणि इकडेच, तुझ्या ह्या खोलींतच ठेव. मी इतक्यात आमची मंडळी कुठें आहे तें पाहून येतों. आज भाऊसाहेब आजारी आहेत तेव्हा ते कांहीं उठणार नाहीं असं पाहून मी हा बेत केला आहे. "

असें म्हणून राजारामाने पांच रुपयाची एक नोट त्यांच्या स्वाधीन केली. थोड्या वेळानें माळी विलायती दारूची बाटली घेऊन आला. राजा एक वेळ बंगल्यांत जाऊन येऊन माळ्याच्या खोलींत बसला होता. माळ्यानें बाटली आणलेली पाहतांच तो आनंदानें म्हणाला, " माळी, ए रामा, आतां आपण जो हा प्रकार करणार आहोंत त्यांतील एक अक्षरहि तेथें कळतां उपयोगी नाहीं. पण कायरे, तुम्हीं घेतली होती कां कधीं अशी विलायती ? "

" आम्हांला गरिबाला कोठून मिळणार अशी विलायती ! "

बाटली उघडीत असता राजानें रामाला दोन काचेचीं पात्रें आणण्यास सांगितलें. माळी आणि रामा हे दोघेहि मोठ्या खुषींत होते.

**लाईन क्लियर.** आज हें विलायती पवित्र पाणी आपल्या घशाखालीं उतरणार तेव्हां आजचा दिवस मोठ्या लाभाचा असें दोघांना वाटलें. रामानें दोन फुटके पण कामचलाऊ काचेचे पेले आणले.

" आतां मी तुम्हाला हें देत आहें हे कोणाला कळता उपयोगी नाहीं—" दारू पेल्यात ओतताना राजा म्हणाला.

" नाहीं साहेब, ह्या कानाचा खडा त्या कानाला नाहीं लागायचा ! "

" आणि हें पहा, आता ही घेतल्यानंतर तुम्ही बंगल्यात बिलकुल येता उपयोगी नाहीं. आमच्या दिवाणजीचें नाक मोठें तीक्ष्ण आहे. "

" अगदीं नाव नका काढूं साहेब—आम्हीं येतो कशाला आतां तिकडे ! "

थोड्या अवधींत राजा मोतदार आणि माळी हे त्रिकुट परस्पराचे 'दिलजान दोस्त' बनले राजाचा आग्रह चालू होता. दोन तीन फेरे उडाल्यानंतर माळी आणि रामा याच्या डोक्याचा किल्ला 'विलायती'नें सर केला.

" खरं सांगतों साहेब, तुमचा तो सैंपाकी बामण लई खाष्ट पण भाऊसाहेब लाख माणूस हायती ! " थोड्याच वेळांत माळ्याच्या अकलेचे तारे तुटूं लागले.

" वाः तें काय विचारतोस ? तुझी इच्छा असेल तर बोल—तुलाहि घेऊन जाऊं आमच्या शीरपूरास. वीस रुपये पगार देऊं आणि तू रामा—तुझीहि करतों सोय. बोल आहे कबूल ? "

अशा रीतीनें थोडा वेळ भाषण झाल्यावर राजा उठला. माळी आणि रामा यांच्यावर 'विलायतीनें' आपला पूर्ण अंमल बसविला. त्या दोघांना तिकडेच अस्ताव्यस्त टाकून राजा परत बंगल्यात आला. तोंपर्यंत सर्व मंडळींची तयारी झाली होती.

" काय राजा, निघायचं ना ? " राजा बंगल्यात येत असतां मनोहरानें दरवाजांतून विचारलें.

" एस्—लाइन क्लिअर ! दोघेहि चांगले हातपाय ताणून पडले आहेत. चला; अगदीं स्वस्थपणें चला—भीति बाळगण्याचें आता काहींच कारण नाहीं. "

अकरा वाजण्याच्या सुमारास आपलें राहिलेलें थोडेंबहुत सर्व सामान घेऊन मंडळी निघाली. प्रथम एक एक जण बंगल्यांतून बाहेर पडला. परंतु

त्याना अडविण्यास तेथें कोणी नव्हतें. सर्व मंडळी रस्त्यावर आल्यानंतर कांहीं वेळपर्यंत सर्वजण मुकाट्यानें चालले होते.

" प्रधानजी उद्या आपल्या ह्या बंगल्यावरील बंदोबस्त तुम्हीं कसा काय कराल ? " राजा थट्टेने म्हणाला, " सकाळीं ही लल्लुभाई, शामळदास आदिकरून बंगल्याच्या आजूबाजूची शेट मंडळी बंगल्यात कोणी नाहीं असें पाहून एकच गोंधळ करतील ! "

" खरंच राजा, सकाळीं बंगल्यात मोठा गोंधळ उडेल यात काहीं शंका नाहीं. " गजाभाऊ म्हणाला, " आणि खरं जर म्हणशील तर मौज पाहण्याची खरी मौज उद्यांच आहे. "

" मग आहे का तुझी इच्छा ! येऊं आपण दोघेजण उद्याहि मौज पाहावयाला ! " अशा रीतीने रायक्लबची मंडळी रमत रमत आपल्या बिऱ्हाडीं पोहोंचली. पहाटेचा सुमार होईपर्यंत माळी आणि रामा विलायतीच्या पूर्ण अमलात अस्ताव्यस्त पडले होते, दुसऱ्या दिवशीं माळी आणि रामा याचा विलायतीचा अम्मल उतरल्यावर बंगल्यात कोणी नाहीं असें पाहून त्याची काय स्थिति झाली असेल याची वाचकांना सहज कल्पना होईल. हा हां म्हणतां आजूबाजूच्या बंगल्यांत ' भाऊसाहेब जहागिरदारानें आपणास फसविलें. ' ही बातमी कळून सर्वत्र हाहाकार उडाला. प्रत्येक शेटजीला चांगलाच चट्टा बसला होता. कित्येकानीं तत्काळ पोलिस कमिशनरच्या बंगल्यावर धांव ठोकली. परंतु त्यापासून कांहींएक निष्पन्न झालें नाही. ' ही एक सोनेरी टोळी आहे. आम्ही शोध करतों ' असें पोलिस मजकुरानीं सांगून त्यांना वाटेस लावलें.

**चांगला चट्टा बसला.**

इकडे दुसऱ्या दिवशीं नऊ वाजण्याच्या सुमारास कृष्णाजी जागी झाली. परंतु तिला आपलें डोकें जड झालें आहे असें वाटत होतें. तिनें एकवेळ कपाळावरून हात फिरविला. हळुहळू तिला पूर्व रात्रीची आठवण होऊं लागली रात्रीं भाऊसाहेब आपणाकडे आले होते इतकेंच तिला आठवलें, परंतु पुढें मात्र तिला काहींच आठवेना. तिनें आपल्या बाजूला मान वळविली परंतु बिछान्यावर तिला कोण दिसणार ? क्षणभरानें ती डोळे चोळीत चोळीत उठली. उभी रहाताच तिला घेरी आल्यासारखें वाटलें. त्याबरोबर तिनें चटकन् कपाट धरलें ! तोंच धक्याबरोबर कपाटाचें दार उघडलें. कपाट उघडें पाहून ती गोंधळली. हा काय

**खण रिकामा**

प्रकार आहे हें तिच्या लक्षांत येईना ! ती पुन्हां पलंगावर बसली. बराच वेळ तिनें पलंगावर आपलें कपाळ टेकलें होतें. तिनें पुष्कळ विचार केला, परतु भाऊसाहेब आल्यानंतर रात्रीं काय प्रकार घडला ह्याची तिला आठवण होईना. पुनः ती उठली आणि कपाट शोधूं लागली. थोड्या वेळानें तिनें आपल्या कमाईचे पैसे आणि दागिने ठेवण्याचा खण उघडला आणि आत पाहिले, तोंच तिच्या छातींत धस्स् झाले !—खण रिकामा ! ! !

" घात झाला ! बुडालें ! ! सर्वस्वी बुडालें ! ! ! "

इतकेच शब्द तिच्या तोंडून बाहेर पडले ! ती हताश होऊन तेथेंच बसली. त्या सर्व दिवसात तिला काहींच सुचलें नाहीं. सध्याकाळीं जीवनलालशेटजीची स्वारी आपलें दुःख परिहार करण्याच्या हेतूनें आपल्या प्रियपात्राकडे आली. परतु कृष्णाजीचा आवट चेहरा पाहून त्याचं दुःख परिहार होण्याऐवजीं उलट दुणावलें !

" का कृष्णाजी ! आज रंग फिकासा ? वेणी फणी नाहीं केली ? "

" शेटजी, मी काल सर्वस्वी बुडालें हो ! आता मी स्वतःची फजिती कोठल्या तोंडाने सागूं ! "

" तूं कशी बुडालीस ? तुला आणखी कोण आलं बुडवायला ? "

" तुमचे भाऊसाहेब ! "

" भाऊसाहेब ! अरे त्यानें तर आम्हांला देखील काल बुडवल ! "

परस्परानीं आपआपली हकीकत सांगितली. शेवटीं डोळ्यात अश्रू आणून कृष्णाजी म्हणाली, " शेटजी, तुमचे पाचपंचविस हजार **गेलं पण मिळालं** ! गेले ते तुम्ही दोन चार महिन्यांत मिळवाल पण मी काय करूं ? माझं हकाचं गेलं असतं तर मला काहीं वाटतं ना ? पण त्या दिवशीं गाण्याकरितां मी मावशीकडून तिचे दागिने मागून आणले होते ते सर्व गेले कीं हो ! आतां ती माझ्या छातीवर बसेल ! आता काय करू ! ह्या चिंतेनें सकाळपासून माझ्या तोंडात पळीभर पाणी देखील नाहीं ! मी एवढे तीन साडेतीन हजाराचे दागिने कोठून भरून देऊं ! बुडालें हो शेटजी, साफ बुडालें ! "

असें म्हणून कृष्णाजीनें रडण्यास आरंभ केला. परंतु तें रडणें कृत्रिम होतें. स्वतःच्या दुःखांत चूर असलेल्या शेटजींच्या दुःखांत कृष्णाजीच्या दुःखाची भर पडली ! तिची कशी समजूत करावी ह्या विचारात शेटजी तिच्याकडे

पहात राहिले. बराच वेळ त्याच्याकडून कांहीं हालचाल होत नाहीं, असें पाहून कृष्णाजीनें एकदम त्याच्या गळ्याभोंवतीं हात टाकले आणि आपल्या कृत्रिम दुःखाच्या हुदक्याबरोबर लटक्या प्रेमाचे प्रदर्शन सुरू केलें.

"बरं ! आतां तू किती शोक करणार ? गेले खरे आता दागिने ! आता मुकाट्यानें भरून देणे भाग आहे. करू त्याची व्यवस्था पुढील महिन्यांत ! गप्प रहा पाहूं—"

"पण शेटजी, तुम्हाला हा उगाच दंड—"

"मग काय करणार ! केलं तसं भरलं पाहिजे ! तुला जर गाण्याला बोलाविल नसत तर कशाला येता हा प्रसग !"

शेटजीनें म्हटल्याप्रमाणें पुढल्या महिन्यांत कृष्णाजीचे सर्व दागिने नवीन करून दिले.

**तिसरें वर्ष.**

वाळकेश्वराच्या बंगल्याचा घरवाला, आजुबाजूची शेट मंडळी आणि कृष्णाजी या सर्वांना आपल्या अकलेचा प्रसाद देऊन आमच्या रायक्लबची मंडळी पुनः आपल्या बिऱ्हाडीं एकत्र जमली. कृणाजीच्या घरून राया परत आला, त्यावेळीं मध्यरात्र झाली होती. तो आंत येताच गजाभाऊनें त्याला 'उजवी कीं डावी !' असा प्रश्न करून 'उजवी' मिळताच त्याची त्यानें पाठ थोपटली, ही हकीकत मागें येऊन गेली आहे. त्यानंतर कृष्णाजीकडे जाऊन आपण काय काम केलें तें रायानें सविस्तर रीतीने आपल्या मित्रांना सांगितलें आणि तो म्हणाला, "आता फारच रात्र झाली. उठा—पुढला विचार उद्या स्वस्थ चित्तानें ठरवूं !"

**रजा दिली**

दुसऱ्या दिवशीं रात्रीं जेवण वगैरे आटोपून सर्व मंडळी एकत्र बसली, तेव्हां राया म्हणाला, "माझ्या मनात जे विचार घोळत आहेत ते मी तुम्हाला सांगतों. आता आपणास कांहीं दिवस ही मुंबई सोडली पाहिजे, नाहीं तर अगदीं स्वस्थ पडून तरी राहिले पाहिजे. काल वाळकेश्वरीं आपण जो घोटाळा केला आहे, त्याची आता जारीनें चौकशी सुरू होईल. मुंबईत एक सोनेरी टोळी आहे, असा आता पोलिसाला चांगलाच संशय आला आहे-तेव्हां आतां जास्त फाजिलपणा करण्यांत अर्थ नाहीं. शिवाय आपणाजवळची रक्कमहि बरीच फुगली आहे. प्रत्येकाच्या वाट्याला पांच पाच हजार रुपये सहज येतील. तेव्हां मी असा

विचार केला आहे, कीं प्रत्येकानें आपआपल्या घरीं जावें तेथें आपली घरची घेण्यादेण्याची कांही व्यवस्था करणें असेल ती करावी. वडील मंडळीच्या अनुमतानें कांहीं शेत जमीन घेणें असेल ती घ्यावी व आपली पुढली तरतूद करून ठेवावी. कोणाला संशय येऊं न देता एक दीड महिन्यात मंडळींना हीं कामें सहज आटोपता येतील. इतक्यांत विजयादशमी येनेंच! माझा असा विचार आहे कीं, ह्या दसऱ्याला सर्व मंडळींनीं पुण्यात जमावें. आणि पुढें काय करावयाचें त्याचा बेत तेथें ठरवावा."

"ठीक आहे. आम्हा सर्वांना ही गोष्ट मान्य आहे. पण पुण्याला कुठें जमावयाचें?"

"आम्हीं कॉलेजमध्यें असताना—मी, बापू आणि राजाराम × × कॉलेजमध्यें असतांना शनिवारांत बुरुजासमोर रहात होतों त्याच घरात!"

"ठरलं तर! पण आम्हीं घरीं केव्हां जावं?"

"ज्याची जशी मर्जी असेल तेव्हा! उद्या निघा हव तर!

**मंडळी पुण्यांत आली.**

ठरल्याप्रमाणें एकदोन दिवसात मंडळी आपापल्या गावीं गेली. जातांना रायानें त्याच्या वाट्याला आलेली कमाई त्याना वाटून दिली आणि नीट हुशारीनें राहाण्यास बजावून ठेविलें. मंडळी निघून गेल्यावर राया आपल्या घरीं जाण्याकरिता निघाला. त्याचें घर फलटणास होतें. घरचा तो सुखी होता. त्याच्या वडिलाना संस्थानात बराच मान मरातब होता. त्याच्या वडील दोन भावाना वडिलानीं अडतीच्या पेढ्या काढून दिल्या होत्या. त्यामुळें मोठा भाऊ साताऱ्यास आणखी दुसरा भाऊ कोल्हापूर, सांगली, मिरज, कुरुंदवाड आणि कागल इत्यादि ठिकाणीं ते आपापला धंदा संभाळून होते. रायानें चांगलें शिकावें आणि आपल्या डोळयादेखत फलटण संस्थानांत चांगली हुद्याची नोकरी मिळवावी अशी त्याच्या वडिलांची फार इच्छा होती. त्याप्रमाणें त्यांनीं रायाला पुण्याच्या × × कॉलेजमध्यें घातलें होतें. पण राया चमत्कारिक वृत्तीचा होता. 'स्वदेशी' ची लाट उसळतांच त्यांत जाऊन तो मिसळला आणि त्यानें आपलें नुकसान करून घेतलें ती हकीकत ह्या कथानकाच्या सुरवातीला येऊन गेलीच आहे. घरीं गेल्यावर रायानें वडिलांच्या पुढें पांच हजार रुपये ठेवतांच त्यांचा सर्व राग दूर झाला. कॉलेजमधून अर्धचंद्र मिळाल्यावर रायानें वडिलांना आपल्या खुशालीची बरींच पत्रें

मुंबईहून लिहिली. परतु त्यांनीं एकाचेंहि उत्तर पाठविलें नाहीं. इतका त्याना आपल्या मुलाचा राग आला होता. असो. घरीं काहीं दिवस राहिल्यावर राया पुण्यास जाण्याकरिता निघाला. बऱ्याच महिन्यानीं आल्यामुळें मुलानें दिवाळी-सण घरीं करावा अशी म्हातारीची फार इच्छा होती. परंतु आपल्या मित्राना आश्वासन दिल्याप्रमाणें त्याला विजयादशमीच्या पूर्वी पुण्यास हजर व्हाव-याचें होते.

विजयादशमीच्या पूर्वी आठ दिवस राया पुण्यात आला. तेथे त्यानें शनिवार पेठेत एक स्वतत्र घर भाड्यानें घेतले. दोन चार दिवसात मंडळी तेथे जमली.

रायक्लबची ही विजयादशमी पुण्यात झाली. रात्रीं सर्व मडळीचा एकत्र बसून आजच्या सुमुहूर्तानें कोठल्या मोहिमेला सुरवात करावयाची याचा खल सुरू झाला. तेव्हा राया म्हणाला, "मुंबईत अठरापकड जाती असून ते व्यापाराचें ठिकाण असल्यामुळे दोन वर्षेपर्यंत आपणांस तेथे चागला गोधळ घालता आला. परंतु पुण्यास मात्र तशी स्थिति नाही. येथे आपणांस गिऱ्हाईकें मिळतील तीं सर्व बुधवारांतच मिळतील."

**वधू पाहिजे**

"बुधवारातच काय पण प्रत्येक पेठेंत आपणांस गिऱ्हाईकें मिळतील अशी माझी खात्री आहे." बापू म्हणाला, "राया, तुला पुण्याची काय माहिती?"

"राया, पण माझं ऐक बुवा!" हातांतील चित्रमयजगत्कडे पहात राजा म्हणाला, "आजच्या मुहूर्तानें आपण ह्या पुण्यांत एक 'हिंदु ब्राइड ॲार ब्राइडग्रुम सप्लाइग एजन्सी' (हिंदु नवरा किंवा नवरी पुरविणारी एजन्सी) सुरू करूं या! हे पहा ह्या आजच्या केसरींत 'वधू पाहिजे' म्हणून जाहिरात आहे. आपण जर ही एजन्सी सुरू केली तर प्रथम महिना दोन महिने आप-णांस त्रास होईल. उपवर मुलामुलींची नोद मिळविण्याकरितां फिरावें लागेल खरें पण धंदा किफायतशीर होईल. तू हो मॅनेजर आणि बाकीच्या मंडळींनीं जावं मुलांची नोंद करण्याकरिता! मुलींची नोंद करण्याचं काम पत्करतों मी! काय समजलास! धंदा पण धंदा! कसा काढला शोधून धंदा! ह्याला म्हणावं डोकं!"

"पाहूं तो चित्रमयजगत्!" राया विचार करीत हात पुढें करून म्हणाला, "वाच-वाच पाहूं ती जाहिरात तूंच."

"कां? पडलीना माझी सूचना पसंत! अरे, पडायचीच पसंत! अरे ह्या

अस्मादिकाचें डोकें उगाच नाहीं!" असें म्हणून राजानें चित्रमयजगत् उघडला आणि वाचण्यास सुरवात केली—

'वर देशस्थ. गोत्र काश्यप वय ४० इनामदार असून सालीना उत्पन्न पंधरा हजार. वधू ब्राह्मण वर्गातील कोणत्याहि पोट भेदापैकीं असल्यास चालेल. परंतु वयानें प्रौढ असून सुस्वरूप असावी. चागली शिकलेली असावी ही विशेष अट आहे. पत्ता, 'X' चित्रमयजगत् आफिस'

"दे मजजवळ—मला एकदा वाचूं दे" असें म्हणून रायानें तो अंक हातांत घेतला. बराच वेळपर्यंत तो विचार करीत राहिला. सर्व मडळी त्याच्याकडे जिज्ञासेनें पहात राहिली. 'वधु पाहिजे' ह्या जाहिरातीचा कसा फायदा घ्यावा, ह्या विचाराशिवाय अन्य विचार रायाच्या डोक्यात घोळत नसेल अशी प्रत्येकाची खात्री होती, म्हणून ती जाहिरात वाचून रायाला काय सुचलें, तो आपणास काय सागणार हें ऐकण्यास प्रत्येकजण अगदीं उत्कठित झाला होता. बऱ्याच वेळानें राया म्हणाला, "ठीक आहे. राजा, तूं म्हणतोस त्याप्रमाणें आपण ह्या जाहिराती पुरती ब्राईड सप्लाईंग एजन्सी' काढूं."

"परंतु मुलगी कोठली आणणार?" गजाभाऊ प्रधान म्हणाला.

"मुलगी का! ही येथें आहे!" गोप्याकडे बोट दाखवून राया हास्य-मुद्रेनें म्हणाला. "गोपिका ऊर्फ चंद्रकला—"

"अस्सं अस्सं! आतां आलं लक्षांत! पण राया, हें जुळविणार कसं?"

"त्यात काय आहे विशेष! जुळविलं कीं सर्व कांहीं जुळतं!"

**जाहिरात कोणी दिली?**

पुष्कळ वेळपर्यंत मंडळींचा विचार चालू होता. चित्रमय जगतात जाहीरात देणारे 'X' कोणी तरी इनामदार आहेत, तेव्हां त्यांच्यापासून आपणास पांच दहा हजारांचा फायदा करून घेतां येईल अशी रायाला खात्री होती. रात्रीं बारा वाजेपर्यंत विचार होऊन पुढें काय करावयाचें तें ठरलें आणि मंडळी झोंपली. दुसऱ्या दिवशीं रायानें गजाभाऊला चित्रमय जगत्च्या ऑफिसमध्यें 'X' चा पत्ता काढण्याकरितां पाठविलें. तेथें चौकशी अंतीं त्याला कळलें कीं, सदाशिव पेठेंत राहणारे 'अप्पाराव तात्यासाहेब निंबाळकर जहागिरदार' यांनीं ती जाहिरात दिली आहे. रायानें दुपारच्या प्रहरीं अण्णा

श्रीपाद ह्या दोघांना अप्पारावांची माहिती मिळविण्याकरितां पाठविलें. आणि स्वतः गोप्याला तो सजवूं लागला. संध्याकाळीं पांच वाजण्याच्या सुमारास त्यानें गोप्याला बेमालूम ब्रीवेश दिला.

" राया, गोप्याला आताच सजवून कुठें घेऊन चाललास ? " चिंतामणीनें विचारलें.

" त्याला कांहीं अप्पारावाला दखविण्याकरितां येऊन जात नाहीं ! " राया म्हणाला, " आतां आम्ही जाणार लष्करांत आणि येथें गोप्याचा ह्या वेषांत फोटो काढणार. जा—एक टांगा नाहींतर शिग्राम घेऊन ये. "

गोपाळाचा फोटो काढून राया परत आला. त्यावेळीं श्रीपाद आणि अण्णा, अप्पारावाविषयीं अवश्य ती माहिती मिळवून आले होते. संध्याकाळीं सर्व मंडळी एकत्र जमल्यावर अण्णा सांगूं लागला. तो म्हणाला, " ह्या निंबाळकराचें घर हौदाजवळ आहे. घरासभोंवती लहानसा वाडा आहे. नोकर चाकर आश्रित मिळून आठ दहा मडळी आहेत. पैकीं यजमान स्वतः आणि त्यांच्या आईच्या नात्याची एक दूरची वृद्धबाई अशीं दोनच खाशी मंडळी आहेत. अप्पारावांना पहिल्या बायकोपासून तीन मुलें झालीं होतीं परंतु त्यापैकीं आता कोणीच राहिलं नाहीं. स्वतः अप्पासाहेब रंगेल गडी असून त्यांना बाहेरख्यालीचा नाद आहे. प्रत्येक महिन्याला ह्या कामांत दोन चारशें रुपये त्याचे खर्च होतात. दाजिबा नांवाचा एक वृद्ध ब्राह्मण घरात आहे तोच त्याचा कारभारी आहे असें वाटतें. तो अप्पारावांच्या वडिलापासून असल्यामुळें ते त्याच्या शब्दाला मान देत असतात. "

" पुष्कळ झाली इतकी माहिती ! " राया म्हणाला, " आतां ह्या अप्पासाहेबांना फायलावर घ्यायला फारसा वेळ लागणार नाहीं. "

रात्रीं बसून रायानें अप्पारावांच्या नावें एक पत्र लिहिलें त्यांत आपण कोण, काय वगैरे कांहीं एक माहिती न लिहितां फक्त, **आपली हें घ्या एक पत्र ! चित्रमय जगतांतील जाहिरात पाहिली; त्यावरून हें पत्र लिहिलें आहे. आपली समक्ष भेट झाली म्हणजे विशेष खुलासा करितां येईल. करितां भेटीची वेळ माझ्या कॉलेजाच्या पत्त्यावर पोष्टानें कळवावी. माझा पत्ता रा. रा. श्रीपाद बळवंतराव चिंचुरकर, फर्ग्युसन कॉलेज'** हा मजकूर त्यानें पत्रांत लिहिला होता. तें पत्र त्यानें रात्रींच पोष्टांत टाकलें आणि गोप्या व श्रीधर ह्या दोघांना

पुनः अप्पारावांच्या घरावबळ पाळत ठेवण्यास सांगितले. त्याप्रमाणे त्या दोघांनीं आपली कामगिरी बजाविली. दुसऱ्या दिवशीं दोन वाजण्याच्या सुमारास अप्पारावाच्या घरातून एक मनुष्य हातात पत्र घेऊन ते पोष्टाच्या खांबात टाकण्याकरितां बाहेर पडला. श्रीधरानें तें पाहताच कोपऱ्यात पोष्टाच्या शिपाया-प्रमाणें पोषाख करून उभा असलेल्या गोप्याला खूण केली तेथेच रस्त्याच्या कोपऱ्यात पोष्टाचा खांबा होता. अप्पारावाच्या घरून पत्र टाकण्यास येणाऱ्या मनुष्यापूर्वीच गोप्या खांबाजवळ जाऊन, आतां आपण खांब उघडणार असें दाखवूं लागला ते पाहून तो मनुष्य लवकर लवकर पुढें येऊन म्हणाला, " शिपाईबुवा डाक खोलतां वाटतं ? हे एक घ्या पत्र. "

" नाही—आहे थोडा वेळ. आता दहा मिनिटानीं उघडू पेटी " त्याने दिलेले पत्र हातात घेऊन गोप्या म्हणाला, " तीन नाहींना वाजले अजून ? "

" झाला वखत. खोला तुम्ही — असें म्हणून तो मनुष्य जाऊ लागला.

गोप्याने पत्रावरील पत्त्याकडे पाहिलें. त्याला पाहिजे होते तेच ते पत्र होतें. हळूच आजूबाजूला पहात गोप्या तेथून निसटला आणि थेट आपल्या बिऱ्हाडीं आला. रायाच्या हातात गोप्यानें पत्र देताच त्यानें तें फोडलें आणि आतील मज-कूर वाचण्यास सुरवात केली. त्यांतील मजकूर खालीं लिहिल्याप्रमाणें होता—

न. वि. वि.

आपले कृपापत्र पावले. मजकुर समजला. उद्या शनिवार आहे तेव्हा आपले कॉलेज लवकर बंद होईलसे वाटते. करिता उद्या सध्याकाळीं चार आणि पाच याच्या दरम्यान आपण येण्याची कृपा केल्यास मी आपला आभारी होईन कळावें लो. अ. ही विनंति.

आपला,

**अप्पाराव निंबाळकर.**

दुसऱ्या दिवशीं रायानें राजाला बरोबर घेऊन अप्पारावांच्या घरीं जाण्याची तयारी केली दोघांनींहि कॉलेजच्या विद्यार्थ्यांना साजेसा पोषाख केला होता. पांच वाजण्याच्या सुमारास ते सदाशिव पेठेंत निंबाळकरांच्या घरीं येऊन पोंचले. दरवाजावर दाजिबांनीं त्याचें स्वागत करून त्यांना वरच्या दिवाण-खान्यांत नेलें. अप्पाराव खिडकीजवळ एका इझिचेअरवर

**अकोल्याचे सर बळवंतराव बिंचुरकर**

बसले होते. नमस्कार चमत्कार झाल्यावर त्यांना आपणाजवळ खुर्चीवर बसवून अप्पाराव म्हणाले, " आपलंच नांव का श्रीपतराव विंचुरकर ? "

" होय. " राया म्हणाला. " माझेंच नाव. आणि हे माझे एक कॉलेजमित्र आहेत. आपण कदाचित् माझ्या वडिलांना ओळखतहि असाल ! अकोल्याचे सर विंचुरकर !— "

" म्हणजे हे कोण विंचुरकर ? कौन्सिलचे मेंबर आहेत तेच का ? "

" होय. "

" त्याचें नांव मला ऐकून चांगलें माहित आहे पण प्रत्यक्ष ओळख मात्र नाहीं—वाः मोठं सुशिक्षित घराणं आहे म्हणतात. "

" होय. तसं म्हणतात परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. बाबांना हा हल्लीं मान-मतराब मिळाल्यामुळं पुढें याव लागतं. बाकी त्यांचीं मतं फार जुनी आहेत. मी सध्यां बी. ए. च्या क्लासात आहें. मी ह्या गेल्या रजेंत घरीं गेलों होतों. तेव्हा आईच्या आणि बाबांच्या मताविरुद्ध धाकट्या बहिणीला शिक्षणाकरितां येथें घेऊन आलों तेथे ती सहाव्या यत्तेंत होती. तिने एकदां मॅट्रिक व्हावें अशी माझी इच्छा ! म्हणून मी तिला यांच्या मताविरुद्ध येथें आणलें. सध्यां ती फीमेल हायस्कूलमध्यें आहे. परंतु बाबांना तें बिलकुल खपल नाहीं. त्यांनीं माझा महिन्याचा खर्च बंद केला आणि मला पत्र लिहिलं कीं, 'तुम्ही दोघेंहि आम्हाला मेल्यासारखीं आहात. आतां माझ्याकडून तुम्हाला एक पैचीहि मदत होणार नाहीं. "

" असं त्यांनीं पत्र लिहिलं ? मोठं आश्चर्य आहे ! "

**विचार घोळूं लागले !**

" त्यात आश्चर्य मानण्यासारखं काहीं नाहीं. त्यांचा स्वभाव तसा आहे. ते एकदां 'नाहीं' म्हणाले तें ब्रह्मवाक्यच " क्षणभरानें राया पुढें म्हणाला, " बाबानीं खर्च बंद केल्यापासून गेले दोन महिने मी मोठया विचारांत आहें, बहिणीनें चांगलें शिकावें अशी माझी फार फार इच्छा ! परतु काय करणार ? इतक्यांत तुमची जाहिरात मी पाहिली. तेव्हां विचार केला, कीं येथें लग्नाचें जुळल्यास पहावें. कारण तुमच्याबरोबर हा संबंध जुळला आणि पुढें तो घरीं कळला तर त्यांत बाबांना किंवा आईला वाईट वाटण्याचें कारण नाहीं. तुमचं घराणं आमच्या तोडीचंच आहे. आणि शिवाय हा संबंध जुळल्यावर मला तिची काळजी राहणार नाहीं. एकतर मी

जबाबदारींतून मोकळा होईन. तिचं शिक्षण पुढें चालू होईल आणि तिचं कल्याण होईल. मी एकदां ह्या तिच्या जबाबदारींतून मोकळा झाल्यावर माझा मी स्वतःचा खर्च पाहून घेईन. ”

अप्पा विचारांत पडले! अकोल्याचे सर बळवंतराव उर्फ भय्यासाहेब विंचुरकर हे जगजाहिर होते. अशा मोठया मनुष्याबरोबर संबंध जुळल्यास दुधात साखर पडल्यासारखें होईल, व आपण त्यांचे जांवई होतांच पुण्यांत आपला लौकिक वाढेल इत्यादि विचार अप्पारावांच्या मनात घोळू लागले.

“ हा पाहिलात का आमच्या बहिणीचा – इंदिराताईचा फोटो ! ” खिशांतून फोटो काढून राधा म्हणाला.

अप्पारावानें फोटो हातांत घेतला. तो सुंदर फोटो पाहताच क्षणभर त्याची दृष्टि त्या चेहऱ्यावर खिळली ! अशी सौंदर्ययुक्त, प्रौढ, शिकलेली आणि मोठया कुळातील मुलगी आपणास पत्नी म्हणून द्वितीय संबधाच्या वेळीं मिळेल आणि ती देखील जाहिरात देऊन — हे विचार त्याच्या मनांत स्वप्नांतहि आले नव्हते.

**फोटो पसंत पडला.**

“ अप्पाराव, आपणास एक गोष्ट सुचवून ठेवायची आहे. मी किंवा तुम्ही इतर मंडळीप्रमाणें अशिक्षित नाहीं तेव्हा आता आपणास जें काहीं करावयाचें ते मंडळीच्या टीकेला भीक न घालता करायचें ! आमच्या बाबाचा स्वभाव आहे फार तापट ! तरी देखील आमची इंदिरा तुमच्या पसंतीस येऊन हा संबंध जर जुळला तर मी मागाहून बाबांचा राग वाटेल त्या रीतीनें घालवीन; परंतु आपले सर्व नक्की होऊन कुंकुमपत्रिका आपल्या आप्तवर्गाकडे जाईपर्यंत ही गोष्ट अगदीं गुप्त— बाबांच्या कानावर बिलकूल जाता उपयोगी नाहीं. आता लग्नाचा दोन्हीं पक्षाचा खर्च आपणासच करावा लागेल. त्याचप्रमाणें मुलीच्या अंगावर सध्यां काहींच दागदागिने नाहींत. सर्व दागिने तेथें बाबानींच रागारागाने काढून घेतले परंतु त्याची मोठीशी मातब्बरी नाहीं. तात्यासाहेब निंबाळकर जहागिरदार यांच्या घराण्याबरोबर मी सबंध जुळवून आणिला हे जेव्हां मागाहून आमच्या घरीं कळेल तेव्हा बाबाना व आईला, त्यांचा राग जाऊन शेवटीं आनंदच होईल, अशी माझी पूर्ण खात्री आहे. आणि असें झालें म्हणजे आपण मुलीच्या लग्नात काहीं खर्च केला नाहीं, तिला दागदागिने घातले नाहींत, ह्या शरमेनें मागाहून

ते मुलीच्या आणि जांवयाच्या अंगावर खात्रीनें दागदागिन्यांचा आणि जड-जवाहिराचा वर्षाव करतील. बाबांचा स्वभाव मला चांगला माहीत आहे. ते हट्टाला पेटले म्हणजे दहाच्या ठिकाणीं हजार आणि हजाराच्या ठिकाणीं लाख खर्चायला देखील मागें पुढें पाहणार नाहींत. तेव्हां आता तुम्हाला विचारावयाचें म्हणजे इतकेच, कीं आमच्या इंदिराताईचा फोटो आपणांस पसंत आहे काय!"

"फोटोंत नांव ठेवण्यास काहीं जागा नाहीं."

"हें पहा अप्पाराव, तुम्हीं आम्ही कांहीं खेडवळ नाहीं. तेव्हां मी म्हणतो, उद्यां आहे रविवार—मी सध्याकाळीं इंदिराताईला येथे घेऊन येतों. तिला तुम्ही प्रत्यक्ष पहा. हा काहीं बाजारांतील सौदा नाहीं. म्हणून करावयाचें तें विचारानेंच केलें पाहिजे. आता आपणास एका गोष्टींत गौण दिसून येईल. इतर मुली दाखविण्याकरितां नेतात तेव्हा दागदागिन्यानीं सजवून नेतात, तसा प्रकार मात्र आमच्या इंदिराताईचा नाहीं. तिच्या अंगावर काहीं सुद्धा दागिने नाहींत. तरी देखील 'जातीच्या सुंदराना काहींहि शोभतें."

**येईल माझी भावी कांता!**

अप्पारावाला बिलकुल बोलू न देता रायानें आपला सर्व मतलब त्याच्या कानावर घातला. थोड्या वेळानें अप्पारावानें दाजिबाला हाक मारून फराळाचें घेऊन येण्यास सांगितलें. फराळाचा बेत श्रीमती थाटाचा होता. असो. त्या सर्व रात्रींत अप्पारावाना बिलकुल झोंप लागली नाहीं. ते सत्रा वेळा उठून इंदिरेचा फोटो काढून पहात. काहीं केल्या त्याच्या नेत्राचें समाधान होईना. चेहऱ्यातील प्रत्येक अवयव ते पुनः पुनः निरखून पहात. शेवटीं उद्या 'येईल माझी भावी कांता—' ह्या विचारांत त्यानीं दाजिबाला सांगून त्या दिवसाचा विशेष बेत ठेवला. इकडे रायानेंहि सर्व तयारी अगदीं बेमालूम रीतीनें करून ठेविली होती. गोप्याला त्यानें पुनः नीट रीतीनें सर्व गोष्टी पढवून स्त्रीवेष दिला. आणि त्याला 'इंदिराताई' बनविलें.

पाच वाजण्याचा सुमार झाला तेव्हां आप्पारावाच्या वाड्याजवळ शिग्राम-गाडी येऊन उभी राहिली. दाजिबा मंडळीचें स्वागत करण्याकरिता आणि आपल्या भावी मालकिणीला धरात घेऊन जाण्याकरितां पुढें आले. अप्पाराव माडीवरच्या खिडकींतून चोरदृष्टीनें सर्व रात्र आपल्या विचाराचें केंद्र बनलेल्या आपल्या भावी पत्नीला चोरून पहात होते. गोप्या उर्फ इंदिरा गाडीचा दर

वाजा उघडतांच रायाच्या मागून खालीं उतरली तिनें एक वेळ वर पाहिलें. पत्नी मिळण्याकरितां ' चित्रमयजगतांत ' जाहिरात देणारे अप्पाराव खिडकींत उभे असलेले पाहतांच मानेला किंचित् हिसका देऊन तिनें आपली दृष्टि तेथून वळविली. तिनें एकच वेळ वर पाहिलें, परंतु खिडकींत असलेल्या अप्पारावाना ती एक चमकन् वीज चमकली असाच भास झाला !

**इंदिरेला दाखविण्याकरितां नेलें.**

राया आणि राजा यांना घेऊन दाजिबा दिवाणखान्यांत आले. इंदिरा आंत गेली. बराच वेळ त्यांच्या इतर गोष्टी झाल्यावर राया म्हणाला, " अप्पाराव, इंदिराताईला बाहेर बोलवा ना ? ती काहीं इतर मुलीप्रमाणें लाजकुळी नाहीं ! आमची ताई चागली सुशिक्षित आहे समजलांत का आप्पाराव ? शिवाय मला आपणास एक सूचना करायची आहे. पण ती इतक्यांत नाहीं. प्रथम आमच्या ताईला पाहून तुमचं काय मत आहे, ते एकदां कळलं म्हणजे मला माझी सूचना पुढे करायला ठीक पडेल. "

थोड्या वेळानें इंदिरेला दाजिबांनीं दिवाणखान्यांत आणलें. ती खालच्या मानेनें रायाच्या खुर्चीमागें उभी राहिली. ह्या वेळीं राजा म्हणाला " अप्पाराव, चोख नाण्याला आपटून पहावें लागत नाहीं. मी माझ्या मित्रांची प्रशंसा करतों अशातला भाग नाहीं. पण विंचुरकरांचें घराणें पेशव्यापासून प्रसिद्ध आहे. आमच्या ह्या श्रीपतरावानीं आपल्या बहिणीच्या कल्याणाकरिता—तिला ज्ञानार्जनाकरितां पुण्यांत आणलें. त्यांचा हेतु खरोखरीच फार उदात्त आहे. परंतु त्याच्या वडिलांना तो बेत पसंत पडला नाहीं आणि त्यांनीं श्रीपतरावांना खर्च पाठविणें बंद केला. परतु त्यामुळें त्यांच्या ह्या इंदिराताईची फारच आबाळ होत आहे. "

" मग आतां तुम्ही ह्या–ह्यांना–" इंदिरेकडे पहात आप्पाराव म्हणाले, " ह्यां–ह्यांची काय व्यवस्था केली आहे ? तुम्ही सडे आहांत तेव्हां तुमचा प्रश्न निराळा आहे. पण ह्यांची रहाण्याची कशी काय व्यवस्था झाली आहे ? "

" सध्यां जी काय केली आहे व्यवस्था ती आमची आम्हाला माहीत ! " असें म्हणून राया थुंकण्याच्या निमित्तानें उठला आणि कोपऱ्यांतील खिडकी-जवळ गेला तेथें क्षणभर पहात राहून तो म्हणाला, " अप्पाराव, तुमच्या ह्या खिडकींतून आजुबाजूचीं शोभा तर फारच प्रेक्षणीय दिसते बुवा ! श्रीनिवास-राव, ही पहिलीत का मौज ? " राजाकडे पाहून राया म्हणाला.

**माझी किनई फार इच्छा आहे.**

राजा उठला आणि खिडकीजवळ जाऊं लागला. तेव्हां तो येत आहे असें पाहून राया दरवाजांतून बाहेर गच्चीवर गेला. त्याच्यामागें राजाहि गेला आणि पूर्वी ठरवून ठेवल्या-प्रमाणें त्यांनीं इंदिरेला अप्पारावांजवळ एकटेंच सोडलें !

प्रथम गोप्यानें एखाद्या चुकलेल्या पाडसाप्रमाणें इकडे तिकडे भयभीत दृष्टीनें पाहिल्यासारखें करून 'दा दा' अशी अस्फुट हांक मारिली.

" इंदिराबाई, अशा भिऊं नका ! तुमचे दादा तुम्हाला येथें एकटेच टाकून जाणार नाहींत. " अप्पाराव म्हणाले, " पण इंदिराबाई, तुम्हाला आज येथें का आणलं आहे तें कळलं का ?—तुमच्या दादांनीं तुम्हाला कांहीं सांगितलं आहे का ? "

" हो " खालच्या मानेनें इंदिरेनें उत्तर दिलें. " दादावर माझा चांगला विश्वास आहे तो जें करील तें माझ्या कल्याणाचेंच करील अशी माझी खात्री आहे म्हणून तर मी आईला सोडून अकोल्याहून येथें त्याच्याबरोबर आलें. बाबांनीं तर आम्हाला टाकून दिल्यासारखें केले आहे. पण—"

हें घर तुम्हाला आवडतं का ?— ह्या घराची स्वामिनी व्हावं अशी तुमची इच्छा आहे काय ? "

" माझी किनई फार इच्छा आहे ! खरंच असं जर घडून येईल तर किती चांगलं होईल ? बाबांची पक्की खोड मोडल्यासारखी होईल. मला दागिन्याची इतकी आवड पण मी दादाबरोबर येथे येताना बाबानीं रागानें एकसुद्धां दागिना माझ्या अंगावर राहूं दिला नाहीं—"

इतक्यांत राया आणि राजा आंत आले. इंदिरेनें त्यांच्याकडे दृष्टि टाकताच आपल्या गैरहजिरींत दिवाणखान्यांत काय भाषणें झालीं, तीं सर्व त्याच्या लक्षांत आलीं. क्षणभरानें दाजिबा चहाचे पेले घेऊन आंत आले.

" श्रीपतराव, तुम्ही काल जें कांहीं बोलला आणि जें कांहीं मला सांगितलं तें सर्व माझ्या लक्षांत आलें, " चहा घेत असता अप्पाराव म्हणाले. " मला तुमच्या सर्व गोष्टी मान्य आहेत. मी हा संबंध जुळविण्यास तयार आहें. पण मला थोडी भीति वाटते. तुम्हीं हें करीत आहांत ; तें चांगलेंच आहे म्हणा—पण तुमच्या वडिलांचा रोष—"

" हें पहा आप्पाराव, त्याबद्दल तुम्हाला काळजी करण्याचें कारण नाहीं,

आमच्या ताईची इच्छा असल्यावर बाबांच्या रोषाला काय करायचं आहे ? तिच्या सुखाकडे मला पहायचं आहे. आतां इतकं मात्र खरं कीं. मी योजल्या प्रमाणें तुमचा आमचा शरीरसंबंध जुळल्यावर बाबा जर प्रतिकूल झाले तर ताईला दागदागिने, जडजवाहिर मिळणार नाहीं; परंतु आप्पासाहेब त्या गोष्टीला तुम्ही मोठेंसें महत्त्व द्याल अस नाहीं मला वाटत ! तुम्हांला काय कमी आहे म्हणा ! "

**इंदिराबाई पसंत पडली.**

" छे छे ! त्याची नाहीं मी पर्वा करीत ! आणि आतां असं समजा, माझ्या जाहिरातीवरून एखादी अगदीं गरीबाचीच मुलगी पुढें येऊन मी तिला पसंत केली असती मग ? म्हणून म्हणतों —त्या दागदागिन्यांची मोठीशी पर्वा करणारा मनुष्य मी नाहीं. मला जें हवं होतं तें हेंच कीं, मुलगी चांगली प्रौढ शिकलेली, सुदृढ आणि नाकीं डोळीं चागलीं !—"

" मग काय हो ? आमची इंदिराताई तुम्हाला पसंत पडेल अशी मला आशा आहे. "

" नुसती आशाच का ! खात्री आहे म्हणून म्हणा कीं ! " हांसत हांसत इंदिराकडे पहात आप्पाराव म्हणाले, " बरं श्रीपतराव, मघां तुम्ही एक सूचना करणार होता ती कोठली ? आता अगदीं संकोच धरूं नका. जें कांहीं तुम्हाला सुचवायचं असेल, बोलायचं असेल ते मोकळ्या मनान मला सांगा. "

हळूंच रायानें खूण करताच इंदिरा आंत जाऊं लागली. तेव्हां विचार करीत राया म्हणाला, " हो —आतां संकोच न धरतां सांगतों. तुम्हाला आमची ताई पसंत आहे हें तर सिद्धच झालं ! तेव्हां आता कोठलीहि गोष्ट सुचविण्यास मला अधिकार आला. मी तुमच्यापासून कोठलीहि गोष्ट चोरून ठेविली नाहीं. आम्ही जरी ' बडेबापकी प्रजा ' आहोंत तरी सध्यां कोठल्या परिस्थितींत आहोंत, हें तुम्ही जाणतच आहांत ! मी हल्लीं ताईला ह्या आमच्या श्रीनिवासरावांच्या घरीं ठेवलं आहे, तेव्हां माझी अशी इच्छा आहे कीं, तिला येथें आणून ठेवावें. पुढल्या महिन्यांत मुहूर्त आहेत. तोंपर्यंत ती येथें आहे हें कोणाला देखील कळता उपयोगीं नाहीं, नाहीं तर आमच्या नांवाला कमीपणा येईल. तितक्या अवधींत मी बाबाचा राग शांत करण्याची खटपट करतों, आणि जुळल्यास लग्नापूर्वीं तुमची आणि बाबांची समक्ष भेट करवून देतों."

" ठीक आहे ! ठीक आहे ! हा विचार मला फार पसंत आहे ! " आप्पाराव म्हणाले, " आतां माझी एक सूचना-नव्हे, तुम्हाला एक विनंति आहे. तुमची ताई येथें राहणार मग तुम्ही तरी कां दूर रहातां ? तुम्ही देखील या की येथेंच ! तुम्हाला कांहीं परकेपणा वाटायला नको ! "

" होय-खरं-पण-" राया अडखळत म्हणाला.

" श्रीपतराव असे विचारात काय पडलात ? " राजा मध्येंच म्हणाला, " आप्पासाहेबांचं म्हणण रास्त आहे ! एकदम परक्या घरात-परक्या नाहीं म्हणा आता, परंतु ह्या नव्या घरांत ताई एकटी राहिल, नाहीं असं नाहीं. पण तुम्ही येथें राहिला म्हणून काय बिघडलं ? "

**दागिन्याची हौस पुरविणारा हौशी नवरा.**

ठरलें ! आठ दिवसांनीं राया आणि इंदिरा यानीं अप्पारावांच्या घरीं राहण्यास येण्याचें ठरलें. त्या दिवशीं ती मंडळी जेवणास राहिलीं होती. त्यावेळीं रायाने आपल्या कपट-शब्दजालानें आप्पारावास पूर्ण गुरफटून टाकलें. जेवण होत असता आपल्या इंदिराताईला दागिन्यांची विशेष हौस आहे, असें एक दोनदा रायानें बोलतां बोलतां आप्पारावाना पुनः सुचवून ठेवलें. आणि ही गोष्ट त्यांच्याहि चांगली लक्षांत राहिली. कारण इंदिरेनेंहि त्याच्या बरोबर बोलताना स्वतःची आवड काय आहे हें त्याच्या कानावर घालून ठेविलें होतें. जेवण वगैरे आटोपल्यावर एक तास पुनः मडळी गोष्टी बोलत बसली होती आणि जेव्हा ते जावयास उठले, तेव्हां आप्पारावांनीं दाजिबाला हांक मारिली थोड्या वेळानें त्यानें एक ताट बाहेर आणलें. त्यांत जरीचें लुगडें. खण, आठ दहा तोळ्यांचा चंद्रहार आणि लहानशा रुप्याच्या ताटांत बर्फी इतके जिन्नस होते. ते जिन्नस घेण्यासबंधानें रायानें प्रथम ' हो-ना ' केलें. असो.

आपल्या बहिणीला ( ? ) घेऊन राया आपल्या कॉलेजच्या मित्रांबरोबर ( ? ) निघून गेल्यावर आप्पारावांचें विचारयंत्र सुरू झालें इंदिरेची मूर्ति त्याच्या दृष्टी-समोरून हालेना ! आपल्यासारख्या बिजवरास इंदिरेसारखी सुस्वरूप आणि मोठ्या कुळांतील मुलगी मिळाली हें आपलें थोर भाग्य होय असें त्यांना वाटूं लागलें. बराच वेळ ते आपल्या थोर दैवाचें कौतुक करीत असतां त्याच्या मनांत दागिन्यासंबंधीं विचार आले. आपल्या भावी कांतेला दागिन्यांची हौस आहे. हें त्यांना प्रत्यक्ष तिच्याच तोंडून कळलें होतें. ते

तत्काळ उठले आणि आपल्या खोलींत जाऊन त्यांनीं आपली सेफ उघडली. त्या सेफमध्यें आपल्या गतपत्नीचे दागिने ठेविले होते. ते सर्व दागिने त्यानीं बाहेर काढले.

**बायकांचें परब्रह्म.**

त्या दागिन्याकडे पहात ते स्वगत म्हणाले, ' छे ! माझ्या इंदिरेला काहीं हे दागिने शोभायचे नाहींत. हे सर्व जुन्या चालीचे बेडौल आणि जड आहेत. इंदिरेला नाजूक आणि फॅशनेबल दागिने केले पाहिजेत. तिच्या बापानें दागिने घातले नाहींत तर मी तिला दागिन्यांनीं अशी भरून काढीन, कीं लग्न झाल्यावर त्यांनीं क्षणभर फक्त तिच्या दागिन्यांकडे पहातच राहिलें पाहिजे. त्यांनीं मुलीची दागिन्यांची हौस पूर्ण केली नाहीं, तरी मुलीची हौस पुरी करणारा हौशी नवरा तिला मिळाला आहे, हें त्यांना कळलें पाहिजे. ' असे विचार करीत त्यांनीं हिऱ्यामोत्याचे दागिने एका बाजूला काढले आणि सोन्याचे दागिने एका बाजूला काढले. क्षणभरानें त्यांचे पुनः विचार सुरू झाले. ' अलीकडे मुंबईत हिऱ्यामोत्यांचे फारच फॅशनेबल दागिने करणारे कारागिर आहेत आतां उद्यां पहिलें काम मुंबईत जावयाचें ! बस्-असेंच केलं पाहिजे. इंदिरेला देखील कळलें पाहिजे कीं, आपली हौस पुरविणारा आपणाला नवरा मिळाला. आणि बायकांचं प्रेम तरी कशावर आहे ! दागिन्या-वरच ! दागिना म्हणजे बायकांना परब्रह्म ! '

" राया, हें जरा विशेष मोठें धाडस आहे ! कारण आतां अस पहा, गोप्याला स्त्रीवेषानें दुसऱ्याच्या घरांत रहावयाचें आहे. " गजाभाऊ म्हणाला. हा संवाद त्यांच्या बिऱ्हाडीं चालला होता.

**पुढची तयारी.**

" म्हणूनच तर मी देखील तेथें राहणार आहें, " राया म्हणाला, " पुढल्या महिन्याच्या ४ थ्या तारखेला एक मुहूर्त आहे. तोच मुहूर्त धरण्यास आप्पारावांना सांगतों. आतां ती स्वारी आपल्या पूर्ण हातांत आली. जशी आपण वळवूं तशी वळणार आहे. आतां मी पुढला व्यूह कसा रचला आहे तो सांगतों. पुढल्या रविवारीं आम्ही तेथें रहाण्यास जाऊं. मग हा पहिला मुहूर्त धरला तरी बाकी वीस दिवस राहतील, काय समजलां ? त्यापैकीं शेवटचे आठ दिवस आप्पारावांना अकोल्यास पाठवावयाचें आहे. तेव्हां बाकी बारा दिवस राहिले. हे बारा दिवस एकदां पार पडले कीं जिंकलें ! मी गोप्याच्या जवळ

दुसऱ्या खोलींत झोंपत जाईन. आणि सकाळीं उठतांच प्रथम त्याला सजवित जाईन. शिवाय ह्या नवीन आणलेल्या केसांच्या टोपाची कांहीं काळजी करावयास नको. अलिकडील फॅशनचा हा फुगऱ्या केसांचा टोप असल्यामुळें केस वांकडे तिकडे झाले तरी कोणाला संशय न येतां उलट ती एक फॅशनच दिसते."

"राया, त्याची काळजी करण्याचे कारण नाहीं. तें सर्व ठीक होईल अशी माझी खात्री आहे. पण कांहीं म्हणा ही आपली पुण्यांत येतांच पहिली बोहणी तर चांगली झाली आहे! आमच्या इंदिराताईला खण, लुगडं आणि दागिने मिळून अडीचशें तिनशेंचा ऐवज मिळाला आहे. ठीक आहे पुण्यांत येण्या-बरोबर शकून कांहीं वाईट झाला नाहीं म्हणायचा!"

"अरे, बोलून चालून पुण्यभूमीच ही! पुण्यांत जर पुण्य साधलें नाहीं तर साधणार कुठें!"

"एस्-यू आर राईट! आपणाला स्टार्ट (आरंभ) तर चांगला मिळाला यांत शंका नाहीं."

"होय-गोष्ट अगदीं खरी आणि 'दॅट वुइच् बीगिन्स वेल, एन्डस् वेल!' (ज्याचा आरंभ चांगला होतो त्याचा शेवटहि चांगला होतो) पण इंदिराताई, आप्पारावांच्या अर्धांगी झाल्यावर आम्हांला नका बरं विसरूं" बाप्पा म्हणाला.

"आणि हें पहा जेव्हां आप्पाराव तुझ्याजवळ येतील तेव्हां असे मुरके मारशील कीं—"

"यंव!" राजानें गजाभाऊ प्रधानाच्या पाठीवर थाप मारून त्याचें वाक्य पुरें केलें!

**दागिने घडविले**

संध्याळीं राया आणि राजा आप्पारावांच्या घरीं गेले दाजिबांनीं त्याचें योग्य स्वागत केलें, आप्पाराव कदाचित् बाहेर गेले असतील असें रायाला वाटलें, परंतु लग्नाच्या तयारीकरितांच ते मुंबईस गेले आहेत, असें थोड्या वेळानें त्याला दाजिबा-कडून कळलें. हळुहळू रायानें दाजिबावर आपल्या मोहजालाचा प्रयोग करण्यास सुरवात केली. तास दीड तासांत त्या म्हाताऱ्याला रायानें इकडल्या तिकडल्या थापा मारून आपलासा केलें.

चौथ्या दिवशीं आप्पाराव आपल्या मनासारखे आपल्या भावी पत्नीकरितां मुंबईतून दागिने घडवून घेऊन आले, दागिने घडविण्याबद्दल मेहनतच

त्यांना तीनशें रुपये द्यावे लागले, यावरून त्या सर्व दागिन्यांची किमत किती असावी याची वाचकांना थोडी तरी कल्पना सहज होण्यासारखी आहे. हिऱ्यामोत्याचे निरनिराळ्या फॅशनचे दागिने तीस हजाराचे होते. आणि सोन्याच्या बांगड्या, हार, आंगठ्या इत्यादि मिळून चार पांच हजारांचे दागिने होते. असो. पुढें चार दिवसांनीं रायाची भेट झाली असतां आपण मुंबईत कशाकरितां गेलों होतों तें आप्पारावांनीं त्याला सांगितलें नाहीं. दागिने इंदिरेच्या अंगावर घालून त्या सर्वांना चकित करून टाकावें, अशी त्याची इच्छा होती. शेवटीं रविवार उजाडला ठरल्याप्रमाणें राया आणि इंदिरा आप्पारावांच्या घरीं आले. 'इंदिरा ही कोण?' हें बाहेरच्या मंडळीस न कळविण्याची घरांतील नोकरचाकर मंडळीस ताकीद देण्याची रायानें आप्पारावाना सूचना केली. त्या दिवशीं रात्रीं रायानें आपल्या आणि इंदिरेच्या झोंपण्याची व्यवस्था कशी असावी याविषयीं सर्व व्यवस्था करून घेतली. रात्रीं सर्वांचीं जेवणें झाल्यावर आप्पाराव आणि राया दिवाणखान्यात गप्पा गोष्टी करण्यास बसले. इंदिराहि त्यांच्याजवळ बसली होती. त्यावेळीं रायाच्या भाषणाचा विषय प्रीतिविवाह हा होता. पाश्चात्य देशांत ज्याप्रमाणें प्रीतिविवाह होतात त्याप्रमाणे हिंदुस्थानांत प्रीतिविवाह सुरू झाले पाहिजेत, असें मत तो प्रतिपादन करीत होता.

"आप्पाराव, तुमच्यावरूनच पहाना!" राया म्हणाला, "आज, उद्यां असे एक दोन दिवस आमच्या इंदिराताईला थोडासा संकोच वाटेल पण एकदा परस्परांच्या स्वभावाची तुम्हाला जानपछान झाल्यावर तुमच्यात नैसर्गिक प्रेम उत्पन्न होऊन तें वाढत जाईल. आणि लग्न होईपर्यंत तें प्रेम सहज दृढ होईल, कीं तुम्हाला आपले जीवित हें एकमेकाच्या सुखदुःखाकरिता आहे असें वाटू लागेल, ह्यालाच प्रीतिवाह म्हणतात."

**प्रीतिविवाह चांगला**

"श्रीपतराव, तुम्ही म्हणतां तें खरें आहे. मला आतापासूनच तसें वाटूं लागलें आहे. माझेंहि असेंच मत आहे कीं, पूर्वीचीं लहानपणीं लग्नें करण्याची ती वाईट आणि परिणामीं दुःखकारक चाल मोडून जिकडे तिकडे हे प्रीतिविवाह सुरू झाले पाहिजेत."

इंदिरा वरील भाषण मुकाट्यानें ऐकत होती. मधून मधून ती वांकड्या नेत्रें पाहून आप्पारावांवर नेत्रकटाक्ष फेंकीत होती. बरीच रात्र होईपर्यंत

त्यांच्या गोष्टी चालल्या होत्या. शेवटीं इंदिरेला झोंप येत आहे, असें पाहून आप्पाराव उठले. त्यानीं आपल्या भावी पत्नीच्या झोंपण्याची व्यवस्था फारच उत्तम केली होती, आपल्या नांवाला साजेसा त्यांनीं इंदिरेचा थाट ठेवला होता. छप्पर पलंग, मऊ गाद्या, पाणी पिण्याकरितां रुप्याचा तांब्या इत्यादि चोख व्यवस्था असून बाजूच्या खोलींत श्रीपरावांची व्यवस्था केली होती.

दुसऱ्या दिवशीं स्नानाच्या पूर्वी आप्पारावांच्या घरांत असलेल्या आजीबाईनें इंदिरेला वेणीफणी करण्याकरितां बोलाविलें. परंतु ' तोंड धुण्यापूर्वीच मी वेणी फणी केली ' असें तिनें म्हातारीला सांगितलें. कारण उठल्या बरोबरच रायानें तें काम आटोपलें होतें. स्नानाला जातांना रायानें ' जरा सावध रहा, आंग धुतांना टोप सरकेल त्याची काळजी घे, ' असा गोप्याला इषारा दिला. परंतु गोप्याला इषाऱ्याची बिलकूल जरूरी नव्हती. आपण स्वीकारलेल्या कामगिरी-मुळें अंगावर पडलेली जबाबदारी तो पूर्णपणें जाणून होता. शिवाय ह्यापूर्वी अशाच प्रकारची भूमिका दोन वेळां घेऊन आतां तो बराच निर्ढावला होता.

**वडिलांना पत्र लिहिलें.**

संध्याकाळचा सुमार झाला. राया एका खुर्चीवर वाचीत बसला होता. इंदिरा उर्फ गोप्या जवळच मासिक मनोरंजनाचा ताजा अंक वाचीत होता. इतक्यात दुपारची झोंप घेऊन आप्पा-साहेब बाहेर आले. त्यांना पाहतांच इंदिरा पदर सावरून चटकन् उठून उभी राहिली.

" बसा बसा–तुम्हाला नको उठायला ! " आप्पाराव म्हणाले, " कां श्रीपतराव, तुम्ही झोंपला नाहीं वाटतं दुपारीं ? मी येऊन जरा पडलों तों लागली बुवा चटकन् झोंप ! "

" नाहीं. मी–क्वचितच दुपारीं झोंपतों. अहो अद्यापि आम्ही विद्यार्थी आहोंत, आम्हांला दुपारीं झोंपून कसं चालेल ? "

" मग काय फिरायला तरी जाण्याचा आहे का विचार ? असें क्षण-भरानें म्हणून आप्पारावानें इंदिरेकडे पाहिलें. त्याबरोबर तिनें आपली दृष्टि जमिनीकडे वळविली.

" तुम्ही जातां कां फिरावयाला ? "

इंदिरेनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. परंतु राया पुढें म्हणाला, " ऐकलं का आप्पाराव तुम्ही मघां झोंपलां असतांना मी एक कामगिरी केली. मी एक

सविस्तर हकीकतीचें वडिलांना पत्र लिहिलें आहे, त्या पत्राला उत्तर येईल अशी माझी पूर्ण खात्री आहे."

"पण तुम्ही, आपला हा संबंध जुळला आहे, याविषयीं कांहीं लिहिलं आहे का त्या पत्रांत ?"

"वाः ती तर गोष्ट मी पहिली लिहिली !"

"बरं मग येतांना फिरायला ? जाऊं म्हटलं पर्वतीपर्यंत !"

रायानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. फक्त तो इंदिरेकडे पहात राहिला. परंतु त्यांची नेत्रपल्लवी भाषा सुरू होती. क्षणभरानें तो म्हणाला, "कां इंदिराताई, तुम्ही असं तोंड कां वांकडं केलं ! तूं नेहमीं फिरावयास जाण्याकरितां माझ्या मागें लागत होतीस आणि आतां आप्पासाहेब आपण होऊन विचारतात मग कां तुझं तोंड हिरमुसलं ?"

"हें रे काय दादा ! गाडींतून जायच आणि मी अशी बुच्या कानानीं उघड्या गळयानें आणि हें पहा—हातांत तरी कांहीं आहे का ! अशी मी इकडच्या गाडींतून फिरावयाला जाऊं वाटतं ?" आप्पारावाकडे पाहताना हिसका देऊन इंदिरा म्हणाली.

"मग आतां त्याला काय करायचं ?" किंचित् निराशायुक्त स्वरानें राया म्हणाला.

"काय करायचं तें मी आतां सांगतों" असें म्हणून आप्पाराव उठून आंत गेले. इकडे राया आणि इंदिरा यांचे नेत्र सकेत झाले. थोड्या वेळानें हातांत एक पेटी घेऊन आप्पाराव परत दिवाणखान्यांत आले आणि म्हणाले, "हें पहा, यांतून आपणांस काय पसंत पडतं तें पहा."

इंदिरा आपल्या पायांच्या बोटाकडे पहात राहिली. तें पाहून आप्पाराव पुढें म्हणाले, "कां अशा विचारांत कां पडलांत ? आतां काय

**किल्ल्या दिल्या.** आणि पुढें काय—ह्या सर्व वस्तूंवर मालकी तुमचीच आहे." असें म्हणून त्यांनीं ती पितळेचीं नकशी केलेली पेटी उघडली. रायानें एकामागून एक दागिना बाहेर काढला आणि त्यांतून दोन भारी किंमतीचे नग हातांत घेऊन राया म्हणाला, "अगदीं अशाच फॅशनचे दागिने तुझे देखील घरीं आहेत ना इंदिराताई ! पण ह्या दागिन्यावर नक्षीकाम फार सुबक आहे. आवडले का हे तुला ताई ?"

इंदिरेनें ते दागिने हातांत घेतले आणि अंगावर घालण्यास सुरवात केली.

पेटींतील एक दोन दागिने खेरीज करून तिनें सर्व दागिने घातले. परंतु ते घालीत असतां आपणास अतिशय आनंद झाल्याची चिन्हें दाखवीत ती हास्य-मुद्रेनें मधुन मधून आप्पारावांकडे पहात होती.

मंडळी फिरावयास गेली. गाडींत आप्पारावांच्या उजव्या बाजूला इंदिरा बसली होती. आणि समोरच्या बाजूला राया बसला होता. आतां इंदिरा हलुहलू आप्पारावांबरोबर बोलूं लागली होती. रात्रीं परत आल्यावर जेवणें वगैरे झाल्यानंतर इंदिरेनें सर्व दागिने काढून ती दागिन्याची पेटी स्वतः घेऊन आप्पारावाच्या स्वाधीन करण्याकरितां तिनें नेली.

" आता ही मजजवळ कशाला देतां ? तुम्हाला आतां ती उद्यां लागेलच ! ठेवा त्या कपाटांत ! ह्या आहेत किल्ल्या ! " असें म्हणून आप्पारावांनीं किल्या देखील इंदिरेच्या स्वाधीन केल्या.

**आठ दिवस झाले.**

सकाळीं जेवणें झाल्यावर ' मी कॉलेजमध्यें जातों — संध्याकाळीं येईन, असें सागून रायानें गोप्याला दुपारीं कसें वागायचं तें पढवून ठेविलें आणि आपण कॉलेजमध्यें जाण्याकरितां निघाला. इंदिरेनें दुपारचा वेळ ' घटकाभर करमणूक ' वाचण्यांत घालविला. चार वाजण्याच्या सुमारास तिनें स्वतः आप्पा-रावांना चहा नेऊन दिला. तेव्हां ते म्हणाले, " वाः तुम्ही कशाला आणिला ? दाजिबा कुठें आहे ? "

" दाजिबा बसले आहेत हिशोब लिहित ! पण मी आणला म्हणून काय झालं ? आता तर इथलं सर्व काम मीच करणार हो ! मला किनई कामाची फार आवड आहे. "

" पण नोकरचाकर आहेत ना घरांत ! तूं आतां सर्व घराची मालकीण होणार तेव्हा—"

म्हणून काय झालं गडे ! मी नव्हतें तेव्हांचा प्रश्न निराळा होता. तुम्हाला नाईलाजास्तव नोकराकडून कामं करूनच घ्यावीं लागत होतीं. पण आतां तसं नाहींना ! इकडच्या पायांची सेवा करणं माझं कर्तव्यच आहे, नाहीं तर माझ्या शिक्षणाचा उपयोग तो काय ? "

इंदिरेनें अगदीं सोळा आणे छाप बसविली ! तिचें भाषण ऐकून आप्पाराव मोठ्या कौतुकानें तिच्या मुखाकडे पहातच राहिले. अशा सुशिक्षित, विनयशील आणि उच्च कुलोत्पन्न कुमारिकेचा आपणास लवकरच लाभ होणार म्हणून

त्यांना आनंद आणि अभिमान वाटूं लागला. अशा रीतीनें हंसून खेळून त्यांचे आठ दिवस गेले. राया सकाळीं कॉलेजमध्यें जाण्याच्या निमित्तानें आप्पारावांच्या घरून जात असे आणि सर्व दिवस आपल्या मंडळींत घालवित असे. संध्याकाळ झाली म्हणजे तो परत आप्पारावांच्या घरीं येई. आठ दिवस झाल्यावर एके संध्याकाळीं राया घरीं आल्यावर आप्पारावांना म्हणाला, "आप्पासाहेब, आता कोठल्याहि गोष्टीची भीति बाळगण्याचें कारण नाहीं. मी अनुमान केल्याप्रमाणें बाबांचें पत्र आलें. मी म्हटलं होतं ना कीं, आपणासारखा जांवई मिळतो--निबाळकराच्या घराण्याबरोबर आपला संबंध जुळतो, असें पाहताच बाबा शुद्धीवर येतील म्हणून !"

"एकंदरीनें पसंत आहे तर त्याना हा संबंध ?"

"अहो, पसंत म्हणून काय विचारतां ? पसंत पडलाच पाहिजे ! आणि पत्र तरी कसं खुबीनें लिहिलं आहे, कीं वाचतच रहावं !"

"पण काय आहे ते पत्र ? वाचा तर खरें !" आप्पाराव उत्सुकतेनें म्हणाले.

रायानें खिशातून पत्र काढलें आणि वाचण्यास सुरवात केली.

"चि. श्रीपती यांसः—

अनेक आशिर्वाद विशेष, तुझें पत्र पावलें, तूं आणि चि. इंदु खुशाल आहात हे वाचून आनंद झाला.

**घरीं बोलाविलें** चि. इंदूला घेऊन तूं येथून हट्टानें गेलास याबद्दल मला तुझा राग आला होता.

अशा रीतीनें वडिलाची आज्ञा मोडणें चागले नाहीं. तूं समजूतदार मुलगा आहेस. अस्तु. श्रीमंत अप्पाराव यांचे वडिल कै. श्रीमंत तात्यासाहेब विचुरकर यांचा व माझा चांगला परिचय होता. तेव्हां त्यांच्याबरोबर आपला सोईरसंबंध जुळल्यास आम्हाला आनंद आहे तुझ्या पत्रावरून तूं मुहूर्त ठरविलास असें दिसतें, परंतु इतक्या लवकर मानपानाच्या गोष्टी आणि आपल्या लौकिकाप्रमाणें लग्नाची तयारी झाली पाहिजे. करितां हें पत्र पावतांच तूं आणि चि. इंदु निघून यावें. तूं येताच समक्ष सर्व गोष्टी कळतांच एक दोन दिवसांत आपण श्री. आप्पारावांस येथें बोलावून सर्व नक्की करूं. हा मुहूर्त टळला तरी पुढें दहा दिवसांनीं दुसरा उत्तम मुहूर्त आहे पत्र पावतांच चि. इंदूला घेऊन

यावें. आतां तिला दूर ठेवणें लोकदृष्ट्या चांगलें नाहीं. शिवाय तुझी आई मुलींविषयीं फार काळजींत आहे, केव्हां येणार तें पत्र लिहावें. श्री. आप्पारावांस माझा आशीर्वाद सांगावा. कळावें हें आशीर्वाद.

तुझा पिता,
**बळवंतराव विंचुरकर.** "

"श्रीपतराव, हें फार चांगलं झालं!" आप्पाराव म्हणाले, "तुम्ही आपल्या वडिलांना कळविलं हें चांगलं केलें. त्यांच्या संमतीनें ज्या गोष्टी होतील त्या चांगल्या."

"पण आप्पासाहेब, आमच्या बाबाची पत्र लिहिण्याची शैली पाहिली काय? आपणाबरोबर ताईचें लग्न जुळलें असें पाहून त्याचा राग चटकन् निवाला. असो. आतां मात्र अगदीं कडाक्यानें लग्न होईल यांत शंका नाहीं!"

"मग तुम्ही केव्हां जाणार अकोल्यास?"

"उद्याच निघूं म्हणतों! आम्ही पोहोंचताच मी तुम्हाला पत्र लिहितो. मग तुम्ही या. आतां लवकर होईल तितकें चांगलं म्हणजे साधल्यास हा पहिलाच मुहूर्त साधतां येईल." असें म्हणून राया इंदिरेकडे वळून म्हणाला, "कां ताई, तुला कसं वाटतं?"

परंतु इंदिरेनें उत्तर दिलें नाहीं, तिनें फक्त हास्यमुद्रेनें आप्पारावांच्याकडे पाहिलें.

दुसऱ्या दिवशीं त्यांची जाण्याची तयारी झाली. इंदिरेनें कांहींच दागिने घातले नाहींत तें पाहून आप्पाराव म्हणाले, "हें काय? दागिने कां नाहीं घातले? हें नाहीं बुवा चागलं! मुद्दाम तुमच्याकरितां तर मी ते केले, ते मी असे पेटींत ठेवण्याकरितां केले कीं काय? तुमच्याशिवाय त्या दागिन्यांना काय शोभा आहे! जा–प्रथम ते सर्व दागिने घाला अंगावर! दागिने घालाल तर मी इथून जाऊं देईन, नाहीं तर नाहीं जाऊं देणार!"

"पण आतां घरीं गेल्यावर माझे आहेत सर्व दागिने!"

"मी कुठें नाहीं म्हणून म्हणतों! पण माझी इच्छा!"

"इथली इच्छाच आहे तर बाई घालते." म्हणून इंदिरा आंत गेली आणि तिनें कपाट उघडलें.

इंदिरा आणि राया यांना स्टेशनावर पोहोंचविण्याकरितां स्वतः आप्पासाहेब

आणि दाजिबा आले होते. सेकंडक्लासचीं टिकिटें काढून आमची मंडळी गाडींत बसली. गाडी चालू झाली. आणि आप्पाराव परत फिरले.

रात्रीं अकराचा सुमार झाला होता. रायक्लबची मंडळी शनिवार पेठेंतील आपल्या बिऱ्हाडांत गोष्टी करीत बसली होती. बरीच रात्र

**प्रतिखडाष्टक.** झालेली पाहून बापू म्हणाला, " कोणी तरी स्टेशनवर जायला पाहिजे होतें ! म्हणजे आज राया येणार कीं नाहीं हे नक्की कळलें असतें—"

" तूं बुआ फार संशयखोर आणि भित्रा आहेस !" राजा म्हणाला, " राया हा आता इतक्यांत येईल. त्यानें सांगितलेला टाईम कधीं चुकला आहे का ? "

" नाहींरे ! पण—"

" पण म्हटल्याबरोबर त्या तुझ्या तोंडात ' परंतु ' म्हणून एक ग्रावी ठेऊन असं वाटतं " असें म्हणून राजानें हात उगारला. तोंच दरवाजा उघडून राया आणि त्याच्या मागून गोप्या हातांत ट्रंक घेऊन आंत आले.

" अरे अरे ! आहे काय !—राजा, का त्या बापूच्या राशील लागला आहेस ? " आंत येतांच राया म्हणाला, " जेव्हां पहावं तेव्हां तुमचा खटका ! ह्या तुमच्या खडाष्टकाच्या मागें प्रीति केव्हां लागेल ती लागो बुआ !"

" ही पहा राया लागली आतापासून ! असें म्हणून राजानें बापूच्या गळ्यासभोंवतीं हात टाकले आणि म्हणाला, " झालें बुवा आजपासून आमचें हें प्रीतिखडाष्टक सुरू ! "

" अरे सोड—राजा, मेलों—" धडपडत त्याच्या हातून सुटका करून घेऊन बापू म्हणाला, " किती जोरानें आवळलेंस ! हें कांहीं प्रीतिखडाष्टक नाहीं पण मृत्युखडाष्टक मात्र आहे ! "

" गप्प बसाना आतां—" चाच्या म्हणाला, राया, तूं येथें नव्हतास पण हें असं चाललं आहे ह्या दोघाचं ! रात्रीं तर कांहीं विचारूं नकोस ! अशी धुमश्चक्री माजविलेली असते. "

" बरं बरं बृहस्पति ! बसा आतां गप्प !" बापू म्हणाला, " ह—कसं काय राया ? कां इंदिराताई, आल्यांत का सासरहून ? काय आणलंत दाखवा पाहूं ? "

रायानें हलुहळू सर्व हकीकत सांगितली, आणि दागिने दाखविले. मंडळीनीं त्या सर्व दागिन्यांची किंमत वीस बावीस हजार रुपये केल्यावर राया म्हणाला,

"मग आम्ही गाडींत सेकंड क्लासमध्यें बसलों. आमच्या डब्यांत दुसरं कोणी नव्हत! एक दोन स्टेशनं गेल्यावर इंदिरेला पुनः गोप्या बनवून पुढल्या स्टेशनवर आम्ही खालीं उतरलों. दोन तासपर्यंत त्या स्टेशनवर आम्हाला बसावं लागल. पुढें विशेष म्हणण्यासारखा काहीं प्रकार घडून आला नाहीं. साडेनवाला परत येण्यास गाडी मिळाली त्या गाडीनें पुनः आम्ही बसलों. पण राजा, आता सध्याकाळीं आम्ही निघतांना मला भीति वाटत होती. गोप्याला मी सांगितलं होतं कीं, निघतांना अप्पारावांचे दागिने अंगावर घालूं नकोस. ते होऊन सांगतील–फार आग्रह करतील तर घाल—"

"आणि त्यानीं आग्रह केला नसता तर?" मनोहरानें मध्येंच विचारलें.

"तर काय? शेवटीं येतांना कपाटांतील पेटीच लांबविली असती!" राया म्हणाला. "पण ते कृत्य 'चोरी' च्या सदराखालीं आलें असते आणि आता राजरोसपणें हे काम झालं. त्यानीं आपण होऊन आग्रहानेंच सर्व दागिने दिले."

"बरं मग आतां कस काय करावयाचं!" बाप्पानें विचारले, "पुढला विचार काय ठरविला आहे?"

"आता पुढला विचार पुढें!" राया कपडे काढित म्हणाला. "आता रात्र फार झाली. झोंपा आतां स्वस्थपणें! उद्या करूं काय तो विचार."

सर्वांनीं अंथरुणें पसरलीं.

दुसऱ्या दिवशीं रात्रीं मंडळींची मिटिंग जमली. आतां पुढे काय करावयाचें त्याचा विचार सुरू झाला. राया म्हणाला—

**पुढें काय करायचें?**

आता पुढे काय करावे अशी मंडळीची इच्छा आहे? ज्याला जे विचार सुचतील ते त्यानें सांगावे. आपणांस अप्पारावकडून जें कांहीं मिळावयास पाहिजे होतें ते तर मिळालें. आतां जरी आपण स्वस्थ बसलों तरी चालण्यासारखें आहे. परंतु एक गोष्ट मात्र लक्षांत ठेविली पाहिजे कीं, जर आपण स्वस्थ बसलों तर आणखी आठ दहा दिवस अप्पाराव स्वस्थ राहतील आणि मग पुढें अकोल्याहून ठरल्याप्रमाणें पत्र आलें नाहीं, म्हणून चौकशीला सुरवात करतील आणि शेवटीं आपणांस फसविलें असें पाहून पोलीसमध्यें वर्दी देतील तर त्यापांसून दोन तोटे आहेत. एक, आपणांस पुण्यांत कांहीं दिवस रहावयाचें आहे. तेव्हां इतक्यांतच पोलीसमध्यें आपणाविषयीं खबर जातां उपयोगी नाहीं आणि दुसरें, आपण आपल्या कामाकरितां ज्या थोरा मोठ्या

मनुष्याच्या नांवाचा उपयोग केला त्या सर विंचुरकरांचें नांव वर्तमानपत्रांत येईल. करितां तें देखील वाईटच आहे. म्हणून म्हणतों कीं, अशी कांहीं युक्ति काढा कीं, ज्यामुळें अप्पारावांना मात्र चांगला धडा मिळेल आणि ते फसल्याबद्दल जास्त वाच्यताहि करणार नाहींत."

रायाच्या भाषणाचा मंडळीनीं आपापल्या मतीप्रमाणें बराच विचार केला. कोणी कांहीं कोणी कांहीं, अशा अनेक सूचना केल्या, परंतु त्यापैकीं एक देखील मंडळींना पसंत पडली नाहीं. राजा म्हणाला, "आतां असं करूं या, आपण एक सविस्तर पत्र लिहून अप्पारावांला सर्व हकिगत कळवावी आणि त्यांचे चांगले कान उघडावे म्हणजे 'वधू पाहिजे' अशी जाहिरात ते पुनः कधींहि देणार नाहींत.

"हा तर अगदीं साधा प्रकार झाला!" राया म्हणाला, "यांत काहीं नाविन्य नाहीं. आतां माझा काय विचार झाला आहे तो सागतों. आणि तो जर पसंत पडला तर तसें करूं. नाहीं तर राजा तुझ्या म्हणण्याप्रमाणें अप्पारावांना एक पत्र लिहून ही भानगड मिटवून टाकूं."

सर्व मंडळी रायानें काय विचार केला आहे, तो ऐकण्याविषयीं अगदीं उत्सुक झाली. राया क्षणभरानें विचार करीत म्हणाला,

**थ्री चीअर्स!**

"माझी इच्छा अशी आहे; कीं प्रथम कोणी तरी जाऊन अकोल्याहून अप्पारावांना बोलाविलें आहे, असें पत्र पाठवावें आणि त्या पत्राप्रमाणें अप्पाराव अकोल्यास गेल्यानंतर त्यांची आणि सर विंचुरकर यांची भेट होईल, त्याच संधीला त्या दोघांना एकदम एकाच वेळीं पत्रें मिळतील, अशी दुसरी व्यवस्था करायची म्हणजे तेथें एक फार्स उडेल."

ही युक्ति सर्वोत्कृष्ट आहे. बापू म्हणाला, "ठरलं! ह्याचप्रमाणं करायचं!"

तावडतोब दौत लेखणी आणून पत्र लिहिण्यास सुरवात झाली. रायानें एका मागून एक अशीं तीन पत्रें लिहून टाकलीं. आणि तीं त्यानें मंडळींना वाचून दाखविलीं.

"शाबास! 'वेल डन्'! राया, हीं पत्रें जेव्हां ते दोघे एकत्र असतील त्या वेळीं जर बरोबर नेमकीं त्यांच्या हातांत पडतील तर अगदीं 'बाऊंडरी हीट' बसेल! आणि तो कसा बसेल सांगूं का?—हा पहा—" असें म्हणून राजानें आपल्या बाजूला बसलेल्या बापूच्या पाठीवर अगदीं जोरानें थाप मारिली! "हा पाहिलास! अस्सा बसेल."

" ओय् ! " म्हणून ओरडत बापू रागानें म्हणाला, " राजा, ही तुझी खोड अगदीं वाईट आहे. जेव्हां तेव्हां तू आपला ज्याच्या त्याच्या पाठीवर दणादण धोपे लगावितोस याचा अर्थ काय ? "

" याचा अर्थ आपलें खडाष्टकदर्शक हें प्रीतीचें चिन्ह ! " असें म्हणून राजानें बापूच्या गळ्याला मिठी मारली.

" बरं आतां सांग पाहूं—कोण कोण मंडळी अकोल्यास यावयास तयार आहे ? " रायानें विचारलें.

मी, मीं म्हणून प्रत्येकजण ' आम्हीं येतों ' असें म्हणूं लागला. शेवटीं रायानें त्यांचा वाद मिटविला. तो म्हणाला, " सर्वजण येऊन कसं चालेल ? मी, मनोहर आणि चाच्या इतकीच मंडळी पुष्कळ ! उगाच सर्वांनीं जाण्यात काहीं अर्थ नाहीं. तुमची सर्वांची जर इच्छा असेल तर ही पुण्याची मोहिम आटोपून आपण सर्व मंडळी एकदम थाटानें उत्तर हिंदुस्थानांत प्रवासाला जाऊं आणि दोन चार महिने सुप्रसिद्ध प्रेक्षणीय स्थळें पाहून मग पुनः आपल्या उद्योगाला लागूं ! "

" पसंत !—हा विचार—नव्हे हा ठराव आम्हीं मोठ्या आनंदानें सर्वानुमतें पास केला ! ' थ्री चीअर्स फॉर धी प्रेसिडेन्ट ' आणि ' स्पेशल थ्री चीअर्स फॉर राया ' ! " असें म्हणून बापू ' हुर्रे ' असें ओरडला. तोंच बाकीच्या मंडळींनीं त्याचें अनुकरण केलें. त्यांच्या ओरडण्यानें सर्व घर दणाणलें. रस्त्यानें जाणारे येणारे देखील क्षणभर उभे राहून वर पाहूं लागले.

**सुख्वर येथून जा.**

ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं राया, मनोहर आणि चाच्या अकोल्यास जाण्याकरिता निघाले. जाण्यापूर्वी रायानें सर्व मंडळींना हुशारीनें राहण्याविषयीं बजावून तो म्हणाला, " राजा, पुनः मंडळी एकत्र जमेपर्यंत येथील सर्व व्यवस्था तुझ्याकडे आहे. तूं आणि गोप्या विशेषकरून अप्पारावांच्या घराच्या बाजूला जाऊ नये अशी माझी इच्छा आहे. "

" ठीक आहे. त्याविषयीं तूं काळजी करूं नकोस. येथली सर्व व्यवस्था मजकडे ! ' नाऊ, आय ऍम् धी मॉनर्क ऑफ ऑल आय् सर्व्हे—"

रायानें त्याला जास्त बोलूं न देतां पुनः एकदां हुशारीनें राहण्याची सूचना देऊन ती मंडळी निघाली. त्यावेळीं सकाळचे नऊ वाजले होते. आमची मंडळी स्टेशनवर आली आणि गाडीची चौकशी करूं लागली. इतक्यांत

' थर्ड क्लास वेटिंगरूम ' च्या दरवाजाजवळ एक वृद्ध स्त्री बसलेली आणि तिच्याजवळ दरवाजांत वीस बावीस वर्षांचा, फॅशनेबल कपडे केलेला एक तरुण रायाच्या दृष्टीस पडला. त्याच्याकडे रायाचें इतकें लक्ष वेधण्याचें कारण तो तरुण मोठ्या ऐटीनें सिगारेट ओढीत असून बाजूला एक गरीब ब्राह्मण वेटिंगरूमच्या कठड्याजवळ उभा राहून त्याच्याजवळ भिक्षा मागत होता. त्या तरुणानें प्रथम त्या भिकाऱ्याकडे दुर्लक्षच केले. परंतु तो जेव्हां जास्त काकुळतीनें भिक्षा मागू लागला, तेव्हा त्या तरुण बहाद्दरानें त्या भिकाऱ्याला एकदोन शिव्या हासडून तेथून जाण्यास सांगितलें. तरी आशेने तो ब्राह्मण तेथेंच उभा राहिला. तें पाहून त्याने ब्राह्मणाच्या अंगावर काठी उगारली आणि " मुव्वर, जा म्हणून सांगितलं तरी उगाच डोकं उठवितो ! " अशीं मुक्ताफळें काढलीं. शेवटीं येथून कांहीं मिळत नाहीं असें पाहून बिचारा गरीब ब्राह्मण तेथून जाऊ लागला. तेव्हा राया पुढें झाला आणि त्यानें त्याच्या हातावर एक चवली ठेविली. तेव्हा तो ' ईश्वर तुमचें कल्याण करो ' असा आशीर्वाद देऊन निघून गेला.

**फ्याशनेबल तरूण.**

थोड्या वेळाने राया पुढें झाला आणि त्या फॅशनेबल तरुणाजवळ उभा राहिला आणि म्हणाला, " काय बुवा, ह्या भिकाऱ्यांनीं अगदीं सतावून सोडलें आहे. " " तें कांहीं विचारू नका. इतक्यातल्या इतक्यात मजजवळ दहा भिकारी येऊन गेले ह्या ×× ना उद्योग करायला काय होतं ? उठला सुटला कीं लागला भीक मागायला ! "

" आपणास कोणीकडे जावयाचं आहे ? " रायानें विचारलें.

" मी का ? " तो तरुण म्हणाला, " मला फार लांबचा प्रवास करावयाचा आहे. काशी, बनारस, मथुरा, आग्रा, दिल्ली असा सर्व उत्तर हिंदुस्थानचा प्रवास करण्याचा माझा विचार आहे. पण तें कसे साधेल तें साधो ! हें एक शुष्ककाष्ठ आहेना बरोबर ! " असें म्हणून त्यानें दरवाजाजवळ बसलेल्या म्हातारीकडे बोट दाखविलें.

" त्या कोण तुमच्या ? "

" माझी आजी—बापाची आई. तेवढीच एक राहिली आहे मागें ! "

" आणि दुसरी मंडळी ? "

" दुसर कोणी नाहीं. वडील आणि मातोश्री निवर्तल्या. आतां मी आणि

ही म्हातारी–ही देखील आली आहे संपुष्टांत. एकदां हिनें ' राम ' म्हटला म्हणजे आम्ही झालों मोकळे ! अहो, हीं म्हातारी खोडं हवींत कशाला ! ही घटके घटकेला आमच्यासारख्या तरुण मंडळीच्या मार्गाआड येतात. "

त्या फॅशनेबल तरुणाच्या एकदर बोलण्यावरून ही एक चांगली शिकार आहे असें रायाला वाटलें. त्यानें पुढें काय करावयाचें त्याचा क्षणभर स्वतःशीं विचार करून पुढला बेत सजविला. आणि त्या तरुणाकडे पहात आमचा नायक म्हणाला, " एका अर्थी बरं झालं मलाहि उत्तर हिंदुस्थानांत जावयाचं आहे. अनायासें तुमची सोबत मिळाली. अहो, प्रवासाच्या कामात अशी ओळख फार उपयोगी. पण तुम्ही आता कोठून जाणार ? "

" आता जाणार कल्याणला. आणि तेथून थेट दिल्ली आग्रा—"

" वाः तुम्ही देखील अगदीं माझ्या मनासारखाच प्रवास करण्याचं योजिलं आहे. "

" त्याला कारण आहे. " तो तरुण ऐटीनें म्हणाला, " प्रथम ह्या म्हातारीला काशीविश्वेश्वराचं दर्शन करवून तेथेंच उपाध्याकडे ठेवायची. तेथें ती राहिल महिना दोन महिने तोंपर्यंत मी सर्व उत्तर हिंदुस्थान फिरण्याचा केला आहे विचार. "

" ठीक ठीक ! फार चांगलं ! " असें म्हणून राया जाऊं लागला, " आलों हं मी ! जरा सामानाची व्यवस्था करून येतों. अजून एक तास आहे गाडीला ! " असें म्हणून चाञ्या आणि मनोहर उभे होते त्याच्याजवळ राया गेला आणि म्हणाला, " चाञ्या, तूं एकटा अकोल्यास जाऊन हें

**गाडींतील पहिली शिकार.**

पहिलें पत्र पोष्टांत टाक आणि तेथेंच एका खाणावळींत रहा. आप्पाराव येतील त्याच्या येण्याकडे लक्ष ठेव आणि मग हीं दोन पत्रें आपलं ठरल्याप्रमाणं कशीं तरी एकाच वेळीं त्याच्या हातात जातील असं कर. पण नीट हुशारीनं. मी काहीं आतां येत नाहीं. मला एक नवीन शिकार सापडली आहे. काय समजलास ? आणि तूं मनोहर आताच्या आता गाडी करून बिऱ्हाडीं जा आणि राजा, बापू, चिंतामण, श्रीधर आणि गोप्या यांना आतांच्या आतां थोडे बहुत प्रवासाचे कपडे घेऊन मला येथें किंवा कल्याणच्या स्टेशनावर येऊन एकामागून एक भेटा असें सांग जा, अगदीं पळत गाडीनें जा ! अद्यापि गाडी सुटण्यास एक तास आहे. आणि हें पहा, अगदीं नवीन ओळख झाली आहे

असंच त्यानीं मला भेटतांना वर्तन करावं असं त्यांना सांग. आणि राजाला शंभर रुपये बरोबर घेऊन येण्यास सांग.

वाचकहो ! ही नवी शिकार रायानें कशी पचविली तें पाहण्यापूर्वी; मोठ्या उत्कंठेनें आप्पाराव पत्राची वाट पहात बसले आहेत, त्यांची आपण खबर घेऊं आणि मग या नव्या शिकारीकडे वळूं.

तिसऱ्या दिवशीं सर बळवंतराव विंचुरकरांचें आप्पारावांना आमंत्रण आलें ते पत्र हातीं येताच आप्पारावांना अतिशय आनंद झाला. पत्रांतील मजकूर खालीं दिल्याप्रमाणें होता —

'न. वि. वि. चिरंजीव श्रीपत आणि इंदू येथें येऊन सुखरूप पोचली. सविस्तर हकीकत कळली. आपण हें पत्र पावतांच येथें येऊन आमचा पाहुणचार घ्यावा अशी आमची फार इच्छा आहे. आपण येथें आल्यावर लग्नमंडप कोठें घालावयाचा व तिथी कोणती पहावयाची याचा नक्की विचार ठरवूं. आपण येथे आल्यास आपणांस सकोच वाटण्याचें कारण नाहीं. कारण घर आपलेंच आहे. आपण सकाळीं गाडींत बसला तर गुरुवारीं अकोल्यास याल. त्याप्रमाणें स्टेशनावर मी आपणास आणण्या-करिता व्यवस्था करतो. गाडी चुकवूं नये. लोभ असावा ही विनति.

आपला,

**बळवंतराव विंचुरकर.'**

तावडतोब दुसऱ्या दिवशीं आप्पाराव अकोल्यास जाण्याकरितां निघाले. त्यांनीं बरोबर दाजिबाना घेतलें होतें. आपण आतां भावी श्वशुरगृहीं जाणार म्हणून आपल्या श्रीमंतीच्या वैभवानें युक्त होऊन स्वारी विशेष डामडौलानें निघाली होती.

**अकोल्यास आल्यावर**

आप्पाराव अकोल्याच्या स्टेशनावर उतरले, त्यावेळ सकाळचा प्रहर होता. श्वशुराच्या पत्राप्रमाणें ते गुरुवारींच तेथे पोंचले. स्टेशनवर आपणास नेण्याकरितां गाडी आली असेल असें त्यांना वाटलें. त्याप्रमाणे दाजिबाना पाठवून त्यांनीं स्टेशनच्या बाहेर चौकशी केली. परंतु गाडी किंवा मनुष्य कोणीच आलें नाहीं, असें त्यांना शोधाअंतीं कळलें, तें पाहून आप्पारावांना आश्चर्य वाटलें, शेवटीं स्वतः बाहेर चौकशी करून आप्पारावांनीं एक भाड्याचा टांगा केला. सर विंचुरकरांचा वाडा स्टेशनापासून बराच दूर होता

वाड्याच्या दरवाजाजवळ येईपर्यंत त्यांना दुपार झाली. अप्पाराव गाडींतून उतरले. तेव्हां कोणीतरी बडा पाहुणा आला आहे, असें पाहून देवडीवरील पहारेकरी पुढें झाला आणि रामराम करून बाजूला उभा राहिला.

" सर साहेब आहेत काय ? " अप्पारावांनीं विचारलें.

" आहेत् ! नुकतेच खाना खाया बसल्याती. " पहारेकऱ्यानें अदबीनें उत्तर दिलें.

त्याचें उत्तर ऐकून अप्पारावांना आश्चर्य वाटलें. आपण आज येणार हें माहिती असता त्यांनीं स्टेशनवर मनुष्य किंवा गाडी पाठविली नाहीं, किंवा आपण येईपर्यंत आपली वाट न पहातां सरसाहेब जेवायला बसले, तेव्हां हा काय प्रकार आहे, हें आप्पारावाच्या लक्षात येईना. कदाचित् त्यांचा दिवस चुकला असेल अशी मनाची समजूत करून आप्पाराव वाड्यात शिरले. तेथें सरसाहेबांच्या आश्रित मंडळींनीं पाहुण्यास उचित असें त्यांचें योग्य आदरातिथ्य करून त्याना माडीवरच्या दिवाणखान्यांत नेलें आणि त्यांचें नांव विचारलें. अप्पारावांनीं नांव सांगतांच एकजण सरसाहेबांना वर्दी देण्याकरितां आत गेला आणि थोड्या वेळानें ' सरसाहेब आतां जेऊन येतील. आपण बसा ' असा निरोप घेऊन आला.

कांहीं वेळानें सरसाहेब पोटावर हात फिरवीत दिवाणखान्यांत आले. त्यांचें वय पंचेचाळीस वर्षांचें असून देह बराच स्थूल होता.

**दोघांना दोन पत्रें.** त्यांनीं कल्लेदार मिशा राखल्यामुळें त्याचा चेहरा भव्य दिसत होता. नमस्कार चमत्कार झाल्यावर विडा चावीत सरसाहेब म्हणाले, " आपण पुण्याहून आला वाटतं ? "

" होय. "

" कां बरं ? कांहीं विशेष काम आहे कीं काय ? "

हा प्रश्न ऐकताच अप्पाराव सरसाहेबांच्या मुखाकडे पहात राहिले. आपण भावी जामात, आपणास त्यांनीं बोलाविलें आणि तेच आता असा प्रश्न करतात हें पाहून अप्पारावाना का बरें आश्चर्य वाटणार नाहीं ! अप्पाराव काहीं बोलत नाहीं, असें पाहून सरसाहेब पुढें म्हणाले, कां ! कांहीं काम असेल तर सागा ? संकोच नका धरूं ? पण उतरलांत कुठें ? स्टेशनावरून आलांत, ते येथेंच आलात कीं कुठें उतरलां आहांत ? "

आता मात्र अप्पाराव जास्तच गोंधळले ! आपले श्वशुर असें काय बोलतात

हेंच त्यांना कळेना ! क्षणभरानें ते म्हणाले, " मी स्टेशनावरून आलों तो थेट येथेंच आलों. पण आपले श्रीपतराव कुठें आहेत ? मघापासून ते येथें आलेच नाहींत ! "

" श्रीपतराव ! कोणते श्रीपतराव ? "

" आपले चिरंजीव. "

" माझे चिरंजीव !" आश्चर्यानें सरसाहेब म्हणाले, " माझे चिरंजीव आणि श्रीपतराव ? तुम्हाला कोणी सांगितल मला चिरंजीव आहे म्हणून ! "

ह्यावेळीं अप्पारावाचा चेहरा पहाण्यासारखा होता ! ते म्हणाले, " मग-मग -हें-हें-पत्र-" असें म्हणून ते आपल्या खिशातून पत्र काढूं लागले.

" अहो पत्र कसलं ? मला मुलगाच नाहीं तर तुम्हाला तो पत्र लिहील कोठून ? आणि पोटीं पुत्रसंतान नाहीं म्हणून तर मी रात्रंदिवस दुःखात आहे. "

" पण-पण हें पत्र तुमच्या सहीचं आहे. " पत्र पुढें करून आप्पाराव म्हणाले.

" माझ्या सहीचं ? काय म्हणता काय ? मी केव्हा तुम्हाला पत्र लिहिल पाहूं ?—" असें म्हणून सरसाहेबानीं, अप्पारावाच्या हातातून पत्र घेतलें. आणि संपूर्ण वाचलें. परंतु त्या पत्राचा त्यांना कांहींच बोध होईना. ते आश्चर्यचकित मुद्रेनें अप्पारावाच्या तोंडाकडे पाहू लागले. इतक्यात त्याच्या देवडीवरल्यानें दोन पत्रें आणून त्याच्यापुढें केलीं त्यापैकीं एका पत्रावर त्यांचें नांव होतें आणि दुसऱ्या पत्रावर अप्पारावाचें नाव होतें. सर साहेबानीं आप्पारावांच्या नांवाचें पत्र त्यांच्यापुढें केलें आणि स्वतःच्या नावाचें वर ' खासगी ' अशीं अक्षरें लिहिलेलें पत्र फोडले. त्या दोन्हीं पत्रांतील मजकूर वाचकांकरिता येथें मुद्दाम देतों.

' सन्माननीय सरसाहेब यासः—

न. वि. वि. वधूकरिता हपालेले हे एक गुडघ्याला बाशिंग बांधून सजण्यास तयार झालेले नवरदेव आपणाकडे

**झणझणीत** पाठविले आहेत. घरचे श्रीमंत आहेत, इनामदार

**अंजन घाला.** आहेत आणि सत्ताधीश आहेत. यांना गावात वधू मिळेना म्हणून यांनीं वर्तमानपत्रात ' वधू पाहिजे ' म्हणून जाहिरात दिली. जणुं काय वधू म्हणजे बाजारांत मिळणारी दीडदमडीची एक वस्तु आहे असेंच त्यांना वाटतें

म्हणून यांच्या डोळ्यात झणझणीत अंजन घालण्याकरिता आम्हाला हा उद्योग करावा लागला. आपणच त्याचे नीट कान उघडून 'वधू पाहिजे' अशी जाहिरात पुन्हा न देतां आपली आश्रित मंडळी जागोजाग पाठवून मुलीचा शोध करावा. आणि आपल्या कुलशीलाला साजेसी मुलगी पहावी असें शिकवा. आपण सूज्ञ आहांत तेव्हा श्रीमंत अप्पासाहेबांची योग्य कानउघडणी कराल हें निराळें सांगणें नकोच ! तसदी दिली त्याबद्दल क्षमा करावी. कळावें, लोभ असावा, बहुत काय लिहिणें ही विनंती.

आपला अपरिच्चित,

'क्ष.'

सरसाहेबानीं हें पत्र वाचताच सर्व गोष्टी त्याच्या लक्षात आल्या. त्यानीं ापणासमोर बसलेल्या अप्पारावांच्या चेहऱ्याकडे पाहिलें परतु काय ! ाप्पारावांचा चेहरा काळा ठिक्कर पडला होता.

"आतां मला ह्या सर्व भानगडीचा उलगडा झाला." पत्र पुढें करून ारसाहेब म्हणाले, "हें पत्र वाचा म्हणजे तुम्हालाच काय तें कळेल."

एखाद्या भ्रमिष्टासारखा हात पुढें करून अप्पारावानीं तें पत्र घेतलें आणि ाचण्यास सुरवात केली. पत्र वाचीत असताना त्यांचा हात लटलट कांपत ोता. वाचकहो ! आपले अप्पाराव तें पत्र वाचीत आहेत आहेत तोपर्यंत त्यांना ाय पत्र आलें तें आपण पाहूं—

'श्रीमंत अप्पासाहेब यास—

**यावरून धडा शिका.**

न. वि. वि. वर्तमानपत्रात 'वधू पाहिजे.' अशी जाहिरात देऊन कुलीन मुलींचे फोटो मागविणें म्हणजे केवळ अविवाहित मुलींची निव्वळ विटंबना करणें होय. परंतु हे खोल विचार तुमच्या सुधारकी डोक्यात यावयाचे नाहींत. कारण तुम्हाला स्वतःच्या कुलशीलाची चाड नाहीं. 'वधू पाहिजे' अशी वर्तमानपत्रांत जाहिरांत देण्यापर्यंत तुमची मजल आली त्यावरून तुम्हाला वधू मिळत नाहीं असें दिसतें आणि पर्यायें तुम्ही नामर्द 'वर' आहांत असें सिद्ध होतें. आतां तुम्हाला हा अगदीं धडा शिकविला आहे. त्यावरून धडा शिका आणि

दागिन्यांत झालेलें नुकसान हें केलेल्या चुकीच्या दंडाकरितां दिलें असें समजून स्वस्थ बसा. आता जास्त वाच्यता केलीत तर त्यांत तुमचीच फजिती होणार आहे हें आम्ही मुद्दाम सांगायला पाहिजे असें नाहीं. आपणांस आम्ही फार त्रास दिला परंतु आपल्या-सारख्या मूर्ख श्रीमंतांना शुद्धीवर आणण्याकरितां आम्हाला नाइलाजास्तव अशा आडमार्गानें जावें लागतें. असो. आतां झाली तितक्या फजीतींत समाधान मानून गप्प बसाल अशी आशा आहे. कळावें.

श्रीपतराव विचुरकर ' हें खोटें नांव
धारण केलेला ' क्ष.'

खरा प्रकार लक्षांत आल्यावर सरसाहेबांना आप्पारावाबद्दल फार वाईट वाटले. ते मृदुस्वरानें म्हणाले, " बरें आप्पासाहेब, आता झाल्या गोष्टीचा आपण जास्त विचार करूं नये हेच चागलें ! उठा आता तुमचें अद्यापि स्नान व्हायच असेल ना ? चला—एकदां जेवण होऊन तुमचे प्रवासाचे शीण दूर झाल्यावर मग आपण स्वस्थपणें ह्या गोष्टीचा विचार करूं. "

सरसाहेबांनीं एका नोकराला हाक मारून आप्पारावाच्या स्नानाची तयारी करविली. जेवण वगैरे झाल्यावर आप्पारावानीं प्रथमपासून घडलेली सर्व हकीकत क्रमाक्रमानें सरसाहेबाना सांगितली. त्यानीं देवडीवरील मनुष्याला बोलावून ' पत्रे कोणी आणून दिली ' त्याविषयीं चौकशी केली परंतु ' एका पोरानें आणून दिली आणि तो पोर चालता झाला ' ह्यापलीकडे पत्र देणाराचा त्यांना कांहीच पत्ता लागला नाहीं. पुढें दोन दिवस सरसाहेबांनीं आप्पारावास आपणाकडे पाहुणे म्हणून ठेवून घेतलें. आणि तिसऱ्या दिवशीं त्याची पुनः परत रवानगी केली.

जाहिरात दिल्याबद्दल आप्पाराव चांगलाच धडा शिकले ! असो. आतां आपण रायाकडे वळूं —

राया पुनः त्या फॅशनेबल तरुणाजवळ गोष्टी बोलत असतां हळुहळू त्याच्या पोटात शिरून त्यानें अवश्य तितकी माहिती मिळविली.

**निळकंठ गुणे.** त्याचें नांव निळकंठ गुणे असून तो घरचा चांगला सुखी होता. त्याचा बाप मुंबईतील एका प्रख्यात सॉलिसिटरचा मॅनेजिंग क्लार्क होता, त्यानें आपणाजवळ पंचवीस तीस हजारांची माया

केली होती. पहिल्या बायकोपासून त्याला कांहीं संतती झाली नाहीं. निळकंठ हा दुसऱ्या बायकोपासून झालेला एकुलता एक मुलगा. त्यामुळें बापाचा तो विशेष लाडका होता. तो वीस वर्षांचा होईपर्यंत रडत रडत त्याचीं इंग्रजी सहा पुस्तकें झालीं पुढें त्याची आई वारली. त्या वेळेपासून तो शाळेंत जाईनासा झाला मधून मधून बाप त्याला शाळेंत जाण्याविषयीं बोले परंतु तो गुणी बाळ त्याकडे लक्षच देत नसे. अशा रीतीनें एक वर्ष झालें, तो बापानें सर्व सत्ता व धनदौलत त्याच्या स्वाधीन करून आपली इहलोकींची यात्रा संपविली. आता घरांत वडील अशीं दोनच माणसें होतीं. पैकीं एक आजी व दुसरे मामा. परंतु ते मामाच होते. भाच्याने आपणास दिवसांतून दोनदां यथेच्छ खावयास घालावे म्हणून ते सदासर्वदा हात जोडून भाच्याची हाजी हांजी करीत असत.

डब्यात सर्व सामान बांकाखालीं व्यवस्थेनें ठेऊन राया आणि निळकंठ एका बाकावर बसले होते. बाजूला कोपऱ्यात खिडकीजवळ निळकंटरावाची आजी बसली होती. बिचारी म्हातारी स्वस्थ चित्तानें आपल्या नातवाच्या गोष्टी ऐकत होती. गाडी सुटण्याला अगदीं थोडा वेळ राहिला होता. इतक्यांत डब्याजवळ राजा चिंतामण आणि श्रीधर येऊन उभे राहिले. राजा डब्याचा दरवाजा उघडता उघडता म्हणाला, " हं, चढा चढा लवकर गाडी आतां सुटेल. अरे ती ट्रंक दे. अहो महाराज—" आत बसलेल्या रायाकडे पाहून तो पुढें म्हणाला, " जरा हात लावा हो !—अरे चढा—"

ते तिघेजण आत आले. राजाने दरवाजा बंद केला. गाडी चालू झाली. तेव्हा खिशातून रुमाल काढून तोंड पुशीत राजा म्हणाला, " मोठ्या मारा-कुटीनें गाडी मिळाली. नाहीं तर आमची मोठी फजिती झाली असती. अहो, हा लांबचा प्रवास करावयाचा असला म्हणजे अशा अडचणी यावयाच्याच !"

" आपणास कुठे जायच ? " रायाने विचारले. " आम्ही देखील फार लांबचा प्रवास करणार आहोंत ? "

" खरं कीं काय ? तुम्ही कुठें जाणार आहांत ? "

" आम्ही का ? आम्ही जाणार आहोंत उत्तर हिंदुस्थानात. "

" काय म्हणता ? वाः आमचाहि प्रवास त्याच बाजूला आहे. " राजा म्हणाला, " मग तर सोळा आणे आम्हाला सोबत झाली. आपण कांहीं व्यापाराकरिता जाणार कीं सहज चैनी खातर—"

" मी जात आहें काहीं कामाकरितां परंतु आमचे हे स्नेही जात आहेत तीर्थयात्रेला आपल्या आजीला घेऊन ! "

" असं अस ! मग आपण संगतीनेंच जाऊ म्हटल ! अहो, हा उत्तर हिंदुस्थानचा प्रवास फार कठीण बुवा ! दिल्लीचे सोदे आपणास ऐकून माहित असतीलच ! आपणासारख्या नवख्या प्रवाशाला ते हा हां म्हणतां नागवितात. म्हणून म्हटलं, आपण संगतीनें जाऊं. एकाला दोन असलां म्हणजे वेळीं अवेळीं एकमेकाचा उपयोग होतो. "

" खरी गोष्ट आहे. पण आपण किती लांब जाणार आहात ? "

" आपण व्यापार वगैरे करता कीं काय ? " रायानें मध्येच विचारिलें.

" होय. मी व्यापाराकरिताच जात आहें. कनोज कानपूरच्या सुगंधी मालाचा माझा मोठा व्यापार आहे. " असें म्हणून राजानें तत्काळ आपल्या कानांतील एक अत्तराचा फाया काढून तो पुढें केला, " आज तीन महिने झाले, हा फाया मी वापरतों आहें. "

रायानें फायाचा वास घेतला आणि आपल्या नूतन मित्राला तो दिला. तेव्हां नीलकंठ म्हणाला, " मला अत्तराचा शोक फार आहे. पण पुण्यात काहीं अत्तर चांगला मिळत नाहीं. "

आतां माझ्याजवळ जास्त नाहीं. पण मी आपणास माझी आठवण म्हणून चार सहा जातीचीं अत्तरं देईन. तीं तुम्हाला कैक वर्षेपर्यंत पुरतील. "

पुढें गाडी कल्याण स्टेशवर येईपर्यंत अशाच गोष्टी चालू होत्या. बोलतां बोलतां ' आपली कांहीं दुसरी मित्रमंडळी कल्याण स्टेशनवर येऊन आपणास भेटणार आहे ' असें राजानें बोलून दाखविलें. त्याप्रमाणें कल्याणास उतरल्यावर गोप्या आणि बापू त्यांना येऊन मिळाले. स्टेशनवर त्यांना फार वेळ मिळाला नाहीं. लवकरच वर जाणारी दिल्ली एक्सप्रेस आली. रायाच्या मंडळींना—आपल्या नूतन मित्रांना निळकंठरावानें त्यांचें सामान गाडींत ठेवण्यास मदत केली. त्या गडबडींत राजानें बरोबर आणलेले पैसे रायाच्या स्वाधीन केले. सर्व मडळी एका डब्यांत बसली. म्हातारीला एका कोपऱ्यांत जागा दिली. गाडी चालू झाल्यावर थोडा वेळ इकडल्या तिकडल्या गोष्टी झाल्यानंतर राजानें भाषणाला सुरवात केली.

" तुमचा हा पहिलाच प्रसग, आहे म्हणून म्हणतों जरा विशेष सावधगिरीनें रहा. "

" हं—त्यांत काय आहे ! " तुच्छतेनें निलकंठ म्हणाला, " तुम्ही सांगता परंतु मला ह्या प्रवासाचं काहीं मोठंसं वाटत नाहीं. अहो, आपण खंबीर असल्यावर कोण येणार आहे आपणास लुटण्यास ? "

**गाडींतील नकला.**

" लुटण्याची गोष्ट नाहीं. पण वेळ कांहीं सांगून येत नाहीं. अहो बोलता बोलता खाद्यावरच जरीकाठी उपरण आणि उशाखालचं बोचकं लाबवणारी मंडळी आहेत. नाहीं—असं कसं म्हणतां तुम्हाला अनुभव नाहीं म्हणून ! बाकी अनुभव आल्यावर तुम्ही देखील त्याच्या हातचलाखीचं आणि कौशल्याचं मोठं कौतुक करीत रहाल ? अहो, परवाची गोष्ट—आम्ही असेच गाडींत बसलों होतों. मी त्यावेळीं मुबईला जात होतो. डब्यांत माझ्या बाजूला एक गृहस्थ बसले होते. त्यानीं नुकताच एक बूट विकत घेतला होता. गाडींत बसल्यावर त्यांनी बूट काढून बाकाखाली ठेवला. आमच्यासमोर दुसरा एक गृहस्थ बसला होता. गाडी चालू झाल्यावर त्या गृहस्थाच्या गप्पा सुरू झाल्या. प्रथम त्यानें नाटकांतील काहीं नटाच्या नकला केल्या. नंतर प्रसिद्ध व्यक्तींच्या भाषणाच्या आणि आवाजाच्या हुबेहुब नकला करून दाखविल्या. अशा रीतीनें अर्धा तासपर्यंत त्यानें डब्यांतील प्रत्येक प्यासेंजरला अगदीं पोट धरून हांसवून सोडलें. नंतर पान वगैरे खाऊन झाल्यावर स्वारीनें पुनः आपल्या तोंडाला मोकळीक दिली. एकीकडे तो मंडळींना हांसवीत होता आणि एकीकडे आमच्या सर्वांच्या देखत त्या दुसऱ्या गृहस्थाचा बूट पायांत घालीत होता. पुढें दुसरें एक स्टेशन आल्यावर त्यानें बाजूला असलेल्या एका गृहस्थाची कोपऱ्यांत ठेवलेली बॅग उचलली. आणि सर्वांना नमस्कार करून राजरोसपणें स्वारी त्या स्टेशनवर उतरली. तो गेल्यावर डब्यातील मंडळी त्या मनुष्याच्या विनोदीपणाबद्दल आणि दाडग्या स्मरणशक्तीबद्दल प्रशंसा करीत होती. शेवटीं आमची गाडी मुंबईजवळ आली. तेव्हां माझ्या बाजूचा गृहस्थ बूट घालण्याकरितां बांकाखालीं बूट पाहू लागला. परतु बूट होते कुठें ! बुटाऐवजीं एक फाटका जोडा मात्र त्यांच्या दृष्टीस पडला. इतक्यांत ते दुसरे गृहस्थ आपली बॅग शोधूं लागले. परतु ब्याग जर डब्यात असेल तर त्यांना मिळणार ना ! नंतर मग त्या मनुष्याची त्यांना आठवण पडली पण करतात काय ! बसले दोघेहि हळहळत ! "

" एकूण डोळयांदेखत त्यानें डोळ्यांत धूळ फेंकली म्हणायची ! " बापूनें उद्गार काढले.

" फेंकली म्हणजे यांत संशय कीं काय ? " राजा म्हणाला, " तसंच परवां तापी व्हाली रेल्वेच्या एक्सप्रेसमध्ये एक गोष्ट झालेली माझ्या एका मित्रानें मला सांगितली. "

" कसली बरं ? " हांसत हांसत श्रीधरनें विचारलें, " कोणाची पगडी बिगडी पळविली वाटतं ? हो–आतां तुम्ही सांगितली गोष्ट बूट पळविल्याची; तेव्हां आतां ही असेल गोष्ट पगडी पळविल्याची ! "

" पगडीची काय कथा ! तो मनुष्य पगडी अन् बूट पळविणारा नव्हता."

" मग काय पळविलं ? "

" पळविलं नाहीं. तो पळून जाणारा लेचापेचा चोरहि नव्हता. त्यानें चोरी केली आणि साक्षीदार म्हणून आपण होऊन पुढें आला."

" काय म्हणता ? मग तर मोठा अट्टलच चोर असला पाहिजे. "

" यांत काय शंका ! "

" मग सागा तर काय हकीकत आहे ती त्याची ? "

" अहो ! ती हक़ीकत मोठी मजेदार आहे. तुम्ही ऐकाल तर आश्चर्यानें थक्क होऊन तोंडात बोटच घालाल ! पण कांहीं म्हणा तुम्ही निळकंठराव ! त्यांची जिज्ञासा वाढविण्याकरिता राजा भाषण वाढवीत म्हणाला, " ह्या आगगाडीच्या डब्यात एक एक असे सोदे असतात कीं, त्याची भामटेगिरी खरोखरीच वाखाणण्यासारखी असते. त्यांचं धोरण त्याची चलाखी आणि त्यांचं धाडस मनुष्याला अगदीं गुंग करून टाकतात. तुम्हाला असे प्रसग नाहींत म्हणून—"

**ठकांचे पुराण.**

" म्हणूनच तर तुम्हाला विचारतों." मध्येंच निळकंठराव म्हणाला, " पण तुम्ही कसले वस्ताद ! त्यानीं काय केलें तें सांगायचं सोडून त्यांच्या वर्णनाच पुराणच सुरू केलं आहे. "

अहो हें ठकांचं पुराणच !

" मग सागाना तें पुराण, आम्हीं करतों तें श्रवण ! " राया म्हणाला, " पुराण पुराण करून आमची जिज्ञासा मात्र वाढवितां ! "

" मग सांगतोंच तर ऐका —एकदां काय झालं, एका कंपार्टमेंटमध्यें तीन प्यासेंजर बसले होते. ती सुरतेला जाणारी गाडी होती. पुढल्या एका स्टेश-

नावर त्या डब्यांत आणखी पांच उतारू आले. हे पांचहि जण भामटे होते. डब्यांत आल्यावर त्यांनीं आपली शिकार नीट न्याहाळून पाहिली. त्या पहिल्या तीन प्यासेंजरांत एक गुजराथी गृहस्थ होता. त्याच्याजवळ एक गाठोडें होतें. त्या गाठोड्याला मांडीवर घेऊन जरा व्यवस्थेनें आणि सावधगिरीनें तो गृहस्थ बसला होता. ही गोष्ट त्या भामट्यांच्या लक्षांत आली आणि त्यानीं जाणलं कीं, ह्या गाठोड्यांत खात्रीनें कांहीं तरी ऐवज असला पाहिजे. "

" पण खरंच होता का त्यांत काहीं ऐवज ? " निळकंठरावानें मध्येच विचारलें. "

**अरे ! मारा बापरे !**

" होय तर ! फडक्याच्या सत्रा गांठींत बांधून ठेवलेले त्यात हजार दीड हजाराचे दागिने होते. ते घेऊन तो गांवीं—जात होता. पुढें दोन चार स्टेशनें गेल्यावर तें गाठोडं उशाखालीं घेऊन तो म्हातारा बाकावर पाय लांब करून पडला. त्याचं डोकं दरवाजाजवळ होतं. थोड्या वेळानें त्याला झोंप येऊं लागली. इकडे त्या चोरानीं पुढं काय करायचं तें सर्व नेत्रपल्लवी भाषेनें परस्परांत ठरविले आणि पुढले स्टेशन जसें अगदी जवळ आलें म्हणजे गाडी उभी राहण्याच्या बेतात आलीं, तेव्हां त्यापैकीं एकानें कोणाचें लक्ष नाहीं असें पाहून त्या म्हाताऱ्याच्या माडीला एकदम जोरानें टाचणी भोसकली. त्याबरोबर ' अरे ! मारा बापरे ! असें मोठ्यानें ओरडून तो म्हातारा ताड्कन् उठून बसला. इतक्यांत एकानें हळूच तें गाठोडें काखेत मारलं आणि दरवाजा उघडून बाहेरचा रस्ता धरला. इकडे त्याचे साथीदार ' अरेरे ! तें गेलं—तें गेलं—ती ट्रंक काढ—' असें म्हणून बाकेखालीं ठेवलेल्या दुसऱ्या प्यासेंजरची ट्रंक आणि बोचकीं मोठ्या धांदलीनें बाहेर काढूं लागले. हा प्रकार होत असता ' हा काय प्रकार आहे ? ' हें जाणण्याकडे सर्वांचें लक्ष वेधलें. इतक्यांत एकानें विचारलें " काय काका, तुमच्या चावलं काय ? " " हां—हे बघा, रगत आयवा—" हा इतका प्रकार होईपर्यंत पुनः गाडी चालू झाली इकडे या मंडळींची धडपड आणि शोधाशोध चालूच होती. शेवटीं ' गेलं बुवा—कुठं नाहींसं झालं ! " असें म्हणून ती मंडळी पुनः हुश्य हुश्य करीत बसली. क्षणभरानें त्या म्हाताऱ्यानें मागें वळून पाहिलें तों काय ? गाठोडें गेलं ! "

" अगदीं बेमालूम रीतीनें फसविलं बिचाऱ्याला ! "

अहो, पुढें तर ऐका—आपलं गाठोडं गेलं हें त्याच्या लक्षांत येताच त्या म्हाताऱ्यानें छाती बडविण्यास सुरवात केली. तेव्हां ती मडळी त्याची समजूत करूं लागली ! एकजण म्हणाला, " काका, तुम्ही भिऊं नका. आपण पुढल्या स्टेशनवर उतरून मागच्या स्टेशनवर तार करूं म्हणजे रेल्वेपोलिस त्या बदमाष चोराला अचुक पकडतील." अशी त्या म्हाताऱ्याची कशीबशी समजूत करून ती मंडळी आणि तो म्हातारा पुढल्या स्टेशनवर उतरले. ते पाहून पुढल्या डब्यातून एक मनुष्य उतरला. हाच तो म्हाताऱ्याचं गाठोडं पळविणारा चोर ! पण म्हाताऱ्याला कांहीं त्याला ओळखतां आलें नाहीं. नंतर यानीं तार केली पण उत्तर काय येणार ?—चोरच जर त्यांच्याजवळ तर तेकडे रेल्वे पोलिसाला चोराचा पत्ता कोठून लागणार ? "

" आहेत खरे बुवा हे चोर ! "

इतक्या गप्पा होईपर्यंत सात आठ स्टेशनांचा प्रवास झाला. नंतर सर्व मडळीनीं एका जक्शन स्टेशनावर चहा घेतला आणि पुनः राजाच्या गप्पांना सुरवात झाली. तो म्हणाला, " नीळकंठराव, आपण लहानपणीं एक कविता पाठ केली आहे ती तुम्हाला आठवत असेलच ! "

" कोठली कविता ? "

" केल्यानें देशाटन, पण्डित मैत्री सभेंत—"

" हो हो—चांगली आठवते. "

" त्या कवितेची सत्यता, असं देशाटन केल्यानें अनुभवाला येते. अहो, मनुष्यावर प्रसंग आल्याशिवाय अनुभव येत नाहींत. आतां हेंच पहा, ह्या ठकांच्या गोष्टीपासून आपण किती चातुर्य शिकतो आणि आपणांस किती अनमोल धडा मिळतो ! " मोठ्या आढ्यतेनें राया बोलत होता, " रेल्वेंतील चोर असे बिलंदार असतात. कीं, कांहीं विचारूं नका. एखाद्या उतारूचा एखादा बोलका शब्द त्यांच्या कानावर पडण्याची खोटी कीं, तात्काळ धोरण बांधून यांनीं त्या उतारूला नागविलंच म्हणून समजावें—तुम्हीं कांहीं म्हणा नीळकंठराव, पण मी तर हें एक कसब आहे असें समजतों. चालत्या गाडींत एखाद्याच्या डोळ्यांत धूळ फेंकणें म्हणजे कांहीं लहान सहान काम नव्हे. साधलं तर ठीक नाहीं तर हातकड्या पडायच्या हातांत !

" असं तर खरंच ! " बापू म्हणाला, " परवां मला एका गृहस्थानें ह्या रेल्वेतील चोराची एक गोष्ट सांगितली. ती ऐकून मी तर थक्क झालों.

" कोठली गोष्ट ? आम्हाला तरी सांगा ! " निळकंठराव म्हणाला.

" कांहीं दिवसांपूर्वी रात्रीं ग्रँटरोडच्या स्टेशनावर सुरत प्यासेंजर उभी होती. त्या गाडींतील एका डब्याच्या खिडकीजवळ एक गृहस्थ बसला होता. वयानें होता तीस पस्तीस वर्षांचा. आणि प्लॅटफॉर्मवर त्या डब्याला धरून दुसरा एक गृहस्थ त्याच्या बरोबर बोलत उभा होता. दोघेहि जातीनें बनिया होते.

**पाकिट अंदरना गजवामां मुकजो.**

थोड्या वेळानें घंटा वाजून गाडी चालू लागली. तेव्हां डब्यात बसलेल्या मनुष्यानें बाहेर उभा असलेल्या मनुष्याचा निरोप घेतला. त्यावेळीं प्लॅटफॉर्मवर दुसरा एक मनुष्य उभा होता. हा मनुष्य रेल्वेंतील चोर असून एखादी शिकार सापडेल ह्या उद्देशानें तेथें टेहळणी करीत इकडून तिकडे फिरत होता. इतक्यांत त्या प्लॅटफॉर्मवर उभा असलेल्या मनुष्यानें गाडींत बसलेल्या मनुष्याला निरोप देऊन ' संभाळीने ज्यजो—पाकिट अंदरना गजवामा मुकजो—सौदो ठरशे त्यारे तार करजो, भुलतो ना ! ' असे शब्द उच्चारिले. इतके शब्द कानीं पडतांच त्या चोरानें एकदा गाडींत बसलेल्या मनुष्याकडे पाहिलें. आणि चटकन् त्या चालत्या गाडींत त्याच डब्यांत तो चढला. अशा रीतीनें वेगांत आलेल्या गाडींत चढल्यामुळें डब्यांत बसलेल्या सर्व उतारूंचें लक्ष त्याच्याकडे वेधलें. क्षणभरानें हुश्श हुश्श करीत खिडकीजवळ बसलेल्या त्या गृहस्थाच्या शेजारीं बसला. परंतु त्याच्या अंगाची सारखी चळवळ सुरू होती ती गाडी रखडत जाणारी असल्यामुळें वादऱ्याचें स्टेशन सोडल्यावर डब्यांतील उतारू बांकावर झोंपण्याची सोई पाहूं लागले. खिडकीजवळ बसलेल्या गृहस्थानें कांहीं वेळानें खिडकीच्या तावदानावर आपलें डोकें टेकलें. त्यावेळीं गोरेगाव आणि मालाड ह्या स्टेशनाच्या दरम्यांत गाडी चालत होती. पुढें कांहींवेळ वाट पाहून त्या चोरानें आपला रुमाल बाहेर काढला आणि आंतल्या खिशांतून एक लहानशी बाटली काढून तींतील दोन चार थेंब त्या रुमालावर ओतले. नंतर तो रुमाल त्यानें हळूच खिडकीजवळ बसलेल्या गृहस्थाच्या खांद्यावर टाकला—"

"त्या रुमालावर त्यानें कसले थेंब टाकले ? " निळकंठानें मध्येंच विचारलें.

" तें क्लोरोफॉर्मसारखें गुंगी येण्याचें औषध होतें. "

" पण तो रुमाल त्यानें त्या मनुष्याच्या खांद्यावर टाकला, तेव्हां कोणी पाहिलं नाहीं ? " श्रीधरनें विचारलें.

" हीच तर त्याची चलाखी ! इतर उतारू डुलक्या घेतात असें पाहून त्यानें हा सर्व विधि केला. पुढें थोडा वेळ गेल्यावर

**पवन आवे छे !** त्याने एकदा हळूच त्या गृहस्थाला धक्की दिली. परंतु त्यानें कांहींच हालचाल केली नाहीं. त्याच्यावर त्या औषधाचा परिणाम झाला कारण खिडकींतून आंत येणारा वारा त्या रुमालावरून वहात होता. आणि श्वासोच्छ्वासाबरोबर त्या औषधाचा वास त्या मनुष्याच्या पोटांत जात होता. अशा रीतीनें कांहीं वेळ गेल्यानंतर त्या मनुष्यावर औषधाचा पूर्ण परिणाम झाला किंवा नाहीं याची खात्री करून घेण्याकरितां त्या चोरानें त्याला एक दोनदा जोरानें धक्की देऊन पाहिली परंतु तो मनुष्य जागा झाला नाहीं. तेव्हां तो मनुष्य उठला आणि खिडकी बंद करण्याच्या उद्देशानें उजवा हात त्यानें पुढे केला. त्या वेळीं बाजूच्या बाकावर बसलेला, डुलक्या घेत असलेला एक उतारू साधारण जागा होऊन त्याच्याकडे पाहूं लागला. तेव्हा चोर म्हणाला, ' पवन बहु आवे छे ! ' अशा रीतीनें खिडकी बंद करण्यास योग्य सबब पुढें करतांच त्या दुसऱ्या मनुष्याला संशयाला जागाच उरली नाहीं. त्यानें आपलें तोंड फिरविलें आणि डोळे मिटून पाठीमागच्या फळीवर डोकें टेकलें. इकडे या चोरानें उजव्या हातानें खिडकी एकदोनदां वर खालीं केली आणि तितक्या अवधींत डावा हात हळूंच त्या मनुष्याच्या जाकिटाच्या खिशात घातला. तेथें त्याच्या हाताला पैशाचें पाकीट लागलें. तें त्यानें बेमालूम रीतीनें बाहेर काढलें—"

" पण त्यांत कांहीं होतं कां ? " उत्कंठेनें निळकंठानें विचारलें.

" होतं का म्हणजे ? त्यात बराच—हजार दीड हजार रुपयाचा ऐवज होता. कारण त्या पाकिटाच्या एका कप्प्यांत तीन हिऱ्याच्या आंगठ्या होत्या व दहा दहा रुपयांच्या चार नोटा होत्या. "

" मग त्यानें पुढें काय केलं ? "

" पुढें काय करायचं ! पुढें पालघरचें स्टेशन आल्यावर त्या चोरानें त्या मनुष्याच्या खांद्यावर टाकलेला आपला रुमाल घेऊन दरवाजा उघडला आणि हळूच दुसऱ्या डब्यांत जाऊन स्वारी बसली !

बापूनें सांगितलेली चोराची हकीकत ऐकून कांहीं वेळपर्यंत त्याच गोष्टीचा मंडळींत खल चालला होता. परंतु तितक्या अवकाशांत

**नेत्र संकेत.** एका बाजूला बसलेल्या रायानें समोर बसलेल्या राजाला नेत्रसंकेत केला. पुढें बराच वेळ त्यांच्या खुणा होत

होत्या. परंतु ती त्यांची नेत्रपल्लवी भाषा कोणाला समजण्यासारखी नव्हती किंवा कोणाच्या लक्षांतहि आली नाहीं. क्षणभरानें राजा निळकंठरावाकडे वळून म्हणाला, "निळकंठराव, हें रेल्वेंतील चोराचें पुराण तुम्ही जितकं ऐकाल तितकं थोडंच आहे. ह्या चोराची एक एक कृति ऐकावी तेवढी थोडीच! त्यांचं धाडस इतकं काहीं विलक्षण असतं कीं, आपली अक्कल गुंग होऊन जाते, मति कुंठित होऊन जाते—"

"अशी तर गोष्ट खरी! ह्या गोष्टी आपणास ऐकतांना मौज वाटते पण ज्या बिचाऱ्यावर ह्या चोरांची वांकडी नजर होत असेल, त्याची काय स्थिति होत असेल!" बापू म्हणाला.

"पण मी म्हणतों," मध्येंच निळकंठ म्हणाला, "अशा मंडळींनी प्रवास करतांना विशेष सावधगिरी ठेवावी."

"प्रवासात ही गोष्ट तर कधींच शक्य नाहीं." राजानें उत्तर दिलें. "अहो, आतां तुम्ही असं पहा, एखाद्याला फार दूरचा प्रवास करावयाचा आहे.' आणि त्यानें आपणाकडून शक्य ती काळजी घेतली आहे. म्हणजे ती अशी–आपली चीजवस्त ट्रंक, बोचकं कपडे इत्यादि वस्तु त्यानें अगदीं व्यवस्थेनें आपणाजवळ घेतल्या आहेत. आणि झोपायचं नाहीं असाहि त्यानें निश्चय केला. त्याप्रमाणें प्रवासाची पहिली रात्र तो वागेल. परंतु असं किती वेळ चालणार? एक तर एकाच डब्यात एकाच जागेवर बसून बसून जीव कटाळतो. आणि शेवटीं मनुष्य-प्राण्याला ज्या नैसर्गिक अवस्था प्राप्त व्हावयाच्या असतात त्या त्याला टाळता येत नाहींत. कारण एकदा कां त्याच्यावर झोंपेचा अंमल सुरू झाला म्हणजे मग त्याची सर्व सावधगिरी कुठल्या कुठें नाहींशी होते. आणि मग स्वारी लागते डुलक्या घ्यावयाला. कारण विश्राति ही सर्वांना अत्यंत आवश्यक आहे हें तुम्हीं देखील कबुल कराल. आतां आपण घरीं मऊ बिछान्यावर जी झोंप घेतों, त्या झोपेंत आणि गाडींत आपणास जी झोप लागते, त्या झोपेंत जमिन-अस्मानाचा फरक आहे. घरीं झोंपलों असतां किंचित् आवाज होतांच किंवा आपल्या अंगाला थोडासा स्पर्श होतांच आपण जागे होतों, इतकी आपली ती झोंप सावध असते. परंतु गाडींतील झोंप म्हणजे केवळ कुंभकर्णी झोंप होय! कारण गाडीचे धक्के बसत आहेत, इकडे एकसारखा चाकांचा खडखडाट चालू आहेच. शिवाय अपुऱ्या जागेमुळें जसे बसलों असतों त्याच

**प्रवाशांची झोंप.**

स्थितींत किंचित् मान कलती करून किंवा मागच्या खिडकीवर डोकें टेकून झोंप घेण्याचा प्रयत्न करतों, त्यामुळें वेळोवेळीं झोपेंत व्यत्यय येऊन झोंप येत असतांहि मान दुखूं लागते म्हणून पुनः जागें व्हावें लागतें, अशामुळें उलट झोपेवर ताण बसून जर एखाद्याला थोडीशी बाकावर झोपण्यापुरती जागा मिळाली कीं, कांहीं विचारूं नका ! मग मोठा आवाज झाला तरी तो त्याला ऐकूं येत नाहीं, कारण गाडीचा खडखडाट सारखा चालूच असतो, त्यामुळे तो आवाज सहवासांतला होऊन त्याचा मनावर परिणाम होत नाहीं. त्याचप्रमाणें गाडीचे धक्के बसत असता एखाद्यानें त्याला धक्का दिला, तरी त्यायोगे तो जागा होत नाहीं. अशा स्थितींत जर त्या डब्यांत तुमच्या माझ्यासारखा एखादा रेल्वेचोर असला तर त्याला त्या मनुष्याची ट्रंक उघडण्यास काय हरकत आहे ?—"

"हरकत नाहीं म्हणा ! पण—" निळकठ हासत हासत म्हणाला, "तुम्ही आम्ही रेल्वेंतील चोर होऊं तेव्हाच्या ह्या गोष्टी आहेत."

"तें तर झालंच हो ! पण आपली एक ओघाला आलेली गोष्ट सांगितली."

**दिसण्यांत सभ्य !**

राजा म्हणाला, "अहो, एखादा तुमच्यासारखा चांगला सभ्य दिसणारा गृहस्थ एका डब्यांत शिरला. डबा तर उतारूंनीं अगदीं गच्च भरला होता. 'ह्या डब्यात जागा नाहीं, तुम्हीं येऊं नका' असं डब्यांतील माणसं त्याला सागत होतीं पण 'महाराज, मी उभा राहीन, मला जवळच जावयाचं आहे' असें सांगून तो डब्यांत तर घुसला आणि प्रथम काहीं वेळ दरवाजाजवळ उभा राहिला. त्यावेळीं रात्रीचे नऊ वाजले होते. डब्यांतील अर्धे अधिक उतारू डुलक्या घेत होते. डब्यांत चढलेला मनुष्य डब्यांत गर्दी आहे असें पाहूनच चढला होता. तेव्हा 'मला बसण्यायरितां थोडी जागा द्या' असें म्हणण्यास त्याला तोंड नव्हतें, व बाकावर बसण्याची त्याची इच्छाहि नव्हती. बराच वेळ उभें राहिल्यावर तो मनुष्य बांकाच्यामध्यें बसला आणि हळुहळू त्यानें आपलें उपरणें, एका बांकाच्या खालीं असलेली एका उतारूची ट्रंक आणि बोचकें बाजूला सारून तेथें पसरलें. नंतर त्यानें बांकावर बसलेल्या एका उतारूनें खाली सोडलेले पाय जरा वर घेण्यास सांगून 'महाराज, स्टेशन आल्यावर मला उठवाल काय ? दोन वाजतां उठविलं तरी चालेल !' अशी त्याला विनंति केली आणि बांकाखालीं पसरलेल्या उपरण्यावर झोंपण्याच्या निमित्तानें अंग

टाकलें. निळकंठराव, हा मनुष्य झोंपला असेल असं तुम्हांला वाटतं काय ? ”

“ नाहीं. हा मनुष्य बहुतकरून रेल्वेचोर असावा आणि कांहीं तरी लग्गा साधावा म्हणूनच तो या डब्यांत चढला असावा. ”

“ होय. त्यांचा उद्देश तोच होता. ” राजा पुढें म्हणाला, प्रथम अर्धा तासपर्यंत तो अगदीं मुकाट्यानें झोंपेच्या मिषानें पडला होता. नंतर त्याची हालचाल सुरू झाली. त्यानें हळूच डोळे उघडून बांकावर बसलेल्या उतारूंकडे पाहिलें.

**कृति चोराची !**

त्यावेळीं बहुतेक सर्वजण पेंगत होते. एक दोन उतारूंना चागलीच झोंप लागली होती; असें पाहून आतां आपला प्रयोग करण्यास आपणास हरकत नाही, अशी खात्री होताच त्यानें अंगाखालीं अंथरलेलें उपरणें काढून डोक्यावरून पायांपर्यंत पांघरूण घेतलें. परंतु असें करतांना बाजूला असलेली दुसऱ्या उतारूची ट्रंक देखील त्या उपरण्याखालीं झाकून घेतली आणि दोन्ही पाय जवळ केले. त्यामुळें अंगावर घेतलेल्या उपरण्यांत पोटाच्या बाजूला पोकळी झाली. मग त्यानें खिशांतून एक बारीक हुक आणि दाते असलेली एक सळी, अशीं हत्यारें बाहेर काढिलीं. त्या हत्याराच्या सहाय्यानें त्याने पांच मिनिटाच्या आत त्या ट्रंकचें कुलूप उघडलें. त्यावेळीं जी कांहीं खडबड झाली, तो सर्व आवाज गाडीच्या खडखडाटांत लपून गेला. नंतर त्यानें ट्रंकचें झाकण किंचित् उघडून आंत हात घातला व आतील सामानाचें परिक्षण सुरू केलें. हात घालतांच वर सांखळीसह घड्याळ आणि पाकिट त्याच्या हाताला लागलें. हे जिन्नस त्या ट्रंकच्या मालकानें गाडींत बसल्यावर खिशांतून काढून ट्रंकमध्यें ठेविले होते. नंतर त्याच्या हाताला घडी केलेला जरीचा रुमाल लागला. तोहि त्यानें हळूच बाहेर काढला आणि पुनः हात आत घातला. ह्या खेपेस त्याच्या हाताला ट्रंकच्या एका कोपऱ्यात एक लहानसा पितळेचा डबा लागला. तो देखील बाहेर काढला. नंतर हळूच बोचकें सोडून त्यांत लांबविण्यासारखें कांहीं आहे काय तें पाहिलें, परंतु त्यात विशेष कांहीं न मिळतां फक्त नुकतींच विकत घेतलेलीं दोन रेशमीकाठी लुगडीं मिळालीं. हे सर्व जिन्नस त्यानें मोठ्या चातुर्यानें आपल्या उपरण्याच्या एका पदरांत गुंडाळून तें आपल्या उशाखालीं घातलें. ”

“ पण त्याला इतके जिन्नस नेतां कसे आले ? ” मध्येंच रायानें विचारलें.

“ तेंच तर त्याचें चातुर्य ? ” राजा म्हणाला, “ पुढें तर ऐका म्हणजे

**जिन्नस लांबविले.** तुमच्या लक्षात येईल. यात प्रशंसा करावयाची म्हणजे त्याच्या चातुर्याचीच ! मग तो मनुष्य बराच वेळ तसाच पडून राहिला आणि एका स्टेशनवर गाडी उभी राहताच ती स्वारी गडबडीने उठून " अरेरे ! झोप लागली – काय कराव, उठतो— नाही तर फजिती होती. ! ' अशी बडबड करीत मोठ्या धादलीने उपरण्यांत गुडाळलेल्या जिनसा त्या उपरण्यासह काखेत मारिल्या आणि धडपडत स्वारी खाली उतरली. "

शाबास. आहे खरी बुवा चलाखी ! निळकंठ म्हणाला. " पण एकदर किती रुपयाचा ऐवज त्याला मिळाला ? "

" ऐवज बराच मिळाला. कारण ज्या ट्रंकमधून त्याने जिन्नस काढले होते ती ट्रंक एका सोनाराची होती. कारण त्या चोराने लांबविलेल्या पितळेच्या डब्यात काही सोन्याचे तुकडे, तारा, मुटी मोत्ये, नथींतील माणके, माथ्यातील गुलाबाच्या फुलाचे ठसे उमटविलेले सोन्याचे पत्रे मिळून शेदीडशे रुपयाचा ऐवज असून घड्याळ आणि साखळी मिळून आठ दहा रुपये, पाकिटात सात आठ रुपये, लुगडी, चोवीस पचवीस रुपये, वीस बावीस रुपयाचा जरीचा रुमाल असे मिळून दोनशे सव्वा दोनशे रुपयाचा माल त्याने लांबविला. "

इतके सभाषण होईपर्यंत एका मोठ्या स्टेशनवर गाडी उभी राहिली. तेव्हां मंडळीने कांहीं फळफळावळ, चहा, चिवडा इत्यादि पदार्थ खरेदी केले, आणि न्याहारीला सुरवात केली. आमच्या राजाचे तोंड अद्यापि चालूच होते-

" निळकंठराव, तुम्हाला मी ह्या दोन चार गोष्टी सांगितल्या यावरून तुम्हाला काय वाटते ? "

" मी आता खात्रीने सांगतो की, असा कोणी रेल्वेचोर माझ्या डब्यात आला तर मी त्याला खात्रीने ओळखून काढीन. "

" अहो, महाराज, त्या गोष्टी राहू द्या ! अद्यापि प्रसंग आला नाहीं, तोंपर्यंतच ह्या गोष्टी ! म्हणतात ना — नाहीं देखिला हरी तोंवरी जंबुक गर्जना करी ! "

हे राजाचें भाषण ऐकून निळकंठ एकदम खजील झाला. त्याचा उतरलेला चेहरा पाहून राजाला देखील किंचित् वाईट वाटलें व आपली चुकी दुरुस्त करण्याच्या उद्देशानें तो पुढें म्हणाला

**मीच चोर** "निळकंठराव, मी बोललो त्याचें तुम्हांला वाईट वाटण्याचे कारण नाहीं. अहो, आता असं पहा-मीच एखादा रेल्वेचोर नसेल कशावरून.

" छे ! छे ! असं काय तुम्ही भलतच बोलतां ? " निळकंठ म्हणाला, " अहो तुम्हाला जर कोणी चोर म्हटल तर मग आम्हाला देखील सहज कोणी चोर म्हणून म्हणेल ! "

" म्हणेल तर खरच ! कारण आजकाल रेल्वेचोरांचा धंदा करणारे, तुमच्या आमच्यासारखे सभ्य चालीचा पोषाख करणारेच असतात. हा हा म्हणता आपल्या डोळ्यात धूळ फेकतात आणि आपणास थक्क करून सोडतात. इतकच नव्हे तर, करून सवरून पुनः साक्षीदार म्हणून तयार ! मी तर एकदा अशी गोष्ट पाहिली आहे कीं, एकच मनुष्य दोनदा एकाच डब्यात शिरून चोरी करतो परतु ते कोणाच्याहि लक्षात येत नाही.

" काय म्हणता ? " आश्चर्याने बापूनें विचारले, " पण कायहो, अशी गोष्ट समजनीय तरी आहे काय ? एक मनुष्य एकाच डब्यात दोनदा शिरतो व चोरी करतो म्हणजे आश्चर्यच म्हणायचें ! "

" त्यात आश्चर्य कसल ! "

" आश्चर्य नाही तर काय ? जोपर्यंत तुम्हाला त्या चोरानें केलेली कृति समजली नाहीं तोपर्यंत आश्चर्यच म्हणायचें ! "

" मग ऐका तर त्याने केलेली कृति—" असें म्हणून राजा पुढे बोलूं लागला, " खाडव्याचा एक कापसाचा व्यापारी दिडशें

**मांडीखालील ऐवज लांबविला**

कापसाचे गठ्ठे घेऊन मुंबईत गेला होता. तेथें ते त्यानें सर्व विकले. त्याची पंधरा हजार रुपये किंमत आली. त्यातील शंभर शभराच्या नोटा त्यानें आपल्या खिशांतील पाकिटात ठेवल्या होत्या आणि सुटे काही रुपये, पाच दहाच्या नोटा असे एकदर तीन हजार रुपये रुमालात बांधून ते आपल्या उपरण्यात गुंडाळून आपल्या मांडीखालीं त्यानें ठेविले होते. हें सर्व दोन रेल्वे चोरानीं पाहिलें होते. आता हे पैसे आपल्या खिशात कसे उतरतील याविषयीं बेत करून ते दोघे चोर त्याच गाडींत दुसऱ्या एका डब्यात चढले आणि सध्याकाळ होण्याची वाट पाहू लागले. पुढे मनमाडचें स्टेशन येईपर्यंत काळोख पडला. तेव्हां त्यापैकी एकजण चोर, तो कापसाचा व्यापारी बसला होता त्या डब्यात शिरला आणि त्याच्याजवळच बसला. पुढे थोड्या वेळानें " आपणास कुठे जावयाचें ? आपण काय उद्योग करता ? " इत्यादि प्रश्न झाल्यावर त्या चोरानें आपला रुमाल आणि उपरणें बाजूला, ज्या मांडीखालीं त्या व्यापाऱ्यानें आपला ऐवज

उपरण्यात गुंडाळून ठेविला होता, तेथें ठेविलें आणि आपली चची बाहेर काढिली. दोघानीं पानसुपारी खाल्ली. इतक्या अवधींत गाडी पुढल्या स्टेशनवर उभी राहिली तेव्हां बोलतां बोलता त्या चोरानें तंबाखूची पिचकी खिडकींतून बाहेर टाकिली. तेथे दरवाजाजवळ प्लॅटफॉर्मवर एक मनुष्य उभा होता. त्याच्या अंगावर ती पिचकी पडली. त्याबरोबर त्यानें एक शिवी देऊन खिडकींतून आत हात घातला आणि आत बसलेल्या त्या मनुष्यास मारण्याचा तो प्रयत्न करू लागला. तेव्हा डब्यांत एकच गोंधळ उडाला. त्या दोघांची शिवीगाळ आणि लठ्ठालठ्ठी सुरू झाली. तेव्हा तो व्यापारी उठून मध्यस्थी झाला आणि ती मारामारी त्यानें सोडविली. तरी देखील बाहेरचा मनुष्य शिव्यागाळी करीत प्लॅटफॉर्मवर उभा राहिला. हे पाहून डब्यात असलेला मनुष्य एकदम उठला आणि 'थांब—तुला आता पुरं शिकवल्याखेरीज तू गप्प राहणार नाहींस,' असें म्हणून त्यानें रागानें दरवाजा उघडला. आणि बाहेर उडी टाकिली त्यावेळीं 'जाऊ द्याहो, तो हलकट मनुष्य आहे. त्याच्या नादीं काय लागता ?' असें तो व्यापारी त्याची समजूत करीत होता. परतु त्यानें तिकडे लक्षच दिलें नाहीं. पुढें थोड्या वेळानें म्हणजे गाडी सुटण्याच्या सुमाराला तो मनुष्य पुनः घाईघाईनें डब्यात चढला. 'तेव्हा काय झालं हो त्याच ?' असा त्या व्यापाऱ्यानें त्याला प्रश्न केला. 'केला कीं, त्या डाबीसाला पोलिसाच्या स्वाधीन ! असें म्हणून तो मनुष्य पुनः आपल्या जागेवर बसला. इतक्यात 'अरे ! इथलं माझं उपरणं काय झालं ?' हे व्यापाऱ्यानें काढलेले भीतियुक्त उद्गार त्याच्या कानीं पडले. परंतु त्याकडे त्यानें प्रथम लक्षच दिलें नाहीं. इकडे तो व्यापारी आपल्या उपरण्याची शोधाशोध करू लागला."

"हें उपरण हो कुणी लांबविलं ?" जिज्ञासेनें विचारलें.

"हेंच तर त्या चोराचें कौशल्य ! त्या चोराची मारामारी झाली, शिवीगाळ झाली हें सर्व पूर्वीच ठरलेलें होते ! थुकण्याचा वगैरे सर्व प्रकार पूर्वीच ठरवून तो गाडींत बसलेला चोर जेव्हा खालीं उतरला. त्यावेळीं त्या गडबडींत तो व्यापारी देखील आपल्या जागेवरून त्याना सोडविण्याकरिता उठला होता. ती संधी साधून त्या चोरानें त्याचें उपरणें त्या गर्दीत हलकेंच आपल्या काखेत मारिलें. आणि त्या चोराला पोलिसाच्या स्वाधीन करण्याच्या उद्देशानें तो डब्यांतून खालीं उतरला. तेव्हा त्यानें तें उपरणें

**पेंवज कसा लांबविला ?**

सर्व ऐवजासह त्या दुसऱ्या चोराच्या स्वाधीन केलें आणि स्वतः परत डब्यात येऊन बसला. बिचारा तो व्यापारी आपल उपरणं येथून कसं गेल याचा विचार करीत आणि तर्क बांधित वेड्यासारखा आपल्या जागेवर बसला. ”

“ परतु दोघेहि चोरच ! ” इतका वेळ गप्प बसलेला राया म्हणाला, “ मलाहि एकदा एकाने अशीच गोष्ट सागितली होती परतु ती आतां सगतवार माझ्या लक्षात नाहीं. ”

“ सांगा सागा तर खरी ! जशी आठवेल तशी सागा ? त्याकडे वळून निळकठ म्हणाला.

**वेष बदलणारा रेल्वेचोर**

“ एकदां असेच एका लांबच्या प्रवासाला जाणारे दोन मित्र होते. ” राया सागू लागला, “ त्या दोघांजवळ बराच ऐवज होता. त्याच्या डब्यात एक रेल्वेचोर होता. त्यानें अशीच काहीं बेमालुम युक्ति योजून एकाच्या जवळचा ऐवज लाबविला; आणि पुढल्या एका स्टेशनवर स्वारी हळूच उतरली. इकडे ते दोघेहि मित्र झोपेच्या गुगीत होते. त्यामुळें तो चोर उतरून गेला हे त्यांच्या लक्षात आलें नाहीं. पुढें तो चोर डब्यातून उतरल्यावर लघुशका करण्याच्या उद्देशानें स्टेशनच्या कोपऱ्यात असलेल्या मुत्रीकडे गेला आणि आत जाताच त्यानें आपला अंगरखा काढला आणि उलटा करून आतील जाभळी बाजू वर करून तो त्याने पुनः अंगात घातला. नतर डोकीचा फेटा काढून तो अंगरख्याच्या आंतून कबरेला गुडाळला आणि खिशांतून लाबी काळी टोपी काढून डोकीवर चढविली. नतर कृत्रिम लावलेल्या मिशा काढून टाकल्या. अशा रीतीनें त्यानें पेहरावात फरक करताच तो एक अगदींच निराळा मनुष्य दिसू लागला. पुढें गाडी सुटण्यापूर्वी तो पुनः त्याच डब्यात येऊन बसला. परतु त्याला कोणी सुद्धा ओळखू शकलं नाहीं. पुढें दोन चार स्टेशने गेल्यावर त्या दुसऱ्या मनुष्याजवळचा देखील ऐवज दुसरी एक विलक्षण युक्ति योजून त्यानें लाबविला आणि त्या दोघा मित्राना कोंकलत ठेवलें. ”

अशा रीतीने त्याच्या गप्पा गोष्टी चालू असताना गाडी एका स्टेशनवर उभी राहिली. त्यावेळीं सध्याकाळ झाली होती. म्हणून डब्यांतील दिवे लावण्याकरिता एक पोर्टर हातात लावलेली बत्ती घेऊन त्याच्या डब्यात

आला. तो दिवा लावीत असतांना राजा म्हणाला, " निळकंठराव, डब्यांतील दिवे आहेत, हे लहान, मोठे किंवा विझविण्याची काय व्यवस्था केलेली असते ती तुम्हाला माहीत आहे काय ? "

" हो. तो डब्याच्या मागे एक ह्याडल असतो तो ओढावा म्हणजे दिवे एकदम विझतात. "

" दिव्यावरून मला एक आतां ह्या रेल्वे चोरांची गोष्ट आठवली, ती तुम्हाला सागतो. " असें राजा म्हणत असताना निळकंठ आपला कोट काढूं लागला. तें पाहून राजा म्हणाला, " निळकंठराव, नीट सभाळून ठेवा काहीं पैसे असतील ते ! "

" हं—त्याची नको काळजी ! "

" नाहीं म्हटलं सावध असाव तितकं चांगलं ! "

" त्यांत काय मोठसं ! आपण मित्रमंडळी असताना—"

" ते खरं हो. पण वेळ प्रसंग कांहीं सांगून येतो का ? "

" जाऊं द्या हो, " निष्काळजीच्या स्वरानें निळकंठ म्हणाला, " आतां तुम्ही ती दिव्याची गोष्ट सांगणार होतां ती सागा प्रथम ! "

" ऐका तर —एकदां एका स्टेशनच्या ' वेटिंग रूम ' मध्ये कांहीं मंडळी बसली होती. त्यांत दोघी बायका—चांगल्या दागिन्यानें

**लग्नाचे वऱ्हाडी.**

भरलेल्या, एक पुरुष आणि तीन चार मुलें होतीं. ती सर्व मंडळी आपल्या आप्ताकडे वऱ्हाडी म्हणून जात होती. त्यांना रात्रीची गाडी होती आणि त्या गाडीला विशेष गर्दी होईल असा स्टेशनवर जमलेल्या उतारूवरून रंग दिसत होता. तें पाहून तो मनुष्य त्या स्त्रियांना म्हणाला, ' हें पहा, आतां ते दागिने काढा आणि हँडबॅगमध्यें ठेवा. गाडींत गर्दी होईल. असं वाटतं तेव्हां तुम्ही हें दागिन्यांचं जोखीम कुठें अंगावर मिरविणार ? ' ही गोष्ट त्या बायकांना पटली आणि त्यांनीं आपल्या अंगावरील ठळक दागिने काढून त्या गृहस्थाच्या स्वाधीन केले व त्यानें तें आपल्या ब्यॅागमध्ये घातले. हा सर्व प्रकार एका कोपऱ्यांतून चार डोळे पहात होते. "

" चार डोळे पहात होते म्हणजे ? "

" म्हणजे कोपऱ्यांत बसलेले दोन रेल्वेचोर ! "

" असं असं ! आतां आलं लक्षांत ! बरं पुढें ? "

"पुढें अस झालं—" असें म्हणत असता राजानेंहि आपला कोट काढला आणि त्याची घडी करून निळकंठनें आपला कोट ठेवला होता त्या कोटाजवळच तो ठेवला. "गाडी आल्यावर ती सर्व मडळी एका डब्यांत चढली. त्याच डब्यांत त्या चोरांपैकीं एकजण चढला. ह्याचा पोषाख अगदीं फाटका-जुना असून डोकीला बाधलेला रुमाल तोहि वेडावाकडा बांधलेला होता. चर्ये-वरून तर तो मनुष्य अगदीं बावळट असा दिसत होता. प्रथम थोडा वेळ ती मंडळी व्यवस्थेशीर बसण्याच्या गडबडींत होती. दागिने असलेली ब्याग घेतलेला गृहस्थ एका खिडकीजवळ बसला. व बाजूला त्या दोन स्त्रिया बसल्या. समोरच्या बाकावर मुलें आणि एका बाजूला खिडकीजवळ तो बावळट दिसणारा चोर बसला. पुष्कळ वेळ झाल्यावर त्यानें 'का दादा, तुम्हास्नी कुनीकड जायचं हाय ?' 'ह्या बयास्नी न्हवऱ्याकड लावाया जाता व्हय ?' 'हीं आपलींच प्वारं न्हव का ?' असें त्या गृहस्थास एकावर एक प्रश्न करण्यास सुरवात केली. प्रथम त्यानें उत्तर दिलं. अशा रीतीनें अर्ध्या तासात त्यानें त्या गृहस्थाला निरनिराळे वेडेवाकडे प्रश्न विचारून बेजार करून टाकलें."

**कुनीकडे जायचं हाय ?**

"पण तो मनुष्य बावळट होता कीं काय ?"

"छे हो ! बावळट कसला ? त्यानें हे सर्व वेड पावरलं होतं ! अहो, ही मंडळी अशी वस्ताद असते, त्याची तुम्हाला कल्पना देखील होणार नाहीं."

"बरं मग त्यानें पुढें काय केलं ?"

"त्या वेळीं रात्रीं दहाचा सुमार झाला होता. त्या मुलांपैकीं एक तर झोंपून गेला होता. दुसरा त्याचें अनुकरण करण्याच्या विचारांत होता. बायकाहि डुलक्या घेत होत्या. असें पाहून त्यानें पुनः प्रश्न विचारण्यास सुरवात केली. 'कायहो दादा, ह्यो गाडीमंदी बत्ती कशी लावत्याती ? काय बघा, गाडी इतकी हालतीया पन बत्तीतलं तेल बी सांडना ? वगैरे प्रश्न विचारण्यास सुरवात केली. तेव्हा त्या गृहस्थाने शक्य तितक्या रीतीनें त्याची दिव्याविषयीं समजूत केली. त्यावर तो मनुष्य म्हणाला, 'काय म्हंगतां दादा, ह्यो दिवा घासलेटच्या धुरावर जळतुया ? असं कसं व्हईल ?—का उगाच थट्टा करतां आम्हा गरीबाची !' असे वेड्यासारखे प्रश्न केले आणि तो आपल्या जागे-

**बत्ती कशी लावत्याती ?**

वरून उठला. तेव्हां तो गृहस्थ म्हणाला, " अरे बाबा, तूं चाललास कुठ ? " ' ती डब्याच्या मागं दांडी हाय म्हनून सांगता ना ? ती बघतुया ! ' असें म्हणून त्यानें खिडकींतून बाहेर तोंड काढलें आणि इकडे तिकडे पाहून " कुनीकडं हाये ती दाडी दादा ! " असं म्हणत त्या ह्यांडलला हात घातला आणि तो जोरानें खेंचला. त्याबरोबर सर्व डब्यांतील दिवे एकदम विझले. तेव्हां एकदम ' अरे मूर्खा, हें काय केलेंस ? ' असें त्या गृहस्थानें म्हटलें. दिवा विझल्यामुळें डब्यांत गोंधळ उडाला. तितक्या गडबडींत त्या मनुष्यानें बाकेखालीं नीट जपून ठेवलेली ब्याग उचलली आणि खिडकींतून बाजूच्या डब्याजवळ नेली. त्या डब्यांत त्याचा साथीदार पूर्वी ठरल्याप्रमाणें दिवा विझतांच खिडकीजवळ येऊन उभा राहिला होता, त्यानें ती घेतली. "

" शाबास. भले बहाद्दर ! पण काय हो, हें त्याचें कृत्य दुसरें कोणी पाहिलें नाहीं वाटतं ? "

" अहो, दिवा विझल्यामुळें सगळा गोंधळ उडालेला ! जो तो त्या मनुष्याला शिव्या देत, तडफडत होता. आणि डब्यात तर अगदीं काळोख पडलेला ! तेव्हां त्या गडबडींत त्याचें कृत्य कोणाच्या लक्षांत येणार ? "

" पुढें दुसरं स्टेशन आल्यावर ' दादा, मी स्टेशनमास्तरला जाऊन सांगतों आणि दिवा लाववितों. ' असें म्हणून स्वारी डब्यातून उतरली. त्याच्याबरोबर त्याचा साथीदारहि उतरला ! "

" मग त्यानें स्टेशनमास्तरला सांगून लावविला का दिवा ? "

" छे हो ! तुम्हाला काय वेड लागलं आहे ? तो मनुष्य दिवा लावण्यास सांगण्याकरितां जाईल ? ते दोघे चोर उतरले. ते जाऊन पुढच्या एका डब्यांत बसले. इकडे ही मंडळी राहिली कोकलत ! थोडा वेळ त्यांनीं हातपाय आपटले आणि मग बसले स्वस्थ ! पुढें दोन चार स्टेशनें गेल्यावर गार्डच्या लक्षांत ती गोष्ट आली, तेव्हां त्यानें दिवा लावण्याची व्यवस्था केली. पुढें हें त्याच्या लक्षांत आलें. मग त्यानें पुष्कळ धांवाधांव केली. परंतु काय ? ब्यागमधले तीन साडेतीन हजारांचे दागिने गेले !

" काय वस्ताद बुवा हे लोक ! धन्य आहे ह्या चोरांची ! " असें म्हणून निळकंठरावानें आपले पाय लांब केले. त्यावेळीं बरीच रात्र झाली होती. मंडळींनीं संध्याकाळीं यथेच्छ फराळ केला असल्यामुळें आतां कांहीं खाण्याची कोणाचीहि

**पाय पसरले !**

इच्छा नव्हती, म्हणून इतका वेळपर्यंत त्यांच्या सारख्या गप्पा चालल्या होत्या. परंतु आतां मात्र मंडळी पेंगूं लागली. निळकंठराव जांभयांवर जांभया देऊं लागला, तरी देखील राजाच्या गप्पा चालूच होत्या. शेवटीं राया म्हणाला, " निळकंठराव, झोप येऊं लागली वाटतं ? "

" होय बुवा. झोंप येऊं लागली खरी ! "

" मग पसरा कीं पाय ! आम्ही होतों जरा बाजूला ! " असें म्हणून राजा जरा एका बाजूला सरकला.

" वाः ! मी पाय पसरूं आणि तुम्ही मात्र—"

" अहो त्यात काय ! ह्या गाडीच्या प्रवासांत सर्वचजण पाय पसरून झोंप घेऊं म्हणून म्हणूं लागले तर ह्या दोन बांकावर त्याचा समावेश तरी कसा होणार ! " राजा म्हणाला, " आतां घटका दोन घटका तर तुम्ही पसरा पाय, मग आम्ही पाहूं ! "

ह्या वाक्याला अनुमोदन देतांच निळकंठरावानें बांकावर अंग टाकलें.

**कानमंत्र झाले.**

प्रथम थोडा वेळ तो राजाच्या चाललेल्या गोष्टी ऐकत होता व मधून मधून उत्तरादाखल एखादं दुसरं वाक्यहि बोलत होता परंतु लवकरच निद्रेनें त्याच्यावर आपला पगडा बसविला. त्याच्या पलिकडे कोंपऱ्यांत बसलेली म्हातारी गुडघ्यांत मान घालून स्वस्थ झोप घेत होती. निळकंठरावाला चागली झोंप लागलेली पाहतांच राजा आपल्या जागेवरून उठला आणि रायाच्या जवळ जाऊन बसला. बराच वेळ त्यांच्या हळुहळू गोष्टी चालल्या होत्या. नंतर राजानें आपल्या खिशांतून नोटबुक काढून त्यावर कांहीं लिहून घेतलें आणि तो म्हणाला—

" पण राया, तो मोठी रक्कम पाठवील का ? "

" हो. तुझी तार जातांच तो निःसंशय पांचशें रुपये पाठवील. " राया म्हणाला, " कारण सकाळीं बोलता बोलतां निळकंठराव म्हणाला कीं, आपण प्रथम हजार रुपये बरोबर घेणार होतों पण मामानें इतकी मोठी रक्कम प्रवासांत बरोबर असणें चांगलें नाहीं असें सांगितलें व तें आपणांसहि पटलें म्हणून आतां थोडीच रक्कम जवळ बाळगली आहे. पण वेळ लागल्यास तार करण्याची खोटी कीं मामा पांचशें पासून हजारपर्यंत देखील तारेनें पाठवितील. कारण तेवढी रक्कम मी. बँकेंतून काढून त्यांच्याजवळ देऊन ठेविली आहे. "

" असं जर असेल तर ठीक आहे." निळकंठरावानें थोड्या वेळापूर्वी काढून ठेवलेला कोट बांकावरून उचलीत राजा म्हणाला, " तर मग मी सर्व व्यवस्थेशीर करतों." असें म्हणून त्यानें स्वतःचा कोट काढला आणि निळकंरावाचा कोट अंगावर चढविला. तो काय करीत आहे तें पाहून राया हंसून म्हणाला, " पण राजा तूं हें काय करीत आहेस ? अरे हा नीळकंठरावाचा कोट ! "

" होय मग ! निळकंठरावाचा कोट म्हणूनच अंगावर चढवितो. कारण मघां मी त्याला बजाविलें होतें परंतु त्यानें ऐकलें नाहीं.

**कोट बदलला**

तेव्हां आतां त्याचें प्रायश्चित्त त्याला मिळणें हें अगदीं ब्रह्मलिखित आहे." असें म्हणून त्यानें कोटाच्या खिशांत हात घातला, आणि आंतून एक पाकिट बाहेर काढलें. त्यात तीन सोन्याच्या गिनी आणि कांहीं रुपये व चवल्या पावल्या होत्या. त्या बाहेर काढून त्यानें पुनः कोटाच्या आतल्या खिशात हात घातला आणि एक डायरी बाहेर काढली त्या डायरीला सभोंवतीं रबर गुंडाळलेला होता. कारण डायरींत बराच ऐवज होता. राजानें रबर सोडतांच नोटाचा पुडका त्याच्या हातात आला. त्या पाचाच्या दहाच्या आणि विसाच्या नोटा होत्या. परतु पांच रुपयांच्या नोटीची संख्या जास्त होती. राजानें नोटा मोजताच त्या किती आहेत असें खुणेनें रायानें विचारलें, तेव्हा त्याला उत्तर म्हणून राजानें आपली तीन बोटें दाखविलीं आणि तो सर्व ऐवज पुनः खिशात ठेवला.

" राजा, त्यांतील दोन गिनी त्या खिशात ठेवून जा." राया हळूच म्हणाला, " निळकंठरावाला अगदींच निष्काचन करून ठेऊं नकोस. "

राजानें दोन गिनी काढून त्या आपल्या कोटाच्या खिशात ठेविल्या आणि तो कोट निळकंठरावाच्या उशाजवळ ठेविला, इतका प्रकार होईपर्यंत भुसावळचें स्टेशन आलें. गाडी उभी राहिल्यावर निळकंठ उठतो किंवा काय ते पाहण्याकरितां मंडळींचें लक्ष्य त्याच्याकडे लागलें परतु तो जागा झाला नाहीं तेव्हा भराभर सर्वजण खालीं उतरले. फक्त राया मात्र डब्यांत राहिला. थोड्या वेळानें गाडी पुनः चालू होतांच रिकाम्या झालेल्या बांकेवर त्यानेंहि पाय पसरले आणि थोड्याच वेळांत तो देखील झोंपी गेला.

दुसऱ्या दिवशीं सकाळच्या प्रहरीं निळकंठराव जागा झाला. कोपऱ्यात

**निळकंठराव जागा झाला.**

बसलेली म्हातारी त्याच्या पूर्वीच जागी झाली होतीं. परतु त्या बिचारीला कोठल्याच गोष्टीचा संशय आला नाहीं. रात्रीं डब्यांत बरीच मंडळी होती व आता आपण तिघेच आहोंत, याचे तिला प्रथम आश्चर्य वाटले. परतु बाकीचे उतारू आपण झोंपलों असतांना आपापल्या गांवीं उतरून गेले असतील अशी तिनें आपल्या मनाची समजूत करून घेतली व स्वस्थ चित्तानें तीं खिडकींतून सकाळचें सृष्टीसौंदर्य पहात बसली. ती जेव्हा जागी झाली, त्यापूर्वीच राया जागा झाला होता. परंतु तो मुद्दाम उठला नाही. तो निळकंठराव उठण्याची वाट पहात तसाच झोंपेचें मिष घेऊन पडला होता. थोड्या वेळानें निळकंठराव उठला. आतां तो पुढें काय करतो हें जाणण्याची रायाला फार उत्कंठा लागली होती. त्यानें आपले डोळे किलकिले केले होते. थोड्या वेळानें डोळे चोळीत निळकंठराव उठून बसला. त्यानें आजुबाजूला पाहिलें. परंतु डब्यांत तिघाशिवाय कोणी नाहीं असें पाहून तो गोंधळला. ही मंडळी उतरून गेली किंवा काय, गेली असल्यास केव्हा गेली आणि जाताना आपणास उठविलें नाहीं हें कसें, वगैरे विचार त्याच्या डोक्यांत आले. तो क्षणभर विचार करीत राहिला, नंतर म्हातारीकडे वळून त्यानें विचारलें, " ही येथें बसलेली मंडळी गेली वाटतं उतरून ? "

" असं वाटतं ! " म्हातारीनं उत्तर दिलें.

" ती मंडळी केव्हा उतरून गेली ? "

" तें नाहीं मला ठाऊक. मीहि आतांच जागी झालें. "

हीं प्रश्नोत्तरें होईपर्यंत खांडव्याच्या स्टेशनवर गाडी येऊन उभी राहिली. तेव्हां निळकंठरावानें रायाला हालवून उठविलें.

" अहो पंत उठा ! कां फारशी झोंप घेता ? "

राया धडपड करून उठला आणि डोळे चोळीत चोळीत खिडकीच्या बाहेर पाहूं लागला.

" कांहो खांडव्याचें स्टेशन आलें ! आणि ही मंडळी कुठें आहेत ? तोंड धुवायला उतरली वाटतं खालीं ? "

" अहो. ती मंडळी तर केव्हांच उतरली ! "

" म्हणजे ? "

" म्हणजे काय ? तुम्ही आम्ही झोंपलों असतां ती मंडळी गेली उतरून ! "

" खरं कीं काय ? पण त्या मंडळींना पुढें जावयाचें होतें ना ! मग ही मंडळी मध्येंच कशी गेली उतरून ? लहरीच गडी होते म्हणायचे ! "

" लहरी म्हणा नाहीं तर रंगेल म्हणा पण जातांना त्यांनीं आपल्याला कसें नाहीं उठविलें ? "

" त्याचेंच मला आश्चर्य वाटतं ! पण निळकंठराव, तुम्हीं तोंड धुतलं का ?— नाहीं, मग उतराना ! तो पहा नळ. तोंड धुवूं आणि मग चहा घेऊं. चला उतरा, नाहीं तर गाडीचा टाईम भरेल. " असें म्हणून रायानें दरवाजा उघडला. दोघेहि खालीं उतरले. नळावर तोंड धुवून झाल्यावर निळकंठरावानें म्हातारीकरितां एक लोटा भरून आणला. इतक्यांत राया चहावाल्या मनुष्याला घेऊन आला. चहा होतांच 'मी देतों पैसे' असें निळकंठराव म्हणण्यापूर्वीच रायानें चहाचे पैसे चुकते केले आणि तसें करण्यांत रायाचा कांहीं अंतस्थ हेतु होता. कारण पैसे देण्याकरितां निळकंठरावाला आपल्या कोटाच्या खिशात हात घालावा लागणार आणि त्यावेळीं कोट चोरीला गेला हें त्याच्या लक्षांत येणार व साहजिकच तो आरडाओरड करणार परंतु इतक्या लवकर त्यानें धांवपळ करणें रायाला इष्ट वाटत नव्हतें. असो.

**हा कोट कोणाचा ?**

थोड्या वेळानें गाडी चालू झाली. निळकंठराव आपल्या जागेवर येऊन बसला तोच त्याची दृष्टि कोटावर गेली.

" कांहो ! हा कोट तुमचा वाटतं ? " निळकंठरावानें विचारलें.

" नाहीं. माझा कोटतर माझ्या अंगांत आहे ! "

" मग हा कोट त्या स्वारीचा असेल !—पण माझा कोट कुठें आहे अरे ! मी तर माझा कोट येथेंच काढून ठेविला होता—लांबविला वाटतं ह्या स्वारीनं !

डब्यांत कोटाची शोधाशोध सुरू झाली. पण कोट कांहीं मिळेना. निळकंठरावाची छाती धडधडूं लागली. त्याचें तोंड काळें ठिक्कर पडलें. आपल्या डब्यांत आलेली मंडळी दुसरी तिसरी कोणी नसून ते सर्व रेल्वेंतील चोरच होते अशी आतां त्याची खात्री झाली.

**दोन गिनी सांपडल्या.**

" हें त्याचेंच काम हो ! हरामखोरांनीं अगदीं सोळा आणे फसविलें म्हणायचं ! काय मौज आहे पहा, त्या बेरडांनीं आपणांस बेमालुम रीतीनें फसविलं हो ! डब्यांत आल्यापासून सभ्यतेचा आव घालून, चोरांच्याच गोष्टी सांगून त्या डांबिसांनीं सपशेल डोळ्यांत धूळ फेंकली किंहो म्हणायची ! "

" आणि मला स्वारीनें रात्रीं बजाविलेंही ! म्हणे कोटांत पैसे असतील तर नीट सांभाळा. आता मला काय स्वप्न पडलं होतं कीं, चोराच्या एवढ्या हा गोष्टी सांगतो आणि आपणांस सावध करतो, तो हाच एक पक्का निर्ढावलेला रेल्वेचोर आहे म्हणून ? "

" मग तुमचे पैसे त्या कोटाच्या खिशात होते कीं काय ! "

" होय हो ! "

" काय म्हणतां ?—किती होते पैसे ? "

" होते तीनशें सव्वा तीनशें रुपये—"

" अरे बापरे ! " असें म्हणून रायानें आश्चर्यानें आपल्या तोंडावर हात ठेवला. तो एखाद्या भांबावलेल्या मनुष्याप्रमाणें तोंड पसरून निळकंठरावाच्या तोंडाकडे पहात राहिला.

सर्व पैसे गेले आणि ते त्या चोरांनींच नेले अशी खात्री झाल्यावर आता पुढें काय करायचें हा प्रश्न निळकंठरावाच्या मनांत दत्त म्हणून उभा राहिला. त्यानें बाजूला ठेवलेला कोट उचलला. आणि त्यात काय काय आहे तें तो पाहूं लागला. त्या कोटाच्या खिशात एक रुमाल आणि दोन गिनी इतक्याच वस्तु त्याला मिळाल्या.

" अहो हें भाग्य समजा, कीं त्यात तरी दोन गिनी—तीस रुपये सांपडले. नाहीं तर आतां सर्वच शंख करण्याची पाळी आली असती ! "

" असं तर खरंच ! पण आतां पुढें काय करणार ? " निळकंठरावानें विचारलें, " आतां पुढल्या स्टेशनवर उतरून पोलिसला वर्दी देतों. "

" काहीं अर्थ नाहीं. "

" कां ? "

" अहो, ज्या पठ्यानें आपणांस ह्या चोरांच्या इतक्या गोष्टी सागून कालचा सर्व दिवस सारखं झुलविलं, ज्याला रेल्वेचोराचे सर्व डावपेंच माहिती, तो तुमच्या हातीं सांपडेल काय ? अहो राव, त्यांनीं तर केव्हांच दिला आपल्याला गुंगारा ! "

" मग आतां पुढें काय ? पैसे गेलेच म्हणायचे ! "

" अर्थात् ! आतां त्या पैशांवर पाणीच सोडलं पाहिजे. पण कांहीं म्हणा निळकंठराव, तो मनुष्य वस्ताद खरा, यांत बिलकुल शंका नाहीं ! स्वारीनें इतक्या गोष्टी सांगितल्या पण संशय येऊं दिला का ? याला म्हणतात कसब आणि चातुर्य ! मी तर तो कोणी सभ्य गृहस्थ आहे, चांगला

**रायानें विचार सुचविला.**

व्यापारी आहे असें समजलों. पण होता तो पक्का दरोडेखोर! हां हां म्हणतां आपल्या डोळयात काजळ घातलं! शर्थ आहे बुवा अशा मंडळीपुढें!"

"तें सर्व खर हो! पण आता पुढं काय करायचं?" निळकंठराव विचार करीत त्रासिक स्वरानें म्हणाला, "आता ही आमची यात्रा येथेंच संपायची काय? मोठा प्रश्न आहे!"

"आतां मला इटारशीच्या स्टेशनवर उतरायचें आहे." राया क्षणभरानें म्हणाला, "तेथें आपण उतरू. मी तेथें तुमची नीट व्यवस्था करतो. आणि मग आपण तेथून तुमच्या मामासाहेबांना तार करूं."

**मामासाहेबांस तार केली.**

रायानें सुचविलेला विचार निळकंठरावास पसंत पडला. पुढें बराच वेळ त्यांच्या गोष्टी चालल्या होत्या. बिचारी कोपऱ्यांत बसलेली म्हातारी मुकाट्यानें हा सर्व प्रकार पहात होती. पैसे गेले असें कळतांच आपली यात्रा आता येथेंच संपते कीं काय अशी तिला भीति पडली, आपण जर मध्येंच कांहीं बोललों तर मुलाच्या कपाळाच्या शिरा फुगतील आणि तो अपयशाचें सर्व खापर आपल्या डोक्यावर फोडील ह्या भीतीस्तव ती बिचारी मुकाट्यानें मूग गिळून कोपऱ्यांत बसून राहिली. दहाच्या सुमारास एका लहानशा स्टेशनावर गाडी उभी राहिली. तेव्हा खालीं उतरून निळकठरावानें पाण्याचा लोटा भरून घेतला. डब्यांत शौच्याची वगैरे व्यवस्था असल्यामुळें त्यानीं आपले सर्व विधी आटोपून घेतले. नंतर म्हातारीने ट्रंकमधून फराळाचा डबा बाहेर काढून दिला. त्यावर हात मारून पुनः ते दोघेजण पुढले विचार करू लागले. दुपारीं दोहोंच्या सुमारास गाडी इटारशी स्टेशनावर आली. आमची मंडळी खालीं उतरली. त्यावेळीं जमीन अगदीं खरखीत झाली होती. उष्मा भयंकर होत होता, रायानें निळकंठरावास वेटिंग रूममध्यें बसावयास सांगून आपण बाहेर पडला. थोडा वेळ इकडे तिकडे चौकशी करतां त्याला मनाजोगतें एक कुळ सांपडलें. स्टेशनापासून जवळच एक ब्राह्मणाचें घर होतें. रायानें त्याची भेट घेऊन आपली व्यवस्था करून घेतली आणि त्याचा एक नोकर बरोबर घेऊन तो स्टेशनवर आला.

"निळकंठराव चला, झाली बुवा व्यवस्था! माझे स्नेही मला भेटले. आतां काहीं काळजी नाहीं. आतां आपण तेथें जाऊं, स्नान वगैरे करूं आणि मग जाऊन तुमच्या मामासाहेबांना तार करूं. म्हणजे त्या पत्त्यावर त्यांना

पैसे पाठविण्यास ठीक पडेल. तोंपर्यंत मीं देखील माझीं गांवातील कांहीं कामे आहेत तीं आटोपून येईन. का ? तुम्हाला कसा काय पटतो हा माझा बेत ? "

" ठीक आहे चला. आता तुम्ही सांगाल तसं ! "

मंडळी ब्राह्मणाच्या बिऱ्हाडीं आली. रायानें प्रथमच रौप्यनाण्याचा प्रयोग केलेला असल्यामुळें ब्राह्मणानें त्याचें फारच प्रेमानें स्वागत केलें. थोड्याच वेळात पाहुण्याची सर्व व्यवस्था लागली. तेव्हा राया ब्राह्मणाकडे पहात निळकंठरावाला म्हणाला, " निळकंठराव, आता मनात काहीं एक सकोच बाळगू नका. हे घर आपलेंच आहे. जें कांहीं लागेल तें घरातून मागून घ्या. "

सर्व व्यवस्था झाली. जेवण वगैरे उरकून राया आणि निळकठ तार करण्याकरिता बाहेर पडले. आता तार केल्यास काहीं हरकत नाहीं अशी रायाची खात्री होती. कारण इतक्या अवधींत तिकडे राजानें ठरल्याप्रमाणें सर्व विधि आटोपून घेतलाच असेल, असें त्याचें मन त्याला सागत होतें. थोड्या वेळानें ते दोघे टेलिग्राफ ऑफिसजवळ आले. निळकंठरावानें आपल्या मामाला तारेनें तीनशें रुपये पाठवून देण्यास तार केली.

" आतां हे रुपये केव्हा येतील ? " निळकंठरावानें विचारलें.

" आता वाजले आहेत पांच. आपली तार पोंचण्यास एक तास लागेल. आणि तुमच्या मामासाहेबानीं ताबडतोब पैसे पाठविले तर आणखी एक तास लागेल म्हणजे सहज सात वाजतील. तुम्ही आठ वाजेपर्यंत वाट पहा. तोंपर्यंत मी माझें काम आटोपून येतों. " असें म्हणून रायानें निळकंठरावांची बिऱ्हाडीं रवानगी केली आणि स्वतः स्टेशनचा रस्ता धरला. आपणास साडेपाचाची गाडी आहे हें त्याला माहीत होतें. वाचक हो ! आपण येथेंच सोडून राजा आदिकरून मंडळी भुसावळच्या स्टेशनवर उतरली आहे, त्यांनीं पुढें काय काय प्रताप गाजविले तें जाणण्याची आपणास उत्कंठा लागली असेल करिता आपण तिकडेच वळूं.

**प्रताप गाजविले !**

इकडे आमची मंडळी स्टेशनवर उतरताच प्रथम परत जाणाऱ्या गाडीचा राजानें शोध केला. परतु त्याला सोईस्कर अशी त्यावेळीं गाडी नव्हती. तेव्हां त्याला विचार पडला. पुढे थोडा वेळ सर्वांचें खलबत होऊन ती रात्र गांवांत काढावी असें त्यांनीं ठरविलें. तें जंक्शन स्टेशन असल्यामुळें स्टेशनच्या बाहेर पडण्यास त्यांना फारसे प्रयास पडले नाहींत. 'आम्हाला वर्ध्याला जावयाचें आहे' अशी

स्टेशनमास्तराला थाप मारून ती मंडळी स्टेशनच्या बाहेर पडली. त्यावेळीं रात्रीं साडेअकरांचा सुमार झाला होता. सुदैवानें त्यांना एक टांगा मिळाला त्यानें एका ब्राह्मणाच्या खाणावळीजवळ त्याना आणून सोडलें.

गांवांत आल्यावर राजानें आपली व्यवस्था कशी केली असेल त्याचा विचारच करावयास नको ! प्रथम खाणावळीच्या मालकास हाक मारून त्याच्या हातावर राजानें पांच रुपयांची नोट ठेविली. आणि आपल्या मंडळींची व्यवस्था त्यानें अगदीं मनासारखी करून घेतली. थोड्या वेळानें खाणावळीच्या मालकाने त्यांची झोपण्याची व्यवस्था करून देतांच सर्व मंडळी विश्रांति घेत पडली. सर्व मंडळी लवकरच झोपी गेली परंतु राजाला मात्र बराच वेळ झोंप आली नाहीं. त्याच्या डोक्यांत सर्व पुढले बेत चालले होते. दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो सर्वांच्या पूर्वी उठला आणि आपले सर्व विधि आटोपून आपण बाहेर जाऊन येईपर्यंत जेवण तयार करण्यास सांगून तो बाहेर पडला. लवकरच तो चौकशी करीत करीत पोष्ट ऑफिसमध्ये आला. तेथें टेलिग्राम करण्याची सोय होती. राजानें निळकंठराव गुणे यांच्या नावानें पुण्यास त्याच्या मामाला ' अर्जंट ' तार केली आणि ' क्षणाचाहि विलंब न करतां तारेनेंच सातशें रुपये पाठवावे. सविस्तर हकिकतीचें पत्र पाठविलें आहे ' असें कळविलें.

तार करून अडीच तास झाले नाहींत तोंच पोष्टाचा शिपाई निळकंठराव गुण्याचा शोध करीत खाणावळींत आला. हेच निळकंठराव गुणे अशी खाणावळीच्या मालकानें खात्री करून देतांच पोष्टमननें राजाच्या पदरांत सातशें रुपये मोजून घातले. नतर स्वस्थ चित्तानें मंडळींनीं आपलें भोजन उरकलें. आणि दुपारच्या प्रहरीं स्टेशनचा रस्ता धरला. तेथें शोध करतां दोन वाजतां परत जाणारी गाडी आहे असें त्यांना कळलें.

तिसऱ्या दिवशीं पुनः सर्व मंडळी पुण्यास आपल्या बिऱ्हाडीं एकत्र जमली.

**मंडळींत आल्यावर**

राजा आदिकरून मंडळीनें गेल्या पांच दिवसात काय काय गोष्टी केल्या, सर्व मंडळी आली आणि अद्यापि राया एकटाच कां मागें राहिला, त्यानें कोठली शिकार हेरली आहे इत्यादि अनेक गोष्टी समजून घेण्यास बाकीची मंडळी उतावीळ झाली होती. शेवटीं सर्वजण खोलींत एकत्र जमल्यावर बापू-कडे वळून राजा म्हणाला, " कां प्रधानजी, राज्याचा बंदोबस्त कसा काय ठेवला होता ? "

"बंदोबस्त तर ठीक ठेवला आहे पण ह्या राज्यांतील प्रजेनें गेल्या चार दिवसांत आम्हाला सळो कीं पळो करून सोडलें आहे. **आमच्या मार्गे.** कोणीसुद्धां माझें ऐकत नाहीं. ज्याला वाटेल तसें तो करतो. ह्या चार रात्रींत मला झोप कशी ती बिलकुल नाहीं. सर्व घर ह्या मंडळींनीं डोक्यावर घेतलं आहे."

"आणि प्रधानजी, आपण काय कमी केलेंत?" बाप्या त्याचा हात हिसकावित म्हणाला, "राजा, आम्हीं सर्वांनीं घर डोक्यावर घेतलं म्हणून हा सांगतों आणि ह्यानें काय केलं ते विचार पाहूं!—का प्रधानजी, आतां का तोंड मिटलं! बोला, बोला, आतां का तोंडाला खीळ घातली?"

असें म्हणताच मंडळींत सर्वजण खो खो करून हासूं लागले. बापू अगदीं ओशाळला परंतु त्याला जास्त चिडविण्याच्या उद्देशानें **वृद्ध गंधर्व.** बाप्या पुढें म्हणाला, "राजा ह्या सर्व गोष्टींच्या मुळाशीं हे तुमचे प्रधानजी आहेत. परवांच्या दिवशीं रात्रीं जेवण झाल्यावर ह्या स्वारीच्या डोक्यात काय आलें तें त्यालाचा ठाऊक! स्वारीनें मोठ्या झोकांत ह्या येथें आसन ठोकून आपल्या खड्या गर्दभ स्वरात ताना मारण्यास सुरवात केली. मग काय विचारतोस? एका मागून एक रागरागिण्यांचे सारखे खून पडत चालले. त्यावेळीं तर आम्हाला अशी भीति पडली कीं, आतां कांहीं आमची धडगत नाहीं. ह्या गर्दभाचार्यांची मंजुळ खडी तान इंद्रलोकीं ऐकूं गेली तर इंद्र महाराजांची स्वारी, आपल्या सर्व अप्सरा, गंधर्व, बालगंधर्व, वृद्धगंधर्व, इत्यादि लटांबरासह येथें आल्यास त्यांची उठाबस आम्ही कशी करावी? आम्हीं आमची ही शंका ह्या स्वारीला सांगितली. पण ही स्वारी त्यावेळीं कोण रंगात! मारे तानावर ताना खेंचत होतीं. शेवटीं आम्हाला भीति वाटत होती, त्याप्रमाणेंच झालेंच! ह्या आमच्या वृद्ध गंधर्वाच्या कर्णमधुर लकेरी आणि ताना ऐकून आमचें इंद्रसरकार खुष होण्याऐवजी इंग्रजसरकार खुष झाले आणि त्यांनीं आपला काळ्या डगल्याचा पट्टेवाला गंधर्व येथें चौकशीला पाठविला. मग आमच्या प्रधानजीची त्रेधा काय विचारतोस? इथून तियून सर्वच गोंधळ! रस्त्यावर तर त्यावेळीं अशी मंडळीची खेंच भरलो होती कीं, वर्णन करणें अशक्य! त्या किर्लोस्कर थिएटरांत तरुण गंधर्वाच्या ताना ऐकण्यास देखील इतकी मंडळी जमत नसते इतकी मंडळी ह्या आमच्या वृद्ध गंधर्वाच्या ताना ऐकून रस्त्यावर जमली!"

" एकूण आमचे प्रधानजी गुणी आहेत तर ! " हांसत हांसत राजा म्हणाला, " ही आता गंधर्वांची यादी दिवसें दिवस फुगत चालली म्हणायची ! इतके दिवस हे बाल गंधर्व आणि सवाई गंधर्व रंगभूमीवर पिंगा घालीत होते, पण आता हे वृद्ध गंधर्व रस्त्यावर पिंगा घालण्यास अवतीर्ण झाले म्हणायचे ! "

" मग आता तूंच सांग, असं बैठकींतलं गाणं सुरू झाल्यावर बाकीच्या मंडळींना झोंप तरी येईल काय ? "

" बरं पण आता तें राहूं द्या ! आम्ही येथून गेल्यावर काय काय केलें तें ऐका. " असें म्हणून राजानें आपला वृत्तांत सांगण्यास सुरवात केली. मंडळी एकचित्तानें ऐकत होती. कल्याणच्या स्टेशनावर आपली व रायाची कशी भेट झाली, आपण गाडींत कसे चढलों, खुशालचेंद्र निळकंठरावावर आपण कशी छाप बसविली, त्याला आपण कशा थापा मारल्या, त्याच्या कोटाची आपण कशी अदलाबदल केली आणि शेवटीं त्याच्या मामाकडून आपण सातशें रुपये टेलिग्राम मनिऑर्डरनें कसे मिळविले इत्यादि सर्व हकीकत सागून झाल्यावर क्षणभरानें राजा म्हणाला, पण अद्यापि राया कसा परत आला नाहीं ? "

परंतु मंडळीस फार वेळ तिष्ठत बसावें लागलें नाहीं. कारण रायाविषयीं

**टांगा आला.**

मंडळी काळजी करीत आहेत तों त्याचाच टांगा रस्त्यावर येऊन उभा राहिला. तो आत येताच सर्वजण एकदम उठून उभे राहिले. रायानें प्रथम राजाकडे पाहिलें. तेव्हा त्याच्या पहाण्याचा आशय ओळखून उत्तरादाखल त्याने खिशातून सातशें रुपयांच्या नोटींचें पुडकें बाहेर काढलें.

" एकंदरीनें ही मोहिम सत्रा आणे फत्ते झाली ! " राया म्हणाला.

" झाली म्हणजे व्हायचीच ! कां वृद्ध गंधर्व असेंच ना ! " असें म्हणून राजानें गजाभाऊच्या पाठीवर एक थाप लगावली ! " राया, ही आपली मोहिम फत्ते झाली म्हणून त्या प्रीत्यर्थ गांधर्व लोकांहून नवीन सर्टिफिकेट घेऊन आलेले हे वृद्ध गंधर्व, यांच्या बैठकींतल्या लावण्याचा रागरागिण्यात सप्रयोग येथें जलसा होणार आहे. कां असंच ना मंडळी ? "

सर्व मंडळींनीं आपल्या ' खो खो ' हासण्याच्या प्रचंड ध्वनींत ' हो हो ' म्हणून आपली संमति दिली. थोड्या वेळानें मंडळींत सवंग पिकलेला हंशा जेव्हा गळला तेव्हां राजानें विचारलें, " राया, पुढें त्या निळकंठाचें काय झालें ? उठल्यानंतर जागेवर कोट नाहीं असें पाहून त्याची बरीच त्रेधा उडाली असेल, नाहीं बरें ! "

" तें कांहीं विचारू नकोस ! " रायानें हांसत हासत उत्तर दिलें आणि आपली सर्व हकीकत सागितली.

" मग तो मामाला केलेल्या टेलिग्रामप्रमाणें पैशाची वाट पहात त्या खाणावळींतच बसला असेल ! "

" काय सागावें ? मी त्याला परत जावयास सांगून स्टेशनवर आलों त्यावेळीं परत येण्यास गाडीहि होती. तेव्हां त्याचा काहीं एक विचार न करतां मी तिकिट काढून गाडींत बसलों आणि मनमाडहून हा आतां येथें आलों. आता—मागें काय झालें असेल तें परमेश्वराला ठाऊक ! पण चला आतां, माझ्या जेवणाची काहीं आहे का सोय ? "

वाचक हो ! क्षणभर आपण ह्या मंडळीस तेथेंच सोडून देऊन पुनः एकदां आपण इटारशी येथे खाणावळींत उतरलेल्या निळकंठरावास भेटावयास जाऊं. तार केल्यावर रायानें निळकंठरावास बिऱ्हाडीं जावयास सांगितलें हें वाचकास आठवत असेल. त्याप्रमाणें निळकंठराव परत खाणावळींत आला आणि वळकटीवर स्वस्थपणें विचार करीत पडला. आपण दुसऱ्याच्या डोळ्यांत धूळ फेकणारे म्हणून आपणास फार अभिमान होता, परंतु आज आपल्याच डोळ्यात ह्या रेल्वेचोरानीं धूळ फेंकली हाच विचार त्याच्या मनात सारखा घोळत होता. शेवटीं सातच्या सुमारास त्याच्या नावाचा शोध करीत तार ऑफिसातला मनुष्य आला. आपलें नाव ऐकताच निळकंठ उठून बाहेर आला तेव्हां त्या मनुष्यानें त्याच्या हातांत एक पिवळें पाकिट दिलें आणि पावतीवर सही करून मागितली. निळकंठरावानें तार हातांत घेऊन ती फोडली आणि वाचली त्यात खाली लिहिलेला मजकूर होता.

**तारेचें उत्तर आलें.**

**' कांहीं भानगड झाली आहे. मी स्वतः पैसे घेऊन येतों. तोंपर्यंत आपण मुक्काम हलवूं नये. खुलासा भेटी अंतीं.**

**मामा. '**

हा तारेंतील मजकूर वाचून निळकंठ आश्चर्यचकित झाला. भानगड कसली, मामा स्वतः कां येतो आणि हा खुलासा काय करणार इत्यादि कोठल्याच गोष्टीचा त्याला उलगडा होईना. क्षणभर विचार केल्यावर निळकंठरावास आपल्या मामाचा राग आला. आपल्या तारेप्रमाणें पैसे पाठविण्याचें सोडून मामाला स्वतः पैसे घेऊनः येण्याची काय गरज ? हेंच त्याला कळेना. तो

मनांतल्या मनांत आपल्या मामावर अतिशय रागावला. होतां होतां नऊ वाजले. खाणावळवाल्या ब्राह्मणानें जेवण तयार आहे असें दोन वेळां येऊन सुचविले तरी निळकंठराव उठेना. तो रायाची वाट पहात होता. शेवटीं दहा वाजले. तेव्हां 'हा गृहस्थ गेला तरी कुठें ?' असें पुटपुटत स्वारी जेवावयास उठली, अकरा वाजले तेव्हां रायाविषयींहि त्याला संशय येऊं लागला. परंतु खात्री मात्र होईना. कारण राया हा प्रवासाच्या सुरवातीपासून आपल्याबरोबर असून त्याच्या वर्तनात किंवा भाषणांत संशय घ्यावयास अद्यापि त्याला जागा नव्हती. परंतु 'शेकून निघालेला मनुष्य लांबच्या आगीलाहि पाहून भितो,' अशाच प्रकारची त्याची स्थिति झाली. आपणास रेल्वेचोरांनीं लुटलें, त्याच कंपूपैकीं हा देखील एक कशावरून नसेल हा त्याचा संशय जसजशी रात्र होऊं लागली तसतसा दृढ होऊं लागला. शेवटीं खाणावळयाकडून आपल्या झोपण्याची व्यवस्था करून घेऊन त्यानें म्हातारीच्या शेजारींच आपल्या बिछान्यावर अंग टाकलें.

**मामा आले.**

बरीच रात्र होईपर्यंत निळकंठरावास झोप लागली नाहीं. आपले तीनशें रुपये गेले, याबद्दल त्याच्या मनात विचार घोळत नव्हते आणि ते विचार तरी कसे घोळतील? स्वतःचीं हाडें झिजवून अगर घाम पुसून त्यानें ती संपत्ति थोडीच मिळविली होती! तेव्हा त्याला पैशाबद्दल टोंचणी लागणार? त्याचे विचार कांहीं निराळ्याच विषयावर चालू होते. रेल्वेचोराबद्दल ऐकलेल्या गोष्टीच त्याच्या मनांत घोळत होत्या. असो. दुसऱ्या दिवशीं दुपारीं दोन वाजतां आपल्या प्रतापी भाच्याचा शोध करीत मामासाहेब आले. परंतु भाच्यानें त्याचें चांगलेंच स्वागत केलें!

"मामा, तुम्हाला येण्याची काय जरूर होती!" कपाळाला आठ्या घालून निळकंठरावानें मामास पहिला प्रश्न केला.

हा प्रश्न ऐकतांच मामा देखील चपापले. परंतु थोड्या वेळानें त्यांनी आपणास भुसावळहून प्रथम मिळालेली तार आणि त्या तारेप्रमाणें रुपये रवाना केले त्याची पावती आपल्या भाच्याच्या हातांत दिली. निळकंठरावांनीं ती तार वाचली आणि पावतीहि पाहिली. त्याला त्या तारेचा उलगडा होईना. तो चमत्कारिक दृष्टीनें आपल्या मामाच्या तोंडाकडे पहात म्हणाला, "म्हणजे! ही सातशें रुपयाबद्दल तार कोणाची! हा काय प्रकार आहे! मला कांहींच कळत नाहीं!"

" आणि मला तरी कुठे कळला आहे! ही तार मला काल सकाळीं मिळतांच मी तारेनें सातशें रुपये रवाना केले आणि सविस्तर पत्राची वाट पहात राहिलों. तों संध्याकाळीं ही दुसरी तार आली. तेव्हां मात्र मी गडबडलो. खरी तार कोठली आणि खोटी तार कोठली हें तरी मी कसं समजावं! शेवटीं ह्या दुसऱ्या तारेला उत्तर दिलें. "

बराच वेळ निळकंठ विचार करीत राहिला. शेवटीं सर्व प्रकार त्याच्या लक्षात आला. आपणास रेल्वेचोरानीं पुरें फसविलें अशी त्याची पूर्ण खात्री झाली. नतर हळुहळू त्यानें सर्व गोष्टी आपल्या मामास सांगितल्या आणि विचारलें, "पण मामा, तुम्ही तरी आतां मी मागविलेली रक्कम बरोबर आणली आहे काय?"

" हो, ही तीनशे रुपयांची रक्कम मी आणली आहे. पण ह्या बेरडांना पकडण्याची तूं काय व्यवस्था केलीस? पोलिसमध्यें वर्दी दिलीस कीं नाहीं?

" नाहीं. "

" नाहीं?" आश्चर्यानें मामा म्हणाले, " म्हणजे तू अद्यापि स्वस्थच बसला आहेस! आता काय म्हणावं तुला! अरे, हे कांहीं एक दोन रुपये नव्हत, वेड्या मूर्तिमंत हजार रुपये गेले ना?" असें म्हणून मामा म्हातारीकडे वळले आणि पुढें म्हणाले, " तरी म्हटलं, इतक्या लाब जाण्यांत काहीं अर्थ नाहीं. आपल्या पंढरीच्या काळया विठोबाचें दर्शन घेतल, कीं त्याच्या चरणीं सर्व तीर्थांचं पुण्य आहे! पण माझं कोण ऐकतो? बस झाली आता हीं यात्रा! ह्या हजार रुपयांत घडली तितकी पुष्कळ झाली; आता चला परत—"

**निळकंठराव परतले.**

प्रसंगामुळें निळकंठरावाला आपल्या मामाचें भाषण पटलें. त्यानें तेथूनच महायात्रेला नमस्कार केला आणि परत निघण्याची तयारी केली. म्हातारीला प्रथम थोडा वेळ वाईट वाटलें. आपणास महायात्रा घडत नाहीं म्हणून तिचें मन खट्टू झालें. परंतु चोरांनीं आपणास हजार रुपयांस फसविलें हा विचार मनांत येतांच, झाली तितकी यात्रा पुष्कळ झाली असें तिलाहि वाटलें. कारण यात्रा घडण्याच्या पूर्वीच आपणास हजार रुपयांचा फटका बसला, त्यावरून यात्रेला निघतांना आपणास कुयोग होता अशी तिनें मनाची समजूत केली. पुढें संध्याकाळीं लवकरच जेवणें आटोपून मंडळी परत येण्याकरितां गाडींत बसली.

पण आमची मंडळी आतां काय करीत आहे? वाचकहो! चला आपण पुनः पुण्यांत जाऊन आपल्या मंडळीचा शोध घेऊं. कारण आतां लवकरच ती सर्व मंडळी आपापल्या घरीं जाणार आहेत. तेव्हां घरीं जाण्यापूर्वी त्यांनीं आपला पुढला कार्यक्रम कसा ठरविला आहे, तो आपणास अवश्य समजून घेतला पाहिजे.

रायाने ' जेवणाची कांहीं सोय आहे काय ? ' अशी पृच्छा करण्याचा अवकाश तोंच अर्ध्या तासांच्या आत सर्व सिद्धता झाली. यावरून रायाच्या शब्दाला त्याची मित्रमंडळी किती तत्परतेनें झेलित होती हे सिद्ध होतें. रायावर सर्वांचें प्रेम होते व तोहि सर्वांच्या प्रेमाला पात्र होता, हें आतापर्यंत प्रसिद्ध झालेल्या गोष्टीवरून वाचकाच्या लक्षात आलेंच असेल.

" हं—येथील वर्तमान काय आहे ? " रायाने जेवीत असताना विचारलें. बाकीची सर्व मडळी त्याच्या सभोंवती घोळका करून बसली होती.

" ह्या दोन तीन दिवसांत कांहीं विशेष ? "

" काहीं म्हणण्यासारखं नाहीं. " चिंतामणीने उत्तर दिलें.

" नाहीं कसं ?—एक मोठी गोष्ट घडली ! " राजा म्हणाला, " आमच्या प्रधानजीने आपल्या दिवाणगिरीचीं वस्त्रें टाकून गर्दभाचार्याच्या संगीत शाळेंत आपलें नांव दाखल केलें आणि वृद्ध गंधर्वांची पदवी मिळून स्वारी मुकतीच आली आहे. "

**एक सूचना.**

राजाचें भाषण ऐकून सर्वजण हंसूं लागले. रायाला जरी त्या भाषणाचा अर्थ कळला नाहीं, तरी राजाचा कांहीं तरी विनोद आहे असें त्यानें जाणलें आणि तो बापूकडे पाहूं लागला. बापूहि किंचित् खजील झाला. परतु आतां गप्प राहिल्यास आपली जास्त थट्टा होईल असें जाणून तो म्हणाला, " राया, त्यांत काहीं अर्थ नाहीं. हा राजा असा व्रात्य आहे कीं, उगाच राईचा डोंगर करून बसतो ' हीः हीः ' करीत दांत काढीत ! पण तें जाऊं दे. त्याचा तो एक अंगस्वभावच आहे. पण राया, तुझ्यापुढें एक सूचना माडावयाची आहे—"

" कसली ? " मध्येच राजानें विचारलें, " एखादी गायनशाळा किंवा एखादा हार्मोनियम क्लास काढण्याची कीं काय ? "

" ऐकरे बुवा ! उगाच मध्यें मध्यें तोंड घालतोस. "

जाऊं देरे ! त्याला आहेच तशी संवय ! तुझं आपलं चालूं दे—"

" राया, एकदां नाटकाला चलरे ! " मध्येंच गोप्या म्हणाला.

" का ?—ह्या आमच्या वृद्ध गंधर्वांवरून तरुण गंधर्वांची आठवण पडली वाटतं ? " राजानें विचारलें.

" होय कांहीं अर्थी तसंच ! पण ह्या तरुण गंधर्वांची जो तो फार फार वाखाणणी करतो. म्हणून म्हटलं ऐकूं तर खरं एकदा कसं काय गातो तो ! "

" तो कितीहि कंठ फोडून गात असला तरी आमच्या ह्या अस्मादिक गंधर्वांच्या पुढे त्याचं गाणं रद्द आहे. काय राजा, खर कीं नाहीं ? " बाप्पानें विचारलें.

" बरं तर तुमची सर्वांची इच्छाच आहे तर जाऊं ह्या शनिवारीं नाटकाला ! " शेवटीं राया म्हणाला.

नाटकाला जाण्याचा बेत ठरला. दुसऱ्या दिवशी बापू किर्लोस्कर थिएटरात तिकिटा काढण्याकरिता गेला. परतु तिकिटा मिळेनात !

**तिकिटा संपल्या.** उद्या नाटक आणि आजच बहुतेक सर्व तिकिटा सपल्या होत्या आणि त्याचें कारण त्या नाटकाला मुद्दाम कांहीं बडी बडी मंडळी बोलाविली होती. बापूनें तिकिटा मिळाव्या म्हणून शक्य तितकी खटपट केली परंतु नाहीं ! शेवटीं तिकिटा न घेता त्याला परत यावें लागलें.

" किती आणल्या तिकिटा ? " राजानें विचारलें.

" छेरे ! तिकिटाच मिळत नाहींत. उद्या ते कोणी बाळासाहेब निजामपूरकर येणार आहेत नाटकाला ! त्याच्याकरिता उद्याचा ' मानापमान ' आहे. "

" झक् मारतात ते बाळासाहेब ! आण इकडे ते पैसे. मी घेऊन येतों तिकिटा. तू तर सदांचा रड्याच आहेस. एवढ्या तिकिटा तुला आणवत नाहींत ? अरे वेड्या, अशा वेळीं हजार लटपटी करून आपलं कार्य साधलं पाहिजे. "

" बरं बरं ! आता जास्त नको वटवट ! आता काय प्रताप गाजवितां तें तर पाहूं ! हे घे पैसे—" असें म्हणून बापूनें राजाच्या हातांत बारा रुपये दिले.

" चलरे गोप्या येतोस का ? " राजानें विचारलें, " आपण जाऊं तिकिटा आणण्याकरिता ! "

" चल. माझी तयारी आहे. " अस म्हणून गोप्या खुंटीवर अडकविलेली आपली कोट टोपी घेऊं लागला.

" अरे ए पोरा ! ते काय कपडे करतोस ? नाटक मंडळीकडे तिकिटा आणावयास जायचं म्हणजे नाटकी पोषाख केला पाहिजे. "

" तो कशाला ? "

" कशाला त्याची चौकशी तुला नको ! लहान मुलांनीं सांगितलेलें काम मुकाट्यानें करावें. "

**सशाच्या शिकारीला वाघाची तयारी !**

गोप्यानें ट्रंक उघडली आणि जीवनलालशेटच्या दुकानावरून चंद्रकलेच्या लग्नाकरितां मागविलेल्या कपड्यांत आलेल्या बारा फेट्या पैकीं दोन जरीचे फेटे बाहेर काढले. त्याच नमुन्याचा बाकीचा पोषाख काढून ते दोघे तयार झाले. परंतु बाहेर पडण्यापूर्वी राजानें ट्रंक मधून हळूच एक शंभर रुपयांची नोट काढली आणि ती खिशांत टाकली. गोप्यानें मात्र तें पाहिलें. आणि तो विचारणार त्यापूर्वीच राजा म्हणाला, " अरे असो ! दोन पैसे जास्त जवळ असले तर वेळीं अवेळीं उपयोगी पडतात. म्हणतात ना ' सशाच्या शिकारीला वाघाची तयारी ! "

बाहेर पडता पडतां राजानें बापूला विचारलें, " बापू, कोणाच्या प्रीत्यर्थ उद्यांचा खेळ आहे म्हणालास ? "

" बाळासाहेब निजामपूरकर. "

" असं ! मग हें हिंदुस्थानी खटलं आहे तर ! ठीक. मग आता आपणासहि तिकडे हिंदुस्थानीच संपादणी केली पाहिजे. यंव—गोप्याखांसाहेब, आया समझके बिचमे ? "

दोघेहि मोठ्या ऐटीनें बाहेर पडले. आणि थिएटरावर न जातां मंडळीच्या एकदम बिऱ्हाडीं आले. त्या दोघांना पाहतांच सर्व मंडळी त्यांच्या तोंडाकडेच पहात राहिली. राजा आपल्या हातांतील बारीक छडी फिरवीत आपणाकडे टकमक पहात असलेल्या मंडळींना म्हणाला, " आपके म्यानेजरसाहेब कहां हैं ? "

" क्या काम हय ? " म्यानेजर पुढें होऊन म्हणाला.

" कल तुम लोग हमारे बालासाहेबके दरिये नाटक करनेवाले हय्–इसी वख्त हमको बारा स्पेशल सीट होना. "

" हमी छे अदमीची स्पेशल पास बाळासाहेबांच्या बंगल्यावर पाठविली हय. " मॅनेजरसाहेब धेडगुजरी भाषेंत म्हणाले.

" और हमको बारा स्पेशल होना. ए ले लेव तुमारा चार्ज ! " असें म्हणून राजानें मोठ्या झोकांत शंभराची नोट काढून पुढें केली. परंतु ती घ्यावी किंवा

न घ्यावी असा म्यानेजरास विचार पडला. त्यानें राजाला आणि गोप्याला बसावयास खुर्ची देऊन मंडळीचें मत घेण्याकरिता तो आंत गेला. बराच वेळ त्याचा खल झाला शेवटीं मंडळीपैकीं एकजण म्हणाला, " आपण आता पैसे घेऊन त्यांना स्पेशल सीट देणें अगदीं वाईट दिसतं. त्यांची दहा बारा मंडळी जास्त आली तरी त्यापासून आपला कांहींच तोटा नाहीं. कारण उद्यांच्या खेळाला आपल्या नेहमींच्या उत्पन्नाशिवाय बाळासाहेबांकडून खात्रीनें आपणास चार पाचशेचा ऐवज मिळेल. "

**स्पेशल पास**

शेवटीं सर्वानुमतें ताबडतोब पैसे न घेण्याचें ठरून मॅनेजरानें बारा मंडळींचा एक स्पेशल पास लिहून तो राजाच्या स्वाधीन केला. त्यावेळीं आंत त्यांच्या काय काय गोष्टी झाल्या असल्या पाहिजेत त्या तर्कानें जाणून मुद्दाम चंद्रबळ आणून शंभर रुपयाची नोट पुढें करून राजा म्यानेजरला म्हणाला, " म्यानेजर साहेब, ए पासके लिए आपने दाम नहीं लिए ? "

" इसकी काय हरकत नहीं. ए तो इस्पेशल पास हय ! "

" ऐसा होगा तो बहोत ठीक ! ए इस्पेशल पास देखके बालासाब और खुष होंगे. और कल आप नाटकवाले लोगोंकूं बिदागीबी भारी देएँगे "

असे म्हणून नाटकी फ्याशनचा सलाम करून राजा आणि गोप्या निघाले. आणि आपण भविष्य केल्याप्रमाणें उद्यां आपणास चांगली पैदास होणार ह्या आनंदात मॅनेजरसाहेब आंत गेले.

" का गोप्या, मिळविली कीं नाहीं स्पेशल पास ? अरे, ह्याला म्हणावं डोकं ! नाहीं तर तो बापू रड्या ! "

**तेथें लागती जातीचे**

राजानें पास आणलेली पाहून—आणि ती देखील एक पै हि खर्च न करता स्पेशल पास आणलेली पाहून सर्वांना अत्यानंद झाला. परंतु बापूला मात्र वाईट वाटलें. आपण टिकीटा मिळविण्याच्या नादीं न लागतां प्रथमपासून अशीच एखादी युक्ति लढविली असती तर आपणासहि स्पेशल पास आणतां आली असती असें त्याला आता वाटूं लागलें.

राजा आपली हकीकत सांगत होता. परंतु त्याचें सर्व लक्ष बापूच्या आंबट झालेल्या तोंडाकडे होतें. शेवटीं तो म्हणाला, " बापू, असं तोंड कां वांकडं केलंस ? तुझ्याकडून छाती ठोकून गेलों आणि आणल्या किनई पासीस ? "

" त्यात काय मोठंसं शतकृत्य केलंस ! मी जर अशी थापापापी केली असती तर नसत्या वाटतं आणल्या तिकिटा ? पण आपलं तें काम नाहीं मनुष्यानें सरळ चालावं ! "

" अहो पण्डित, पुष्कळ झाली आपली सपादणी ! म्हणे 'सरळ चालावं' मोठे धर्मात्मेच पडला किनई ! पण बाबा, थापाथापी करायला तरी अक्कल लागते. पण तुझ्यासारख्या गबाळाला सागून काय उपयोग ! ' तेथें लागती जातीचे ! '

इतक्यात गोप्या आत आला. त्याच्या हातांत एक पुस्तक होतें. मंडळीनें तें पाहतांच ' पुस्तक कसलें ? ' म्हणून त्याला विचारलें. तेव्हां गोप्यानें पुस्तक वर करून त्याचें मुखपृष्ठ सर्वांना दाखविलें. तें पुस्तक रा. खाडिलकरकृत संगीत ' मानापमान ' नाटकाचें होतें. तात्काळ मंडळी गोप्याच्या सभोंवती जमली आणि पुस्तक वाचनास सुरवात झाली.

नाटक संपूर्ण वाचून झालें. कोणी कथानकावर, कोणी भाषेवर, तर कोणी पदावर आपापल्यापरी टीका केली. परंतु मंडळीच्या त्या टिकेत काहींच अर्थ नव्हता. बऱ्याच वेळानें राया मंडळीकडे पाहून म्हणाला, " आता आपल्या हातात पुंढलें कुठलें काम आहे ? "

" आता काहीं विशेष काम हातांत नाहीं. फक्त उद्या तरुण गंधर्व नाटक मंडळीचें संगीत मानापमान नाटक पहाण्याकरितां ही सर्व अस्मादिक मंडळी जाणार इतकेंच ! " बाप्पा म्हणाला.

" ते तर ठरलंच आहे ! " राया म्हणाला, " पण नाटकाला जाणं हेंहि मंडळीनीं आखून ठेविलेल्या कार्यक्रमांपैकींच एक आहे ना ? "

" होय. "

" मग त्या प्रीत्यर्थ मंडळीला कांहीं विशेष तयारी करावयाला पाहिजे काय ? "

" काहीं विशेष म्हणजे उद्या बाळासाहेब निजामपूरकर येणार आणि तेथेंच आपणास बसण्याच्या स्पेशल सीटस् असल्यामुळें कोणाला संशय येऊं नये म्हणून आपला पोषाख जरा झकास असला म्हणजे झालं ! " राजा म्हणाला.

**तेरी चुप–मेरी चुप !**

" नाटक मंडळीला वाटेल कीं खरोखरच ही कोणी बाळासाहेबाची मंडळी आहे आणि बाळासाहेबांच्या मंडळीला–खुद्द बाळासाहेबानाहि वाटेल कीं आपणासारखीच ही कोणी प्रेक्षक मंडळी आहेत. म्हणजे हा प्रकार, ' तेरी भी चुप, मेरी भी चुप ! ' अशापैकीं होणार आहे. "

रायानें एकवेळ आपल्या सर्व मित्रमंडळीकडे पाहिलें आणि शेवटीं राजाकडे पहात तो म्हणाला, " राजा, आपल्या कार्यक्रमापैकीं उद्यां नाटकाला जाणं हें एक कार्य आहे असें जर तुम्ही एकमतानें कबूल करता तर त्यासंबंधीं पोशाखाशिवाय दुसरी कांहींच का आपणास तयारी करावयास नको ?–करा, पुनः सर्वांनीं ह्या नाटकाच्या गोष्टी निघाल्यापासून घडलेल्या सर्व गोष्टींचा नीट विचार करा आणि मंडळींनीं पुढें काय केलें पाहिजे तें सांगा ? "

पुनः सर्व मंडळी आपापलीं डोकीं खाजवू लागली. परंतु आपणास काय विशेष करावयाचें राहिलें आहे, हें मात्र कोणाच्याच लक्षात येईना. वाचक हो ! या ठिकाणीं हा प्रकार इतका पाल्हाळानें लिहिण्याचें कारण राया कोठलीहि गोष्ट हातीं घेतल्यावर, ती कितीहि जरी क्षुल्लक असली तरी त्या गोष्टीबद्दल किती बारीक रीतीनें साधक बाधक विचार करीत असे, हें आपल्या लक्षात येईल. त्यानें मंडळींना प्रश्न विचारला. परंतु कोणाकडूनच उत्तर मिळेना. तेव्हां तो म्हणाला, " अरे, एवढी क्षुल्लक गोष्ट तुमच्या लक्षात येऊं नये हें मोठें आश्चर्य आहे. राजानें बाळासाहेब निजामपूरकराच्या नांवाचा उपयोग करून पास मिळविला. तेव्हा बाळासाहेबांविषयीं इत्थंभूत माहिती असणें अवश्य आहे. त्याचप्रमाणें नाटक मंडळीने पास आपल्या थापांना बळी पडून दिला, तेव्हा नाटक मंडळींतील मुख्य पात्रं, मालक इत्यादि मंडळीविषयीं माहिती असणें अवश्य आहे. "

" होय. " राजा म्हणाला,: " राया, तूं म्हणतोस त्याप्रमाणें नाटकाला जाण्यापूर्वी आपली ही पूर्व तयारी झाली पाहिजे खरी ! "

" मग आतां घ्या तर एक एकानें कामें वांटून आणि लागा आतांपासूनच तयारीला ! "

**नाटक मंडळया फोडणारे सभ्य**

चाऱ्या मनोहर आणि बाप्पा यानीं नाटक मंडळीविषयीं माहिती आणण्याची कामगिरी आपणाकडे घेतली. आणि बापू, चितामण, गजाभाऊ ह्या तिघांनीं बाळासाहेबाची हमी घेतली. संध्याकाळपर्यंत मंडळींनीं आपापलीं नेमलेलीं कामें केलीं. परंतु त्याचवेळीं मात्र त्याची चर्चा झाली नाहीं. जेवणानंतर सर्व मंडळी एकत्र बसली असतां जेव्हां प्रश्न निघाला, त्यावेळीं मनोहर म्हणाला, " नाटकमंडळींत चौघे मालक आहेत. ही मंडळी चालू असलेल्या प्रघाताला अनुसरून एका प्रसिद्ध नाटक मंडळींतून फुटली

आणि ही मंडळी फोडण्याला कांहीं सन्माननीय गृहस्थांचीं नांवें सांगतात आणि खरोखर जर हे सन्माननीय गृहस्थ ही एकीची बेकी करण्याच्या मुळाशीं असले तर ही गोष्ट त्यांना भूषणावह आहे, असेंच म्हटलें पाहिजे."

"पण कायरे राया, ह्या सभ्य म्हणविणाऱ्या मंडळींना नाटक मंडळ्या फोडण्याशिवाय दुसरे कांहीं उद्योगच नसतात काय?" गोप्यानें विचारलें.

"काय सांगावं बुवा आपण! ह्या बड्या मंडळीचें सर्वच बडें! आणि त्यांचे उद्योगहि बडेच! बाकि तुझी इच्छाच असेल तर ह्या बड्या मंडळीचा दिनक्रम कसा असतो, यांचे उद्योग काय चालतात याची पाहिजे तर आपण चौकशी करूं!" राजा म्हणाला.

"कशाला? काय फायदा होणार आहे तुम्हांला उद्योग आणि दिनक्रम कळून. रायानें विचारले.

"कां बरं? बड्या मंडळीचं चरित्र अनुकरणीय असतं!" बापू म्हणाला.

"होय, असतं पण त्या विभूति निराळ्या आणि बडे म्हणवून घेणारे व नाटक मंडळ्या फोडणारे हे शिष्ट यांचें चरित्र निराळें! यांचा दिनक्रम सूक्ष्म रीतीनें अवलोकन केला तर आपणास किळस उत्पन्न होईल आणि याचा उद्योग पाहिला तर अंगावर शहारे येतील अशीं कारस्थानं आपल्या दृष्टीस पडतील."

"जाऊं देरे बुवा! त्या बड्या लोकांच्या गोष्टी आपणाला कशाला?" बाप्पा म्हणाला, "पण बापू, तूं बाळासाहेबांची काय माहिती आणलीस?"

"मी आणलेली माहिती फार मजेदार आहे!" बापू म्हणाला, "अरे, हे

**शोकीन संस्थानिक**

बाळासाहेब निजामपूरकर हे निजामशाहींतील एक छोटेसे सस्थानिक आहेत. वयानें पन्नाशीच्या घरात आहेत. पण फारच शोकीन प्राणी आहे. येथें मुद्दाम ह्या तरुण गंधर्वाचें गाणें ऐकण्याकरितां आले आहेत. स्वारीला नाच्या पोऱ्यांचा फार शोक आहे. आणि त्याप्रीत्यर्थ हजारों रुपये खराब होत आहेत. आपल्या आश्रयाखालीं एखादी नाटक मंडळी असावी अशी फार इच्छा आहे. याच मंडळीला ते आश्रय देऊन आपल्या कृपाछत्राखालीं घेणार होते. परंतु तो मान दुसऱ्याच एका संस्थानिकानें घेतल्यामुळें आपली गुणग्राहकता दाखविण्याकरितां उद्यां ते मंडळींना एक हजार रुपये देणार आहेत! शिवाय तरुण गंधर्वाकरितां दोनशें रुपयांचा एक शालू आणि तीनशें रुपयांचा एक कंठा त्यांनीं तयार केला आहे.

रायानें सर्व हकीकत मुकाट्यानें ऐकून घेतली. मंडळीहि त्याच्याकडे मुकाट्यानें पहात राहिली. तो भुतावरून स्वर्गाला जाणारा, तेव्हा तो मुकाट्यानें बसला आहे, त्या अर्थी त्याचा काहीं बेत चालू असला पाहिजे, इतकें मंडळीनीं जाणलें. बराच वेळ झाला परंतु राया काहींच बोलत नाहीं असें पाहून गोप्यानें विचारलें, " राया, मग काय विचार ठरतो ? "

" ठरतो काय ? ठरला !—पण आता त्याची वाच्यता नको. उद्यां काय होईल तें पाहूं. आतां झोंपा स्वस्थ. उद्यां नाटक आहे तेव्हां जाग्रण होणार आहे. चला, उठा—'

दुसऱ्या दिवशीं आमची मंडळी बरोबर नवाला शिग्राम गाड्यातून नाटकगृहाजवळ येऊन थडकली. प्रत्येकानें निरनिराळा पण

**हा टकमक पाही.** भपक्याचा पोषाख केलेला होता. आमची मंडळी येण्यापूर्वीच बाळासाहेब निजामपूरकर थिएटरमध्यें गादीच्या खुर्चीवर बसले होते. नाटकगृहाजवळ गाड्या येताच पहिल्या शिग्रामधून प्रथम राजा खाली उतरला. नंतर राया खालीं उतरला. त्याचा पोषाख फारच भपक्याचा होता. ही मंडळी गाडींतून उतरतांना पाहून म्यानेजर पुढे झाला. राजानें डोळ्यानें खूण करताच, बाळासाहेबानीं स्पेशल पास मागविले, ते हेच गृहस्थ असें वाटून म्यानेजरानें मोठ्या अदबीनें त्याना आंत नेलें. थिएटरात बाळासाहेब बसले होते, त्यांच्या बाजूला एक खुर्ची रिकामी होती. त्यावर म्यानेजरनें रायाला नेऊन बसविलें. रायानें खुर्चीवर बसता बसता बाजूला वळून बाळासाहेबास किंचित् वाकून नमस्कार केला.

नवाला नाटकाचा पडदा वर झाला आणि 'कृष्णकवी' नें 'विस्मयकाराचें नमन तबल्याच्या ठेक्यात आणि पेटीच्या सुरांत सुरू केलें. थोड्यावेळानें भामिनी येताच तिच्या 'लाल लाल' गालाकडे बाळासाहेब 'टकमक' पाहूं लागले.

" काय हो हाच तरुण गंधर्व काय ? " हळूच रायाकडे वळून बाळासाहेबानीं विचारलें. त्याला 'होय' म्हणून उत्तर मिळताच 'मोठं ठसक्यांत काम करतो बुवा !' असे स्वारीनें उद्गार काढले !

पहिला अंक समाप्त होईपर्यंत राया आणि बाळासाहेब यांचीं बरींच प्रश्नउत्तरें झालीं. हळुहळू रायानें आपल्या मुद्यावर गोष्ट आणिली. उल्लु बाळासाहेब ताबडतोब विरघळून आपलें हृद्गत ओकूं लागले. ते म्हणाले, " हें असं मारु

पात्र आमच्या संग्रहीं नाहीं. एक दोन तास जर ही नखरेबाज भामिनी माझ्याजवळ राहील तर मोठी बहार होईल. गाण्यापेक्षां अक्टिंगच ठार मारतं—"

" पण काय हो, बाळासाहेब, आज तुम्ही ह्या मंडळींना कांहीं बक्षीस देणार आहांत म्हणून ऐकलं ? " रायानें एकदम विचारलें.

" होय. आज तेवढ्याकरिताच तर मी मुद्दाम येथें आलों. पण बुवा, हें नाहीं आपल्याला पसंत ! आपण इकडून शालू आणि कंठा नजर करायचा आणि त्या भामिनीनें तिकडून—स्टेजवरून इतक्या लाबून घ्यायचा. आपल्याला नाहीं बुवा पसंत ! इतका माल द्यायचा मग इकडे असं जवळ बसून हांसत, खेळत, मुरडत कां नाहीं तिनें घ्यावा ? "

तुमची इच्छा असेल तर आपण त्याला इकडे बोलवूं ! बहुतकरून तिसऱ्या अंकाला हे तुम्हाला हार तुरे होतील. तर अद्यापि पुष्कळ अवकाश आहे. बोला–तुमची इच्छा असेल तर म्यानेजरला बोलावून मी अद्यापि व्यवस्था करीन. "

" पण काय हो इकडे जरी तो पार्टी आला तरी फार वेळ थोडाच तो बसणार आहे, आणि आपला दिल रमविणार आहे ? "

" नाहींच. फार झालं तर तो इकडे येईल. आपल्या गळ्यांत हार घालील, दोन शब्द बोलेल आणि तुम्ही द्याल तें मुकाट्यानें काखेत मारून तुमचे आभार मानील आणि जाईल. "

" पण तें नाहीं बुवा आपल्याला पसंत ! "

इतक्यात दुसऱ्या अंकाला सुरवात झाली. रायाचें विचारयंत्र चालू होतें.

**नामी बेत.**

आपण येथपर्यंत सर्व गोष्टी नीट जुळविल्या पण आतां शेवटचा बार कसा उडवावा, याचा तो विचार करीत होता. त्यानें बरेच तर्क बाधले परंतु विशेष गाजावाजा न होतां आपला कार्यभाग कसा साधेल याचा विचार करता करता त्याला एक नामी युक्ति सुचली. तेव्हां तो बाजूला वळून बाळासाहेबांना म्हणाला, " बाळासाहेब, आपली इच्छा आहे, तसंच घडून यावं अशी माझीहि इच्छा आहे. कारण असं पहा, तुम्ही जें एवढें मंडळींना पारितोषिक देणार तें लोकांना दाखविण्याकरितां किंवा लोकांनीं तुम्हाला मोठे म्हणावें म्हणून नाहीं, तर आपला शोक पुरा करण्याकरितां देणार !—पण मी असं म्हणतों तुमची मोटार गाडी असेलच ? "

" हो हो आहे तर !-का बरं ? माझ्या मोटारमध्यें त्या वनमालेला आणणार कीं काय ?—वाः मग तर काय ? बहारच उडेल ! "

" आपली इच्छा असेल तर असंच करूं ! मग आपलें मन चाहेल तस दोन तास मोटारमध्यें फिरा आणि तेथेंच त्या मंडळींना काय द्यावयाचें असेल, त्या वनमालेला काय स्पेशल द्यावयाचं असेल तें सर्व मोटारमध्येंच तिला द्या. मला वाटतं हा बेत फार नामी होईल आणि आपल्या मनाप्रमाणेंहि होईल. "

" बस् बस् ! ठरलं ! असा जर बेत जुळवून आणाल तर हो आणखी काय पाहिजे ? " बाळासाहेब अत्यानंदानें म्हणाले " पण आपणालाहि आलं पाहिजे मोटारमध्यें ! आपण काहीं फार नाहीं, तुम्ही, मी आणि ती वनमाला ! "

नामी बेत ठरला. ताबडतोब राया उठून बाहेर आला आणि राजाला खूण करून एका बाजूला घेऊन गेला, थिएटरच्या खालीं उपहारगृह आहे, तेथें एका बाजूची एकांतातील खोली पाहून ते दोघे आत गेले आणि बसले. परंतु आत येतांना कोणाला संशय येऊं नये म्हणून त्यानें मसाल्याचें दूध मात्र मागविलें. बराच वेळ त्या दोघांचें खलबत चाललें होतें. नंतर राजा उठून गेला आणि राया पुनः थिएटरांत येऊन आपल्या खुर्चीवर बसला. नाटक चालूच होतें. थोड्या वेळानें राया बाजूला वळून बाळासाहेबास म्हणाला, ' मी व्यवस्था इतकी चोख केली आहे कीं विचारूं नका. नाटक आटोपल्यावर ही वनमाला ह्याच स्त्रीवेषांत आपल्या मोटारमध्यें येईल ! "

" काय म्हणतां ह्याच—ह्याच पोशाखांत येईल ? "

" येईल म्हणजे आतां शंका कशाला ? मग तुम्ही तिकडेच—मोटारमध्यें तास अर्धा तास फिरून तिला किंवा मंडळीला जें काय द्यावयाचें असेल तें द्या. आतां तिसऱ्या अंकाच्या शेवटीं ते तुम्हाला हारतुरे देतील. त्यावेळीं जें कांहीं बोलायचं तें सर्व काम मी करीन. आपण त्याविषयीं कांहीं काळजी करूं नये. "

**हारतुरे झाले.**

' आपण बोलणार का ? वाः वाः फारच उत्तम ! मलाहि तीच काळजी पडली होती. कारण मला उभं राहून काहीं दोन शब्द बोलतां येणें शक्य नाहीं. आणि माझ्याजवळ सभाधीट असा कोणी मनुष्यहि नाहीं. "

तिसऱ्या अंकाच्या शेवटीं पडदा पडल्यानंतर पुनः थोड्या वेळानें पडदा वर झाला. स्टेजवर चार खुर्च्या मांडल्या होत्या. मधल्या खुर्चीवर बाळासाहेब

दुसऱ्या खुर्चीवर राया आणि बाकीच्या खुर्च्यांवर बाळासाहेबांबरोबर आलेलीं दोन मेषपात्रे बसलीं होतीं. थोड्या वेळानें म्यानेजरनें बाळासाहेबाची आणि प्रेक्षकांची ओळख करून दिल्यावर त्याच्या गुणग्राहकतेची फार प्रशंसा केली. आणि मंडळीच्या वतीनें त्यांच्या गळयात हार घातला. नंतर दुसरा हार रायाच्या गळयांत घातला. मग तुरे वगैरे देऊन झाल्यावर राया उठला आणि म्हणाला, "आज मंडळीनीं बाळासाहेब निजामपूरकर यांचा जो सन्मान केला, तसा आपला सन्मान व्हावा हा मात्र बाळासाहेबांचा मुळींच उद्देश नव्हता. त्याना गुणीजनाची फार आवड आहे आणि तेवढ्याकरिताच ते येथें मुद्दाम आले आहेत. आजच्या प्रसंगीं त्यांनीं मंडळींना एक हजार रुपयाची बिदागी आणि मंडळीचे सुप्रसिद्ध नट तरुण गंधर्व यांस दोनशें रुपयांचा एक शालू व तीनशे रुपयाचा कठा दिला आहे." असें म्हणून राया बाजूला वळून म्यानेजरला अगदीं हळू म्हणाला, "उद्यां आपण बंगल्यावर या म्हणजे हें आपणास मिळेल." म्यानेजरनें अत्यंत लीनतेनें मान वांकवून नमस्कार केल्यावर राया पुढे म्हणाला, "आतां मी जास्त वेळ बोलून नाटक पाहण्याच्या आपल्या आनंदात विरस करीत नाहीं. करितां मंडळीची अशीच उत्तरोत्तर भरभराट होवो एवढें इच्छून मी आपली रजा घेतो."

"वा: आपण समयाला अनुसरून अगदीं छान भाषण केलें!" पुनः आपल्या खुर्चीवर येऊन बसल्यावर बाळासाहेब रायाला म्हणाले.

हळुहळू पांचवा अंक संपत आला, तेव्हां राया म्हणाला, "आपण मोटारगाडी दरवाजाजवळ आणण्यास सागा मी ह्या भामिनीला आणण्याची व्यवस्था करतों.

एखाद्या हर्षवायु झालेल्या मनुष्याप्रमाणें बाळासाहेब चटकन् उठले आणि त्यानीं आपली मोटार दरवाजाजवळ आणण्याचा हुकूम केला. राया दरवाजाकडे पहात उभा होता. त्याची चर्या किंचित् चितायुक्त दिसत होती. तो दरवाजांत कोणाची तरी वाट पहात होता असें दिसतें. चाच्या, मनोहर, गजाभाऊ आणि बाप्पा ही मंडळी दरवाजाजवळ उभी होती. तथापि ती मंडळी देखील बाहेर रस्त्यावर पहात होती. एकंदरीनें ती मंडळी कोणाची तरी वाट पहात होती, एवढें खरें! बाळासाहेब बाहेर जाण्याकरितां अतिशय उतावीळ झाले होते. नाटकाचें भरतवाक्य होऊन शेवटचा पडदा पडला. हळुहळू मंडळी गर्दीनें बाहेर पडूं लागली.

**वनमाला आली.**

" थांबा बाळासाहेब एवढी गर्दी मोडूं द्या ! " असें म्हणून रायानें सर्व गर्दी जाईपर्यंत बाळासाहेबांस थांबविलें. अद्यापि तो ज्याची वाट पहात होता, तो आला नव्हता असें दिसतें, ' आतां पुढें काय करावें ?' असा प्रश्न उद्भवून राया क्षणभर गोंधळला. तेव्हां त्यानें बाळासाहेबाकडे न पाहता दोन खुर्च्या बाजूला ओढल्या आणि दरवाजांत उभा असलेल्या गजाभाऊला हांक मारून दोन ' कोल्ड्रिंक ' मागविलीं.

" कशाला ? कशाला ? इकडे कशाला मागविलं ? बाळासाहेब म्हणाले आपण पुढें पुना हॉटेलमध्यें घेतलं असतं ? "

रायानें उत्तर दिलें नाहीं. त्याला वेळ काढावयाचा होता. पण आपण योजलेला व्यूह बरोबर पार पडतो किंवा मध्येंच काहीं घोटाळा होतो याची रायाला काळजी पडली. थोड्या वेळानें दोन ग्लासें भरून आलीं ! गजाभाऊच्या हातातून एक ग्लास घेऊन रायाने बाळासाहेबांना दिलें आणि दुसरें घेताना ' आला ? ' असा गजाभाऊला हळूच प्रश्न केला. तेव्हां त्यानें नकारार्थी मान हालविली. राया विचारांत पडला ! आतां थिएटरमध्ये बाळासाहेबांच्या मंडळीशिवाय कोणी राहिलें नव्हतें. सर्व मंडळी केव्हांच निघून गेली होती.

" चला आता का उगाच वेळ घालवितां ? मोटार आली आहे. "

" मी वेळ घालवीत नाहीं. पण म्यानेजरची वाट पहातों. आता नुकतेंच नाटक आटोपलें आहे. तेव्हां आतली व्यवस्था झाल्यावर वनमाला बाहेर येईल. आणि ती आली म्हणजे म्यानेजर आपणास सूचना देण्याकरितां येतील.

राया पुढें बोलतो तोंच दरवाजात उभा असलेल्या गजाभाऊनें खूण केली. त्याबरोबर राया " चला, आली तुमची वनमाला—भामिनी ! " असें म्हणाला.

**नाहीं मी बोलत आतां, नाथा !**

ग्लासात राहिलेलें कोल्ड्रिंक फेकून देऊन बाळासाहेब एकदम खुर्चीवरून उठले. त्यांच्या मागे राया होता. दरवाजाजवळ मोटार गाडी उभी होती. बाळासाहेबाना मोटरमध्यें बसताना पाहून रस्त्यांतील लोक त्यांच्या मोटारसभोंवतीं गोळा झाले. अद्यापि रस्त्यावर पुष्कळ गर्दी होती. इतक्यांत उपहारगृहांतून एक स्त्री बाहेर आली आणि मुरडत—हासत मोटारमध्यें चढली. तिला पाहतांच रस्त्यांतील मंडळी आपापसांत कुजबूजूं लागली.

" अरे, तो तरुण गंधर्व !—खात्रीनें तोच ! "

" छेरे ! तसा दिसला—"

" तो नसेल तर नाव बदलून देईन ! तुझी माझी पैज ! "

अशा रीतीनें प्रेक्षकांत पैज लागण्यापूर्वीच मोटार चालू झाली !

तीन वाजण्याच्या सुमाराला मंडळीच्या बिऱ्हाडीं टांगा येऊन उभा राहिला. टांग्यांतून राया आणि एक स्त्री खालीं उतरली. सर्व मंडळी बाहेर आली. गजाभाऊ पुढें होऊन म्हणाला, " का वनमाले ! शालू—कंठा मिळाला, आता तरी नाथाबरोबर बोलशील कीं, ' नाहीं मी बोलत नाथा आता ' करीत रडगाणं गात सर्व घरभर पिंगा घालीत बसशील ? "

" विनयवती मी तुमची कांता, नाथा ! मी कशी नाहीं बोलणार तुमच्याबरोबर आतां ? " असें मुरडत लवत बोलून गोप्या आत गेला. त्याच्यामागून सर्वजण आंत गेले.

रायानें मंडळीपुढें प्रथम रुमालांत बांधलेला शालू ठेविला. नंतर खिशांतून हजाराच्या नोटा काढल्या. इकडे गोप्यानें आपल्या गळ्यातला कंठा काढला. तेव्हां राया म्हणाला, " कायरे राजा, तुला थिएटरवर यायला इतका वेळ का झाला ? मी समजलों, कीं तूं काहीं आता येत नाहींस ! "

" आम्हाला वेळ लागला कारण टांगा मिळाला नाहीं. बाकी मी तू सांगितल्याप्रमाणें गोप्याला त्या भामिनीबरहुकूम पेंट देऊन अगदीं तयार ठेविली होती. "

" आणि त्याबद्दल मी तुला शंभरापैकीं शंभर मार्क देतों. बरं पण तूं त्या म्यानेजराला काय जाऊन सांगितलेस ? "

" त्याला मी अशी सोळा आणे थाप दिली कीं विचारूं नको ! त्याला आत नेऊन सांगितलं कीं, आमचे श्रीमंत तुमचं नाटक पाहून अत्यंत खुष झाले आहेत. त्यानीं आता मंडळींना देण्याकरिता जें काहीं बरोबर आणलं आहे, तें मंडळीच्या गुणाकडे पाहता काहींच नाहीं, असें आतां त्याना वाटूं लागलें आहे. आता आपण हारतुरे वगैरे जो समारंभ करणार आहात तो करा. आणि उद्यां सायंकाळीं बंगल्यावर या म्हणजे श्रीमंत आपल्या मंडळीला एक हजार रुपये आणि त्या मुख्य स्त्रीपार्टीकरिता दोनशेंचा शालू आणि तीनशेंचा कंठा देतील. हें माझें भाषण ऐकून तो म्यानेजर खुष झाला. त्यानें आंत जाऊन आपल्या मंडळींना तें सांगितलें. आणि बाहेर येऊन मला ' ठीक आहे. श्रीमंतांच्या इच्छेप्रमाणें होऊं द्या. ' असें सांगितलें. "

" आणि मीहि,भाषण करताना म्यानेजराला हळूच तसेंच बोलून दाखविलें, तेव्हां त्याना सशय येण्याला मार्गच उरला नाहीं. "

" बर पण तुम्ही मोटारमध्यें काय काय केलें तें तर ऐकूं द्या ? " राजानें विचारलें.

" मोटारमध्यें काय करणार ? बोलून चालून तो उल्लु प्राणी ! गोप्या मोटारमध्ये चढल्यापासून बराच वेळ बाळासाहेब त्याच्या तोडाकडे पहात होते. तो पुरुष आहे, कीं स्त्री आहे याचाच ते निर्णय करीत होते असं मला वाटतें. नंतर 'तुमचं काम फारच उत्तम झालं, तुमचा गळा फारच मधुर आहे. ॲक्टिंग अगदीं ठार मारून टाकतं. मी तुमच्यावर फार खुष आहें.' इत्यादि प्रशंसा केल्यावर कठा आणि शाल त्यांनीं गोप्याला दिला. गोप्यानेंहि मुरडून आणि मानेला हिसके देऊन बाळासाहेबांना अगदीं चीत करून टाकलं. नतर त्यानीं मंडळीकरिता ह्या हजारांच्या नोटा दिल्या. अर्धा तास बंड गार्डनच्या पुलावर आमची मोटार उभी होती. तेथून आम्ही पुना हॉटेलमध्यें आलों. तेथें चहा, केक यावर तडाखा मारल्यावर तेथून आम्हीं निघालों आणि चतरशिंगीपर्यंत एक चक्कर मारिली. वाटेंत बाळासाहेबाची स्तुति चालूच होती. 'तुम्ही कंपनी घेऊन आमच्या निजामपूराला या, मी तुमची योग्य व्यवस्था ठेवीन, संकोच बाळगूं नका ! असा त्यांचा आग्रह झाल्यावर आम्हीं परत फिरलो. तेव्हा वाटेंत मी मोटार उभी करण्यास सांगितले. बाळासाहेबाची इच्छा होती कीं, बिऱ्हाडापर्यंत मोटार आणावी. पण मीच नको म्हटल कारण मोटार पाहून आजुबाजूची मंडळी भलताच सशय घेतील, म्हणून आम्ही लष्करात टांगा केला आणि बाळासाहेब एकटेच मोटारमधून गेले. "

**मोटार मधून सहल.**

" आतां उद्या संध्याकाळीं मात्र बाळासाहेबाच्या बंगल्यावर मोठी मौज होईल. " गजाभाऊ म्हणाला, " म्यानेजरसाहेब तिकडे जातील, तेव्हां हा सर्व घोटाळा त्यांना कळेलच ! "

" घोटाळा कळून करणार काय ? बसतील शंख करीत झालं ! बाळासाहेबासारख्या उल्लु मनुष्याला फसविल्याबद्दल आपणाला कांहीं पाप लागत नाहीं. आपण नाटक मंडळीलाहि कांहीं बुडविलं नाहीं. त्याना जें काय मिळायचं तें उद्यां बाळासाहेबाकडून मिळेलच ! "

" तें कसंरे मिळणार राया ? " गोप्यानें विचारलें.

" लाजेकाजेस्तव दोनचारशें रुपये उद्यां बाळासाहेब त्या म्यानेजराच्या पदरांत टाकतीलच ! "

" जाऊं द्या आतां त्या गोष्टी ! आपलं काम झालं आतां उद्यां त्यांना वाटेल तें ते करोत ! चला आता चार वाजले. झोंपा—"

आधल्या दिवसाचें जाग्रण असल्यामुळें मंडळी बराच वेळ झोंपली होती. दुसऱ्या दिवशीं त्याचें जेवण होईपर्यंत सहज दोन वाजले. जेवतांना त्यांच्या गप्पागोष्टी चालू होत्या. बोलतां बोलतां बाप्पा म्हणाला.

" हें पहा राया, ह्या मोटारगाड्यांचा शहरांत अलीकडे फार झाला आहे सुळसुळाट ! "

" मग तुझी आहे का इच्छा एखादी मोटारगाडी ठेवण्याची ! बोल-उद्यां घेऊं एक विकत. "

" घातलं—घातलं पुनः तोंड ! राजा, तुला मध्यें तोंड घातल्याशिवाय चैनच नाहीं कारे पडत ? "

" जाऊंदे म्हटलं ना ! तूं त्याच्याकडे लक्षच देऊं नकोस ! सांग तुझी काय आहे सूचना ? "

" सूचना म्हणजे अशी— परवां आम्ही दोघेचौघेजण बेलबागेत गेलो होतों दर्शनाला ! येथून परत येत असतां बुधवारांत एक मोटारगाडी मला तुडवूनच जात होती पण—"

" तुडविलं नाहींना ? मग जाऊंदे त्या गोष्टी ! "

" मग जाऊंदे कशा ? आणि मी मेलों असतों मग ? "

" दुनिया ओस नसती पडली ! "

" पण बापू, तें नाहींरे सांगितलंस ? " मध्येंच श्रीपाद म्हणाला.

" अरे हो ! बरी आठवण केलीस. " बापू म्हणाला. " हें पहा राया, आज दोन तीन दिवस आम्ही बेलबागेंत एक मौज पाहिली. संध्याकाळीं पांच साडे-पांचाच्या सुमारास एक गृहस्थ, तीसपस्तीस वर्षाचा, दिसण्यांत सुशिक्षित, सभ्य पण कृतींनें हलकट, असा एक संभावित देवळाच्या चौथऱ्यावर येऊन बसतो आणि देवदर्शनाकरितां येणाऱ्या जाणाऱ्या बायकांचे चेहरे न्याहाळीत असतो. काल तर त्यानें कमालच केली. एक तरुण विधवा देवदर्शनाकरितां

बेलबागेंतील मौज.

आली, तिला तर त्यानें जातां येतां खुणा केल्या पण ती बिचारी त्या मार्गातली नव्हती.—"

"असं कशावरून तूं म्हणतोस बापू"

"कशावरून म्हणजे? मनुष्याच्या चर्येवरून ओळखता येत नाहीं वाटतं!"

"अस्सं! एकूण तुम्ही मनुष्यपारखीहि आहांत म्हणायचे! बरं पुढे?"

"पुढे काय? ती बिचारी घाबरून तेथून निसटली."

बराच वेळ ह्याच गोष्टीवर त्याची चर्चा चालली होती. परतु रायानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. त्यानें मुकाट्यानें आपलें जेवण आटोपलें, शेवटीं उठतांना तो म्हणाला, "बापू, तूं सांगितलेल्या दोन्ही गोष्टी विचार करण्यासारख्या आहेत. पैकीं मोटारगाड्यांचा विचार पुढे करूं. परंतु ही आता दुसरी सांगितलेली गोष्ट मात्र तात्काळ विचारांत घेतली पाहिजे. चला उठा आता दिवाणखान्यांत गेल्यावर त्याचा विचार करूं." असें म्हणून तो उठला.

**उद्यां सहा वाजतां दिंडी उघडी ठेवा.**

रायानें हात धुतल्यावर पुनः सर्व मंडळी एकत्र जमली, आणि बेलबागेंत चौथऱ्यावर बसणाऱ्या गृहस्थाला वठणीला आणण्याकरिता काय काय करावयाचें त्याचा खल झाला. दुसऱ्या दिवशीं राया स्वतः बापूबरोबर बेलबागेंत गेला आणि त्यानें त्या गृहस्थाला पाहिलें. इतकेच नव्हे तर तेथें आणखी एक दोन घाणेरडे प्रकार त्याच्या दृष्टीस पडले. देवळात पुराण चाललें होतें. कांहीं भाविक आणि वृद्ध बायका पुराणाला बसल्या होत्या. त्यात काहीं तरुण विधवा, तरुणी आणि काहीं गृहस्थी स्त्रियाहि होत्या. पलीकडे पुरुष मंडळींत कांहीं तरुणहि होते. त्यांचें लक्ष्य पुराणकारापेक्षा समोर बसलेल्या तरुणीकडे विशेष असावें असे दिसत होतें. राया देवळांत आल्यावर त्यानें सूक्ष्म निरीक्षण करण्यास सुरवात केली. त्यानें तो सर्व प्रकार पाहिला. इतक्यात दुसरे एक गुलाबी पगडीचे गृहस्थ देवळात आले. तोंच बायकांत बसलेली एक वृद्ध विधवा उठली आणि त्याच्याजवळ आली. देवळाच्या पायरींजवळ त्यांची भेट झाली. राया पायरीजवळच उभा असल्यामुळें त्यानीं हळुहळू केलेला गुप्त संवाद त्याला ऐकूं आला.

"दुर्गाबाई, कांहीं वळतं का गाडं?" त्या गुलाबी पागोट्याच्या गृहस्थानें विचारलें.

"अहो वळतं का म्हणून काय विचारतां? ह्या दुर्गाबाईनें हातांत काम

घेतल्यावर त्यांत यश नाहीं असं कधीं झालंय् का ? " वृद्ध विधवेनें उत्तर दिलें, " अहो, मी मी म्हणणाऱ्या आणि नाकानें कांदे सोलणाऱ्या बायका ठावल्या वाटेला, तर ह्या पोरीची काय कथा ! "

" असं तर खरच दुर्गाबाई ! " तो गृहस्थ म्हणाला, " मी तुमचं सामर्थ्य जाणत नाहीं असं का तुम्हाला वाटतं दुर्गाबाई ? पण काय हो, काय ठरलं शेवटीं ? "

" ठरलाहे सगळं ! पण प्रथम माझी मेहनत ? "

" ती तर तयार आहे. चला अशा बाजूला या—" असें म्हणून तीं दोघें देवळाच्या बाजूला झालीं. तेव्हा त्या गृहस्थानें खिशातून एक कागदाची घडी काढून ती तिच्या हातीं दिली. ती पांच रुपयाची नोट होती. ती नोट घेऊन दुर्गाबाई म्हणाली, " उद्या संध्याकाळीं सहा वाजतां तुम्हीं तुमच्या घराच्या मागल्या दरवाजाची दिंडी उघडी ठेवा. ती तुमच्याकडे येईल. पण जरा सांभाळा हो ! अगदीं नवखंच पोर आहे तेव्हां बिचकण्याचा संभव आहे. "

" त्याची नको तुम्हाला काळजी ! हा कांहीं माझा पहिलाच प्रसंग नाहीं !"

" पण दुर्गाबाई येईल खरी ना ? मी वाट पाहूं ना ? "

" हो हो तर ! ही पहा मी आतां तिकडेच निघालें. पण बळवंतराव जरा सावधगिरीनें असा हो ! "

" त्याची नको तुम्हाला काळजी. "

**समाजकार्यांत पुढारीपण.**

दुर्गाबाई जाऊं लागतांच रायानें बापूला खूण केली, तेव्हा तो तिच्या मागून जाऊं लागला. राया मात्र त्या गुलाबी पगडीच्या गृहस्थाच्या मागें होता. थोड्या वेळानें तो गृहस्थ देवदर्शन घेऊन बाहेर पडला. त्यावेळीं त्याच्या चर्येवर हास्य दिसत होतें. तो आपल्या विचारात दंग होता. रायाहि त्याच्या मागें होता इतक्यांत बुधवारात लायब्ररींतून एक गृहस्थ बाहेर पडले. त्यानीं रायाच्यापुढें चालणाऱ्या गुलाबी पगडीच्या गृहस्थाला पाहतांच त्यांस हांक मारिली.

" कां बळवंतराव, कुणीकडे निघालात ? " त्या गृहस्थानें विचारलें, " गेल्या आठ दहा दिवसांत अगदीं आला नाहींत ? कुठल्या एवढ्या कामात होतां ? "

" नाहीं कांहीं विशेष नाहीं—"

"मग उद्यां येणार ना? उद्या आपल्या संस्थेमार्फत सध्याकाळीं त्या प्रो. ×× चें लेक्चर आहे—"

"उद्या?—छे बुवा! उद्या मला विशेष काम आहे—"

"अहो तुम्हा श्रीमंताना कामं हीं रोजचींच असतात—पण त्यांतल्या त्यांत कांहीं सवड केली पाहिजे. तुमच्यासारख्यांनीं तर ह्या समाजकार्यात पुढारीपण घेतल पाहिजे."

"तें खर हो! पण एवढा उद्याचा दिवस मला माफ करा."

पुढें थोडा वेळ संभाषण झाल्यावर बळवंतराव उर्फ गुलाबी पगडीवाले पुढें निघाले. त्याच्या मागून राया होताच! किर्लोसकर थिएटरावरून बळवंतराव कसब्यात वळले. तेथे त्याचें घर होते. रायानें आजुबाजूला चौकशी केल्यावर त्यांचें सर्व नाव बळवंतराव हरिभाऊ पण्डित असें असून घरचा तो श्रीमंत आहे असें त्यास कळले. नंतर रायानें मागल्या बाजूला जाऊन पाहिलें. तो घराच्या पिछाडीला एक बोळ असून तेथूनहि मागल्या बाजूनें घराला एक दरवाजा होता. बाजूला एक लाकडाची वखार होती.

**देवळांतील महार-वाडा.**

इतका शोध करून राया बिऱ्हाडीं आला तों दिवे लावण्याच्या सुमारास बापुहि परत आला. त्यानें दुर्गाबाईच्या मार्गें जाऊन तिनें म्हटलेल्या 'नवख्या पोरी' चें घर पाहिले. 'ती मोरोपंत ललितांची विधवा मुलगी असून त्याना कोठल्याशा एका सरकारी कचेरींत पाऊणशें रुपये मिळत असतात,' इतकी माहिती मिळाल्यावर पुढें काय करावयाचें ते ठरवून मंडळीनीं आपलीं जेवणे आटोपलीं. नंतर राया आणि राजा हे दोघे मोरोपंत ललितांच्या घरीं जाण्यास निघाले. आमची मंडळी गेली त्यावेळीं मोरोपंत नुकतेच जेऊन उठले होते. प्रथम नमस्कार चमत्कार झाल्यावर मोरोपंतानीं विचारलें, "आपणास मी कधीं पाहिलेलं दिसत नाहीं. आपण कुणीकडे असतां?

"मी सध्या सिनिअर बी. ए. क्लासांत असतों. माझें नाव मनोहर जोग. मी आपणाकडे काही एक हेतु मनात योजून आलों आहें." रायानें बोलण्यास सुरवात केली. 'हे माझे क्लासफ्रेंड श्रीधर देशमुख. आम्ही काल सहज बेल-बागेत गेलों होतों. तेथें कांहीं गोष्टी पाहून आमच्या मनात एक विचार घोळूं लागला आहे. कांहीं सभ्य दिसणारे गृहस्थ तेथें येतात. त्या पवित्र स्थानीं त्यांची एक एक कृति पाहिली म्हणजे अंगावर शहारे येतात—"

" अहो, हा प्रकार कांहीं आजचा नाहीं. हें असं चालायचंच ! गांव आहे तेथें महारवाडा असायचाच ! "

" गावांत महारवाडा आहे व असतोहि ! त्याबद्दल विशेष विचार करण्याची आवश्यकता नाहीं. पण हा महारवाडा देवळांत—हिंदूच्या पवित्र स्थानीं आहे. तेव्हां त्याबद्दल अवश्य विचार झाला पाहिजे. "

" होय. पण ही गोष्ट कोणी करावी ? हा एक प्रश्न आहे ! "

" आम्ही घेतों ही गोष्ट मनावर ! माझे कांहीं कॉलेजमित्र आहेत. पण आपण आम्हाला सहाय्य करावें. "

" ठीक आहे. मी काय करावं असं आपलं म्हणणं आहे ! "

" उद्या सायंकाळीं आपण आमच्या बरोबर यावं आणि खरी वस्तुस्थिति डोळ्यांनीं पहावी नंतर काय करायचं तें आपण ठरवूं. "

नंतर दुसऱ्या दिवसाचा कार्यक्रम ठरवून राया आणि राजा परत बिऱ्हाडीं आले.

**तरुणीच्या मुग्ध प्रेमचेष्टा.**

पाचाचा सुमार झाला होता. राया, राजा, चिंतामण, श्रीपाद आणि मोरोपंत लळीत इतकी मंडळी इतर मंडळीबरोबर बेलबागेत ठरल्याप्रमाणें पुराण ऐकण्याकरितां बसली होती. आधल्या दिवशीं रायाने न्याहाळून ठेविलेले सभ्य गृहस्थ देवळाच्या चौथऱ्यावर देवदर्शनाकरिता येणाऱ्या स्त्रियांचीं तोंडें पहात बसले होते. इतक्यांत अठरा वर्षाची एक तरुणी देवदर्शनाकरिता आली. तिनें आंत येताना एकदा त्या गृहस्थाकडे पाहिलें. नंतर देवळाच्या पायऱ्या चढताना एकदा मागें वळून पाहिलें. पुनः आत गेल्यावर पाहिलें. अशा रीतीनं दोनतीनदा पाहून झाल्यावर प्रदक्षिणा करताना एकवेळ हास्य मुद्राहि केली. ह्या सर्व त्या तरुणीच्या मुग्ध प्रेमचेष्टा पाहून चौथऱ्यावर बसलेला गृहस्थ उठला. तरुणीच्या सर्व चेष्टा आपणास पाहूनच आहेत असें त्याला वाटलें. तो उठला असें पाहून ती तरुणी प्रदक्षिणा करण्याच्या उद्देशानें उजव्या बाजूला वळली आणि देवालयाच्या मागें जाऊं लागली. तो गृहस्थहि प्रदक्षिणा करण्याच्या वरकाति हेतूनें देवळाच्या मागें गेला. हा सर्व प्रकार देवळांत येणाऱ्या जाणाऱ्यांना किंवा पुराण ऐकत बसलेल्या भाविकांना संशय न येईल अशा रीतीनें झाला. परंतु रायाचें सर्व लक्ष त्यांच्यांकडे होतें. आणि तो सर्व प्रकार आपल्या शेजारीं बसलेल्या मोरोपंत लळितांना दाखवित होता.

चौथऱ्यावरून उठून तो सभ्य गृहस्थ त्या तरुणीच्या मागें गेलेला पाहून राया आदिकरून मंडळी उठली. इतक्यात देवळाच्या मागून एक किंकाळी ऐकू आली. त्याबरोबर राया एकदम पुढें झाला. त्याच्या मागून मोरोपंत आणि इतर मंडळी धावली. देवळाच्या मागें एक विलक्षण प्रकार त्यांच्या दृष्टीला पडला तो सभ्य गृहस्थ भयभीत असा दगडी पुतळ्यासारखा उभा असून त्याच्यापुढे ती तरुणी हुंदके देत परतु त्याच्यावर शिव्यांचा वर्षाव करीत उभी होती.

" मेल्या तुझ्या हाताला आग लागली ती! चाडाळाचं निसंतान झालं तें! "

हां हां म्हणतां तेथें गर्दी जमली! रायानें पुढें होऊन त्या सभ्य गृहस्थाच्या एक सणसणीत श्रीमुखांत लगावली आणि त्याची मान धरून त्या तरुणीकडे वळून त्यानें विचारलें, " बाई, ह्या पाजी मनुष्यानें आपणाबरोबर कांहीं फाजील-पणा केला काय ? "

" मेल्याचे हात झडतील! चाडाळानें मला येथे एकटीला पाहून मागून येऊन माझा पदर किंहो धरला ! "

हुंदके देत देत त्या स्त्रीने इतके शब्द उच्चारले असतील नसतील तों राया आदिकरून मंडळी त्या गृहस्थावर घसरली. प्रत्येकानें आपल्या हाताचें पारणें फेडून घेतलें. सर्व देवळात गलबला झाला पुराणिक बुवाचें पुराण तितक्यावरच थाबलें. जो तो काय प्रकार आहे तें पाहण्याकरिता पुढे पुढें होऊं लागला. कोणाची कांहीं कोणाची काहीं, अशीं निरनिराळीं मतें ऐकू येऊं लागलीं. कोणी कोणी म्हणे " हा मनुष्य आज पंधरा दिवस येथें येऊन बसतो. दिसण्यांत तर सभ्य पण कृति पहा कशी नीच! " तों दुसऱ्यानें म्हणावें, " परवां देखील यानें एका स्त्रीबरोबर असाच अतिक्रम करण्यांचा विचार केला होता पण ती बिचारी सज्जन बाई मुकाट्यानें खालच्या मानेनें देवदर्शन घेऊन गेली. ह्या हलकटांना शेण खायचं तर बाहेर जागा नाहीं वाटतं! इकडेच येतात देवळांत झक् मारायला ! "

**पक्की अद्दल घडली !**

हा इतका प्रकार होईपर्यंत ती तरुणीहि तेथून निसटली. हें पाहून राया त्या सभ्य गृहस्थाकडे वळून म्हणाला, अहो महाराज, आतां तरी ह्या झाल्या गोष्टीवरून धडा घ्या आणि कांहीं तरी पुण्यकर्मात आपल्या आयुष्याचा

व्यय करा. जा आतां, झाली इतकी शोभा पुष्कळ झाली. निघा—व्हा येथून चालते—"

बिचारा खजील झालेला तो गृहस्थ खालच्या मानेनें हळुहळू देवळाच्या बाहेर पडला. इकडे राया आपल्या मंडळीस घेऊन मोरोपंतांसह दुसऱ्या कामगिरीवर जाण्याकरितां निघाला. त्यावेळीं सहा वाजण्याचा सुमार झाला होता. "आतां कुणीकडे निघालां ?" मोरोपंतांनीं विचारलें.

**नोकर गडबडला.**

"येथें जरा कसब्यांत जायच आहे." रायानें उत्तर दिलें. "आपणास तेथेंहि एक मौज पहावयास सांपडेल अशी माझी खात्री आहे."

मंडळी लवकरच कसब्यात आली. तेथें वखारीजवळ बाप्या उभा होता. राया आदिकरून मंडळीला येतांना पाहून तो पुढें झाला आणि म्हणाला. "आता नुकतीच आंत गेली. पांच मिनिटंहि झालीं नाहींत. तो दरवाजाहि तसाच अर्धा उघडा आहे."

"चला मोरोपंत, आपणास ह्या घरीं गेलें पाहिजे." राया पुढें होऊन म्हणाला.

दरवाजाच्या दिडींतून ते सर्वजण आंत गेले. तेथें कोणी नव्हतें. ते पाहून राया धिटाईनं पुढें झाला. इतक्यांत एक नोकर पुढें आला. त्याच्याकडे वळून राया एकदम जोरानें म्हणाला. "कायरे, बळवंतराव आहेत ना घरांत ? चल आम्हाला घेऊन त्यांच्याजवळ—"

"नानासाहेब नाहींत घरांत—"

"चोरा, खोटं बोलतोस काय ? देऊं का एक मुस्कटांत ! तुला माहित नाहीं वाटतं मी कोण आहे तो ! बिड्या ठोकीन हातांत तेव्हां समजेल ! चल—मुकाट्यानें तुझे नानासाहेब कोठल्या खोलींत आहेत तें दाखीव."

नोकर गडबडला ! इतक्यात एक म्हातारी आजीबाई दरवाजात डोकावून म्हणाली, "अरे गोविंदा, नानासाहेब वर आहेत ना आणि नाहीं म्हणून काय सागतोस ! जा त्यांना घेऊन वर !"

मंडळी माडीवर आली. परंतु पुढल्या दालनाचा दरवाजा आंतून बंद होता. तें पाहून मोरोपंताकडे वळून राया हळूच म्हणाला, "मोरोपंत, आतां येथें जो काहीं प्रकार आपल्या दृष्टीस पडेल, त्यामुळें आपण क्रोधायमान व्हाल; पण होतां होईल तों तुम्ही आपल्या मनाची शांतता ढळूं देऊं नका. मी ह्या

सर्व गोष्टीला बिनचूक तोड काढून ठेविली आहे." असें म्हणून रायानें पुढें होऊन दरवाजा खडखडविला !

"कोण आहे ?" आंतून प्रश्न आला.

"मी आहें गोविंदा." रायानें उत्तर दिलें.

"काय पाहिजेरे तुला ?—जा आतां मग ये—"

"पण जरा ऐका—नानासाहेब, जरा दरवाजा उघडा."

"काय आहेरे कटकट—" असें म्हणून बळवंतराव ऊर्फ नानासाहेबानें दरवाजा उघडला.

आंत टेबलाजवळ एक तरुण विधवा उभी होती. तिच्याकडे दृष्टि जातांच

**अगबाई-बाबा !**

"कोण यमू !" असे उद्गार मोरोपंताच्या तोंडून बाहेर पडले ! त्याबरोबर यमूनें मागें वळून पाहिलें. तो मोरोपंत तिच्या दृष्टीस पडले. त्याबरोबर "अग बाई—बाबा !" असे भीतियुक्त शब्द तिच्या मुखातून बाहेर पडले. आणि क्षणात तीं धाडकन् जमिनीवर पडली ! त्याबरोबरच बळवंतरावाचा चेहराहि काळा ठिक्कर पडला.

"हवालदार, प्रथम एक गाडी घेऊन या—" आपण पोलिसचे खासगी पोषाखांतील लोक आहोंत, असा बाहाणा करून अधिकारयुक्त वाणीने राया म्हणाला, "आणि मोरोपंत, तुम्ही हिला प्रथम घरीं घेऊन जा. मी या बळवंतरावाची—नानासाहेबाची व्यवस्था लावून आपणाकडे येतो, तोंपर्यंत आपण कांहीं हालचाल करूं नये. मी आल्यावर सर्व व्यवस्था करतों.

रायाचा अधिकारी बाहाणा पाहून मोरोपंतहि त्याच्याकडे पहातच राहिले. प्रथम त्यानें आपण कॉलेजातील विद्यार्थी आहोंत असें सांगितलें आणि आतां हा पोलिस अधिकाऱ्यासारखा हुकूम करतो तेव्हा यातील खरें कोणतें ? हेंच त्यांच्या लक्षांत येईना. ह्या प्रकरणांत पोलिस जर असेल तर मग आपल्या अब्रूचे धिंडवडे होतील, हा विचार मनांत येऊन मोरोपंतांचें मन अस्वस्थ झालें.

"मोरोपंत, आतां विचार करीत उभें राहण्यांत कांहीं अर्थ नाहीं ! प्रथम आपल्या या मुलीला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करा आणि तिला येथून घेऊन जा. मला ह्या नानासाहेबाबरोबर पुष्कळ काम आहे."

रायानें पुनः सूचना करतांच मोरोपंत मुकाट्यानें पुढें झाले आणि यमूला शुद्धीवर आणण्याच्या प्रयत्नाला लागले. जवळच पाण्याचा लोटा होता, त्यांतील पाणी तिच्या तोंडावर शिंपडतांच ती शुद्धीवर आली. इतक्यांत

राजानें एक टांगाहि आणला. तेव्हा राया पुढें म्हणाला, " मोरोपंत, मी येथून माझं काम आटोपून तुम्हांला भेटेपर्यंत तुम्हीं आपलें चित्त शांत ठेवा. मुलीला कांहीं बोलूं नका, मी आल्यावर पुढचा विचार करूं ! "

यमुना खालच्या मानेनें आपल्या पित्याबरोबर खालीं उतरली. इतका प्रकार

**फरासखान्यांत येतां, किं आपसांत हें मिटवितां?**

होईपर्यंत बळवंतराव एखाद्या महान् अपराध्याप्रमाणें एका बाजूला अधोवदन करून उभा होता. त्याची छाती धाड्धाड् उडत होती. हात पाय लटलटत होते. आतां हें प्रकरण कोठल्या थराला जाईल याची त्याला कल्पनाहि होईना.

" या, नानासाहेब, असे पुढें या. " राया जोरात म्हणाला, " मी कोण आहे, हें तुम्हाला कळलें काय ? नसेल कळलं तर फरासखान्यात चला म्हणजे कळेल ! तुमचीं हीं घाणेरडीं कृत्यें आम्हाला आजच माहित आहेत असं नाहीं. तुम्हीं श्रीमत लोक ! तुमच्या अब्रूला धक्का बसेल म्हणून आम्ही इतके दिवस तुमच्याकडे दुर्लक्ष केलें. पण आता तुम्ही हजारों रुपये जरी खर्च केलेत, तरी तीन वर्षांच्या खालीं कांहीं तुम्ही सुटत नाहीं, हें पक्कें लक्षात ठेवा. तुमच्या विरुद्ध सर्व साक्षीपुरावा अगदीं जय्यत तयार आहे. शिवाय ह्या वेळीं तुमची ती कुंटिण दुर्गाबाई देखील तुमच्या विरुद्ध पुरावा देण्यास फरासखान्यांत बसली आहे. बोला, काय विचार आहे ? फरासखान्यांत येतां कीं हें, प्रकरण आपसांत मिटविता ? "

" जमादारसाहेब, मी अगदीं लाचार आहें. तुम्ही सांगाल तसें मी करतो. होऊं नये ती गोष्ट झाली ! आतां त्याचा दंड भरलाच पाहिजे. " नानासाहेब खालच्या मानेनें म्हणाले.

" होऊं नये ती गोष्ट झाली काय ? " रायानें कपाळाला आठ्या घालून हिणवीत विचारलें, " नानासाहेब, तुम्हांला ह्या गोष्टीची शरम वाटावयास पाहिजे होती. कुंटिणीच्या साहाय्यानें अशीं नीच घाणेरडीं कृत्यें करून ' होऊं नये ती गोष्ट झाली ' अशी संभावितपणाची बतावणी करतां काय ? शरम वाटते तुम्हाला ! संभावित गृहस्थांचीं घरं बिघडविणाऱ्या तुमच्यासारख्या हलकट नरपशूंना न्यायी सरकारनें कोरड्याची जी शिक्षा ठेविली आहे तीच योग्य आहे. मी समजत होतों कीं, ह्या गोष्टीचा तुम्हाला पश्चात्ताप झाला असेल, तेव्हां आपण आपसांत हें प्रकरण मिटवावें. पण आतां तुमची ही

भाषा ऐकून तुमच्यासारख्या निढावलेल्या बेरडाला तीन वर्षे फरासखाना आणि पोलिसचे सणसणीत कोरडेच योग्य आहेत. चला आतां तुमच्याबरोबर जास्त बोलण्यात अर्थ नाहीं. हं—चला, व्हा पुढें. नाहीं तर धक्की मारून गचांडी देईन—"

"जमादारसाहेब, मी तुमच्या पायां पडतों–मी तुम्हाला शरण आलों आहें. माझी अब्रु वांचवा—" असें दीनवाण्यासारखें

**लांच देतां काय?** म्हणून नानासाहेब बाजूच्या कपाटाजवळ गेले आणि तें उघडून त्यांतून त्यानीं दहा दहा रुपयाच्या दहा नोटा बाहेर काढल्या. राया त्याच्याकडे पहात होता. त्यानें नोटा जेव्हा हातांत दिल्या, तेव्हा त्या किती आहेत तें पाहून त्यानें एकदम फेंकून दिल्या.

"लांच देता काय?—हा एक आणखी सबळ पुरावा! पाजी मनुष्य!" दरडावून राया म्हणाला. आणि खरोखरच त्यानें नानासाहेबाला एक जोराचा धक्का दिला त्याबरोबर भयभीत होऊन त्याची पांचांवर धारण बसली! त्यानीं मुकाट्यानें रायाचे पाय धरले.

"जमादारसाहेब, चुकलों–क्षमा करा! तुम्ही सांगाल तसं करतों पण मला वाचवा! मी तुमचे उपकार जन्मभर विसरणार नाहीं. मला अभय द्या!"

नानासाहेब अगदींच गयावयां करूं लागलेले पाहून रायानें त्याना उठविलें.

"हं—उठा—तुम्हाला जर खरा पश्चात्ताप झाला असेल तर माझ्या समक्ष 'अशा वाईट फंदांत कधींहि पडणार नाहीं' अशी शपथ घ्या आणि सेवासदन आणि अनाथबालिकाश्रम ह्या संस्थाना प्रत्येकीं दोनशें रुपये देण्याकरीतां आतां मजजवळ द्या. म्हणजे मीं ह्या सर्व गोष्टी आपसातच मिटवून टाकतों."

नानासाहेब मुकाट्यानें उठले. आणि कपाटांतून रायानें म्हटलेली रक्कम काढून त्याच्या स्वाधीन केली. नंतर खालच्या मानेनें परंतु पश्चात्तापपूर्वक त्यानें सांगितल्याप्रमाणें शपथ घेतली.

रायानें चारशें रुपये खिशांत टाकले. आणि पुनः एक वेळ नानासाहेबांस बजावून ती मंडळी जाण्याकरीता निघाली. मोरोपंतांच्या

**सेवासदनांत पाठवावें.** घरीं जाईपर्यंत ती मंडळी आपल्या कपटनाटकाचा शेवटचा अंक कसा वठतो याचा विचार करीत चालली होती. मोरोपंत आपल्या दिवाणखान्यांत सचिंत बसले होते, रायाला आंत आलेला पाहून त्यांनीं फक्त नमस्कार केला.

" मोरोपंत आतां झाल्या गोष्टीचा खेद करण्यांत कांहीं अर्थ नाहीं." राया म्हणाला, " अद्यापि इतक्या काहीं वाईट थराला गोष्ट गेली नाहीं. तेव्हां आपण अजून प्रयत्न केल्यास सर्व काहीं ठीक होईल, अशी मला पुष्कळ आशा आहे. पण तुम्ही मुलीला काहीं बोलला काय ?"

" त्या कार्टीचं मी आतां नांव देखील घेणार नाहीं."

" छे छे ! ह्या तुमच्या कृतीनें मात्र सर्व गोष्ट बिघडून जाईल. आता मुलीचा झाला तो अपराध पोटांत घालून तिला दोन हिताच्याच गोष्टी सागितल्या पाहिजेत म्हणजे अशा अपराधात देखील प्रत्यक्ष बापाचीं सहानुभूति आहे असें पाहून तिचें सात्विक मन जागृत होईल. ह्यावेळीं तिच्यावर रागावण्यापेक्षां तिला जवळ ओढून खजील करणं हीच खरी शिक्षा आहे. आतां तिला दोन हितोपदेशाच्या गोष्टी सागून तिचे मन गुतविण्याकरिता तिला उद्यापासून येथील सेवासदनांत तुम्ही पाठवावें असें माझें मत आहे."

" तुमचें म्हणणें खरें आहे." बराच वेळ विचार करून मोरोपंतांनीं उत्तर दिलें, " ह्या वेळीं तिला सहानुभूतीचीच अपेक्षा आहे असं मला वाटतं !"

**दुर्गाबाईचें कारस्थान.**

पुढें बराच वेळ त्यांच्या गोष्टी झाल्यावर राया जावयास निघाला. त्यानें आपली कामगिरी उत्तम प्रकारें बजाविली. कारण त्यानें ज्या ज्या गोष्टी सागितल्या त्या सर्व मोरोपंताना पटल्या. आणि त्यानीं त्याच रात्रीं यमुनेला जवळ बोलावून गोड शब्दान विचारलें. तेव्हा पूर्ण पश्चातापपूर्वक तिच्या डोळ्यांत पाणी आलें. तिनें सर्व खरीखरी हकीकत सागितली. ती वाचकाकरितां येथें संक्षिप्त रीतीनें दिली आहे.

बळवंतराव—उर्फ नानासाहेब यांची यमुनेवर नजर गेल्यावर ती आपणास प्राप्त व्हावी म्हणून त्यानें दुर्गाबाईला आपल्या हाताशीं धरलें. आणि तिला त्यानें यमुनेचें घर दाखविलें. प्रथम दुर्गाबाईनें त्या घरात किती मंडळी आहेत; बायका पुरुष किती आहेत. याची बाहेरून चौकशी करून एके दिवशीं ती लुगडीं खण विकण्याच्या निमित्तानें यमुनेच्या घरीं गेली. एक दोन खण आणि यमुनेला पसंत पडलेलें लुगडें मुळांत घट खाऊन स्वस्त दिल्यामुळें ही बाई चांगली आहे, असा यमुनेच्या आईचा ग्रह झाला. पुढें दुर्गाबाई दोन दिवसांनीं पुनः त्यांच्या घरीं जाऊन यमुनेच्या आईला आपणाबरोबर पुराणाला येण्याचा आग्रह करूं लागली. परंतु वेळेची सबब सांगून

तिनें जाण्याचें नाकारलें. पुढें दोन चारदां प्रयत्न केल्यावर त्या मायलेकी पुराणाला जाऊं लागल्या. नंतर ती एकटीच यमुनेला घेऊन देवळात जाऊं लागली. असे दोन चार दिवस गेल्यावर दुर्गाबाईनें आपलें जाळें पसरण्यास सुरवात केली. पूर्वी ठरवून ठेवल्याप्रमाणें नानासाहेब त्यांच्या जाण्या-येण्याच्या मार्गावर दृष्टीस पडूं लागले. नंतर त्यानीं त्याच्याकडे पाहून हांसण्याला सुरवात केली. ही गोष्ट एके दिवशीं दुर्गाबाईने त्या भाबड्या पोरीच्या लक्षात आणून दिली. व ती हळुहळू तिची विषयवासना जागृत करण्याच्या गोष्टी सागूं लागली. अशा रीतीनं यमुनेला आपल्या अंकित करून तिनें नानासाहेबाकडे जाण्याचा दिवस ठरविला. वाचक हो ! अशा कारस्थानी स्त्रियाना आपल्या घरापासून दूर ठेवा !

राया बि-हाडीं आला, त्यावेळीं बरीच रात्र झाली होती. मंडळीचे जेवण आटोपल्यावर जेव्हां ते सर्वजण एकत्र बसले त्यावेळीं

**वडीलांचें पत्र.**

मन्याबापू म्हणाला, " राया, आज संध्याकाळच्या डाकेने मला वडिलाचें पत्र आलें आहे. बरेच दिवस झाले, मी घरीं यावें अशी त्याची इच्छा आहे. तेव्हा आता मी त्यांच्या पत्राला काय उत्तर लिहावें तें सांग ? "

" मलाहि घरीं जाण्याची इच्छा आहे. पण गोपाळ कुठें आहे ? तो नाहीं कुठें दिसत ? " रायानें विचारले.

गोप्या दुसऱ्या खोलींत होता, तो आता बाहेर आला. त्याला पाहताच राया म्हणाला, " शाबास गोपाळ, आज तूं आपली भूमिका सोळा आणे वठविलीस ! तुला पाहून तो देवळातला बेरड मनुष्य साफ फसला. पण कायरे, तूं देवाला प्रदक्षिणा करतांना त्याला खूण केलीस आणि तोहि तुझ्या मागून गेला. पुढें काय झालं ? "

" माझ्या मागून तो खाकरत आला, " गोप्यानें हासत हासत उत्तर दिलें " आणि मला स्त्रीच समजून 'तुम्ही कुठें राहता ?' असा प्रश्न केला. मी कांहींच उत्तर दिलें नाहीं. तेव्हा तो पुढें म्हणाला, 'अशा लाजूं नका, मी कोणी परका नाहीं.' असें म्हणून त्यानें माझा हात धरला. त्याबरोबर मी पूर्वी ठरल्याप्रमाणें एकदम किंकाळी मारिली. इतक्यात तुम्ही सर्वजण आलांत. "

वरील गोप्याच्या भाषणावरून देवळात आलेली स्त्री कोण ह्याचा आतां

**पुढील तजवीज.** वाचकांना पूर्ण खुलासा झालाच असेल! असो. पुढें थोडा वेळ त्याच गोष्टी झाल्यावर राया म्हणाला, "आतां आपण थोडे दिवस विश्रांती घेतली पाहिजे. हा क्लब स्थापन केल्यापासून आज जवळजवळ साडेतीन वर्षे झालीं. इतक्या अवधींत आपण बरीच कामगिरी करून द्रव्यसंचयहि बराच केला. तेव्हां आतां माझी अशी इच्छा आहे कीं, प्रत्येकानें आपापल्या हिश्शाची रक्कम घेऊन घरीं जावं, व वडिलांच्या किंवा आपल्या घरातील वडील माणसाच्या संमतीनें शेत-वाडी, जमीन-जुमला आपल्या पंसतीप्रमाणें घेऊन गांवीं चागलं स्थाईक उत्पन्न करून ठेवावं आणि घरच्या सर्व गोष्टी व्यवस्थेशीर करून पुनः विजयादशमीला ह्याच ठिकाणीं सर्वांनीं एकत्र जमावें."

"अगदीं पसंत!" बापू म्हणाला, "पण राया, आपल्यापैकीं एकाद्याला घरच्या मंडळींनीं लग्नाचा आग्रह केला तर?

—"अरे चोरा! बापू—" असें म्हणून राजानें त्याच्या पाठीवर थाप मारिली, "किती वस्ताद आहेस तूं? म्हणे' एखाद्याला घरच्या मंडळींनीं लग्नाचा आग्रह केला तर!' अरे, आडून गोळीबार कां करतोस? सरळ म्हण कीं, माझीच लग्न करण्याची इच्छा आहे!"

"होय बापू—" विचार करीत राया म्हणाला, "तूं म्हणतोस त्याप्रमाणे घरच्या मंडळींत प्रश्न निघण्याचा संभव आहे खरा! पण सर्वांनीं आणखी एक वर्ष तरी थाबल पाहिजे. मग पुढें आपण ह्या गोष्टीचा योग्य विचार करूं."

**गीता मिताक्षरी.** "ठीक आहे. माझीहि तशीच इच्छा आहे पण राया, आतां आपण सर्वजण आपआपल्या घरीं गेल्यावर कदाचित् आपणास काहीं काम लागलं, अगर एखादी खाजगी पण गुप्त गोष्ट आपल्याच मंडळीला करावयाची असली, तर मग पत्रव्यवहार कुठें आणि कुणाच्या नांवें करावा?"

"होय. त्याहि गोष्टींचा मी विचार करून ठेविला, आहे." राया म्हणाला, "आपण सध्या आहोंत, हेंच आपलें मुख्य ठिकाण समजायचें आणि विजयादशमीपर्यंत प्रत्येकानें येथें १५ दिवस पाळीपाळीनें राहावयाचें. मी प्रथम रहातो, मग तूं नंतर बापू अशी प्रत्येकाच्या सोयीप्रमाणें पाळी ठरवूं. आतां खाजगी आणि गुप्त पत्रव्यवहार कसा करावा, त्यांवर मी जें ठरविलें आहे, तें सांगतो. मराठी अर्थ दिला आहे अशी 'निर्णयसागर' ची गीता

प्रत्येकानें जवळ बाळगा. आजकाल भगवद्गीता जवळ बाळगण्याचें बंड लोकांत फार माजलं आहे. पण तींतील त्याना अर्थ समजेल तर शपथ! पण जाऊं द्या त्या गोष्टी. आपणहि एक एक गीता जवळ बाळगूं व आपला कार्यभाग साधूं!"

"वाः फार उत्तम! योग्य सूचना!"

"म्हणजे तें कसं? बापूनें मध्येंच विचारलें.

"तें तसेंच! तुला अडाण्याला त्यांत काय कळणार आहे! अरे बाबा, आज काल ह्या स्वदेशी चळवळीपासून गीता बाळगणारा मनुष्य मोठा 'देशभक्त' समजला जातो, हें तुला काय माहीत!"

"छे, छे! तूं चुकलास." राजा म्हणाला.

"तू म्हणतोस त्याप्रमाणें गीता जवळ बाळगणाराला 'मवाळ' 'देशभक्त' असें म्हणतात. आणि असे 'मवाळ देशभक्त' ह्या स्वदेशी चळवळींत किड्या-प्रमाणें वळवळ करणारे सर्वत्र पसरले आहेत."

"मग 'जहाल देशभक्त' कोण?"

"फासावर चढतांना गीता हातात धरणारे.

"जाऊं देरे! मी काय सागतों तें ऐका—गीतेंत बहुतेक सर्व शब्दांचा भरणा आहे. तेव्हां त्या शब्दावर मी मिताक्षरी कशी बसविली आहे, ती लक्षांत ठेवा." असें म्हणून रायानें ट्रंकमधून गीता काढून उघडली आणि म्हणाला, "आतां बापू असं समज कीं, आम्हीं सर्वांनीं तुझ्याकडे एक गुप्त कामगिरी दिली आहे. त्याला फार दिवस झाले आहेत. म्हणून मी तुला एक मिताक्षरी पत्र लिहिलें तें असें—

४२$\frac{७}{४}$, २३$\frac{११}{२}$, २३$\frac{११}{३}$, २३$\frac{११}{४}$, ! २०७$\frac{१०}{१}$, २०७$\frac{१३}{२}$, २०७$\frac{१३}{३}$, २०७$\frac{१३}{४}$, २०७$\frac{१३}{५}$, २०७$\frac{१३}{६}$, ७$\frac{१४}{४}$.

आता ४२$\frac{७}{४}$. म्हणजे गीतेच्या ४२ पानावरील ७ ओळींतील चौथा शब्द= तूं नंतर २३$\frac{११}{२}$ म्हणजे २३ पानांतील ११ व्या ओळींतील दुसरा शब्द=तेथें अशा रीतीनें सर्व आंकडे पाहून पत्र जुळविलें म्हणजे त्याचा अर्थ-'तूं काय केलें! हें जाणण्याची मला इच्छा झाली आहे. उत्तर.' असें एक वाक्य होईल. अशा प्रकारें आपणांस अवश्य तो शब्द पाहून ह्या मिताक्षरींत पत्र लिहावें म्हणजे आपणांशिवाय इतरांस यांतील एक अक्षरहि कळणार नाहीं. त्याच प्रमाणें प्रत्येक अध्यायाच्या आपण स्वतःकरितां खुणा ठरवूं-

मी म्हणजे अध्याय १, राजा हा अध्याय २, बापू हा अध्याय ३, याप्रमाणें ठरवूं आणि तुला पत्र लिहिताना मी सुरवातीला अ० ३ असें लिहून पुढें मिताक्षरीं आंकडे आणि शेवटीं सही न करतां फक्त अ० १ असें लिहीन."

अशा रीतीनें आपसात ठरवून दुसऱ्या दिवशीं मंडळींनीं प्राप्तीचे हिस्से केले. आणि प्रत्येकाने बहुमतानें आपल्या हिश्शांतून काहीं भाग काढून तो निरनिराळ्या उपयुक्त संस्थांना 'एक' हितचिंतक ह्या नावानें मदत देण्याकरितां रायाच्या स्वाधीन केला. राया मात्र पुण्यात राहिला आणि बाकी सर्वजण आपापल्या गावीं निघून गेले. वाचकहो येथें रायक्लबचा पूर्वार्ध समाप्त झाला.

**पूर्वार्ध समाप्त.**

# रायक्लब अथवा सोनेरी टोळी.

## उत्तरार्ध.

**वर्ष चौथें.**

विजया दशमीच्या सुमुहूर्तावर मुंबईत स्थापन झालेल्या आमच्या रायक्लबची पहिली साडेतीन वर्षाची हकीकत पूर्वार्धात दिली आहे. वाचकाच्या ती पूर्ण लक्षांत आहेच. त्या पूर्वार्धात शेवटीं उल्लेख केल्याप्रमाणें पुण्यास मुख्य ठिकाणीं प्रत्येकानें १५ दिवस पाळीनें रहावयाचें आणि बाकीच्या मडळीनीं आपआपल्या घरीं जावयाचें असें ठरून रायानें परस्परात गुप्त पत्रव्यवहार करतां यावा म्हणून ‘ गीता मिताक्षरी ’ नावाच्या लिपीचा शोध लाविला, तोहि वाचकांना माहित आहेच. असो. ठरल्याप्रमाणें सर्वजण दोन दिवसातच आपल्या घरीं निघून गेले. फक्त राया, बापू आणि राजा हे तिघे पुण्यात राहिले. पहिल्या खेपेस ही मंडळी आपल्या घरीं गेली होती, त्यावेळीं प्रत्येकानें बरोबर पांचपाच हजार रुपये नेले होते. ती त्याची तीन वर्षांची कमाई होती. परंतु आतां सहा महिन्यातच प्रत्येकाच्या वाटणीला तीन तीन हजार रुपये आले. मंडळी निघून जाताच राहिलेल्या तिघाना मुळींच करमेना. वास्तविक पाहिलें असता क्लबचे अध्वर्यु राया, बापू आणि राजा हे तिघेच होते. पूर्वी पुण्यास कॉलेजांत असताना त्याचे पुष्कळ मित्र होते. परंतु आतां त्यांनीं कोणाचीहि ओळख ठेविली नव्हती. इतकेंच नव्हे तर आता इतके महिने ती मंडळी पुण्यात होती, परतु बापू आपल्या बहिणीलाहि भेटण्याकरितां गेला नाहीं. कारण रायानें आपल्या मंडळींना तशाच कडक शिस्तीनें राहण्यास सागितलें होतें.

“ राजा, तुझा प्रधान गेल्यामुळें तुला अगदीं ओकंसं वाटत असल ना ? ” त्या दिवशीं रात्रीं ते तिघे एकत्र जेऊन बसल्यावर बापू म्हणाला, “ बरं तें एक तुला येता जाता तोंडीं लावायला लोणच होतं ! ”

“ गजाभाऊ माझें लोणच आणि तूं काय ?—आमटी वाटतं ! अरे हो, राया, आतां हा चुलीचा ससेमिरा आपल्यामागें कशाला ? आपली मडळी होती, तेव्हा मन्या-चाच्या स्वयंपाक पहात असत पण आतां आपण तिघेच आहोंत. तेव्हा जात जाऊं खाणावळींत ! ”

" होय मलाहि तसंच वाटतं ! " बापू म्हणाला शिवाय खाणावळींतील तरी मौजा पाहायला मिळतील. "

दुसऱ्या दिवशीं ते तिघे मित्र बाजूच्या बोळांतील अन्नपूर्णाबाईच्या खाणावळींत गेले. अन्नपूर्णाबाई नांवाच्या विधवेने ती खाणावळ घातली होती, म्हणून खाणावळीला तसें नांव दिलें होतें. बाईला दोन मुलें होतीं. मोठा मुलगा बावीस वर्षांचा होता, त्याचें थोडक्यांत वर्णन करावयाचें म्हणजे हे राजेश्री सर्वगुणसंपन्न होते. दुसरी मुलगी अठरा वर्षांची होती. ती विधवा होती. रंगरूपाला साधारण बरी असल्यामुळे आणि तीच वाढपी असल्यामुळे जेवणास येणाऱ्या ' मेंबर्स ' ची संख्या बरीच होती. स्वतः आई अन्नपूर्णाबाई स्वयंपाक करीत असे, मुलगा पोळ्या बडवीत असे आणि मुलगी वाढीत असे, त्यामुळें धंदा या दृष्टीनें बचत होऊन गिऱ्हाईकहि खुष असे. परंतु ते खुष असो वा नसो आपणाला त्याच्याशीं काय करावयाचें आहे ? आमचा सूत्रचालक तीन व्यक्ति त्या खाणावळींत गेल्या, तेव्हांपासून तेथें काय काय घडलें तें आपण पाहूं.

**अन्नपूर्णा खाणावळ.**

" बापू लग्न करायला तुझं मन हुरळलें आहे ना ? मग घे कीं गळ्या उरकून ! " दुपारीं जेऊन परत घरीं आल्यावर राजा म्हणाला. " ती बाई वाढत होती ती चांगलीच दिसते ! "

" राजा, तुझ्या तें लक्षांत आलें का ? " मध्येच रायानें विचारलें.

" काय तें ? "

" ती वाढणारीणबाई आणि तो आपल्या उजव्या बाजूच्या कोपऱ्यांत बसलेला मनुष्य ! "

" छे ! माझं तिकडे लक्षच नव्हतं ! " राजानें उत्तर दिलें, " फक्त पानावर बसल्यानंतर एकदां मी सर्वांना न्याहाळून पाहिलं. पण माझ्या ओळखीचा कांहीं कोणी मला दिसला नाहीं, म्हणून मी मुकाट्यानं ताटाचाच समाचार घेतला ! पण तूं म्हणतोस तो गृहस्थ माझ्या लक्षांत आहे. हातांत आंगठ्या वगैरे दिसल्या. मला वाटतं कोणीतरी बाहेर गांवचा इसम असावा. "

" ते रागावलेले जांवई बापू आहेत ! " हांसत राया म्हणाला, " मला त्यांत कांहीं तरी गौडबंगाल असावं, असा वास येतो. आतां आपण आहोंतच त्या खाणावळींत तेव्हां हें काय गौडबंगाल आहे, तें उलगडून टाकूं ! "

रायानें आपल्या कार्याला सुरवात केली. दोन दिवसांतच त्यानें सर्व कांहीं बित्तंबातमी काढिली. त्या गृहस्थाचें नांव विश्वनाथ पित्रे असून तो निजामशाहींत वकिली करीत असे. बायकोला नेण्याकरिता म्हणून तो पुण्यात आला होता. परंतु 'तुम्ही तेथील वकिली सोडून पुण्यांत रहा आणि वकिली करा,' असें बायकोचें म्हणणें पडलें. तिच्या आईबापानें जांवईबुवांना तसें सांगितलें. तेव्हा रागावून वकिलसाहेब श्वशुरगृहांतून बाहेर पडले. आणि अन्नपूर्णाबाईकडे राहिले. ही बाई खाणावळ घालण्यापूर्वी वकीलसाहेबाच्या श्वशुरगृहाजवळच रहात असे. त्यामुळें तिच्या मुलीची आणि वकीलसाहेबाची प्रथम ओळख झाली. त्यानंतर आता आठ दिवसापूर्वी ते पुण्यास आले, त्यावेळीं रस्त्यात वकीलसाहेबांची आणि बाळची—खाणावळी बाईचा मुलगा—भेट झाली. त्यानें आग्रह करून वकीलसाहेबांना आपल्या खाणावळींत नेलें. तेव्हा अर्थात् जुनी ओळख म्हणून अन्नपूर्णाबाईनें विशेषतः तिच्या मुलीनें—आवडीनें त्यांची विशेष उठबस केली. हा प्रसंग घडला त्याच्या दुसऱ्या दिवशींच वकीलसाहेबाचा आपल्या श्वशुरगृहीं खटका उडून त्यानीं घर सोडलें. आपली वडिलांपासून जमलेली वकिली सोडून पुण्यांत येऊन राहण्यास त्याचें मन तयार होईना. त्या संधीला पुण्यात एका प्रसिद्ध व्यक्तीनें पुनर्विवाह केला, त्याबद्दल त्या जोडप्याचें अभिनंदन करण्याकरितां सभा भरली. त्या सभेला वकील साहेब गेले होते. तेथें जमलेल्या बोलक्या सुधारकांनीं त्या जोडप्यानें दाखविलेल्या मनोधैर्याचें असें स्तोत्र गायिलें कीं विचारूं नका! तेव्हांपासून आपणहि असाच पुनर्विवाह करून यक्षिणीनें कांडी फिरविल्याबरोबर होणाऱ्या चमत्काराप्रमाणें आपण घटकेंत 'सुधारक' म्हणून सर्वतोमुखीं गाजावें, असें त्यांना वाटूं लागलें. आपण खरोखरीच असा विवाह केला तर आपल्या चढेल पत्नीची आणि श्वशुरघरच्या मंडळीची चांगलीच खोड मोडल्यासारखें होईल, ह्या विचारांतच त्यानीं अन्नपूर्णाबाईकडे आपलें बिऱ्हाड नेलें. दोन दिवसांतच आवडीनें वकील साहेबांचें मन ओळखलें. चोरटे व्यवहार करण्यापेक्षां वकीलसाहेबासारखा सुशिक्षित, सुंदर, तरुण आणि श्रीमंत आपण होऊन जर पुनर्विवाहाची इच्छा करतो, तेव्हां होकार देऊन जगांत उजळ माथें करून घ्यावें, असा तिनें निश्चय केला.

सुधारक.

"दादा, माझं तुझ्याजवळ एक काम आहे," आवडा आपल्या भावाला म्हणाली.

" एक सोडून दहा कामं साग--पण आवडे, तुलाही माझं एक काम केलं पाहिजे. काय—करशील ना ?—मग बोल तर तुझं काय काम आहे ?"

" वकीलसाहेब मला बंड गार्डनवर बरोबर फिरायला ये म्हणून सांगतात."

" मग काय व्हिक्टोरिया गाडी आणून देऊं ?"

" असं काय दादा ? तुला आपली थट्टाच वाटते !"

" यात कसली थट्टा ? वकीलसाहेब तुला फिरायला ये म्हणतात ना ?"

" हो, पण मला त्यांच्याबरोबर उघड कसं जाता येईल ?"

" कां बर ? आतां तूं त्याची वकिलीणबाई होणार, मग तुला कुणाच्या बापाची भीति आहे ?"

" पण ते समोरचे दाजी भाऊ आहेत ना ! त्याना जरा कुठं संशय आला तर ते आकाशपाताळ एक करतील ! एकदा हें लग्न उरकलं कीं मग नाहीं मी कुणाला भीत !"

" तरी मी म्हणत होतों कीं, तूं ह्या दाजीच्या नादीं लागूं नकोस म्हणून !"

" हो. पण त्यावेळीं मला असं पुढं ताट वाढून येईल, अस स्वप्न का पडलं होत ?"

" बर पण मी तुझं काय काम करूं तें साग !"

" उद्या सध्याकाळीं चार वाजतां वकीलसाहेब गाडी घेऊन येणार आहेत. त्यावेळीं दाजी भाऊ दुकानांत नसतील, असं काहीं कर."

" तें कसं करूं ?" विचार करीत बाळा म्हणाला. " आहे—आवडे, शक्य आहे. ते माझ्याबरोबर रेसिसला एकदा येणार आहेत. गेले दोन आठवडे मजजवळ पैसे नव्हते म्हणून मला जाता आलं नाहीं. पण तू जर मला आईच्या पेटींतून शंभर रुपये काढून देशील तर—"

" शंभर रुपये ?" आश्चर्यानें आवडी म्हणाली.

" एवढा ' आ ' पसरायला काय झालं ? अग शंभराचे हजार येतील तेव्हा ? उगाच नाहीं पैशाला पैसा मिळत ! हजार आले कीं मीं शंभर परत देईन !"

" पण आईच्या किल्ल्या कशा हातीं येतील ?" विचार करीत आवडी म्हणाली.

" तें तूं काहीं कर. पण शनिवार दुपारपर्यंत मला दे म्हणजे झालं ! आणि हें पहा, वकीलसाहेबांना सागून उद्याचा बेत रहीत करून परवा शनिवारचा बेत कर, कारण दाजीला मी दुपारींच घेऊन जाईन. मग तुला कोण पहाणार ? खुशाल वकीलसाहेबांच्या शेजारीं वकिलीणबाई म्हणून मिरवीत जा."

हा बहिणभावाचा संवाद चालू असतां त्या खोलीच्या खिडकीखालीं एक व्यक्ति उभी होती. ती व्यक्ति दुसरी तिसरी कोणी नसून राया स्वतःच होता. आज दोन दिवस तो, राजा किंवा बापू पाळीपाळीने तेथें पहात होते. ज्या गोष्टी कळाव्या अशी त्याची इच्छा होती ती आज पूर्ण झाली. रायाला इतक्या गोष्टी कळल्यावर पुढील इमारत कशी रचावयाची हें त्यानें तात्काळ ठरविलें. बिऱ्हाडीं आल्यावर त्यानें आपल्या मित्रांना सर्व गोष्टी सागितल्या. आणि आपण पुढें योजून ठेविलेला बेत कसा सिद्धीस न्यावयाचा त्याचाहि उलगडा केला.

"राया, तूं योजिल्याप्रमाणें ह्या वकीलसाहेबांची सोळा आणे फजिती होणार, यात शकाच नाहीं. पण आपणाला ती मजा पहायला मिळाली पाहिजे." राजा म्हणाला.

"आपण तर जाऊंच !"

"पण राया, आपण इतकी मेहनत करून ह्या वकीलसाहेबाचे कान उपटणार त्याबद्दल आपणाला काय मोबदला मिळणार ?" बापूने विचारलें.

"मौज पहायला मिळणार !" राजानें उत्तर दिलें. "एवढहि लेका तुला कळत नाहीं ?"

"नाही !—तूं चुकतोस !" राया गंभीर स्वरात म्हणाला, "आपली मेहनत अशी मौजेच्या मोबदल्यानं मिळून उपयोगी नाहीं. आपल्या ध्येयाप्रमाणें आपल्या मेहनतीचा मोबदला म्हणून काहीं द्रव्य हें मिळालच पाहिजे !"

"पण तें कस मिळणार ? आपण जावई बापूचे कान उपटले म्हणून खूष होऊन त्याचे श्वशुर महाराज आपणास काहीं देतील काय ?"

"अरे असं मागून कुणी दिल आहे काय ?—तो बाळा रेसिसला शंभर रुपये घेऊन जाणार आहे ना ? तेच रुपये आपल्या मेहनतीच्या मोबदल्याचे आहेत अस समज. आतां ते रुपये कसे मिळवायचे तें तुम्ही ठरवा म्हणजे झालं !" राया म्हणाला.

राजानें थोडा वेळ विचार करून 'ते रुपये त्याच्या खिशांतून काढून घ्यावे' असें सांगितले परंतु रायाला तें पटलें नाहीं. 'आपण मोठ्या कौशल्यानें आणि शिताफीनें त्या अजागळाच्या खिशातून रुपये काढून आणूं,' असेंही त्यानें सांगितलें, तरीहि रायाला सुचविलेला तो विचार रुचेना.

तेव्हा बापू आपली युक्ति सागू लागला. 'बाळाच्या खिशातील पैसे काढा--

वयाचे म्हणजे त्याच्याबरोबर कोणी तरी रेस-ग्राऊंडवर जावें आणि सलगी दाखवून आपणांस अत्यंत खासगी रीतीनें घोडा कळला आहे, त्यावर आपण पैसे लावणार असें सागून त्या घोड्याचें टिकिट घेण्याच्या उद्देशानें बाळाजवळून रुपये घ्यावयाचे आणि त्याला झुकांडी देऊन आपला रस्ता सुधारावयाचा!' परंतु बापूचीहि युक्ति रायानें नापसंत केली. तो म्हणाला, "अरे जिथं नखानं काम होण्यासारखं आहे तिथं कुऱ्हाड कशाला? तुला त्या अन्नपूर्णाबाईचे चिरंजीव बळवंतराव कोणता कोट घालतात, तें आहेना माहीत?"

"मी आज त्या खोलींत खुंटीवर कपडे काढून ठेविले होते, तिथंच कोपऱ्यात हडप्यावरील खुंटीवर तो ठेवतो, तें मी पाहिलं आहे." बापूने उत्तर दिलें.

"बस् बस्! आतां आलं लक्षात!" मध्येंच राजा म्हणाला, "आता पुढलं काम माझ्याकडे लागलं! तूं त्या वकीलसाहेबाचे कान उपटण्याच्या उद्योगाला लाग."

रायानें आपली चामड्याची पेटी उघडून पत्र लिहिण्याचें साहित्य बाहेर काढलें आणि थोडा वेळ विचार करून त्यानें दोन पत्रें लिहिलीं. एक वेळ वाचून तीं पत्रें त्याने आपल्या मित्राना वाचून दाखविलीं. त्यांपैकीं एक पत्र दाजी भाऊ चहावाल्याच्या नांवाचें होतें. आणि दुसरें वकीलसाहेबाचे श्वशुर श्रीधर रामचंद्र परांजपे, वकील यांना लिहिलें होतें. पहिल्या पत्रात रायानें लिहिलें होतें कीं, 'आपणास एकवेळ रेसिस पाहण्याकरिता जाण्याची इच्छा आहे. ही इच्छाच शेवटीं मनुष्याला त्या रेसिसच्या जाळ्यांत कायमचा अडकवून नागविते, हें मी आपणास सागावें असें नाहीं. असो; ह्या आपल्या इच्छेप्रमाणें ह्या शनिवारीं अन्नपूर्णाबाईचे चिरंजीव बळवंतराव आपणास रेसिसला नेणार आहेत. आपण त्या दिवशीं रेसिसला न जातां बळवंतरावाला चुकवून बरोबर पांच वाजतां बंडगार्डनवर यावें आणि एका कोपऱ्यांत स्वस्थ बसून रहावें. तेथें तुम्हाला रेसिसच्या शतपटीनें मौज पाहण्यास मिळेल. न याल तर पस्तावाल. ह्या पत्रातील मजकूर गुप्त ठेवा. आपणास मौज दाखविणारा—क्ष.' ह्या मजकुराप्रमाणें श्रीधरपंत वकीलसाहेबांना त्याच्या दोन मित्रांसह मुलीला घेऊन बंडगार्डनवर बोलाविलें होतें. हीं दोन्हीं पत्रें रायानें पोष्टात टाकिलीं. आणि राजा आपली ब्लँकेट, धोतर आणि पंचा घेऊन खाणावळींत आला.

" बाई, थोडा ओला चहा मला करून देतां का? "

" कांहो ताप आलाहे वाटतं!—काय मेल्या ह्या पुण्याची हवा झाली आहे भिकार! एक घर काहीं हा ताप सोडीत नाहीं!—आवडे ठेव ग आंथण थोड. पडा इथं ह्या हडप्यावर. गरम गरम चहा घ्या आणि घोंगडी पांघरून पडा म्हणजे आता घाम येईल आणि व्हाल मोकळे! "

राजानें आपला कोट काढून ठेविला आणि हडप्यावर आपलें आसन ठोकलें! बाई दरवाजांतच भाजी चिरीत बसली होती. थोड्या वेळानें राजानें दहा रुपयाची नोट तिच्यापुढें टाकून म्हटलें, " बाई माझा तुम्हाला त्रास नाहींना होणार?--मी तुमची मेहनत ही अशी सढळ हातानं देईन! "

" छे हो! त्रास कसला! मेंबर लोकाचा त्रास मानून कसं चालेल? " नोट उचलून आपल्या कनवटीला लावीत बाई म्हणाली.

" आपले बळवंतराव कुठे दिसत नाहींत? बाहेर गेले आहेत वाटतं? "

" अहो काय सांगू ह्या बाळ्याचं? हातावर पाणी पडल कीं अस्सा गांवभर भटकत असतो.—पण अद्यापि त्या पोरीनं चहा कसा नाहीं आणला? " असें म्हणून म्हातारी उठली आणि आत गेली. राजा पेटीवर पडला होता, त्या खोलीला लागूनच दुसरी खोली होती. त्या खोलींत धान्यांचा साठा आणि काहीं अडगळ असून तेथेच म्हातारीची पेटी होती. म्हातारी आपल्या मुलीला घेऊन त्याच खोलींत झोंपत असे. त्या खोलीला लागूनच स्वयंपाक घर होतें. मधल्या लांब माजघरात मडळी जेवायला बसत असत. भांडीं घासण्याकरिता दोन मोलकरणी होत्या. पण भाजीपाला आणण्याचें काम स्वतः बाईच करीत असे.

" आई, ते आतां तापाचे गृहस्थ आले, त्याना तूं आपल्याच खोलींत ठाणें द्यायला लावलंस! " आई स्वयंपाक घरात आल्यावर आवडा म्हणाली. " आता ते वकीलसाहेब येतील, ते कुठं बरं बसतील? आज त्यांच्याशीं मला पुष्कळ बोलायचं आहे. "

" मग बोल. आपल्या धान्याच्या खोलींत जागा नाहीं वाटतं? बरं पण चहा झाला का? माझे मेंबर मला खुष ठेविले पाहिजेत. उद्या तूं जाशील निघून आणि बाळ्या हा असा! माझी गिऱ्हाइकं मला सांभाळलीं पाहिजेत. "

आवडी मुकाट्यानें चहा घेऊन गेली. राजानें चहा घेत असतां 'मला थोडी सुंठ देतां का परतून?' असें आवडीला विचारलें. ती 'नाहीं' म्हणाली.

नाहीं परतु जरा फणकाऱ्यातच बाहेर निघून गेली. वकीलसाहेबांचें हें कायमचें आणि उजळमाथ्याचें कुळ तिच्या हातात जर त्यावेळीं नसतें तर आमच्या राजाला तिनेंच होऊन ' थोडी सुंठ आणू का ? डोकें चेपूं का ?' असें विचारलें असते. पण आता चक्र उलट फिरलेलें होतें. थोड्या वेळानें तिनें सुठ परतून आणिली. तेव्हां राजा म्हणाला, "आवडाताई तुम्ही, खऱ्या खुऱ्या आवडाताईच आहात. कारण माझ्या बहिणीचंहि नाव आवडाताई आहे. तिचंहि माझ्यावर असंच प्रेम ! बिचारीवर आकाशाची कुऱ्हाड कोसळली होती परतु बाबानीं पुन्हा तिला सुखी केलं ! आमचे वडील मोठे कट्टे सुधारक आहेत. त्यानीं लोकापवादाची भीति न बाळगतां तिचा गेल्या वर्षी पुनर्विवाह केला. आता ती मोठ्या सुखात आहे. यंदाच तिचा नवरा वकिलीची परीक्षा पास होऊन वकिली करूं लागला आहे. आता तिला समाजांत केवढा तरी मान मिळतो आहे. जो तो तिला वकिलीणबाई म्हणून आपल्या घरीं मोठ्या आदरात बोलवितो. तुमचं आणि तिचं नांव एकच आहे म्हणून तुम्हाला मी तिची हकीकत सागितली ! "

जणुं काय आपलीच गोष्ट तो सागत आहे असें आवडीला वाटलें. प्रथम ती किंचित् चपापली. तिनें राजाच्या तोंडाकडे न्याहाळून पाहिलें परतु त्याचा चेहरा निर्विकार दिसला. तेव्हा तिला तो सांगत असलेली हकीकत खरी वाटून उद्यां आपलाहि वकीलसाहेबाबरोबर पुनर्विवाह झाल्यावर आपणासहि समाजात मान मिळेल आणि सुखाची रेलचेल होईल, ह्या भावी गोष्टीचें सुंदर चित्र तिच्या डोळ्यासमोर उभें राहिलें. आणि ती मनोराज्यांत दंग झाली. इतक्यात ज्यांच्याबरोबर विवाह करून माथा उजळ होणार होता, ते वकीलसाहेबच आले; त्यांना पाहतांच ती झटकन उठली आणि त्यांना घेऊन शेजारच्या खोलींत गेली. वकीलसाहेब रोज दुपारीं तेथें येत असत. संध्याकाळपर्यंत आपल्या भावी वधूबरोबर भावी सुखाच्या गोष्टी बोलून चहा घेतल्यावर स्वारी फिरायला जात असे.

" कोण मनुष्य तो पेटीवर निजला आहे ? " खोलींत आल्यावर वकीलसाहेबांनीं विचारलें.

" एक नवा मेंबर आहे. त्याला आज ताप आला आहे. "

" आणि तूं त्याला अशी खेटून बसली होतीस ! मला नाहीं हें पसंत ! "

" खेटून कशी ?—दूरच होतें. पण तुम्हाला हें नाहींना सहन होत ! मग

मला इथून लवकर न्या कशी! मला तरी कुठं हें आवडतं? पण काय करायचं! इथं आहे तोंवर मला असंच वागलं पाहिजे."

"ठीक आहे! आतां ह्या पंधरवड्यांतच उरकून घेऊ. बरं पण आवडे, उद्यां तूं येणार ना? मी सर्व गाडीची वगैरे व्यवस्था केली आहे!"

"उद्यां?—पण तुमच्या बरोबर यायला मला चांगलं लुगडं कुठं आहे. दादाला सांगून आई उद्या आणविणार आहे. तेव्हां म्हटलं उद्याच्या ऐवजीं आपण परवा शनिवारींच जाऊ!"

"लुगड्याकरिताच जर तूं येत नसशील तर मी आताच घेऊन येतों!"

"तस नव्हे पण एका दिवसानं काय बिघडतं?"

"बरं राहिलं! परवा जाऊ. पण परवां तरी नक्की ना? आपण प्रथम बंडनवर जाऊं, थोडावेळ बसूं आणि थोडा काळोख होत आला कीं, मी तुला शर्यती पहायला नेईन."

"अगबाई! शर्यती पहायला?—नको ग बाई कोणी तिथं ओळखलं तर? उगाच इकड नावं ठेवणं होईल! लग्न झाल्यावर मग तुम्ही सांगाल तिकडे आपण जाऊ! त्यातून परवा दादा आणि—आणि—दाजी—ई"

"दाजी कोण?—आवडे, अशी तूं अडखळलीस का? हे दाजी कोण?

"हे दाजी आमच्या समोरचे चहावाले! मला त्याची फार बाई भीति वाटतें. जसे काय ते माझे सासरेच! बर पण मी चहा घेऊन येतें. आणि दुसरं काय आणूं फराळाला?"

"काही नको तूं बैस माझ्याजवळ. मला तुला कांहीं सांगावयाचें आहे! हें पहा परवां आपण फिरायाला जाणार तेव्हां तुला कुंकूं लावल पाहिजे—काय? बोलत कां नाहींस?"

"लावीन म्हणतें ना! तुम्ही सांगाल तसें करीन पण मला लवकर सोडवा गडे इथून!"

"पधरा दिवसातच म्हणतों ना?" पण हें घे—असें म्हणून वकील-साहेबानीं खिशांतून एक डबी काढून तिच्या पुढें केली. त्या डबींत ओलें कुंकूं होतें. आवडीनें ती डबी हातांत घेऊन उघडली आणि किंचित् हास्य करीत वकीलसाहेबाकडे पाहिलें. तेव्हा ते म्हणाले, "ह—ये अशी पुढे. मी स्वतःच तुझ्या कपाळाला लावतों. कुंकूं लावल्यावर तूं कशी दिसतेस तें मला पाहूं दे." असें म्हणून वकीलसाहेबानीं मोठ्या आवडीनें आपल्या आवडीच्या कपाळा-

वर कुंकवाचा टिळा लाविला. तात्काळ तिच्या चर्येत फरक पडला. पूर्वीपेक्षा ती अधिक सुन्दर दिसू लागली. तें पाहून वकीलसाहेबांनाहि समाधान झालें !

" मी पुढें कशी दिसणार तें पाहिलंतना ? गालांतल्या गालांत हांसत तिरक्या दृष्टीनें पहात ती म्हणाली. " आवडलें ना तुम्हांला ? परवां गाडींत इकडच्या शेजारीं बसायला शोभेन ना ? मग आता पुसतें तर ! "

" थांब-इतकी घाई का ? "

" चहा अन् फराळाचें आणतें ना ? "

बाजूच्या खोलींत चाललेला हा सर्व संवाद भिंतीला कान लावून राजा ऐकत होता. आंतील संवाद बंद पडला त्यावरून आवडा आपल्या भावी पतीला फराळाचें घेऊन येण्याकरिता गेली, हें राजानें जाणलें. तो तसाच डोक्यावरून पाघरूण घेऊन स्वस्थ पडला होता. इतक्यात त्याला दरवाजाजवळ पुनः आवाज ऐकूं आला. किंचित् दरडावून अधिकारयुक्त वाणीनें उच्चारलेले ते पुढील शब्द होते. ' आवडे, ही काय भानगड आहे ? तूं हें फराळाचं कुणाला घेऊन चाललीस ? तो अलीकडे रोज दुपारीं तुझ्याकडे कोण येत असतो ? खर सांग. माझ्याशीं जर कपट करशील तर याद राखून ठेव, हा दाजी भाऊ आहे ! सरळ आहे तोंपर्यंत ठीक. पण एकदा का मी बिघडलों कीं, तुझी शंभर वर्षे भरलींच म्हणून समज ! पोट जिरवायला दाजी पाहिजे होता काय, अन् आता कसं कपट ? "

" दाजी, हें काय ? तुम्हाला वेड तर लागलं नाहीं ! केवढ्या मोठ्यानें बोलतां ? खोलींत एक मेंबर आजारी आहे. पलीकडे ते दुसरे गृहस्थ वकील-साहेब बसले आहेत ! "

" वकील असो नाहींतर वकिलाचा बाप असो ! मला काय सांगतेस ? तूं मात्र सांभाळून रहा म्हणजे झालं ? पण तो वकील अशा दुपारीं इथं का येतो सांग ? "

" सांगतें पण आज अगदींच कसं पिसाटासारखे करतां ? फारच बाई तुमचं मन संशयी ! ते वकील आम्ही पूर्वी सदाशिव पेठेंत परांजपे वकिलांच्या शेजारीं रहात होतों, त्यांचे जांवई आहेत. इथं आले आहेत बायकोला बरोबर नेण्याकरितां, पण नवरा बायकोंत कांहीं खटका उडाला आहे. त्यांची आणि आमची जुनी ओळख असल्यामुळें ते इथं येतात. त्यांना हा चहा आणि फराळाचं दिलं पण तुम्हाला कांहीं तें सहन होत नाहीं ? कशी बाई पुरुषांची जात संशयखोर असते तरी ! सरळ दृष्टीनें कधीं पहायचेच नाहींत ! "

"जुन्या ओळखीवर आज तूं त्या वकिलाला चहा फराळाचं देतेस पण उद्यां आणखीहि कांहीं देऊं लागशील !"

"बरं बरं ! बोलत नाहीं तोंपर्यंत !" रागाचा अविर्भाव आणून आवडा म्हणाली, "सगळ्याच बायका सारख्या पाहिल्यात वाटतं ?"

"छे छे ! सीता मंदोदरीच लागून राहिलीस कीं नाहीं तूं !"

इतक्यात त्याच्या भाषणात व्यत्यय आला. बाहेर गेलेले बळवंतराव ऊर्फ बाळ्या आत आला. त्याला पाहतांच दाजी भाऊ जवळून आवडी निसटली आणि चहा फराळाचें घेऊन आत गेली. वकीलसाहेब दुसऱ्या खोलींत दरवाजा बंद करून बसले असल्यामुळें त्याना बाहेर झालेला आवडीचा आणि दाजी भाऊंचा संवाद ऐकूं गेला नाहीं. परंतु राजाला आपल्या जाग्यावरून प्रत्येक शब्द ऐकूं आला होता. तो संवाद थांबला तोंच दुसरा संवाद बाहेर सुरू झाला.

"मग दाजीभाऊ, येणार ना तुम्ही शनिवारीं ?" बाळानें विचारलें, "ह्या शनिवारच्या शर्यतीला मी जाणार आहें. पहा तर खरी कशी मौज आहे ती ! आतां मी घोड्याची यादी आणायलाच गेलों होतों, पण लेकाचा तो अबदुल्या जॉकी भेटलाच नाहीं !"

"तुझा जाण्याचा बेत नक्की आहे ना ?—मग मी येतोंच ! मला जातांना हांक मार म्हणजे झालं !" असें म्हणून दाजी भाऊ निघून गेला, आणि बाळा खोलींत आला. तेथें राजाला पांघरूण घेऊन झोंपलेला पाहून 'हें कोण बुवा इथं निजलं आहे ?' असें पुटपुटत त्यानें आपली कोट-टोपी काढून खुंटीवर ठेवली. राजानें बिलकुल हालचाल केली नाहीं. बाळा पुनः बाहेर गेल्यावर थोड्या वेळानें त्यानें आपल्या तोंडावरून पांघरूण दूर केलें. आणि हळूंच खुंटीवर नुकताच बाळानें काढून ठेवलेल्या खिशांत त्यानें हात घातला. त्या खिशात एक पुडी होती. ती त्यानें बाहेर काढून चाचपडून पाहिली. नंतर वास घेऊन पाहताच तो गांजा आहे असें त्याला कळलें. पुडी पुनः खिशांत ठेऊन दुसऱ्या खिशांत त्यानें हात घातला, त्या खिशात कांहीं दिडक्या आणि विड्या होत्या. आतल्या खिशात एक पुस्तक होतें. कदाचित् तें पुस्तक एखाद्या नाटकाची पद्यावली असेल, असें त्याला वाटलें. परंतु काढून पाहतांच तें रेसिसचें पुस्तक होतें. राजाला जें कांहीं पाहिजे होतें, तें त्यांत नव्हतें. तो थोड्या वेळानें उठून बसला. इतक्यांत पाण्याचा लोटा घेऊन बाळा खोलींत आला.

" काय हो तुम्हाला म्हणे ताप आला आहे ?—" खिडकीखालीं लोटा ठेऊन बाळानें राजाला विचारलें.

" हो. आला होता. परंतु तुमच्या मातुश्रीनीं कढत चहा दिला मग पांघरूण घेऊन झोंपल्यावर आतां घाम सुटला आहे ! "

" ह्या आमच्या पुण्याची हवाच फार बिघडली आहे ! " असें म्हणत बाळानें आपल्या खिशांतून पुडी बाहेर काढली आणि खिडकी खालीं लोट्या-जवळ तो बसला. तो आता काय करणार हे राजानें ओळखले. परंतु कांहीं बोलला नाहीं मुकाट्यानें तो बाळाच्या गाजा मळण्याकडे पहात होता. आज पर्यंत त्यानें हा विधि पूर्वी कधीं पाहिला नव्हता. थोड्या वेळानें गाजा मळून आणि पिळून झाल्यावर बाळानें हडप्याखालीं असलेली चिलिम आणि इतर साहित्य बाहेर काढिलें आणि काथ्याची गुंडी पेटविली.

" तुम्हाला आहे का संवयी ? " बाळानें विचारलें.

" छे बुवा ! ह्या शास्त्रात आपली गति नाहीं आणि गम्यहि नाहीं ! "

" मग एक दम मारून पहा ! और मजा येईल. आमच्या गुरुजींनीं जेव्हां मला हा प्रसाद दिला, तेव्हा तुम्हाला काय सागूं ? अहाहा ! असा मजा आला कीं विचारूं नका ! मी प्रथम तुमच्याच सारखं नको नको म्हणून म्हटलं. तेव्हां गुरुजी म्हणाले, ' नको नको, क्यूं कहता हय् ? ए तो एसा है जो न पीए गाजेकी कली उस लडके से लडकी भली ! ' अस जेव्हां त्यानीं सागितलं, तेव्हां घेतली त्यांच्या हातांतून चिलीम आणि अशी ओढली ! " असें म्हणून स्वारीनें पहिला जोराचा दम मारला ! त्यानें राजाला बराच आग्रह केला परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तेव्हा तो उठून बाहेर गेला. आणखी थोडा वेळ गेल्यानंतर राजा उठला. आणि म्हातारीला ' आतां माझा ताप गेला. कामाला जाऊन येतों, ' असें सांगून बाहेर पडला. आपल्या बिऱ्हाडीं आल्या-वर त्यानें रायाला सर्व हकीकत सागितली.

त्या रात्रींहि तापाच्या निमित्तानें राजा खाणावळींत राहिला. दुसरा दिवसहि तो बहुतेक सर्व दिवस त्या हडप्यावरच पडून होता. तेथें जेवणाकरिता जवळ-जवळ वीस मंडळी येत असत. परंतु ती बहुतेक सर्व मंडळी छापखान्यांत, मंडईत आणि कापडाच्या दुकानावर नोकरी करणारापैकीं होती. रात्रींच्या जेवणाच्या वेळीं त्या मंडळींत शर्यतीच्याच गोष्टी चालू होत्या. त्यापैकी बरेचजण शर्यतीला जाणारे होते. राजाला मोठें आश्चर्य वाटलें. महिना

वीस पंचवीस रुपये कमविणारे हे लोक शर्यतीकरितां पैसा आणतात कोठून, हेंच त्याला कळेना. त्याच्या बोलण्यावरून गेल्या चार पांच शर्यतींत कुणी जिंकून —रुपयाला दोन रुपये मिळवून आला असें तर त्याला दिसलें नाहीं. शर्यतीला जाण्याकरितां पैसा येतो कोठून? हें त्याला पडडेलें गूढ रायानें उलगडलें. आज बाळा जवळ पैसा नाहीं, हें त्याला माहीत होतें परंतु तो दुसऱ्या दिवशीं शर्यतीला नक्की जाणार आहे. त्याला जसें त्याची बहीण आपल्या आईच्या पेटींतून नकळत रुपये काढून देणार आहे, त्याचप्रमाणें प्रेसमध्यें असलेले नोकर तेथून छापील पुस्तकाच्या प्रति चोरून आणून त्या बाजारांत कमी भावानें एखाद्या बांधलेल्या दुकानदाराला नेऊन देत आणि पैसा उभा करीत. कापडाच्या दुकानांतील नोकरहि त्याचप्रमाणें! एखादा कापडाचा ताका कंबरेसभोंवती गुडाळून बाहेर काढावयाचा आणि ठराविक शिंप्याकडे त्याची विक्री करावयाची! असो.

शनिवारचा दिवस उजाडला. आवडीचा चेहरा आज प्रफुल्लित दिसत होता. आज आपण वकीलसाहेबाच्या बरोबर फिरावयास जाणार म्हणजे जणूं काय आज आपला वरघोडाच निघणार आहे, असें तिला वाटत होते. बाळाचा मात्र जीव वर खाली होत होता. अद्यापि त्याच्या हातीं आईच्या पेटींतील रक्कम आली नव्हती. आवडा आपल्या आईच्या कनवटीच्या किल्ल्या आपल्या हातीं याव्या म्हणून माजरीमारखी टपलेली होती. शेवटीं आई स्नानास गेली आहे असें पाहून ती मागल्या चौकात गेली. म्हातारी स्नानाच्या वेळीं नेहमीं किल्ल्या शिळेवर ठेवीत असे.

"आई, काय ही तुझ्या मानेवर आणि पाठीवर मळी बसली आहे? थाब हं मी चोळते!" असे म्हणून ती 'नको, नको' म्हणत असताहि आवडीनें आपल्या आईची पाठ चोळण्यास सुरवात केली. नंतर "इश्य! किती हा मळ—थाबा मी आंतून साबू आणतें—" असें म्हणून मोठ्या शिताफीनें तिनें आईच्या बाजूला शिळेवर असलेल्या किल्ल्या उचलल्या आणि ती झटकन् आंत आली.

"दादा, ऊठ ह्या घे किल्ल्या. झटपट रुपये काढ आणि पेटी बंद करून मला मोठ्यानें हाका मार. मी तोंपर्यंत आईची पाठ चोळतें. चल आटप—"

इतक्या मनोभावाने आवडीनें आपल्या आईची पाठ चोळली असेल, तर ती आजच! पांच मिनिटें झालीं, दहा मिनिटें झालीं, तरीहि दादा हाक

मारीत नाहीं, हें पाहून ती गोंधळली! ‘ अग आवडे, बस झालं बाई! माझी पाठ आतां चुरचुरायला लागली!’ असें म्हातारीनें दोन तीनदां म्हटले. तरी आवडीचें रगडणें चालूच होतें. इतक्यांत आतून ‘ आवडे—आवडे ’ अशा हांका ऐकूं आल्या. त्या बरोबर ती धांवत धावत आंत गेली. आणि घेतलेस काढून रुपये?’ असा प्रश्न करीत त्याच्या हातांतील किल्ल्या तिनें घेतल्या.

“ उगाच दादा ओरडतो—आई, थोडं हातावर पाणी घाल—” असें म्हणून खालीं वांकल्यावर तिनें हळूच किल्ल्या पूर्ववत शिळेवर ठेविल्या. म्हातारीनें तिच्या हातावर पाणी घातलें. आवडी हळुहळू आत आली. त्यावेळीं बाळा खोलींत गेला होता. राजा त्या हडप्यावर निजला होता. आज सावज आपल्या जाळ्यात सापडणार याबद्दल तर त्याची खात्रीच होती आणि तो त्याचीच वाट पहात होता. बाळाने आत येतांच आपल्या धोतरांतील जिन्नस हळूच कोटाच्या खिशांत कोबले आणि तसाच तो पोळ्या लाटण्याकरितां आंत गेला. आई स्नान करून आली असता आपण जागेवर नाहीं, असा तिला संशय येऊं नये म्हणून त्याची ही सर्व धडपड होती. तो बाहेर जातांच राजानें आपला हात वर केला. त्याच्या हाताला प्रथम त्या खिशात दोन पाटल्या लागल्या. शिवाय सल्लयाचा एक जोड दोन आंगठ्या, आणि तादळी फोत हे जिन्नस असून शिवाय नोटाचें पुडके आणि कांहीं रुपये सुटेहि होते. हे सर्व जिन्नस राजानें आपल्या खिशात उतरविले आणि क्षणभर विचार करून त्याने सुटे दहा रुपये पुनः त्या खिशात ठेऊन दिले. आपलें कार्य बिनचूक झालें हे पाहून आता तो उठला आणि एक दरवाजातून कानोसा घेऊन तेथून बाहेर पडला.

“ राया आपल्या मेहनतीचा मोबदला काय मिळाला असेल असं तुला वाटतं?” घरीं आल्यावर राजाने प्रश्न केला.

“ ज्या मानाची मेहनत त्या मानाचा मोबदला! पाहूं किती मोबदला मिळाला?” हात पुढें करून रायाने विचारलें.

राजाने आपल्या खिशांतील जिन्नस बाहेर काढून त्याच्या पुढें ठेविले. पाटल्या, आंगठ्या वगैरे मिळून दहा अकरा तोळे सोनें आणि सव्वा-तीनशें रुपयांच्या नोटा मिळून साडेसातशेंपर्यंत त्यांना मोबदला मिळाला, असेंच म्हटलें पाहिजे. जिनसाची किंमत केल्यावर राजानें सर्व हकीकत

सांगितली, तेव्हां बापू म्हणाला, " मग ते दहा रुपये कशाला त्याच्या खिशांत टाकलेस ? मोठा दिलदारच दिसतोय् लेकाचा ! "

" राजानं केलं ते अगदीं बरोबर केलं बापू ! " राया म्हणाला, " त्याचे सर्वच रुपये काढून आणले असते ! तरी त्याला बोंबाबोंब करतां आली नसती ही गोष्ट जरी खरी आहे, तरी त्यामुळें त्याला आज रेसिसला जातां आलं नसतं आणि त्याच्या न जाण्यामुळे कदाचित् दाजीभाऊच्या भीतीनं त्याची बहीण वकीलसाहेबाबरोबर गेली असती किंवा नसती याची शंकाच आहे. म्हणजे आपला सगळाच व्यूव्ह ढासळला असता, खरना ? पण आता बाळाजवळ दहा रुपये आहेत, तेव्हां तो रेसिसला जाणार हें तर निश्चित आहे. बरं मी आतां ह्या प्रकरणाच्या समारोपाचीं पत्रं लिहितों—" असें म्हणून तो पत्रें लिहिण्यास बसला.

आज जेवणाकरितां फक्त बापू आणि राया असे दोघेच गेले. खाणावळींत त्यांना कोणतीहि गडबड दिसून आली नाहीं. त्यावरून बाळाला रुपये गेले हें अद्यापि कळलें नसावें असेंच त्यांना वाटलें. जेऊन परत येताना रायानें एका फराळाच्या दुकानातून राजाकरितां फराळ घेतला. घरीं आल्यावर राजाचा फराळ आटोपल्यानंतर कांहीं वेळ गप्पा गोष्टी केल्यावर ते तिघे मित्र कपडे घालून तयार झाले. आता त्या तिघानींहि अगदीं निराळा पोषाख, आवडी ओळखणार नाहीं अशा पद्धतीचा केला होता. रायानें इंग्लिश हॅट आणि बुट सूट घातला होता. राजानें आणि बापूनें कोल्हापुरी फ्याशनचे पटके बांधून तंग इजारी चढविल्या होत्या. त्यामुळे आपणास कोणी ओळखील ही त्यांना भीतीच नव्हती. तीन वाजतां त्यानीं बुधवार चौकांत येऊन गाडी केली आणि तिघेहि बंड गार्डनवर जाण्याकरितां निघाले.

राया, आज सहा दिवस झाले, अजून आपल्या मंडळींपैकीं कुणाचंच कसं पत्र येत नाहीं ? " गाडींत बसल्यावर त्यांच्या गोष्टी सुरू झाल्या. " प्रत्येकान पोचल्यावर पत्र लिहितों म्हणून कबूल केलं होतं ! "

" माझी खात्री आहे उद्यां सकाळीं सर्वांची मिळून आठ पत्रं आपणास खात्रीनं येतील ! " राजानें उत्तर दिलें.

" आठ कशीं ? नऊ ! "

" नाहीं आठ ! "

" मी म्हणतों नऊ ! शर्यत तुझी माझी ! "

" कबूल आहे बोल काय शर्यत मारतोस ?—राया, आतां मध्यें बोलूं नकोस ! ही शर्यत मी जिंकणार ! बोल बापू , काय शर्यत मारतोस ? मी म्हणतों कीं, आजपासून ही आपली अन्नपूर्णाबाईची खाणावळ सुटणार तेव्हा उद्यां तू जर शर्यत जिकलीस तर मीं, आपण इथ असेपर्यंत स्वयंपाक करावयाचा आणि मी जिंकलो, तर तर तू करायचा ! "

" कबूल आहे ! "

राया काहींच बोलला नाहीं. उद्या बापू हरणार हे त्याला माहीत होते. आपण एकंदर बाराजण. त्यापैकीं नऊ आपल्या गावीं गेले आहेत, तेव्हां त्या प्रत्येकाकडून एक एक पत्र म्हणजे नऊ पत्रें येतील असा बापूने सरळ हिशोब केला. परतु श्रीपाद आणि गोपाळ हे दोघे भाऊ एकाच ठिकाणी असल्यामुळे ते दोघे मिळून एक पत्र लिहितील, असा हिशोब करून राजानें आठ पत्रे येतील, असें म्हटले आणि तेच बरोबर होतं. साडेतीनच्या सुमारास त्याची गाडी बंड गार्डनवर आली. रायानें गाडीवानास गाडी एका बाजूला उभी करण्यास सांगून ते तिघेहि बागेत शिरले. कोण कोण बागेत येतात, ते स्पष्ट दिसावे म्हणून त्यांनीं एक जागा शोधून काढिली. आणि तेथे ते तिघेजण एका बांकावर बसले. त्यावेळीं सर्व बागेत ते तिघेच होते. थोडा वेळ झाला नाहीं तोच दाजीभाऊ बागेत आला, आणि तो इकडे तिकडे पाहू लागला. थोड्या वेळानें तोहि एका बाकावर बसला.

तिघानींहि त्याला ओळखले. परंतु त्यानीं ओळख दिली नाहीं. तिघेहि आपल्याच नादात गोष्टी बोलत होते. थोड्या वेळानें राया हळूच म्हणाला, " आजच्या नाटकाचे आपण तिघेजण सूत्रधार आहोत. आजच्या नाटकाचें नाव ' वकीलसाहेबाची कानउघडणी ' अंक तीन आणि प्रवेश तीन. पैकीं पहिला अंक, प्रवेश पहिला अन्नपूर्णाबाईच्या खाणावळींतच झाला. दुसरा अंक प्रवेश पहिला पुन: तेंच स्थळ. आतां तिसरा अंक प्रवेश पहिला सुरू झाला. स्थळ हें बंड गार्डन. आजचें नाटक इंग्लिश धर्तीवर रचलेलं आहे. एक अंक एक प्रवेश असं हे नाटक झाल आहे. त्याप्रमाणें तिसऱ्या अंकांतील दाजीभाऊ हे पात्र आता रंगभूमीवर आलं आहे. आतां एकामागून एक अशीं दुसरीं पात्रं रंगभूमीवर इतक्यात येतील ! "

" त्याप्रमाणें आता एकटंच रंगभूमीवर आलेलं पात्रं दाजीभाऊ यांचं स्वगत भाषण सुरू आहे ! " राजा पुढें म्हणाला, " तो पहा, एकटाच त्या

झाडाखालीं बसून विचार करतो आहे. सांग पाहूं बापू, त्याचे स्वगत चाललेले विचार ? "

बापूनें क्षणभर विचार केला. एखाद्या पात्राचे स्वगत विचार कवि कसे प्रेक्षकाना आणि श्रोत्याना पटवितो, याचा विचा करून तो म्हणाला, " मी अगदीं नेमलेल्या वेळीं नेमलेल्या स्थळीं हजर झालों. पण मला तर इथं चिटपाखरूहि दिसत नाहीं. मला मूर्ख ठरविण्याकरिता का कुणी ते पत्र लिहिलं असेल ? छे—अशी शंका घेणेहि चुकीचं आहे. मला इथ मौज पाहण्याकरितां बोलाविणाऱ्या व्यक्तीच्या मनात माझ कल्याणच आहे. मी हा इकडे बसून राहणार आणि काय मौज आहे ती पाहणार ! "

" शाबास बापू !—तुला शभर मार्क्स आहेत ! "

" गप्प राजा, ती पहा मंडळी आली ! " त्याला थाबवून राया म्हणाला. इतक्यात एक व्हिक्टोरिया गाडी आली. आणि त्या गाडींतून तीन गृहस्थ आणि एक बाई खालीं उतरली. रायानें पत्रात विनंति केल्याप्रमाणें वकील साहेबाचे श्वशुर त्याचे दोन मित्र आणि मुलगी, म्हणजे वकीलसाहेबाची बायको अशी ती मडळी होती. त्यानीहि बागेत येताच सभोंवार टकमक पाहिलें. आतां बागेत एकंदर आठ मंडळी झाली. ती मंडळी थोडा वेळ बागेत फिरल्यावर एका बाजूला झाडाच्या गर्द छायेंत एका बाकावर बसली. आणखी काहीं काळ लोटल्यावर हळूहळू इतर गुलहौशी मंडळी आणि प्रणयीं जोडपीं येऊ लागलीं. पाच, सव्वापाच आणि साडेपाच झाले. अद्यापि वकीलसाहेब आणि पुनर्विवाह उरकून घ्यावयाला उतावीळ झालेली आवडा दिसेनात, हें पाहून रायाच्या मनात शंका येऊ लागली. आपण भरलेला बार सहसा फुकट जाणार नाहीं, ही त्याची खात्री होती. परतु कदाचित् बाळाच्या पैशामुळें गोंधळ उडण्याचा संभव आहे, हेंहि तो जाणून होता. आणखी थोडा वेळ लोटला, तोच त्याची काळजी दूर झाली. एक उघडी व्हिक्टोरिया गाडी येऊन बागेच्या दरवाजाजवळ उभी राहिली. बागेंत नवीन कोण मंडळी येते हें पाहण्याकरितां तेथें पूर्वी आलेली मंडळी मोठ्या उत्सुकतेनें पहात होती. गाडींतून प्रथम वकीलसाहेब खालीं उतरले. नंतर त्यानीं हात पुढें करून आवडीचा हात धरला आणि तिला खालीं उतरविलें. आपल्या पतीला त्यानें दुसऱ्या स्त्रीला हात धरून उतरविलेलें पाहताच सुशीलेनें—वकीलसाहेबाच्या बायकोचें नांव—मोठ्यानें किंकाळीच मारिली. श्रीधरपंतांनीं आपल्या जावईबुवांना

ओळखलें. इतकेंच नव्हे तर रागानें ते देहभान विसरले. इकडे दाजीभाऊनें प्रथम एकदम जरी आवडीला ओळखलें नाहीं, तरी तिला ओळखण्यास त्याला कांहीं फारसा वेळ लागला नाहीं.

" आवडे, अगXX ! ही तुझी जुनी ओळख काय ? " पुढें होऊन दाजी-भाऊनें रागानें आवडीचा पदर धरला ! " फटाकडीसारखी सजून कुंकूं लावून ह्या वकीलाबरोबर इथं फिरायला आली आहेस काय ? थांब—तुझ्या आतां झिज्या उपटून तंगड्याच टाकतों मोडून ! "

राया पुढें झाला आणि कांहीं एक न बोलतां त्यानें एक पत्र दाजीभाऊच्या पुढें केलें. त्या पत्रांत फक्त ' मौज पाहण्याकरितां बोलाविलें होतें, त्याप्रमाणें ही मौज आहेना ! आतां आपल्या आवडीला सांभाळा. वकीलाबरोबर पळून जाण्याचा तिचा बेत होता, पण पुराव्यासह पकडून दिली आहे ! ' असे लिहिलें होतें.

" विश्वनाथराव, हा काय प्रकार आहे ? ही बाई कोण ?—अरे, ही तर आवडी ! " श्रीधरपंत पुढें होऊन विचारूं लागले, " आपल्या शेजारींच रहात होती ! "

पुनः रायानें पुढें होऊन एक पत्र श्रीधरपंताच्या आणि एक पत्र त्यांच्या मुलीच्या हातांत अशीं दोन पत्रें दिलीं. पहिल्या पत्रांत लिहिलें होतें कीं, ' आपले जांवई आपण मुलीला बरोबर पाठवीत नाहीं म्हणून चिडून आपली खोड मोडण्याकरितां ह्या आवडा नांवाच्या छचोर विधवेबरोबर तिच्या कुलशीलाची कांहींच चौकशी न करता पुनर्विवाह करण्यास आणि ' सुधारक ' म्हणून प्रसिद्धीस येण्यास उत्सुक झाले आहेत. आतां पुराव्यासह तुमच्यापुढें उभे केले आहेत. चांगले कान उपटून शुद्धीवर आणा ! आपणास जी मौज पाहण्याकरितां बोलाविलें होतें, ती हीच मौज ! ' आणि सुशीलेच्या पत्रांत फक्त दोनच ओळी होत्या, त्या येणेंप्रमाणें—' स्त्रियांचें दैवत पति ! आपल्या पतीला सोडून स्त्रीनें माहेरीं राहण्याचा हट्ट धरणें पाप तर आहेच पण प्रसगीं त्याचा परिणाम किती भयंकर होतो, तो स्वनेत्रांनीं पाहण्याकरितां आज तुम्हांला येथें बोलाविलें ! आतां इतःपर शहाण्या व्हा आणि पतीबरोबर घरीं जाऊन सुखानें रहा ! '

हा सर्व प्रकार पाहून दाजीभाऊ रागानें लाल झाला होता. त्यानें पहिल्या रागाच्या आवेशांत आवडीच्या श्रीमुखांत दोन भडकविल्या आणि

तोंडानें अद्वातद्वा बोलत तो वकीलसाहेबांवरहि घसरला. त्यानें आपली पायातील वहाणच काढली होती. परंतु श्रीधरपंतांनीं आणि त्यांच्याबरोबर आलेल्या मित्रांनीं मोठ्या मिनतवारीनें समजूत केल्यावर तो शान्त झाला! आवडी तर बाजूला चळचळ कांपत रडत उभी होती! आज तिचा आणि वकीलसाहेबांचा खराखुराच वरघोडा निघाला!

सर्व बागेंतील मंडळी ती मौज पाहण्याकरितां गोळा झाली. त्या गर्दीत आमचे तिघे मित्र झटकन् बाहेर पडले आणि गाडींत बसले. श्रीधरपंत आपल्या जावई बुवांची चांगली कान उघडणी करून घरीं नेतील आणि कोणतेहि आढेवेढे न घेतां सुशीला मुकाट्यानें आपल्या पतीबरोबर निजाम शाहींत जाईल, तसेंच दाजीभाऊ आपल्या आवडीची फरफटत ओढीत घरापर्यंत धिंडका काढील, अशी गाडींत बसतांना आमच्या तीन मित्रांनी भविष्यें केलीं, तीं खरींच ठरलीं!

"राया आज रेसिस आहेना." गाडी चालू लागल्यावर बापू म्हणाला "चल ना आतां ती मजा पाहूं!"

त्यांची इच्छा पाहून रायानें गाडी ग्राऊंडवर घेण्याकरितां गाडीवानास सांगितलें. केवळ मौज पाहण्याकरिताच आलेली ती मंडळी! त्यांना खरी मौज दिसली. ते गेले त्यावेळीं पांच शर्यती झाल्या होत्या आणि दोन व्हावयाच्या होत्या. सर्व जातींचा आणि दर्जाचा मनुष्य त्यावेळीं तेथे दिसत होता. महार, मांग, न्हावी, धोबी, तों गव्हर्नरापर्यंत अठरा पगड जाती घोड्यांच्या टांपांवर आपलें नशीब अजमावीत होते. राया मुकाट्याने गाडींत बसून ती मौज पहात होता.

"राया, आज येथून परत घरीं जातांना कितीजण हाय हाय करीत जातील याची गणती करीत आहेस काय?" राजाने विचारलें.

"नशीब त्याची गणती करीत आहे!—आजच्या ह्या रेसिसकरितां कोणी कोठून आणि कसा पैसा आणिला असेल, याचा विचार केला म्हणजे निरनिराळीं चित्र डोळ्यांपुढें उभीं राहतात. कोणी चोरून, कोणी फसवून, कोणी जवळचे जिन्नस विकून तर कोणी दागिने गहाण ठेवून, असे पापमार्गांनीं आलेले लाखों रुपये ह्या शर्यतींत खेळत असतील!"

"जरा खालीं उतरून आज इथं कोण कोण मंडळी आली आहेत तें तरी पाहूं!"

" त्यांत पाहायचं काय ? मी इथं बसून सांगतों ऐक—मुंबईचे वाणी भाटये, खोजी, मुसलमान आदिकरून बडे बडे गिरणीचे मालक, मोठमोठ्या ऑफिसांतील युरोपियन, रेल्वेतील अधिकारी, हायकोर्टाचे जज्ज, वकील, ब्यारिस्टर तसेच कापडाचे दुकानदार, किराणामालाचे दुकानदार, बुकसेलर्स छापखानेवाले नाटकवाले, फुलवाले, हेअर कटिंग सलूनवाले, न्हावी, धोबी, इतकेच नव्हे तर विद्यार्थी सुद्धा आज इथं खेळायला आले आहेत, समजलास ?—बर चला ही शेवटची रेस सुटली. आता आपण दुसरी एक मौज पाहण्याकरिता जाऊं. ह्या पुण्यातील बडी बडी ब्राह्मण म्हणविणारीं धेडं खाद्यपेयांच्या बाबतींत किती नीच बनली आहेत, तें पाहूं ! " असें म्हणून रायानें गाडीवानाला कॉर्नेली हॉटेलसमोर गाडी उभी करण्यास सांगितलें.

हॉटेलच्या दोन्ही बाजूला मोठमोठी दालने होतीं. खिडक्या उघड्या असल्यामुळें आंतील विजेच्या रोषनाईत आत बसलेली मंडळी बाहेरून स्पष्ट दिसत होती. त्यांपैकीं काहीं जणाना आमच्या मंडळींनीं ओळखलें त्या बसलेल्या शिष्टात काही प्रोफेसर, वर्तमानपत्राचे एडिटर, छापखान्याचे मालक आणि बुकडेपोचे धनी अशी मंडळी होती. बुधवार पेठेतून जातांना ह्या मंडळींना तांबडी पगडी, अंगावर उपरणें, स्वच्छ अंगरखा, आणि पायात ब्राह्मणी जोडा घातलेला पाहून कोणीहि याना ' थोर शिष्ट ' म्हणूनच संबोधतील, परंतु दिसतें तसे ते नसते !

घरीं आल्यावर राजा स्वस्थ बिऱ्हाडीं बसला. राया आणि बापू हे दोघेच खाणावळींत गेले. तेथे त्याना एकच गोंधळ उडालेला दिसला, खोलीत आवडी रडत बसली होती. अन्नपूर्णाबाईनें तर प्रत्यक्ष चंडी देवीचा अवतार आणला होता आणि पोलीस, इतर मेंबर आणि दाजीभाऊ यानीं सर्व माजघर भरलेलें होते. बाळाचा मात्र पत्ता नव्हता. म्हातारी आपल्या पेटींतील हजाराचे दागिने आणि रोकड पाचशें रुपये गेले म्हणून उर बडवीत होती. तिला एक मेंबर सांगत होता, अन्नपूर्णाबाई, तुम्ही आम्हाला पोलिसात काय म्हणून अडकविणार ? तुमच्या खाणावळींत जेवायला येत होतों, हा आमचा गुन्हा काय ? चोर तर तुमच्या घरांतच आहे. त्या तुमच्या आज सौभाग्यवती होऊन वकीलसाहेबाच्या बरोबर फिरायला गेलेल्या आवडाबाईलाच विचारा म्हणजे आपाआप चोर मिळेल ! वगैरे. '

रायानें चौकशी केली, तेव्हा त्याला कळलें कीं, अन्नपूर्णाबाईनें आजपासून

आपली खाणावळ बद केली आहे. अर्थातच त्या दोघांना परत यावें लागलें. आता घरींच स्वयपाक करावा, अशी त्याची इच्छा होती. परंतु आपली शर्यत गगली आहे तेव्हा उद्यां पत्रें येऊन आपल्या शर्यतीचा निकाल लागेपर्यंत दुसऱ्या खाणावळींत न जाता किंवा घरींहि स्वयंपाक न करतां बाहेरून फराळाचें आणावे, असें राजा आणि बापू याचें मत पडलें. त्याप्रमाणें त्या रात्रीं फराळावरच त्यांनीं आपली क्षुधा शात केली. दुसऱ्या दिवशीं शर्यतीप्रमाणें आठ केंवा नऊ पत्रे येण्याऐवजीं दहा पत्रें आलीं. त्यापैकीं आठ पत्रे त्यांच्या गेताक्षरींत लिहिली असून एक बापूच्या घरचें आणि एक राजाच्या घरचे अशीं दोन पत्रे स्पष्ट मराठींत लिहिलीं होतीं. आपण अमुक दिवशीं घरीं येतों असें याशिवाय करून प्रत्येकानें आपापल्या घरीं कळविलें होतें. त्याप्रमाणें बापू आणि राजा गेले नाहींत, म्हणून घरच्या मडळींकडून ती शोधार्थ पत्रे आलीं होतीं. राया, बापू आणि राजा यानी तीं पत्रे गीतेवरून उलगडलीं. गजाभाऊच्या पत्रांशिवाय करून इतर पत्रांतील मजकूर ‘ आम्ही सुखरूप पोंचलों काळजी नसावी. ’ अशा अर्थाचा मजकूर होता. गजाभाऊचें पत्र पुढें लेहिल्याप्रमाणे होतें.

$१९५\frac{१४}{५}$ $१९५\frac{१४}{६}$ $२१५\frac{१४}{८}$ अ १

$३\frac{५}{१}$ $२१२\frac{१२}{१}$ $११\frac{५}{२}$ $२६\frac{१०}{२}$ $२६\frac{१०}{३}$ $११\frac{५}{२}$ $४\frac{१}{७}$ $१२३\frac{१७}{४}$ $४४\frac{६}{४}$ $५\frac{१}{९}$

$२३\frac{१७}{३}$ $१२\frac{३}{६}$ $३२\frac{१४}{४}$ $१\frac{१७}{३}$ $२१५\frac{१४}{८}$ $४४\frac{६}{४}$ $१९६\frac{१४}{१}$ $५\frac{१८}{६}$ $२१८\frac{१०}{५}$

$०५\frac{६}{१}$ $१४४\frac{११}{२}$ $११\frac{३}{३}$ $१\frac{१५}{६}$ $११\frac{१५}{५}$ $३२\frac{११}{७}$ $३४\frac{६}{२}$ $३४\frac{९}{१}$ $३४\frac{९}{२}$ $३१२\frac{६}{६}$

$१२\frac{९}{१}$ $२३३\frac{१४}{५}$ $२९६\frac{१५}{४}$ $२९६\frac{११}{३}$ $१०४\frac{७}{१}$ $११\frac{५}{२}$ $१६१\frac{११}{५}$ $८५\frac{६}{२}$ अ ४

राजाने ह्या पत्राचा अर्थ लाविला तो असा—

परम श्रेष्ठ मित्र राया

याम नमस्कार, येथें कुशल असे.

येथें एक फौजदार आहेत. ते फौजदार आमचे चुलते यांचे मित्र आहेत. तो इतका घोर पापी दुराचारी आहे कीं, त्याच्या समोर उभे राहवत नाहीं तेणेंकरून मडळी क्लेश सोसून आहे तू येथें येणे कर.

गजाभाऊ.

“ मग कसं काय ? राया जायचं ना महाडला ! ” बापूने विचारलें.

“ गेलं पाहिजे—” विचार करीत राया म्हणाला, “ पण गजा म्हणतो,

कीं तो फौजदार म्हणजे सरकारी अधिकारी आहे. तेव्हां जरा सावधच गेलं पाहिजे. ठीक आहे. कांहीं हरकत नाहीं."

" बरं पण आतां शर्यतीचं काय ? " बापू मध्येंच म्हणाला. " राजाहि हरला आणि मीहि हरलों. तेव्हा, आता खाणावळींतच जावयाचं ओघानं सिद्ध झालं ! "

" खरं म्हणाल तर मला ह्या खाणावळींतील जेवण मुळींच आवडत नाहीं. "

" राया म्हणाला. " आपण लक्ष देत नाहीं म्हणून ठीक आहे पण जरा चौरस दृष्टि ठेवली तर अंगावर शहारे येतील, असा एक एक प्रकार दृष्टिस पडेल !

" त्याला एक युक्ति आहे ! " राजा म्हणाला, " आतां आपण उद्यां इथून जाणार. पण राया आम्ही दोघे येऊं ना तुझ्याबरोबर ?—हो, एकाला दोन असलेले बरे ! त्यातून हें सरकारी धूड आहे ! "

" पण तूं आतां काय सांगत होतास ? " बापूनें मध्येंच विचारलें.

" प्रत्येक वेळीं नवीन खाणावळींत जायचं, स्पेशल दर ठरवायचा आणि ' आज जेऊन पाहूं आणि मग नक्की करूं, ' असं त्या खाणावळीच्या म्यानेजराला सांगायचं म्हणजे अन्न चांगलं मिळेल आणि नव्या नव्या खाणावळीमुळं रुचिवैचित्र होईल ! "

सकाळीं त्यांनीं एका खाणावळीची चव घेतली. दुपारीं सर्व दिवस राया बाहेरच होता. संध्याकाळ झाली. दिवे लागले; तरीहि राया परत येण्याचें चिन्ह दिसेना. तें पाहून राजा आणि बापू विचारांत पडले. दुपारीं जातांना राया सांगून गेला नसल्यामुळें त्याला शोधण्याकरितां कोठें जावे, हेंच कळेना. आठ वाजले तेव्हा ते दोघे बाहेर पडले. एखाद्या खाणावळींत जाऊन जेवावें आणि मग रायाच्या शोधाला फिरावें, असें त्यांनीं ठरविलें. बिऱ्हाडाला कुलूप लावून ते दोघे बाहेर पडल्यावर थोड्या वेळानें राया परत आला. त्याच्याजवळ स्वतंत्र किल्ली होती. दरवाजा उघडून आंत आल्यावर त्यानें दिवा मोठा केला आणि खिशांतून एक पत्र काढून तें वाचलें. त्याच्या चर्येवर हास्य दिसत होतें. क्षणभरानें तो स्वतःशीं पुटपुटला, ' ही युक्ति सोळा आणे लागू पडली पाहिजे अशी माझी खात्री आहे ! '

वळकटीला टेकून राया विचार करीत पडला होता. थोडा वेळ झाला नाहीं तोच जिन्यावर पावलें वाजूं लागलीं. राजा अणि बापू जेऊन आले, असा त्यानें तर्क केला. त्या तर्काप्रमाणें ते दोघे आले होते परंतु जेवून मात्र

आले नव्हते. दोघेही वर येताच आत न येतां तसेच नळावर गेले. रायाला त्यात कांहीं विशेष वाटलें नाहीं. पाय धुण्याकरितां ते नळावर गेले आहेत, ह्या समजुतीवर तो गप्प बसला. तोच नळावरून दोघांच्या ओकण्याचा आवाज त्याला ऐकूं आला. तसाच तो उठला आणि नळावर गेला तेथें बापू आणि राजा ओकत होते. हा प्रकार पाहून रायाच्या छातीत चर्रर्र झालें. ह्या दोघांना कॉलरा झाला असाच त्याला एकदम संशय आला!

"अरे, हें असं एकाएकीं तुम्हाला झालं काय?"

"तुझं म्हणणं खरं ठरलं! शिव शिव! नको त्या खाणावळी" असें म्हणून बापूनें दोन्ही हात कानशिलावर ठेवले. "हातानं करायचा कंटाळा आला तर उपाशीं राहीन पण इतःपर प्राण गेला तरी खाणावळींत जाणार नाहीं!"

"पण असं झालं काय?"

"तुझी वाट पहा पहा पाहिली आणि शेवटीं कुलूप लावून निघालों—" आंत येऊन बसल्यावर तोंड वगैरे पुसून झाल्यावर बापू सांगूं लागला. राजाराम अगदीं स्वस्थ वळकटीवर टेकून ताणून पडला. बापू पुढें म्हणाला, "आम्ही त्या कसब्यातल्या खाणावळींत गेलो. राजाला चाभारचौकशीच जास्त असल्यामुळें तो म्यानेजराजवळ अन्नाची आणि दराची कसून चौकशी करूं लागला. 'आपल्या खाणावळींत स्पेशल जेवण असतं तें यंव असतं आणि त्यंव असतं. अशीं पक्वान्न असतात आणि अशी स्वच्छता असते' अशा तो म्यानेजर गप्पा मारीत होता. इतक्यांत आंत स्पेशल ताटावर बसलेला एक गृहस्थ मोठमोठ्यानें म्यानेजराला हांका मारूं लागला. तोंच आंतून एक मनुष्य ओय् ओय् करीत बाहेर आला आणि भडभडा ओकला. तोंच दुसरा मनुष्य बाहेर आला, तोहि सदरहूप्रमाणेंच ओकूं लागला, तोंच तिसरा, चौथा, पाचवा अशीं तेथें जेवायला बसलेली मेंबर मंडळी भराभर बाहेर येऊन भडाभड ओकूं लागली, हा काय प्रकार आहे, म्हणून राजा आत गेला आणि पाहूं लागला. तेथें पात्रावर बसलेल्या एका गृहस्थाला आमटींत एक झुरळ सांपडलें. आमटी वाढताच त्यानं पहिला भुरका मारला आणि दुसरा भुरका मारणार तों वाटींतील झुरळ त्याच्या हातांत आलें. त्यानें म्यानेजरला तें दाखविलें. आमटींत झुरळ होतें, इतर जेवणाराला कळतांच मग काय? ज्याला त्याला भडभडून आलें. कारण प्रत्येकानें तीं आमटी पूर्वी भुरकून खाल्ली होती!"

" आतां आलं लक्षांत ! अरे हा झुरळाचा प्रकार एकच पकार नाहीं, तर असे अनेक प्रकार नित्यशः खाणावळींत आणि ह्या चहाच्या दुकानात घडत असतात. नाइलाज म्हणून आज हजारों लोक ह्या खाणावळींत जेवायला जातात. आपणात एक म्हण आहे कीं, ऋषीच कुळ आणि नदीचं मूळ कोणी शोधूं नये, तसंच ह्या खाणावळींतील धूळ कोणी साफ करण्याच्या उद्देशानं पाहूं नये ! "

" बापू ऊठ, आतां आपण दोघे मिळून स्वयंपाक करू ! " राजा ताडकन उठून म्हणाला, " आपल्याला तर मनस्वी भूक लागली आहे ! "

तिघांनीं मिळून साधेंच जेवण तयार केलें. आणि पोट भरून त्यावर हात मारला. सर्वजण पुनः एकत्र बसल्यावर ' सर्व दिवस काय उद्योग करीत होतास ? ' असा रायाला त्यानीं प्रश्न केला. तेव्हा रायानें आपल्या खिशातील एक सरकारी लांब लखोटा काढून तो राजाच्या हातीं दिला. आणि त्याला वाचण्यास सांगितलें. राजानें तो लखोटा बाहेरून पाहिला. आणि उघडून वाचला.

" राजा, काय लिहिलं आहे त्यात ? " उत्कंठेनें बापूनें विचारलें.

" हा कमिशनर साहेबाचा सी. आय्. डी. च्या रायकर इनस्पेक्टरला हुकूम आहे महाडचे फौजदार विध्वंस यांच्याबद्दल बऱ्याच तक्रारी झाल्यावरून खरी वस्तुस्थिति काय आहे, याचा शोध करण्याबद्दल हा रायकराला हुकूम आहे. ही खालीं कुणाची बरं सही आहे ?— गिबन की गिबसन कमिशनर ऑफ पोलिस !—पण राया, हा हुकूम तुझ्याकडे कसा आला ? हा रायकर सी. आय्. डी इन्स्पेक्टर कोण ? " राजाचा हा प्रश्न ऐकून राया हंसू लागला. तें पाहून राजा विचारांत पडला. रायकर म्हणजे रायाच म्हणावें तर तो काहीं गुप्त पोलिसखात्यांत इन्स्पेक्टर नाहीं, हें त्याला माहीत होतें. पत्र खोटें म्हणावें तर छापील सरकारी कागदावर टाइप राईट केलेलें पत्र असून कमिशनरची सही आहे, तेव्हां विचारात पडला.

" अरे, असा विचारांत का पडलास ? आपणाला गजाभाऊचं महाडहून पत्र आलं आहे, त्याप्रमाणें त्या फौजदाराची चौकशी करण्याबद्दल हा हुकूम आहे."

" होय, तें मला कळलं ! पण हा हुकूम तुझ्याजवळ कसा ? "

" कारण मी इन्स्पेक्टर आहें म्हणून ! " पुनः हांसत रायानें उत्तर दिलें.

" हेंच मला कळलं नाहीं. "

" कळलं नाहीं तर सांगतों. हें सर्व मात्र मी स्वतःच्या अकलेनं तयार

केलं आहे. प्रथम कागद विकत घेऊन एका प्रेसमधून हें ' सी. आय्. डी. ऑफिस, ' ' कमिशनर ऑफ, पोलिस ' वगैरे वर खालीं छापून घेतलं. त्याबद्दल प्रेसला पांच रुपये दिले. नंतर बुधवारांत टाईप रायटिंग क्लासमध्यें गेलों. आणि स्वतःच हें टाईप केलं. आता आलं लक्षात ? आतां ह्यापुढें आपणास काय काय करायचं आणि कसं वागायचं ते सर्व आपण महाडास गेल्यावर गजाभाऊला भेटून ठरवूं ! "

रात्रीं शेवटच्या गाडीनें ते तिघे मुंबईस येण्याकरिता निघाले. डब्यांत साधारण गर्दीच होती, बापूनें आपल्या दोन वळकट्या, एक लहान ट्रंक आणि रायाची ब्याग व्यवस्थेने बाकाखालीं ठेविली, रायाने आपल्या डब्यात कोण कोण बसले आहेत ते पाहिलें. त्यांच्यासमोर एक म्हातारा बनिया आणि एक मुसलमान बसले असून इतर मंडळी होती. बोलतां बोलता ते दोघे गृहस्थ कोण आहेत हें रायाने विचारून घेतलें. पुण्यास लष्करात एक बंगला विकावयाचा होता, तो विकून देणारे हे दोघे दलाल होते. त्यांच्या परस्परात लग्नाच्या चालीरीतिबद्दल गोष्टी चालल्या होत्या. मुसलमान आपली लग्नाची चाल उत्तम म्हणून प्रतिपादन करीत होता आणि बनिया आपली चाल श्रेष्ठ म्हणून सागत होता. राया मुकाट्यानें त्याचें भाषण ऐकत बसला होता. ह्या त्याच्या वादविवादापासून त्याला खरोखरीच मनोरंजक माहिती मिळाली. नंतर त्याचा विषय आपल्या धंद्याकडे वळला. रेल्वेने किंवा बोटीनें व्यापारी आपला माल पाठवितात किंवा मागवितात, त्यात ते व्यापारी ह्या दोन्हीं कंपन्याना दलालाच्या मार्फत कसे चकवितात आणि वेळ पडल्यास त्या कंपन्यांकडून नुकसानी बाबत कसे पैसे वसूल करतात, ती माहिती रायाला त्यांच्या भाषणावरून मिळाली. आज नाहीं उद्या केव्हां तरी ह्या आपणास माहितीचा उपयोग होईल अशी, त्याची पूर्ण खात्री होती. पुढें बरीच रात्र झाल्यावर ते दोघे दलाल बाकांवरच निजले. रायानें बापू आणि राजाला केव्हांच झोपण्याचा इशारा दिला होता. त्याप्रमाणे ते दोघेहि मागे मान टाकून स्वस्थ झोंपले होते. घाट उलटून गाडी खालीं आल्यावर त्या दोघांची झोंप सावध झाली. नंतर त्यानीं रायाला झोंपण्यास सांगितलें. सकाळपर्यंत कांहीं विशेष घडलें नाहीं. सात वाजतां ते तिघे मुंबई बोरिबंदरच्या स्टेशनावर उतरले स्टेशनातून बाहेर पडतांच प्रथम रायानें महाडास ' आम्ही येत आहोंत, ' अशी गजाभाऊस तार केली. तिघेहि स्टेशनावरून निघाले ते थेट

बंदरावर आले. जलमार्गानें जावयाचें असें त्यांनीं पूर्वीच ठरविलें असल्यामुळें ते त्याच मार्गानें निघाले. बाणकोटात येईपर्यंत कांहीं विशेष घडलें नाहीं. ह्या पूर्वी ते कधींहि महाडास आले नसल्यामुळे त्यांना महाडास जाण्याचा कोणता मार्ग सुलभ आहे, हें माहित नव्हतें. तथापि कोणती गोष्ट माहित नाहीं म्हणून कच खाणारा राया नव्हता. बाणकोटास पडावांतून उतरल्यानंतर रायानें एक गाडी ठरविली आणि ते तिघे मित्र निघाले. त्याना मिळालेला गाडीवालाहि अर्धवटच होता. एक दोन वेळां तरींतून उतरल्यानंतर मध्यरात्रींच्या सुमारास आमची मंडळी स्वतःच्या डोक्यावर सामान घेऊन महाडात गजाभाऊ प्रधानाची चौकशी करूं लागली. वास्तविक त्यावेळीं सर्व गाव झोपलेला! जिथून तिथून कुत्रे ओरडत होते, आणि त्याबरोबरच बापू ‘ गजाभाऊ प्रधान ’ असे मोठ्यानें ओरडत होता. आणि बराच वेळ फिरल्यावर एका वाड्याचा दरवाजा उघडला आणि एक गृहस्थ बाहेर आला.

“ कोण पाहिजे तुम्हाला ? ”

“ गजाभाऊ प्रधान कुठं राहतात ? ”

“ कोण राजा ?—वः महाराज भले केलीत ! आता येतां काय ?” गजाभाऊ म्हणाला, कारण वाड्याचा दरवाजा उघडून गजाभाऊच बाहेर आला होता. “ कोण कोण आलं आहे ? ”

“ प्रधानजी, तुमचे डोळे फुटले काय ? हा राजा आपल्याबरोबर राया आणि बापूला घेऊन आला असतांना तुम्ही कोण कोण आलां आहांत म्हणून विचारतां ? हाच का तुमचा बंदोबस्त ? ”

गजाभाऊनें राजाच्या विनोदाकडे लक्ष न देतां त्या तिघांना आत नेलें. ह्या ठिकाणीं आपण गजाभाऊची ओळख करून घेणें अवश्य आहे. त्याच्या घरात त्याची आई आणि दोन चुलते होते, दोघांहि चुलत्यांचीं लग्नें झालीं असून पहिल्याला तीन आणि दुसऱ्याला दोन अशीं मुलें होतीं. वडिलार्जित थोडी शेतजमीन होती, परंतु त्यावर कांहीं भागेना म्हणून गजाभाऊचे वडील चुलते विठूकाका एका नाटक कंपनींत राहिले. आठ दहा वर्षे प्रख्यात नट म्हणून त्यांनीं नाव कमविलें; परंतु त्याबरोबरच वित्त गमाविलें. शेवटीं अनेक व्यसनें बरोबर घेऊन आपली शेतीवाडीच बरी असें म्हणून घरीं आले, दुसरे चुलते आपल्या लेखणीवर विसंबून कांहीं वर्षे इतर कुळांचीं खतें गहाणपत्रें तारा वगैरे लिहून महिना पांच दहा रुपये कमवीत होते. परंतु तेहि आतां धंदा

चालत नाहीं असें म्हणून घरीं बसले होते. अशा रीतीनें दोन्ही चुलते घरांत ऐतखाऊ होऊन बसल्यावर वडिलार्जित शेत जमीन आणि मळे सावकाराच्या घरांत जाऊन पडले. परंतु ऐन वेळीं गजाभाऊनें मुंबई-पुण्यांत आलेल्या मित्रमंडळींच्या साह्यानें एकदां पांच हजार रुपये मिळविले आणि पुनः तीन हजारांची त्यात भर घातली, त्यामुळें त्यांची सर्व शेतीवाडी सुटून आता तेच चुलते गावांत व्याजबट्टयाचा धंदा करूं लागले. आणि सावकार म्हणून सर्व महाडात मशहूर झाले. आपल्या घराण्याचा उर्जितकाळ आणायला गजोबा कारण झाला म्हणून दोन्ही चुलते, चुलत्या आणि म्हातारी आमच्या गजाभाऊला तळहातावरील फोडाप्रमाणें वागवीत होते. त्याचे मित्र येणार आहेत. असे त्यांना माहीत असल्यामुळें आतां राया, राजा आणि बापू हे येताच सर्व घर गजबजलें !

थोडासा फराळ करून ताजेतवाने झाल्यावर गजाभाऊनें आपल्या तिन्हीं मित्राची दिवाणखान्यात झोंपण्याची व्यवस्था केली. आपण कसे आणि कोणत्या मार्गानें आलों, तें सर्व सागितल्यावर रायानें महाडची हकीकत विचारण्यापूर्वी गजाभाऊला त्याच्या चुलत्याबद्दल माहिती विचारली.

" आमचे विठूकाका म्हणजे एक व्यक्ति आहे ! दहा वर्षे त्यांनीं नाटकांत काढलीं आहेत. कोणाचीहि नक्कल ते अशी हुबेहुब वठवून देतात कीं विचारू नको ! "

" पण आपल्या कामात त्यांचा कांहीं उपयोग होईल काय ? "

" हें काय विचारतोस ? माझ्यापेक्षां विठूकाका किती तरी पटीनें हुषार आणि शिवाय विश्वासू ! "

" बरं आता ह्या फौजदार साहेबांची काय हकीकत आहे ? "

" मी विठूकाकांनाच बोलावितों म्हणजे तेच सर्व कांहीं तुला सांगतील ! "

विठूकाकाचें वय तीस बत्तीस वर्षाचें होतें. गजाभाऊनें त्यांना बोलाविल्यावर प्रथम त्यांनीं ' मंडळीची नीट व्यवस्था लागली ना ? घर आपलंच आहे, मुळींच संकोच बाळगूं नका ! ' इत्यादि औपचारिक प्रश्न केल्यावर राया म्हणाला, " काका, तुम्हांला कांहीं विचारावयाचें आहे ! पण प्रथम आमची तुम्हांला ओळख करून देतो. तुमचा गजाभाऊ आणि आम्ही बाराजण आहोंत. आम्हीं साडेतीन वर्षात काय कमविलें तें सर्व तुम्हाला गजाभाऊच्या मिळकतीवरून कळलंच आहे. आमच्या मंडळीचं नांव ' रायक्लब ' आहे. अधर्मानं

कोणाला फसवायचं नाहीं, अनीतीनं वागायचं नाहीं आणि कोणताहि अनाचार करायचा नाहीं, हा आमचा बाणा आहे. सर्वांनीं एकजुटीनें रहावयाचं आणि जी प्राप्ति होईल, ती सर्व सारखी वाटून घ्यायची! क्लबची एकही गोष्ट बाहेर फुटायची नाहीं, अशी प्रत्येकानं खबरदारी घ्यावयाची. कंजुष, लोभी, अनाचारी, व्यभिचारी आणि चोर, चहाड शिंदळ यांना आम्ही बेधडक लुटतों. कोणतीहि गोष्ट करतांना प्रथम ठरवून त्याप्रमाणें एकदां ठरल्यानंतर सर्वांनीं त्याप्रमाणें वागायचं! मीं अमुकच करीन असा हट्ट किंवा इतरांचा द्वेष करायचा नाहीं. तसंच कोणतहि काम — मग तें काम कोणत्याहि दर्जाचं असलं तरी तें मंडळींनीं ठरविल्यावर संतोषानं करायचं! अशी आमच्या क्लबची ही थोडक्यांत हकीकत असून आम्ही सर्वजण अशा कडक शिस्तीनें वागतों, आतां मला गजाभाऊचे पत्र आलं, म्हणून इथं आम्ही आलों आहोंत. येथील फौजदार अत्यंत अनाचारी आहेत, असं गजाभाऊनं कळविलं आहे, तेव्हां त्याची आम्हाला माहिती द्या, म्हणजे मग पुढं काय करायचं तें आम्ही ठरवूं!"

"वाटेल तितकी माहिती! अहो, माहितीला काय तोटा? ह्या फौजदार साहेबांचं नांव विध्वंस असून नांवाप्रमाणंच त्यांनीं सर्वांचा विध्वंस चालविला आहे. हे फौजदार तुम्हाला माहितच आहेत—केवळ गरीबांचे काळ! ह्याना कोंबड्या लागतात, लांकुडफांटा लागतो, धान्य लागतें, दारू लागते, कपडा-लत्ता लागतो, सर्व कांहीं लागतं! मग काय फौजदाराच्या नांवावर पाटील, शिपाई, नाईक, जमादार हीं त्याची पिलं गरीब रयतेला सारखी पिळून काढतात. ह्या फौजदारानं गांवांतील कितीतरी बायका भ्रष्ट केल्या आहेत. मग ती बाई कोणीका असेना? गवतवाली असो, लाकुडवाली असो किंवा एखादी कातकरीण असो. तरुण असली कीं झालं! आणखीं दोन वर्षें बाकी आहेत. मग हे राजेश्री जाणार पेन्शनमध्यें! पण तोंपर्यंत काय गुण उधळतील तें परमेश्वरालाच ठाऊक! ह्यांच्या पूर्वीचे फौजदारहि अगदीं असेच होते. पण ते बायाबापड्यांच्या वाटेस जात नसत. ही स्वारी वाटेल त्याच्यावर एखादं लचांड उपस्थित करून शें दोनशें किंवा पांचशें त्याच्याकडून उकळल्याशिवाय स्वस्थ बसायची नाहीं. कोणतीहि केस असो, पैसा खाऊन उलट चार्ज मांडायला ह्या राजेश्रींची तयारीच!"

"ही सर्व माहिती आम्हाला कळली. पण अलीकडची कांहीं ताजी बातमी?" रायानें विचारलें.

क्षणभर विचार करून विठूकाका म्हणाले, ' इथं एक विधवा आहे. तिच नीनशें रुपयाचें उत्पन्न असून पाच हजारांपर्यंत दागदागिन्याची तिच्याजवळ माया आहे. तिला माहेरची आप्तसंबंधीं आहेत परंतु नवऱ्याच्या बाजूनं कोणी नाहीं. बाई चांगली देखणी आणि तरुण आहे तिच्यावर ह्या राजेश्रींचा आज दोन वर्षे डोळा आहे. पण तिचं प्रेम गुंतलं आहे एका तरुण परभावर ! जवळजवळ ती त्याच्याजवळ आहे म्हणाना ? सर्व गावाला माहीत आहे. तिला कांहीं महिने लोटले होते. मध्यंतरी ती आणि तो—त्याचं नांव प्रभाकर फणसे—अशीं दोघेंहि तीन चार महिने बाहेर गांवीं गेलेलीं होतीं. प्रभाकराला फक्त एक आजी असून घरचं उत्पन्न बऱ्यापैकीं आहे. आता एका महिन्यापूर्वी तीं दोघें परत आलीं. पुढें ती बाई बाळंत झाली. चार दिवसानीं ते मूल मेलं. तेव्हां रीतसर त्या मुलाला स्मशानांत नेऊन पुरण्यात आलं. फौजदार साहेबांना त्या बाईचा सूड उगवायचाच होता. म्हणून त्यांनीं स्वतःच एक तक्रार केली ' अमुक बाई बाळंत झाली. गरोदर असतानाच मुलाची वाट लावण्याकरितां ती चार महिने परगांवीं गेली होती. परंतु तें कार्य तिकडे साधलं नाहीं. आतां परत आल्यावर ती गुप्तपणें बाळंत झाली. झालेल्या मुलाला मारण्यांत आलें आहे. तर सरकारी रीतीनें ह्या गोष्टीची चौकशी व्हावी ! ' अशा अर्थाची कंप्लेंट तयार करून ह्या बाईला आणि प्रभाकराला कचेरींत बोलावून घेतलें. ह्या दहा दिवसांत त्या नुकत्याच बाळंत होऊन अशक्त बनलेल्या बाईला त्यांनीं कमींतकमी पन्नासदां कचेरींत बोलाविलें. त्या मुलाचं प्रेत उकरून काढून डॉक्टरकडून त्याची तपासणी करविली. असा सर्व फार्स केल्यावर ती बाई भ्याली. एक तर कचेरींत एकसारखे हेलपाटे घालून ती टेकीलाच आली होती. त्यांत हा चार्ज आपल्यावर येणार असें पाहून भीतीनें तिनें पांचशें आणि प्रभाकरानें पांचशें अशी हजाराची थैली त्याच्यापुढें केल्यावर त्यानं चार्ज न मांडता केस मिटविली. पण खरं पाहिलं तर मुळात केसच नव्हती ! "

ऐकलेल्या हकीकतीचा राया विचार करीत होता. थोड्या वेळानें विठूकाका पुढें म्हणाले. " तुम्हाला अधर्मानं आणि अनाचारानं वागणारीं बडीं कुळ पाहिजे आहेत ना ?—मग उद्यां आमच्या गांवांतील दोन चार व्यक्ति तुम्हाला दाखवितों ! तुम्हीं ह्या फौजदाराला शिकविणार असाल, तर त्याच्या बरोबरच त्याच्या नायकालाहि घ्या फायलावर ! हे बजावा नाईकहि पुढें वाढत वाढत जाऊन फौजदारच होणार ! "

" त्याची काय हकिकत आहे ? "

" फौजदाराचा तो उजवा हात आहे. परवा त्यानंहि अशीच कांहीं कात-करणीच्या पोरीची भानगड केली, असं मीं ऐकलं पण नक्की माहिती नाही. उद्या शोध करून सांगतों. "

थोडा वेळ विचार करून राया म्हणाला, " विठूकाका, तुम्हाला एखादं काम सांगितलं तर कराल ना ? "

" तें काय विचारतां ? असं बिनचूक वठवून देतो कीं तुम्हीं शाबास म्हणाल ! "

" तुमची आणि ह्या विध्वंस फौजदाराची ओळख आहेच ! "

" ओळखच का चांगला स्नेह आहे पण लेकाचा मलाहि गडविण्याच्या विचारात असतो. एखादी वस्तु पाहिली कीं ही बरी दिसते ह ! विठूकाका ही जिन्नस आपल्याला फार आवडली बुवा ! असं म्हणून ती स्वारीनं उचललीच ! आमचा एक सुदर आरसा एक पेटी, एक काठी, अशा जिनसा लेकानं नेल्या. फौजदार म्हणून कांहीं बोलतां येत नाहीं ! "

" बरं आता तुम्ही असं करा — असें म्हणून पुढं काय करावयाचं तें रायानें त्याना सांगितलें, आणि म्हटलें " तुम्ही दहा वर्षे नाटकात घालविलीं आहेत तेव्हा आता तुम्ही हें काम कसं करता तें पाहतो. "

" अगदीं काळजी नको ! पहा तर खर ! " असें म्हणून विठूकाका उठले आणि रायानें दिलेला लखोटा घेऊन तसेच उघडे बोडके बाहेर पडले. त्यावेळीं मध्यरात्र उलटून गेली होती. बाहेर गुडुप अंधार पडला होता. फौजदाराचें घर परभू आळीच्या शेवटाला होते. वाटेंत भुंकणाऱ्या कुत्र्याना 'हाड् हाड्' करीत विठूकाका फौजदाराच्या घराजवळ आले, तेथेंहि एक सरकारी कुत्रा पहाऱ्यावर होताच ! घरांत फौजदारसाहेब दारूच्या निशेंत पडले होते आणि पहाऱ्यावर चिलमीच्या तारेंत शिपाई डुलक्या देत होता. अशा अपरात्रीं फौजदार कोणाचीहि भेट घेत नसे. कितीहि महत्त्वाचें सरकारी काम असलें तरी फौजदारसाहेबांनीं रात्रीं आपल्या डोक्याला त्रास दिला, असें ह्यापूर्वीं कधींच झालें नव्हते. कारण एकदां नऊ वाजले म्हणजे हे फौजदार-साहेब स्वतःच्या ताब्यांत नसून ते बाटलीबाईचे दास बनत असत. रात्रीं कोणाचीहि फौजदारसाहेब भेट घेत नाहींत, हें माहीत होतें तरी आपणांस त्याची आतां भेट घेतां येईल, अशी विठूकाकाची खात्री होती, म्हणूनच आतां ते आले होते.

" कोण आहे ? " शिपायानें दरडावून विचारलें.

" मी विठूकाका आहे ? " फार महत्त्वाच काम आहे. माझी फौजदार साहेबांशीं भेट झालीच पाहिजे ! "

" तू विठूकाका आस नाहीं तर दाझू काका आस ! सायबाची आता भेट व्हायची नाही, रात्रीं साहेब कुणाला भेटत नसतात. "

" तुला काय कळतं ! तुझ्या साहेबावर मोठ संकट आल आहे. माझी त्याची भेट झालीच पाहिजे ! "

" अरे जा लेका ! मुकाट्यान जा नाहीं तर गचाडी देईन ! "

" तुझी काय मजाल आहे अंगाला हात लावायची ! "

" अरसं काय ! रात्रभर खोड्यात अडकवून ठेवीन ! माहित नाहीं पोलिसचा इंगा ? "

" काय आहे रे गडबड ? " वरच्या खिडकींतून स्वतः फौजदार साहेबांनीं विचारलें, " कोण करतो आहे धादल ? अडकवून ठेव चौकीवर ! "

" फौजदारसाहेब मी विठूकाका आहे. तुम्हाला मुद्दाम भेटण्याकरता आलों आहे ? "

" कोण विठूकाका ? आणि इतक्या रात्रीं ? "

" होय ! फार महत्त्वाच काम आहे ! "

" रखमा त्याना वर घेऊन ये. "

शिपायानें मनातल्या मनात चरफडत पण मुकाट्यानें विठूकाकाना वर आणलें. नमस्कार चमत्कार वगैरे औपचारिक विधि कांहीं एक न करतां शिपाई निघून जातांच विठूकाकानीं बोलण्यास सुरवात केली. " फौजदारसाहेब, तुमच्यावर मोठ संकट येऊं पहात आहे. तुमच नशिब थोर म्हणून मला वेळीच सुगावा लागला ! "

" माझ्यावर सकट ? " असें म्हणून फौजदारसाहेबानें एक अश्लील शिवी हासडली, आणि ते पुढें म्हणाले, " ह्या विष्वसावर कोण सकट आणणार ? कोणाची माय व्याली आहे ? कोणाला आपला जीव नकोसा झाला आहे ? "

" असे रागावता काय ? मी काय म्हणतो तें ऐकून तर घ्या, मग कोणाची माय व्याली आहे ते कळेल ! मी जो इतक्या अपरात्रीं जीव तोडून धापा टाकीत आलों, तें उगाच वाटतं ? —तुमचा माझा स्नेहसबंध म्हणून ना ? "

" बरं सांगा !—सांगा ! "

" आमचा गजोबा तुम्हाला माहीत आहे ! "

" तुमचा पुतण्या कीं नाहीं ? त्याला परवां गोव्यांची पांच हजारांची लॉटरी आली तोच ना ? "

" होय होंय तोच ! " विठूकाका बोलले. आमच्या गजाभाऊनें आपल्या वाट्याचे पाच हजार रुपये घरीं आणले, ते रुपये त्याला गोव्याच्या लॉटरींत मिळाले, असें विठूकाकानें गांवांत जाहीर केलें होतें. फौजदारांचाहि तसाच समज होता, आणि तोच समज विठूकाकानीं कायम ठेवला होता. ते पुढें म्हणाले, " आमच्या गजोबाचे दोन मित्र सहज त्याला भेटण्याकरता काल इकडे आले. त्याच्याबरोबर त्याचाहि एक मित्र आला आहे. तिघेहि आमच्याच घरीं उतरले आहेत. हा तिसरा मनुष्य आमच्या घरीं येताच मला त्याचा संशय आला. तुमच्या सहवासात असल्यामुळें तो मनुष्य कोणातरी गुप्त पोलिसापैकी असावा, असा मला संशय येऊं लागला, म्हणून मी त्याच्यावर पाळत ठेवली. रात्रीं ते तिघेहि बराच वेळ गोष्टी बोलत बसले होते. तो मनुष्य गजोबाजवळ तुमचीच चौकशी करीत होता. आमच्या पोराला धोरण नसल्यामुळें त्यानं परवां तुम्ही राधाबाईवर तो मुलाचा उपस्थित केलेला खटला त्याला सांगितला. मी त्यांच्या सर्व गोष्टी ऐकत होतों. नंतर निजानिज झाल्यावर मी माझ्या संशयाची निवृत्ति करून घेण्याच्या मागें लागलों. त्या तिघांनींहि आपले कपडे खुंटीवर काढून ठेवले होते. त्यांत मला शोध करतांना हा लखोटा सांपडला. हा घ्या, वाचा ? " असें म्हणून विठूकाकांनीं आपल्या बंडीच्या खिशांतून लखोटा बाहेर काढला आणि फौजदारसाहेबांच्या हातीं दिला. तो सरकारी लखोटा आहे, हें त्यानें तात्काळ ओळखलें. दिवा मोठा करून त्यानें तो लखोटा वाचण्यास सुरवात केली. क्षणार्धांत त्याची चर्या पालटली. फौजदार साहेबांच्या तोंडावरील अधिकाराचा बेगुर्वतपणा नाहींसा होऊन आता ' आ ' पसरून ते लखोट्याकडे पहात राहिले. आपल्या विरुद्ध पुरावा गोळा करण्याकरतां खास कमिशनरसाहेबांच्या हुकूमावरून रायकर नावाचा एक ' सी. आय. डी.' चा इन्स्पेक्टर आला आहे, हें वाचून फौजदारसाहेबांचें धाबे दणाणलें यांत कांहीं नवल नाहीं ! त्यांची निशा खाडकन् उतरली. त्यांच्या सर्वांगावर दरदरून घाम सुटला. ते पत्राची घडी करीत म्हणाले, " मोठं लचांड झालं ! "

" फौजदारसाहेब, लचाडच काय पण तुमचा डब्बा गुल्ल होण्याची वेळ

आली आहे, आहात कुठं ? " आपण दिलेलें पत्र वाचून फौजदारसाहेब गर्भगळीत झाले आहेत, हे लक्षांत येताच विठूकाकांना जोर आला. ते पुढें म्हणाले, " तो आलेला इन्स्पेक्टर गुप्त रीतीनें चौकशीला सुरवात करील. अर्थातच त्याला तुमचीं एकएक कुलंगडीं कळतील. शिवाय गावकरीहि त्याला तुमच्या विरुद्ध वाटेल तशा गोष्टी सागतील, कारण गांवकरीहि कांहीं तुम्हाला बरं पहात नाहींत. अर्थात् तो तुमच्या विरुद्धच पोलीस कमिशनरसाहेबांस रिपोर्ट करील आणि—"

" पण छे छे !—विठूकाका, तस होतांच उपयोगी नाहीं ! " भयभीत स्वरांत फौजदार म्हणाले. ' माझी इतक्या वर्षांची सर्व्हिस नाहक पाण्यांत जाईल आणि उलट सरकार पाच दहा वर्षे पाठवील ! विठूकाका, तुम्हीं माझे जानी दोस्त आहांत !—कसंहि करून ह्या इन्स्पेक्टरला वश करून घेतलंच पाहिजे ! "

" तें कसं काय करायचं तें तुमचं तुम्हीच पहा ! मी माझं मित्रकार्य केलं. पण फौजदारसाहेब तुम्ही इतके घाबरतां कां ? तुमचा अधिकार एवढा मोठा, सत्ता एवढी दांडगी आणि ' हम करेसो कायदा ' तुमच्या हातांत असं असताना तुम्ही असे भिता ? कांहीं तरी लचांड उपस्थित करून ह्या इन्स्पेक्टराला अडकवून टाका इथल्या इथं म्हणजे झालं ! "

" छे छे विठूकाका भलतंच ! असं कांहीं केलं तर माझीच दहा वर्षांची बेगमी होईल. अहो ' सी. आय. डी. ' इन्स्पेक्टरपुढं कसली आली आहे आमची सत्ता आणि अधिकार !—छे ! कांहीं तरी युक्तिच काढली पाहिजे. हें पहा, विठूकाका तुम्ही त्याच्या हालचालीवर नजर ठेवा आणि मला वेळोवेळीं येऊन कळवीत चला. आणि तुमच्या त्या पुतण्याचेहि कान चावून ठेवा. आजपर्यंत कमावलेलं गमवायची वेळ आली आहेसं दिसतं ! "

" त्याची नको काळजी ! तुम्ही कमावलेलं गमावलंत तरी त्यांत हरकत नाहीं ! ' हपापाचा माल गपापाला गेला, ' असें म्हणून स्वस्थ तरी बसता येईल. पण उद्यां त्यानें रिपोर्ट करून तुम्हाला दहा बारा वर्षांची यात्रा करावी लागेल त्याचा प्रथम विचार करा ? "

विठूकाकानें आपली कामगिरी सोळा आणे बजावली यांत शंकाच नाहीं ! आमची मंडळी त्यांची वाटच पहात होती. बरीं आल्यावर आपणाकडे सोंपविलेली कामगिरी आपण कशी पार पाडली, ती सविस्तर सांगून विठूकाका म्हणाले, " हा लेकाचा आतां पुरा हातांत आला ! पांच हजाराला कांहीं आतां

मरण नाहीं. आजपर्यंत लोकाच्या मुंड्या पिळल्या पण आता स्वतःचीच मुंडी पिळून घेण्याची वेळ आली आहे. ' कराव तसं भराव ' म्हणतात तें काहीं खोटं नाहीं ! "

" बरं पण पत्र कुठ आहे ? " रायानें विचारलें.

" हें काय ? मी हें पत्र तिकडे ठेवीन अस का तुला वाटलं ? "

" आणि ठेवल असतं तर त्यात काय बिघडलं होत ! त्या पत्राचा खरेखोटे-पणा सिद्ध करण्याची तुमच्या फौजदारसाहेबाची छातीच नाहीं ! बर आता झोंपा उद्यां पुढल्या गोष्टीचा विचार करू ! "

सर्वजण झोंपले. परतु राया मात्र बिछान्यावर पडून विचार करीत होता. आपण घेतलेल्या सोंगाची यथायोग्य बतावणी करण्याकरिता आपल्याला कोण-कोणत्या गोष्टी केल्या पाहिजेत, याचा विचार करीत रायानें पुढले सर्व बेत जुळवून ठेविलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्यावर त्या मित्रमडळीचा चहा झाला. नंतर ते चौघे मित्र गांव पहाण्याकरितां बाहेर पडले. वाटेत त्यांना देवळें, सरकारी कचेऱ्या, शाळा, हायस्कूल, फौजदारकचेरी वगैरे अनेक स्थळें लागलीं. तीं पहात पहात आमची मडळी सरकारी दवाखान्याजवळ आली, तेव्हा क्षणभर विचार करून राया म्हणाला, " चला आपण दवाखान्यांत जाऊ. ह्याच डॉक्टरन त्या मुलाच प्रेत तपासलं ना ? पाहूं तर खर बोलतां बोलतां त्याच्याकडून कांहीं बातमी काढता आली तर ! "

हे रामजी डॉक्टर हॉस्पिटल असिस्टंट असून आज वीस वर्षे ते सरकारची नोकरी करीत होते. गावात काहीं डॉक्टर आणि वैद्य होते तथापि रामजी डॉक्टरची प्रॅक्टीस बऱ्यापैकीं होती. मनुष्य लोभी खरा, परतु तितकाच भित्रा होता. तरी गांवात तो चांगलेंच वजन राखून होता. आमची मंडळी दवाखा-न्यात गेली. त्या वेळीं डॉक्टर साहेबाच्याजवळ दोन पेशन्ट होते. एक बाई साधारण वयवंत होती आणि दुसरी तेरा चौदा वर्षांची पोरच होती. कातकऱ्याची ती गरीब जात, एका कोपऱ्यांत बसून डॉक्टर साहेब केव्हां औषध देतील त्याची वाट पहात बसली होती. आमच्या मंडळींना पहातांच ' काय महाराज, काय हेतु योजून आला आहांत ? ' डॉक्टरानीं विचारलें.

" कांहीं नाहीं सहज आलों होतों. गांव पाहायला निघालो तेव्हा म्हटलं डिस्पेन्सरीहि पहावी म्हणून आलों. " बापूनें उत्तर दिलें. तोंच डॉक्टर साहेबाची दृष्टी गजाभाऊकडे गेली.

" ओहो, गजोबा, यू लकी डॉग ! आज कुणीकडे ? तुला म्हणे दहा हजारांची गोव्याची लॉटरी आली ? मला परवा कोण सांगत होता, खरना ? खरंच मलाहि अशीच लॅाटरी येईल तर मी स्वस्थ हरि हरि म्हणत घरीं बसेन ! बरं पण ही मडळी कोण ? "

" हे आमचे स्नेही आहेत. आणि हे—रायाकडे बोट दाखवून, " ग्रँट मेडिकल कॉलेजचे स्टुडंट आहेत. " गजाभाऊ म्हणाला.

" तरीच ते दवाखान्यात आले ! जो तो आपापल्या आवडीप्रमाणे वळणावरच जाणार ! बर मीं तुम्हाला एक मजेदार केस दाखवतो. तुम्ही मेडिकल स्टुडंटच आहात, तेव्हां तुम्हाला ह्या केसमध्ये मोठ ' इंटरेस्ट ' वाटेल. " असे म्हणून डॉक्टरसाहेबानीं कोपऱ्यात बसलेल्या मुलीला जवळ येण्यास सांगितले. ती कातकऱ्याची मुलगी वर्णानें अगदीं काळी कुळकुळीत होती, तरी तारुण्यात तिचा प्रवेश होत असल्यामुळे तिची अंगलट मोहक दिसत होती तिच्याकडे पहात डॉक्टरसाहेब म्हणाले, " ही मुलगी नुकतीच आपलेरणात आली आहे. तथापि अति प्रसगामुळे तिची कशी नुकसानी झाली आहे, ते मी तुम्हाला दाखवितो, पोलिसामध्ये ' रेपच्या ' केसीस पुष्कळ येतात. माझ्यामतें जवळ जवळ ही केस देखील तशीच आहे. परंतु केस उपस्थित करणार कोण ? ही जात पडली अशी गरीब ! त्यातूनहि केस केली तर पोलिसालाच आरोपी करावे लागतील. पण जाऊ द्या.—ही केस तर पहा. " असें म्हणून डॉक्टरांनीं त्या मुलीला बाजूच्या खोलींत जाण्याला सांगितलें. आपणास काय झालें आहे, हें डॉक्टरानें परक्या मनुष्याला सांगितलें, हे त्या मुलीला मुळींच पसंत पडलें नाहीं. ती कातकऱ्याची मुलगी होती तरी लज्जाशील होती. रागानें ती बाहेर निघून गेली. ते पाहून राया म्हणाला, ' जाऊ द्या डॉक्टरसाहेब ! अशा केसीस जरी मी पाहिल्या नाहींत, तरी त्यावर पुष्कळस वाचलं आहे. "

" मी कांहीं फारशा वाचल्या नाहीत पण पाहिल्या आहेत मात्र पुष्कळ ! "

" पण कसं काय हो डॉक्टरसाहेब, त्या दिवशीं म्हणे तुम्ही मेलेल मूल तपासल, ही गोष्ट खरी का ? एखादं जमिनींतून उकरून प्रेत बाहेर काढायला आणि तें तपासायला तुम्हाला सरकारी हुकूमच मिळत असतील ! "

" हो— तर ! पण मी परवा तपासलेलं तें मूल तपासण्याकरिता मला कांहीं सरकारी हुकूम नव्हता. फक्त फौजदारसाहेबाच्या सांगण्यावरून मी ते मूल

तपासल. त्या मुलाचा खून केला असा फौजदार साहेबांना वहिम आला होता. परतु मला मात्र तसं काहीं आढळलं नाहीं. कदाचित् पोट फाडल्यावर काहीं समजल असतं तर काहीं सांगतां येत नाहीं."

"एकूण तुम्हीं मूल तपासल एवढी गोष्ट खरी! बरं डॉक्टरसाहेब घेतो आम्ही आपली रजा!" असें म्हणून राया बाहेर पडला. त्याला त्या कातकऱ्याच्या मुलीला भेटायचें होतें म्हणून त्यानें डॉक्टरसाहेबांची अशी घाई-घाईनें रजा घेतली. ती मुलगी आणि तिच्या बरोबर असलेली म्हातारी अद्यापि दवाखान्याच्या बाहेर सांवलीत होत्या. राया त्यांच्या जवळ जाऊन म्हणाला, "बाई, घाबरूं नका! ह्या मुलीला कोणी दुष्टानं छळलं आहे, हें मला कळलं पण तुम्ही अशा स्वस्थ काय बसलां? तुम्हाला पुरुषमंडळीची मदत नाहीं का? तुम्ही ह्याच वेळीं उद्या कोणी पुरुषमडळी बरोबर घेऊन या. मग पुढें काय करायचं ते मी सांगेन. तुम्हाला जी लागेल ती द्रव्याची मदत मी करीन. मुळींच काळजी करूं नका!"

हे सहानुभूतीचे शब्द ऐकताच त्या म्हातारीच्या डोळ्यांतून घळघळ अश्रू वाहू लागले. तिनें दुसऱ्या दिवशीं जरूर येण्याचें कबूल केल्यावर राया आपल्या मित्रमंडळीसह तेथून निघाला. ते चौघे मित्र जाऊन थोडा वेळ झाला नाहीं तोच फौजदारसाहेब तेथें आले. त्यांना पाहतांच ती गरीब कातकरीणबाई भितीनें झटकन् बाजूला झाली.

"म्हातारे, इकडे ये. अशी माझ्याबरोबर आंत ये, रडतेस कशाला? तुला बोंबलायला काय झालें? मी विचारतो त्या प्रश्नाचीं सरळ उत्तरें दे!" दरडावून फौजदारानें विचारलें. आणि तिला आंत आणलें. आज सकाळ-पासून आपलीं खास विश्वासाचीं चार माणसें विठूकाकाच्या घरावर टेहळणी करण्याकरिता त्यांनीं पाठविलीं होतीं, त्यांच्या घरीं आलेले तीन पाहुणे कोठें जातात आणि काय करतात, यांवर त्यांनीं स्वतःहि नजर ठेवलीच होती. ह्या टेहळणीप्रमाणेंच त्यांनीं आतां आमच्या मंडळीना दवाखान्यांतून बाहेर पडतांना आणि त्या म्हातारीबरोबर बोलतांना पाहिलें होतें. त्या पाहुण्यांपैकीं एक 'सी. आय. डी.' इन्स्पेक्टर आहे, हें त्यांना पुरतेपणीं कळून चुकलें होतें. तो आतां कोणती चौकशी करतो, इतकेंच त्यांना समजून घ्यावयाचें होतें. म्हातारीला दरडावून विचारतांच तिनें सरळ हकिकत सांगितली. तेव्हां क्षणभर विचार करून फौजदारसाहेब डॉक्टरांना म्हणाले, "रामजी डॉक्टर, तुमच्या जवळ त्या मनुष्यानं काय चौकशी केली?"

" चौकशी कसली फौजदारसाहेब ! तो एक मेडिकल स्टुडंट आहे. सहज डिस्पेन्सरी पहाण्याकरितां म्हणून आला आणि विचारूं लागला कीं, तुम्ही थोड्या दिवसापूर्वी एका मुलाचं प्रेत उकरून काढून तपासलें,—"

" अरे बापरे ! " एकदम भयभीत स्वरानं फौजदाराच्या तोंडून उद्गार बाहेर पडला !

" कां फौजदारसाहेब इतके भ्यालात का ? अहो हे मेडिकल स्टुडंट अशी माहिती विचारणारच ! "

" तुमचं बोडकं ! तुम्हाला यात काय कळतं आहे ! तो मेडिकल स्टुडंट नाहीं, पण तुमचा आमचा काळ आहे ! अहो डॉक्टरसाहेब तो 'सी. आय. डी.' चा इन्स्पेक्टर आहे समजलात ? मुद्दाम चौकशी करण्याकरितां कमिशनर-साहेबाच्या हुकुमावरून तो इकडे आला आहे. ही आपण पोराची भानगड केली, त्याचं प्रेत तपासलं आणि ही खरी सरकारी केस आहे, असं दाखवून त्या × × राधेला दहशतहि घातली पण आतां ती केस तुमच्या अन् माझ्या बोकाडीं बसणार आहे ! "

" अरे बापरे ! " आतां डॉक्टरसाहेबांच्या तोंडातून भीतीचा उद्गार बाहेर पडला ! " आता कंबख्ती भरली म्हणायची ! तरीच तो मला अगदीं खोदून खोदून विचारीत होता. 'तुम्हाला सरकारी हुकूम होता काय ? तुम्ही सरकारी हुकुमाशिवाय तें मुलाचें प्रेत जमिनींतून काढून तपासलं ही गोष्ट खरी काय ?" असं त्यान मला दोन चारदां खोदून खोदून विचारलं. "

" बस बस ! तुमची कंबख्ती भरली हेंच खरं ! तो पुरावा गोळा करतो आहे, हेंच खरं ! "

आमचे चौघे मित्र घरीं आल्यावर विठूकाकांनीं स्वतः त्यांच्या स्नानाची व्यवस्था केली. जेवणाचा बेत स्पेशल होता. आनंदानें जेवण चाललें अस-ताना रायानें त्या मंडळींना आपला खाणावळीचा अनुभव कळविला, आणि पुनर्विवाहास उत्सुक झालेल्या आवडाबाईचीहि हकीकत सांगितली. ती ऐकतांच विठूकाकाहि आपले नाटकी आयुष्यांतील दहा वर्षांचे अनुभव सांगूं लागले. ते म्हणाले, " आमची कंपनी प्रथम मुंबईमध्यें स्थापन झाली. त्यावेळीं आम्ही सर्व उडाणटप्पुच होतों. केवळ खावं, प्यावं आणि चार गांव पाहायला मिळून मौज मारायला मिळावी, हाच आमचा नाटक कंपनी स्थापण्याचा मूळ उद्देश होता.—हे बडे लोक 'नाटक हें एक लोकशिक्षणाचें अंग आहे,'

असा वाटेल तितका शंख करोत, परतु मला त्यांत काहींच तथ्य दिसत नाहीं. कपनींत गोरींगोमटीं पोर असतात याच्यावरच खुष होऊन हे कवि, लेखक उल्लू बनलेले असतात. दहा वर्षात आमच्या कपनीनें पधरावीस नाटके बसविलीं. चागले नामाकित नाटककार आमच्या कंपनींत पुष्कळ झोडीत होते. कंपनींतील त्याच वर्तन बघितल तर काहीं निराळच ! एखाद्या स्त्रीपात्राच पोर ह्या कवींच्या बगलेंत असायचंच ! त्याला धोतर घेऊन देतील, कपडे शिवतील, खावयाला देतील आणि त्याचे वाटेल ते चोज पुरवितील ! ही झाली आमच्या नाटककार कवीची हकीकत ! प्रेक्षकात देखील असाच उल्लूपणा ! नाटकी मडळींना आपल्या घरीं बोलावण्यांत आणि त्यांना खाऊ पिऊं घालण्यात त्यांना मोठा पुरुषार्थ वाटतो. विशेष आश्चर्य करण्यासारखी आणि नवलाची गोष्ट म्हणजे ह्या नाटक कपन्याना पैसे देणाऱ्या सावकाराची ! एखाद्या धंद्याकरिता एखादा होतकरू मनुष्य भाडवलासाठीं जंग जग पछाडतो. पण त्याला पाच फुटक्या कवड्याची कुणाकडून मदत होत नाहीं. परतु तेंच एखाद गोरंगोमट स्त्रीपात्र बरोबर घेऊन एखाद्या सावकाराकडे जा कीं सावकार दोन हजारांच्या ऐवजीं तीन हजार आपण होऊन देतो. आता कंपन्यातील मडळी आणि हीं नाटकी पोरं ! यांत व्यसन नाहीं असा एक मनुष्य विरळा ! पानपट्टी खाणं आणि विड्या ओढणं हें आतां ' व्यसन ' सदराखालीं येत नाहीं, तेव्हा त्याविषयीं सांगायला नकोच ! कोणाला दारूचं, तर कोणाला गांजाचं, तर कोणाला भागेच अशा ह्या व्यसनात मडळी अगदीं चूर असतात. ह्या शिवाय त्यांचीं बाहेरचीं एकएक लफडीं अशीं गुतागुंतीचीं कीं काहीं सागता येत नाहीं. आता मी आमच्या कपनींतील मडळींच्या काहीं गोष्टी तुम्हाला सागतो. आमच्या कपनींत केशा म्हणून एक एक संगीत पात्र होतं. आवाज चांगला होता. रंगल्यानंतर दिसत होताहि चांगला ! पण लेकाचा काळा होता ! आमच्या नाटकाला एक दोन नायकिणी आपल्या बनिया शेटबरोबर नियमान येत असत. त्या दोघींच लक्ष केशावर होतं. ही गोष्ट कालातरान त्या शेटजीच्या लक्षात आली. हा केशाहि सर्व मंडळींची नजर चुकवून केव्हातरी तिकडे जात असे. त्यानीं चार पांचशे रुपयाचा ऐवज आमच्या केशाला दिला होता. त्याचे निरनिराळे पटके, नवीन नवीन धोतरें, आणि उची कोट पाहून आम्हाला तो कांहीं दाद लागू देईना. परंतु एके दिवशीं त्याचा डब्बा फुटला ! एके दिवशीं शेटजीनें नीट पाळत

ठेवून त्याला पकडलें आणि आपल्या हस्तकाकडून बेदम मारलें. इतकेंच नव्हें तर त्याच्या जवळून दोन हजार रुपयाचा रोखा लिहून घेतला. त्या नायकिणीं-नाहि जे हजार दोन हजाराचे दागिने दिले होते ते सर्व काढून घेतले, इतकेंच नव्हे तर उर्ची कपड्यानीं भरलेलं कपाट, टेबल, खुर्ची वगैरे दुसरं सामान एका दिवसांत आपल्या घरीं नेऊन त्या दोघी नायकिणींना त्या शेटजीनं कफ-ल्लक करून सोडलं. दुसऱ्या दिवशीं केशावर केस केली. परंतु तो मारामुळे आजारी पडला. त्याला कोर्टात जाता आलें नाहीं, तेव्हां एकतर्फी निकाल होऊन डिक्री झाली. दुसऱ्या दिवशीं जेव्हा ते शेटजी सामान काढण्याकरिता बेलिफ घेऊन कंपनीच्या बिऱ्हाडीं आले; तेव्हां आम्हांला केशाची भानगड कळली आणि तो प्रत्येक दिवशीं नवीन नवीन फेटा आणि पोशाख घालीत असे, त्याचं रहस्य कळलें. केशा कंपनीच्या चौघा मालकांपैकीं एक असल्या-मुळे कंपनीला झक्कत ते पैसे भरावे लागले. आपण आपल्या शोकाकरितां त्या नायकिणींना दोनशें रुपये दरमहा देऊनहि जर त्या निमकहराम बनल्या आणि त्याच शेटच्या पैशावर जर आपला शोक करूं लागल्या तर त्यांना मिळाल तें प्रायश्चित्त योग्य नव्हतं असं कोण म्हणेल ! ”

“ शेटजीनें केलं तेंच योग्य केलं अस मी म्हणतो, ” राजा म्हणाला.

“ आतां दुसरी गोष्ट सांगतों. ” विठूकाका पुढं सांगूं लागले. “ एकदा आमची कंपनी नाशकास गेली होती. कंपनीचें बिऱ्हाड थिएटरमध्यें होतें. आमच्या कंपनींत जयराम म्हणून एक पार्टी होता. त्याचीं लफडीं काहीं विलक्षण ! तो बाहेर गेला आणि परत कंपनींत आल्यावर त्यानें एखादें लफडें बरोबर आणलं नाहीं, असें होतच नसे. चहाच्या दुकानात गेला कीं एक सिंगल चहा, एक दिडकीची उसळ, दिडकीची भर्जी, दिडकीचा चिवडा ! अशा चार पाच बशा त्या खावून झाल्यावर त्यापैकीं एखादी तरी रिकामी बशी तो खिशांत घालून बिऱ्हाडीं आणायचाच ! मुंबईच्या मुक्कामाला त्यानें अशा दीडशें बशा गोळा केल्या होत्या, शिवाय उधारीच्या बाबतींत तर कांहीं विचारूंच नका. प्रत्येक चहावाला त्याच्या नावानें बोंब मारीत बिऱ्हाडीं यावयाचा ! एखाद्या बरोबर त्याची ओळख व्हावयाची खोटी कीं त्याच्या घड्याळाला, बटणांना, काठी किंवा छत्रीला निदान त्याच्या रुमालाला तरी त्यानें शह द्यायचाच ! अशीं त्याचीं लहान सहान हजारों लफडीं असत. नायकांच्या बाबतींत त्याची

फारच वाईट नजर होती. ज्या दिवशीं नाटकांत काम नसेल त्यावेळीं तो डोअरवर उभा असायचा. एखाद्या बाईची छेड काढायला त्याला भीति वाटत नसे. एकदा तो असाच डोअरवर उभा असताना बायकांच्या ग्यालरींत एक बाई बसली होती तिच्या बरोबर आणखी दोघी म्हाताऱ्या बसल्या होत्या. त्या बाई-कडे जयरामच सारखं लक्ष होतं. नाटक पहातां पहाता तिचेंहि लक्ष एक दोनदा त्याच्याकडे गेलं. तेव्हां त्यानं डोळे मिचकावून तिला खुणा केल्या. बिचारी सासुरवाशीण ती ! तोंड फिरवून बसली. परंतु दरवाजावर उभे राहून जयरामचं खाकरण-खोकणं सुरूच होतं. बिचारीचें नाटकाकडेहि लक्ष लागेना तिच्याबरोबर चार पाच पुरुष मंडळी होती. परंतु ती खालीं स्टॉलमध्ये बसली होती. हें सर्व उपाध्येपणा करणारे नाशिकचे ब्राह्मणच होते. होता होतां नाटक संपलें. ती बाई बाहेर पडतांना अगदीं अंगचटीला जाऊन ' मग काय आमचं करताना ? ' अशी जयरामानं हळूच मुक्ताफळें टाकलीं. बिचारी ती बाई भयभीत होऊन घामाघूम झाली. कशी बशी आपल्या मंडळीबरोबर ती हळूच खालीं उतरली. तों जयराम तिच्या मागे होताच. थिएटरच्या बाहेर पडेपर्यंत जयरामनें दोन तीनदां तिला खेटून जाण्याचा प्रयत्न केला. तिच्याबरोबर तिचा नवरा आणि मोठे दोन दीरहि होते. घरीं गेल्यावर तिनें थिएटरांत घडलेली सर्व हकिकत आपल्या नवऱ्याला सांगितली. त्याबरोबर तो रागानें परत थिएटरकडे यावयास निघाला. परंतु वडील भावाला जेव्हां ही हकीकत कळली तेव्हा त्यानें समजूत केली. आतां जाऊन कांहीं उपयोग नाहीं. कारण आपल्याला तो मनुष्य ओळखून काढतां येणार नाहीं. शिवाय ती नाटकी मंडळी ! आपण त्यांच्या बिऱ्हाडीं गेल्यावर ते आपला वाटेल तसा अपमान करतील वगैरे ' त्याला सांगितलें. "

" गोष्ट खरी आहे ! " राजा म्हणाला. " मंडळी काय वाटेल तें म्हणेल. ' तुम्ही आपल्या बायका अशा मोकाट सोडल्यावर परक्यांनीं त्यांची थट्टा-मस्करी केली, तर त्यांत त्यांचा दोष काय ? ' असंहि म्हणायला ती मंडळी कमी करायची नाहींत. कारण बोलून चालून नाटकी मंडळी ? "

" होय, एवढ्याचकरतां त्यानें आपल्या धाकट्या भावाला कंपनींत जाऊं दिलं नाहीं. परंतु आपल्या भावजईचा अपमान करणाऱ्याचा त्यानं सूड उगविण्याचा मात्र निश्चय केला. पुढल्या शनिवारीं नाटक होतें. त्या दिवशीं पुनः तिला बरोबर घेऊन ती मंडळी नाटकाला आली. जयरामचें पहिल्या

अकांत काम होतं. स्टेजवरून त्यानें त्या स्त्रीला ओळखलं. आज देखील ती स्त्री नाटकाला आली आहे, अस पाहून 'पाणी मुरतं' असा त्याने कयास काढला. आणि काम आटोपताच रग वगैरे पुसून तो पुनः स्त्रियांच्या ग्यालरीवर दरवाजात येऊन उभा राहिला. दुसऱ्या अकाच्या शेवटीं ती बाई उठली आणि बाहेर जाण्याच्या निमित्तानें बाहेर आली. तें पाहून जयरामहि तिच्या मागून लगट करूं लागला. तेव्हां ती बाई हळूच म्हणाली, 'असं माझ्या मागं येऊं नका. मंडळी आहेत—पहातील. हळूच मागून घरी या. मी दरवाजा उघडतें!' अशा अर्थाचं तिनं सांगताच जयराम अगदीं खुष झाला! थोड्याशा प्रयत्नाना एक सावज आपणास सांपडल, ह्या मनोराज्यांत दंग असता तिसरा अंक आटोपला आणि नाटक खलास झालं! ती बाई निघाली. तिच्याबरोबरची मंडळी बरीच मागं राहिली, आणि ती एकटी पुढें जाऊं लागली. जयरामहि जिभल्या चाटीत तिच्या मागेंच होता. सोमवार पेठेंत एका घरांत ती शिरली. तिच्या मागोमाग जयरामहि त्या घरात शिरला. तेव्हा तिनं दरवाजा बद करून घेऊन 'बसा. मी आंतून येतें' असं त्याला सांगून ती आंत निघून गेली, जयरामनें आजूबाजूला पाहिल तों तेथें कांहीं विशेषसं सामान नव्हतें. कोनाड्यांत दिवा मात्र बारीक केलेला होता. आतां आपली मोठ्या आनदांत रात्र जाणार ह्या विचारात भिंतीवरील चित्रें पहाण्यात तो गढला असतांना एक आंतून आणि एक बाहेरून, अशीं दोन माणसें हातांत काठ्या घेऊन खोलींत आलीं."

"अहो राजेश्री कोण पाहिजे तुम्हाला?" एकानें विचारलें.

"मी—मी—मी—त्या बाई—बाई—जयरामनें उत्तर दिलें."

"त्या बाई का तुझ्या आई? हरामखोर, पाजी मनुष्या!" असें म्हणून पहिल्या गृहस्थानं आपल्या हातातील काठीचा रट्टा त्याच्या पाठीवर लगावला! मागून तडाखे सुरू झाले. जयरामच्या पाठीवर सारख्या काठ्या पडूं लागल्या. त्याचे कपडे फाटले. अंगावर, पाठीवर, माड्यावर आणि हातावर बोट बोट वळ उठले. अशा तऱ्हेनं यथास्थित मारल्यावर त्यांनीं दोरानें त्याचे हातपाय बांधले आणि त्याला उचलून रस्यात गटारावर टाकलें. त्यावेळीं दोन वाजलेले असल्यामुळें रस्त्यांत कोण असणार? बिचारा जयराम कुंथत पडला होता. पहाटेच्या सुमारास गस्तवाल्या शिपायांनीं त्याला पाहिलं तेव्हां 'आपणास चोरांनीं लुटलं आणि मारून बांधून ठेवलं,' असं

त्यानं सांगितल ! परंतु, पोलिसाला तें खरं वाटलं नाहीं. 'इतका मार बसत असताना कांहींच आरडा ओरड झाली नाहीं हें कसं ?' असा त्यांना संशय आला. त्यांनीं सकाळीं, त्याला कंपनींत आणलं तेव्हां आम्हाला खरा प्रकार कळला !"

"बरं उठा आता ! ताटावरच बसून गोष्टी चालविल्या तर बायकांनीं केव्हा जेवायच ? असें हासत म्हणून राया उठला. सर्व मंडळी हात धुवून दिवाणखान्यांत आल्यावर पान खात असता विठूकाका म्हणाले, "नाटक कंपन्यातील पात्राना चोप दिल्याच्या ह्या दोन गोष्टी तुम्हाला सांगितल्या, अशा किती तरी गोष्टी आहेत. त्या सर्वांचें कारण बायका आहेत. आता बायकानीं, आपण होऊन कंपन्याचीं पोटं भरलीं, अशींहि काहीं उदाहरणं आहेत."

"दिवाळं फुंकलेल्या कंपन्या तर पुष्कळच आहेत आणि ह्या कंपन्याच्या पायीं बुडलेल्या सावकाराची कोणाला कींवहि येणार नाहीं, खरं ना ?" राजानें विचारलें.

"होय, अशी तर गोष्ट खरी ! पण त्यातल्यात्यांत शहाजोग रीतीनं सावकाराला फसविल्याचींहि काहीं उदाहरणं आहेत !"

"मग एक दोन सागा तरी !" मध्येच बापूनें विचारलें.

"एक कंपनी नगर मुक्कामी स्थापन झाली—" विठूकाका सांगू लागले, "त्या कंपनीचे मालक आमच्याच कंपनींत एक दुय्यम पार्टी होता. त्याचं आणि आमच्या मालकाच कांहीं कारणावरून भांडण झालं. तेव्हां तो ईर्षेला चढून 'तुझ्या सारखे मालक मी नोकरीला ठेवीन !' अशी आमच्या मालकाजवळ प्रतिज्ञा करून तो निघाला आणि आपल्या गावीं जाऊन चुलत्याबरोबर भाडून आपल्या हिश्शाचे तीन हजार रुपये त्यानें घेतले. आमचा मुक्काम त्यावेळीं नगराला होता. त्याच मुक्कामाहून तो निघाला होता. तेव्हां पैसे घेऊन तो परत नगरालाच आला. पैसे घेऊन मालक उभा राहिल्यावर पात्रांना कांहीं तोटा नसतो. भराभर त्याच्या सभोंवतीं पात्रं जमा होऊं लागलीं. दीड हजार रुपयांत कपडा आणि चार पडदे तयार झाले. मडळीं जमण्यांत आणि नाटकाची तालीम सुरू होण्यात दोन महिने सहज निघून गेले. तोंपर्यंत पांचशें रुपये भोजन खर्च झाला, एका कवींना बोलाविलें. त्यांचा प्रवास खर्च व नाटकाबद्दल 'बयाना' म्हणून दोनशें रुपये त्या कवींना देऊन त्यांच्या 'प्रभात' नांवाच्या नाटकाची तालीम सुरू

झाली. दोन महिन्यांत नाटक साधारण बसलें. त्या नाटकाकरितां हजार रुपयापर्यंत नवीन कपडा आणि दोन सीन्स तयार केले. नाटक मोठ्या थाटांत काढावयाचं असं ठरलं. आणि गांवांतहि नाटकाबद्दल बोलबाला होऊं लागला. तोंच दुसऱ्या कंपनींत जास्त पगार मिळतो ह्या सबबीवर चार पात्रं निघून गेली. पुनः संच बिघडला. पात्रांची जुळवाजुळव करीपर्यंत आणखी एक महिना गेला. पाच महिने झाले. कोणालाच पगार मिळाला नव्हता. नाटकें सुरू झाल्यावर पगाराचे आंकडे पडणार होते. तोंपर्यंत विडी, चहापान इत्यादि हातखर्चाकरिता कोणी दहा, कोणी वीस, कोणी तीस तर कोणी पन्नास अशी प्रत्येकानें उचल केलेलीच होती. ही उचल जवळ जवळ पाचशेंपर्यंत झाली होती, शिवाय मालकाचा खर्च रोजचा पाच रुपये होता. अर्थातच मालकाच्या जवळचे रुपये संपून त्याला हजारपर्यंत देणं झालं शिवाय सर्व मडळी एका खाणावळींत जेवीत असत. त्या खाणावळीचे चार महिन्यांचे हजारबाराशें रुपये थकले होते."

"हजार बाराशें?" आश्चर्यानें बापूनें विचारलें.

"मग त्यांत तुला इतकं आश्चर्य कां वाटलं? राजा म्हणाला, "आपण बाराच जण आहोंत पण आपणाला दरमहा दोनशें रुपये लागत असत आणि ही तर पंचवीस तीस मंडळी असतील, त्यांना महिना तीनशें रुपये कांहीं फार नाहींत. पण काय हो विठूकाका, तो खाणावळवाला इतकी रक्कम चढेपर्यंत थांबला कसा?

"खाणावळ 'वाला' नव्हता पण 'वाली' होती! मोठी बुवा, धीट आणि बोलकी बायको. तिनें कंपनीचे सर्व कपडे आणि पडदे आपणाकडे गहाण लावून घेतले होते. 'रुपये बाराशें रोख देऊं तेव्हां कपडे आणि पडदे नेऊं' असा मालकानें स्टॅम्प कागद त्या बाईला लिहून दिला. बाई हुशार होती परंतु ह्या स्टॅम्प कागदांतील मख्खी तिला कळली नाहीं. बाईनं कंपनीच्या सर्व कपड्यांच्या पेट्या आपल्या घरीं नेल्या होत्या. होतां होतां नाटक लागलं! तेव्हां मालकानं कपडे मागितले. पण बाई देईना. अर्थात् कपडेच नाहीं तर नाटक होत नाहीं आणि पर्यायानं नाटक होत नाहीं, त्याअर्थी बाईला पैसे मिळत नाहींत असं सिद्ध झालं शेवटीं तिची कशीतरी समजूत केली. 'नाटकापुरत्या कपड्याच्या पेट्या द्या आणि नाटक आटोपतांच पेट्या परत आणा, असं समजल्यावर बाईनें आपला एक मनुष्य बरोबर देऊन पेट्या

दिल्या. पहिल्या खेळाला तीनशें रुपये उत्पन्न झालें. त्यापैकीं शंभर रुपये बाईला देऊन पेट्याहि परत दिल्या. आतां पुढल्या खेळांतून जास्त रक्कम देऊं, अशी तिची पुनः समजूत केली. पुनः दुसरा खेळ लागला पेट्या परत आणल्या, त्याबरोबर बाईच्या खाणावळींतील एक नोकरहि थिएटरात आला. नाटक सुरू झाल्यावर त्या मालकानें नोकराला दारू पाजली. तोहि गडी रंगला आणि शेवटीं एका कोपऱ्यांतच निजला!"

"आणि त्या पेट्या?"

"त्या पेट्या आणि कंपनीचें इतर सामान नाटक आटोपताच स्टेशनकडे रवाना झालें आणि सकाळच्या गाडीनें ती सर्व मंडळी नाशकास निघून गेली! दुसऱ्या दिवशीं तो नोकर उठून पहातो तों काय आहे? थिएटर रिकामं!— मग त्या बाईनें थोडी धामधूम केली परंतु मंडळींनी तिला, ज्या अर्थी सामान परत दिलें आहेस, त्या अर्थी करारात लिहिलेल्या प्रमाणं तुला रक्कम पोंचली, असंच सिद्ध होतं, असं सागितलं?"

"मुकाट्यानं गप्प बसण्यापलीकडे ती काय करील बिचारी?"

"फिर्याद लावता येत नाहीं कीं काहीं नाहीं! अहो ही तर बायको माणूस म्हणून फसली म्हणाल. पण मुंबईसारख्या ठिकाणीं ह्या अट्टल कंपन्यानीं सावकारांनासुद्धां फसविलं आहे!"

"तें कसं काय बुवा?"

"अशीच एक उडाणटप्पू मंडळी मुंबईत आली होती. लागला सट्टा तर मुंबईत दोन पैसे मिळतील नाहींतर आहे कोंकण! अशा निर्धारानें पूर्वीच्या दोन चार मुक्कामी कर्ज करीत करीत ती मुंबईत गेली. खेळ सुरू झाले. उत्पन्न होई पण थिएटरभाडं सुटेना. तेव्हां एक सावकार पाहिला. त्याच्याकडून कंपनीच्या सामानावर दोन हजार रुपये काढले. पुढें पंधरा दिवस झाल्यावर आपल्याच पात्रांपैकीं एक मनुष्य मालकानं तयार केला. त्याला नाटकांतीलच कपडे घालून हातांत नकली सलकडें, बोटांत दोन हिऱ्याची नकली आंगठ्या आणि खोट्या मोत्यांची टपोरेदार भिकबाळी घालून सजविला आणि त्याला आपणाबरोबर घेऊन मालक सावकाराकडे गेले. आणि पेढीवर बसावयास सांगून मालकानें त्या सावकाराला एका बाजूला बोलावून घेतलें. नाटक कंपनीनें हें एक नवीन कूळ गांठलं आहे, असं सावकारालाहि वाटलं. एकान्तांत आल्यावर मालक त्या सावकाराला म्हणाला, 'हें पहा शेटजी, आमच्या

कंपनीचा भाग्योदय आला आहे, असं दिसतं ! हे एक मुंबईतील श्रीमंत गृहस्थ आहेत. त्यांच्या मनातून आमची कंपनी चागली रंगरूपाला आणावी अशी इच्छा आहे. ते कंपनीचं सर्व कर्ज देऊन आणखी दहा हजार रुपये कंपनींत घालणार आहेत. मी फक्त त्याना एकच तुम्ही सावकार आहात, असं सागितलं आहे. दोन चार सावकार सागितले तर त्याचा ग्रह वाईट होईल, ही मला भीति पडली. म्हणून तुमचेच साडेतीन हजार रुपये आहेत असं त्यांना सागितलं असून मुद्दाम तुमच्याकडे घेऊन आलो आहें. त्याच्या हातात कोर्टांतून सर्व इस्टेट येणार आहे. पण त्याला महिना दोन महिने कदाचित् तीन महिनेसुद्धा लागतील. तोपर्यंत ते माझं खातं बदलून आपल्या नांवावर घ्यायला तयार आहेत. तर तुम्हीहि त्याना साडेतीन हजार रुपये सागा."

"पण माझे आहेत फक्त दोनच हजार!" असें तो सावकार म्हणाला.

"होय. पण तुम्ही साडेतीन हजार म्हणून सांगा. मला सात आठशें रुपये दुसरं किरकोळ कर्ज आहे. तेव्हां तुम्ही उद्या परवा सवडीनें आठशें रुपये द्या. आणि त्याच्याकडून साडेतीन हजारांची माझ्या नावाची फिरवून प्रॉमीसरी नोट लिहून घ्या." हें मध्येंच दाखविलेलें आमिष पाहून तो सावकार भुलला. कुळ चांगलं दिसतं ह्या बाह्य देखाव्यावर जाऊन त्या सावकारानें त्यास साडेतीन हजार आहेत असंच सागितलं. आणि त्याच्या नांवाची एक प्रॉमिसरी नोट लिहून घेऊन नवीन खातं सुरू केलं. मालकाची प्रॉमिसरी नोट रद्द केली आणि त्याचं खातं बंद करून टाकलं. दुसऱ्या दिवशीं मालक पुनः त्या सावकाराकडे गेला. तेव्हां त्यानं आठशें रुपये त्याच्या हवालीं केले. त्याच दिवशीं कंपनीनें आपला मुक्काम कोंकणात नेला!"

"शाबास! आहे खरं त्या मालकाचं डोकं! दोन हजार रुपये आणि वर आठशें रुपये दक्षणा!"

"बरं आतां तुम्ही थोडा वेळ वामकुक्षी करा. एकदां फौजदार साहेबा-कडून चक्कर मारून येतों." असें म्हणून विठूकाका उठले.

फौजदार साहेब तर घरीं सारखे तळमळत होते. आपलीं शंभर वर्षें पुरीं भरलीं, असेंच त्यांना वाटूं लागलें. कारण त्यांची आतां पक्की खात्री होऊन चुकली. इन्स्पेक्टर आला आहे, आणि त्यानें खासगी चौकशी चालविली आहे, हें तर त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेंच होतें. आज ते कचेरींत सुद्धां गेले नाहींत. हा आलेला इन्स्पेक्टर पैशानें वश होणारा असेल, तर कदाचित् आपणास सुटण्याचा

मार्ग आहे. आणि तसा जर तो नसेल, तर मात्र विष खाऊन जीवच दिला पाहिजे, त्याशिवाय अपकीर्ति टाळण्यास दुसरा मार्गच नाहीं, असेच विचार त्यांच्या डोक्यात चालू होते. इतक्यात विठूकाका त्यांच्या पुढें जाऊन उभे राहिले.

" काय विठूकाका, तुम्ही आणखी काय खबर आणली आहे ? " निराशेच्या स्वरांत फौजदारानीं विचारलें.

" कांहीं विशेष नाहीं ! इन्स्पेक्टरसाहेब सकाळीं गावात जाऊन—"

" मला तें कळलं ! त्यानीं माझ्या विरुद्ध भक्कम पुरावा मिळविला आहे, ते मला कळलं. शिवाय त्या मूर्ख बजाबा नायकचंहि लचाड माझ्या गळ्यात येईल असं दिसतं ! "

" हें काय बुवा आणखी नवीन घोगड ? " आश्चर्यानें विठूकाकानीं मुद्दाम विचारलें.

" हा बजाबा त्या दिवशीं माळावर काहीं तपासाकरितां गेला होता. तिथं एक कातकऱ्याची तरुण पोर लाकडाचा भारा घेऊन विकायला आली होती. तिला त्यानं माळावर नेलं आणि लाकडं तूं जंगलातून चोरून आणलीस, असा तिच्यावर त्यानं खोटा चार्ज केला. पोर गेली भिऊन ! तें पाहून त्यानं तिच्याकडे दुसरीच गोष्ट काढली. पण ती काहीं कबूल होईना, तेव्हां त्या मूर्खानें तिच्यावर बळजबरी केली आणि इच्छेला येईल, तसा तिच्याशीं व्यवहार केला. ह्यामुळं ती पोर दुखावली. तें पाहून बजाबानं तिला दहशत घालून हाकून दिलं. ' जर तूं कांहीं बोलशील तर चार्ज मांडून तुला अडकवून ठेवीन ' अशी भीति घातल्यामुळें ती पोर मुकाट्यानें गेली. बिचारे गरीब लोक करतात काय ? त्यांतून माझीहि भीति त्यांना आहेच ! दोन दिवसांनीं जेव्हा दुःख जास्त वाढलं, तेव्हां ती पोर दवाखान्यात औषधाला येऊं लागली. आज देखील ती आणि तिची आई दवाखान्यांत आली होती. तिला ह्या इन्स्पेक्टरानं स्वतः विचारलं आणि मदत करण्याचं कबूल करून तिला उद्यां बोलाविलं आहे ! "

" आता आलं लक्षांत ! तरीच आतां दुपारीं जेवल्यावर तो कांहीं लिहावयास बसला होता—"

" काय म्हणतां ? लिहावयास बसला होता ! मग खात्रीनं तो रिपोर्ट लिहीत असेल !—आतां काय करावं ? विठूकाका—"

"अहो, फौजदारसाहेब हें काय? असं हातपाय गाळून कसं चालतं! कांहींतरी खटपट केली पाहिजे."

"विठूकाका, करा—कांहीं तरी खटपट करा—वाटेल ती खटपट करा पण माझा गळा सोडवा—"

"त्याच प्रयत्नांत मी आहें. ह्या आमच्याकडे आलेल्या इन्स्पेक्टराची भूक केवढी मोठी आहे, ती मी आज उद्यांपर्यंत अजमावून पाहणार आहें!"

"पहा-पहा! एवढ काम तुम्हीं कराच! मग त्याची भूक केवढीका मोठी असेना, तेवढा घास त्याच्या तोंडात टाकीन!

खुंटा जितका हालवून बसवावा तितका तो बळकट बसतो, हें तत्त्व विठूकाकांना माहीत होतें. त्याप्रमाणेंच त्यानीं हा खुंटा हालविण्याचा प्रयोग चालविला होता. ते घरीं आले, त्यावेळीं मंडळी चहा घेत बसली होती. रायाजवळ त्यावेळीं लखूनाना—विठूकाकाचा धाकटा भाऊ—गोष्टी बोलत बसला होता. तो गावातील एका प्रसिद्ध सावकाराकडे माहेकीर्दीच्या चोपड्या लिहिण्यास जात असे. महिन्यातून चार दिवसाचें तें काम असे. त्याबद्दल त्याला तो सावकार पाच रुपये देत असे. शिवाय त्याचें अक्षर चांगलें असल्या-मुळें त्याच सावकाराचीं खरेदीखतेंहि तोच लिहित असे. त्या प्रत्येक खतामागें त्याला रुपया मिळतःअसे.

"ह्या सावकाराचं नाव काय?" सहज रायानें विचारलें.

"कुंवरजीभाई!—हा जातीचा मारवाडी असून त्याची हकीकत मोठी ऐकण्यासारखी आहे."

"मग तर अवश्य सांगा!"

"चाळीस वर्षांपूर्वी तो प्रथम आपल्या देशातून मुंबईस आला. त्यावेळीं त्याचें वय अठरा वर्षांचं होतं. प्रथम चार सहा महिने मुंबईत राहिल्यावर तेथें आपलीं कांहीं डाळ शिजेल, असं त्याला वाटेना. म्हणून तो एखाद्या खेड्यात जाण्याच्या विचारात होता. परंतु त्याला आजुबाजूच्या खेड्यांची माहिती नसल्यामुळें त्याला जवळपास कोणतंच खेडेगाव दिसेना. तो दिवसभर मुंबईत फिरे. जवळ पांच दहा रुपये होते, ते सर्व संपत आले. एकदां तो भाऊच्या धक्क्यावर असाच भटकत गेला होता. त्यावेळीं त्याच्या कनवटीला फक्त दीडच रुपया राहिला होता. कर्मधर्मसंयोगानं त्यावेळीं बाणकोटच्या खाडींत जाणारा एक वृद्ध ब्राह्मण बंदरावर आला होता. स्वाभाविकच त्याला

त्या मारवाड्यानं कुठं जावयाचे आहे, असं विचारलं. तो म्हातारांहि आपल्या महाडची माहिती सागू लागला. तेव्हा आपणहि त्या म्हाताऱ्याबरोबर महाडास जावं, असा विचार त्याच्या मनात येऊन तो त्याच्याबरोबर निघाला. म्हाताऱ्यालाहि त्याची सोबत झाली. पुढें महाडास आल्यावर त्या म्हाताऱ्याच्या ओटीवरच त्यान आपलं ठाणं दिल. ती रात्र तो तिथेंच पडून होता. दुसऱ्या दिवशीं नदीवर जाऊन त्यानं स्नान केल आणि बाजारांतून आठ आण्यात मिरच्या, धणे, खोबरं, गूळ आणि शेंगदाणे अशा पांच वस्तु विकत आणल्या. आणि त्याच ओटयावर वाटे माडून विकत बसला. दुपारपर्यंत त्या जिनसा विकल्या आणि त्यांत दोन आणे त्याला फायदा झाला, त्यापैकीं एका आण्यांत चणेफुटाणे आणून त्यानें आपली क्षुधा भागविली. पुनः दुसऱ्या दिवशीं तेच जिन्नस आणून दुकान घातलें. दुसऱ्या दिवशीं तीन आणे फायदा झाला. अशा रीतीनें कधीं ओटीवर तर कधीं बाजारात एका कोपऱ्यात बसून तर कधीं नदीवर त्यानें जिन्नस विकत बसावे. होता होता महिना झाला. त्याचं भाडवल चार रुपयापर्यंत वाढलं. पुढल्या चार महिन्यात पधरा रुपयापर्यंत वाढलं आणि एका वर्षात शंभर रुपये झाले, तेव्हा आता आहे त्याच जागेवर एक लहान दीड रुपया भाड्याची खोली घेतली. ओटीवर धोतरांत वांटे मांडून बसणारा तो मारवाडी एका वर्षात दुकानदार झाला. मग त्याची भरभराट होऊं लागली. दोन वर्षात तो धान्याचे साठे करूं लागला. तिसऱ्या वर्षाला त्यानें पेढी काढली. अशा रीतीनें वाढता वाढता दहा वर्षात त्यानें तीच जागा विकत घेतली आणि तिथ आपली मालकीची माडी बांधली. मग त्यानं लग्न केल ! हळुहळू त्याचा व्यापार वाढूं लागला. आज तो लाखाचा धनी आहे ! ”

“ चिकाटी आणि सतत उद्योगाचं हें फळ आहे, असं कोणीहि मनुष्य आमच्या कुंवरजी मारवाड्याची ही हकीकत ऐकून म्हणेल. पण मी मात्र तस म्हणणार नाहीं ! ” विठूकाका पुढें म्हणाले, “ मीहि दहा वर्षं चिकाटीनं नाटक धंद्याचा उद्योग केला. आणि उद्योग करीत नाहीं कोण ? ज्याच्या पाठीमाग पोट आहे त्याला उद्योग केलाच पाहिजे. पण तो उद्योग सद्धर्माच्या पायावरचा पाहिजे. आचरण शुद्ध पाहिजे. पण ह्या लोकाचं आचरण मांगासारखं नाहीं तर खाटकासारखं म्हणा ! कायरे नाना, मी म्हणतों तें खरं ना ? ”

" खरं नाहीं तर काय ? फाल्गुन होळी शिमगा म्हणून एका महिन्याऐवजीं तीन महिन्याचं व्याज बहुतेक सर्व कुळाकडून तर राजरोस घेतोच ! शिवाय गरीब शेतकऱ्यांचीं शेतं गहाण लावून घेण्याऐवजीं मुदत खरेदी करतो. बिचारी कुळं दर वर्षाला व्याज तर देतातच पण तीन वर्षं झाल्यावर तोंडघशीं पडतात. रुपयाला एक आणा दोन आणे वेळीं तीन आणे सुद्धां व्याज घेऊन शिवाय गहाण असलेल्या दागिन्यात अफरातफर करतो, ती निराळीच ! "

" पण त्यालाहि आमचे फौजदारसाहेब चागलंच पिळतात ! " मध्येंच विठूकाका म्हणाले, " नाना, तीं कायरे भानगड झाली होती ? " असें त्यांनीं आपल्या धाकट्या भावाला विचारलं.

" एक सटव्या कातकरी जातीचा शेतकरी होता. त्याच्यावर असाच कांहीं प्रसंग येऊन पैशाची जरूरी लागली. तेव्हा त्यान ह्या शेटजीकडे व्याजीं पैसे मागितले. तेव्हा शेटजींनीं ' शेत गहाण लावून दे म्हणजे पैसे देतों असं सागितलं. सटव्याच्या शेताचा तुकडा म्हणजे सोन्याचा तुकडा आहे. तो स्वतः त्यांत रात्रंदिवस खपत असल्यामुळं शेत उत्पन्नाला चांगलं होतं शेवटीं नाइला-जास्तव सटव्यानं शेत गहाण लावलं. परतु शेटजीनीं कुळकर्ण्याला हाताशीं धरून गहाणपत्र करण्याऐवजीं तीन वर्षाचं खरेदी खतच लिहून घेतलं आणि तें रजिस्टर सुद्धां करून टाकलं. बिचाऱ्या सटव्याला ही भानगड कशी कळणार ! शेटजींनीं पहिल्या दोन वर्षाचं व्याज तर घेतलंच परतु तिसऱ्या वर्षीं जेव्हा तो व्याज व मुद्दल घेऊन आला, तेव्हां ' मुदत संपली, शेत गेलं ! ' असं शेटजींनीं स्पष्ट सांगितलं. त्याबरोबर त्या धक्यानेंच बिचारा कोसळून पडला आणि मेला. अर्थात पंचनामा भरण्याची पाळी आली. शेटजीकडून पैसे उकळण्याची संधि आलेली पाहून फौजदारसाहेबांनीं शेटजीना फायलावर धरलं. तेव्हां पाचशें रुपये फौजदारसाहेबाच्या खिशांत पडले. इकडे त्या सट-व्याची बायको आणि दोन लहान पोरं उघडीं पडलीं. त्या गरीबांची दाद कोण लावणार ? "

ही हकीकत ऐकून रायाच्या मनावर फार परिणाम झाला. त्या शेटजीला चांगली अलद्दल घडवावी, असा विचार त्याच्या डोक्यांत घोळूं लागला. तें पाहून गजाभाऊ आपल्या धाकट्या चुलत्याला म्हणाला, " नाना, असं कां म्हणतां ! गरीबांचा वाली परमेश्वर आहे ! आणि म्हणूनच आमचा राया इथं आला आहे.

" नाना, त्या सटव्याच्या बायकोपोरांचीं नावं तुम्हाला माहीत आहेत का ? " मध्येंच रायानें विचारलें.

" नाहींत, पण आज मी चौकशी करीन आणि तीं उघडीं पडलेलीं पोरं आणि सटव्याची बायको हल्लीं कुठं आहेत, त्याचाहि शोध करीन ! खरंच, ह्या गरिबाचं जर एवढं शेत शेटजीकडून तुम्ही त्याना परत मिळवून दिलंत, तर बिचारीं जन्मभर तुम्हाला दुवा देतील ! "

नंतर विठूकाकांनीं आपण फौजदाराकडे गेल्यावर तेथें काय काय हकीकत घडली, ती सविस्तर सांगितली. आपण आज दवाखान्यांत गेलों, आणि तेथें त्या मुलीबरोबर बोललों. तसेंच डॉक्टराजवळ चौकशी केली, त्या आपल्या सहज कृतींत किती अर्थ होता हें आता रायाच्या लक्षांत आलं. आपण स्वाभाविक जी गोष्ट केली, ती फौजदाराला तशा अर्थाची वाटली यांत त्याला कांहीं नवल वाटलें नाही. कोणतीहि गोष्ट जुळावयाची असली म्हणजे योगायोगहि तसेच जुळून येतात, हा त्याला अनुभव होता. थोडा वेळ विचार करून राया म्हणाला, " विठूकाका, आता तुमची आणि फौजदाराची भेट झाली कीं इन्स्पेक्टरसाहेब पैसे घेतात असा मला थोडा वास येतो ! ' असं तुम्ही सूतोउताच करून ठेवा आणि आतां ह्या पुढल्या एकदोन दिवसांत ही सर्व भानगड मिटविली पाहिजे. खर पाहिलं असता आमचे हे विस्तवाबरोबर खेळ आहेत ! तेव्हां आम्हालाहि फार जपून पुढलीं धोरणं बांधून वागलं पाहिजे. नाहींतर एखाद्या वेळीं ' फट् म्हणता ब्रह्महत्त्या ! ' व्हायची ! "

" हो—तेंहि खरंच ! " विठूकाका म्हणाले.

इतका वेळ राजाराम एका कोपऱ्यांत बसून पत्रें लिहित होता, त्यांना गांवीं गेलेल्या त्यांच्या मित्राकडून पत्रें आलीं होतीं, त्या पत्रांचीं उत्तरें लिहिण्याचें काम रायानें आज राजाला सांगितलें होतें. त्याप्रमाणें त्यानें एका बैठकींत तीं सर्व उत्तरें लिहून रायाच्या पुढें आणून ठेविलीं. ' क्लबच्या कामाकरितांच आम्ही तिघे गजाभाऊ प्रधानाच्या घरीं महाडास आलों आहोंत आणि येथील काम आटोपतांच परत पुण्यास जाऊं ' असं त्यांनीं प्रत्येकाला कळविलें होतें. रायानें तीं सर्व पत्रें आपल्या खिशांत टाकलीं. फिरायला बाहेर पडल्यावर तीं पत्रें पोष्टांत टाकावीं असा त्यानें विचार केला. आणि ती सर्व मंडळी फिरण्याच्या उद्देशानें कपडे घालून बाहेर पडली. फौजदारानें त्यांच्यावर टेहळणी करण्याकरितां ठेवलेला मनुष्य येथें होताच !

आमची मंडळी गांवांतून चक्कर मारून किनाऱ्यावर जात असतां रायाला आपल्या खिशांतील पत्राची आठवण झाली, तेव्हां तो एकटाच मागें वळून पोष्टांत गेला आणि त्यानें ती सर्व पत्रें पेटींत टाकलीं. फौजदाराच्या हस्तकानें तें पाहिलें. आणि त्याप्रमाणें फौजदारसाहेबाना जाऊन वर्दी दिली. इन्स्पेक्टरानें स्वतः पत्रें पोष्टांत टाकिलीं, त्या अर्थी तीं सर्व महत्त्वाचींच असलीं पाहिजेत, असा फौजदारसाहेबांनीं त्याचा अर्थ केला. कावीळ झालेल्या माणसाला जसें पिवळें दिसतें, त्याप्रमाणें फौजदारसाहेबाची स्थिती झाली. आणि भीतीनें तिरपिट उडाली ! असेंच्या असेंच पोष्टांत जावें आणि पोष्ट मास्तराकडून तीं पत्रें हस्तगत करून घ्यावीं, असाहि एक विचार त्यांच्या डोक्यांत आला. परंतु अशी पत्राची अफरातफर केल्यास परिणाम फार भयंकर होईल, ही जबरदस्त दहशत असल्यामुळें फौजदारसाहेबांना तो विचार सोडून द्यावा लागला. आपण परत वळून पोष्टात गेलों आणि पत्रें टाकिलीं, ह्या आपल्या सहज घडलेल्या कृतींत गूढार्थ भरलेला असेल. अशी रायाला कल्पना नव्हती ! आपण स्वतः पोष्टात पत्रें टाकिलीं, परतु इकडे फौजदारसाहेबाची छाती धडाडली. ह्या गोष्टीची रायाला गंधवार्ताहि नव्हती. ती सर्व मंडळी नदीतीरावर बसल्यानतर बापूनें एक विचार काढला.

"राया, आपण सध्यां बसलो आहोंत, तेथून जवळ रायगड आहे. आपले परमश्रेष्ट पुण्यश्लोक श्री छत्रपति महाराज यांची तिथं समाधि आहे. तेव्हां इतक्या जवळ आल्यासारखं त्या राष्ट्रीय क्षेत्रीं जाऊन श्री शिवाजी महाराजाच्या समाधीचं दर्शन घ्यावं अशी मला इच्छा झाली आहे. एकदा कॉलेजमध्ये ह्या राष्ट्रीय तीर्थावर भाषण करतांना प्रोफेसर भानू म्हणाले, 'सर्व हिंदुस्थानात पवित्र स्थळं पुष्कळच आहेत. परंतु स्वतःला हिंदू म्हणून घेणाऱ्या हिंदूला सर्वांत श्रेष्ठ पूज्य वाटणारं असं जर कोणतं तीर्थ असेल, तर महाराष्ट्रातील हें राष्ट्रीय तीर्थ होय. ह्या क्षेत्राचा पवित्रपणा शब्दांनीं वर्णन करून सांगता येत नाही. हें क्षेत्र भावनाप्रधान आहे. येथें कोणीहि मनुष्य-मग तो कोणत्याहि जातीचा आणि धर्माचा असो, ह्या क्षेत्रात जातांच तेथील बुरूज त्याच्या बरोबर बोलूं लागतात. ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष छत्रपति महाराजांची समाधी आहे, तेथें जातांच अंतःकरण सद्गदीत होऊन नेत्र अश्रुनीं डबडबून येतात. ज्या ठिकाणीं सिंहासन स्थापना केली, जेथें प्रत्यक्ष महाराज बसत असत त्या पवित्र जागीं जातांच प्रत्येक मनुष्याचं मस्तक स्वाभाविक नमतं ! खरोखरीच त्या स्थलांत अद्यापि अद्भुत शक्ति खेळत आहे !"

" बापू, तूं किती वर्णन करशील ? बोलून चालून अवर्णनीय तें पुण्यस्थल ! तू वर्णन करून काय सांगणार ? " राजा म्हणाला. " राया, इथून जाताना त्या महात्म्याच्या पुण्यसमाधीचं दर्शन घेऊन आपण तसेच पुढें घाट चढून पुण्यास जावूं ! "

" घाट चढून तुम्हीं पायीं पुण्यास जाणार ? " आश्चर्यानें लखूनानाने विचारले, " छे ! तें तुम्हाला शक्यच नाहीं ! "

" नाना, तुम्ही ह्या भलत्याच गोष्टींत वादविवाद करूं नका ! ' मध्येंच गजाभाऊ आपल्या चुलत्याला म्हणाला, " आमच्या मंडळींना ' अशक्य ' हा शब्दच माहीत नाहीं, तें तूं विसरलास ! अरे, छत्रपतीच्या वेळीं आपलेच पूर्वज दिवसांतून दोन वेळां हे घाट चढून उतरत असत, हें तूं विसरलास काय ? "

" आपले वाडवडील असे आणि तसे होते, असें म्हणण्यात अर्थ नाहीं. आपण त्याच्यासारखं होण्याचा प्रयत्न केला पाहिजे. बरं विठूकाका, रायगडावर जाण्याकरिता वाहनाची काय सोय आहे ? मंडळीचा विचार ठरला तेव्हां आता पुढला विचार करूं. वाहनांची व्यवस्था होत असेल तर मग पायीं कशाला जा ? भलत्याच कामांत हट्ट नसावा ! आमचे वाडवडील म्हणे न्याहारीलाच दोन पायली पोहे आणि वर पाच शेर दूध पीत होते. तशी न्याहारी आतां आम्ही करू म्हटल्यास शक्य आहे काय ? वीस भाकरी खाणाऱ्यांचे आम्ही वंशज, आता आम्हाला दोन कागदासारख्या पोळ्या खपत नाहींत, अशी आहे हल्लीची आमची स्थिति ! ' एक कप चहा असला कीं जेवायलाहि नको ! " अस म्हणणारे वीर सध्या आहेत. आपण चहावर सबंध दिवस राहतों, ही त्यांना भूषणाची गोष्ट वाटत असेल, पण यांतून गर्भितार्थ काय निघतो ? आमचीं शरीर इतकीं नबळीं आणि जीर्ण झालीं आहेत कीं, एक कप चहाच पाणी त्या शरीराचं सहज पोषण करूं शकतं !

" खरंच, अशी आपली स्थिति झाली आहे खरी ! " विठूकाका दीर्घश्वास सोडून म्हणाले.

" बरं दादा, मी जातों आता शेटजीच्या पेढीवर— " लखूनाना उठला तें पाहून राया म्हणाला, " थांबा, नाना आतां आपण सर्वच परत जाऊं. जाता जाता मलाहि तुमच्या शेटजींना पाह्यचं आहे. "

" मग चला ना ? सर्वच संगतीनं जाऊं पेढीवर ! आमचे शेटजी शिष्टाचाराला फार गोड आहेत. पानसुपारी घ्या आणि मग जा घरीं ! "

सर्व मंडळी कुंवरजीभाई मारवाड्याच्या पेढीवर आली. त्यावेळीं लक्ष्मीचा वेळ असल्यामुळे शेटजी पेढीवर पागोटें घालून बसले होते. वयानें ते साठीच्या घरात आले होते तरीहि त्याचा बांधा सुदृढ दिसत होता. दोन्हीं बाजूला राखलेले कल्ले भव्य असून ते आणि डोक्याचे केस पाढरे झाले होते. पोटाचा नगारा बराच वाढलेला होता. सद्र्याव त्यानीं गळ्यात घातलेली कंठी दिव्याच्या उजेडात लखलखत होती. त्याच्या डोक्यात कावेबाजपणाचें तेज सहज ओळखता येण्यासारखे होते. आमच्या मडळींना पाहतांच शेटजींनीं हांसत मुद्रेनें 'जयगोपाळ' करून मोठ्या आदरानें त्याचें स्वागत केलें; आणि त्यांना आपल्याजवळ बैठकीवर बसविलें.

"बोला रावसाहेब. आपलं काय काम आहे?" शेटजी मोठ्या मिनतवारीनें बोलूं लागले. "मी एक गरीब मनुष्य आहें, तरी मी आपल काम यथाशक्ति करीन अशी खात्री ठेवा."

"शेटजी, हे काहीं कामाकरिता आपणाकडे आले नाहींत. लखूनाना म्हणाले. "सहज दोन दिवस मुबईहून पाहुणे म्हणून आमच्याकडे आले आहेत. मला पेढीवर यावयाचं होतं, तेव्हा आणले बरोबर पेढी दाखवायला!"

"फार चागलं! फार चागलं! आपल्यासारख्या थोर लोकाचे पाय माझ्या पेढीला लागले, हें मीं भाग्य समजतों!" शेटजी हासत म्हणाले, "बर लखूनाना, तुमची कीर्द लिहून झाली काय? तेवढं काम लवकर आटपा म्हणजे मला जुन्या खतावण्या लिहून काढायच्या आहेत—घ्या रावसाहेब पान घ्या!"

"शेटजी ते पान खात नाहींत. मी त्याना तबकातील वेलदोडा देतों म्हणजे झालं!" असें म्हणून लखूनानानें तबकांतील वेलदोडे प्रथम रायाच्या पुढें केले. त्यावेळीं तो आपल्या हाताकडे पाहात स्वस्थ बसला होता. त्याच्या डोक्यांत कांहीं निराळेच विचार चालू होते. त्यामुळें लखूनानानें पुढें केलेले वेलदोडे त्याच्या लक्षांत आले नाहींत. तें पाहून विनोदानें लखूनाना म्हणाले, "काय स्वतःच्याच हातावरील रेषा पाहता काय?"

हें वाक्य शेटजीच्या कानावर जातांच त्यांनीं चटकन् विचारलें, "कोण रेषा पहातो?" ह्या शेटजीच्या प्रश्नाला राजानें मध्येंच पटकन् उत्तर दिलें. हे आमचे स्नेही उत्तमपैकीं सामुद्रिक आहेत. याचा अभ्यास फार दांडगा आहे. सामुद्रिक पाहण्याकरितां मोठमोठ्या राजेराजवाड्यांतून यांना वरचेवर

बोलावणीं येत असतात. यांची फी एक हात पहायला शंभर रुपये आहे. तंतोतंत सर्व गोष्टी पटवितात. बाकी शेटजी तुमचें भाग्य काय पाह्यचं म्हणा, हें दिसतंच आहे!"

"मलाहि एकदां माझा हात दाखवायचा होता! पण—पण तुमची फी फार जबर आहे हो! आमच्या सारख्या गरीबांनीं एवढी फी कोठून द्यायची? राजेरजवाड्यांची गोष्ट निराळी! शंभर रुपये फी देतात तें योग्यच आहे!"

"अहो, फीच काय, हजार पाचशें रुपये बक्षीस देतात आणि जाण्या-येण्याचा सेकंड क्लासचा खर्च देतात तो वेगळा! बाकी तुमचा हात पाह्यचा असेल तर ते नाहीं म्हणावयाचे नाहींत. आमच्या लखूनानाचे तुम्ही शेटजी तेव्हां तुम्ही द्याल तें घेतील. पण एकदां दाखवाच हात—त्याच्या अजब विद्येचा एकदां मासला तर पहा. असे प्रख्यात सामुद्रिक सबंध जन्मात आपणास भेटले नाहींत, असंच तुम्ही म्हणाल!"

"मग दाखवितोंच हात!" असें म्हणून शेटजीनें आपला हात पुढें केला. राया क्षणभर विचारात पडला. लखूनानानें थट्टेत उच्चारलेल्या वाक्याचा परिणाम इतक्या थराला आलेला पाहून क्षणभर त्याला कौतुक वाटलें. राजानेंहि एका क्षुल्लक वाक्याला इतकें महत्त्व देऊन गोष्ट भलत्याच थराला नेली, आणि आपल्याला प्रख्यात सामुद्रिक बनविलें म्हणून तो किंचित्‌हि गडबडला नाहीं. अंगावर कोणतीहि बाजू कधींहि घसरली तरी त्यांतून बिनतोड पार पडण्याची त्याच्या अंगांत धमक होती. त्याचा आत्मविश्वास जबर होता. कोणत्याहि प्रसंगांत टाकलें असतांना राया डगमगणार नाहीं, हें पूर्णपणं माहित होतें. म्हणूनच राजानें हा 'पराचा कावळा' केला होता. शेटजीनें हात पुढें केलेला पहातांच राया म्हणाला, "शेटजी, मीं आपला हात मोठ्या आनंदानं पहातों. परंतु कोणाचाहि हात मी असा उघडा चारचौघांत पहात नाहीं, कारण प्रत्येकाचा हात त्याच्या वर्तमान, भूत आणि भविष्य काळाचें टिपण केलेला आरसा असतो. त्यांत चांगल्याहि गोष्टी असतात. तशा कांहीं गुप्तहि गोष्टी त्यांत नमूद केलेल्या असतात. म्हणून उघड हात पाहणं चांगलं नाहीं. आपण आंत एखाद्या खोलींत जाऊन बसूं म्हणजे ठीक पडेल!"

"बरोबर आहे! तुमचं म्हणणं मला बरोबर पटतं!" असें म्हणून शेटजी उठले आणि त्यांनीं रायाला आपल्या मागें येण्यास सांगितलें, आंतल्या

खोलींत गेल्यावर तेथें अंथरलेल्या बैठकीवर बसून रायानें शेटजीचा हात आपल्या हातांत घेतला आणि बराच वेळ त्या हातावरील रेषा पाहून मोठ्या गंभीरपणानें त्यानें सामुद्रिक सांगण्यास सुरवात केली. " शेटजी तुमचा हात एखाद्या आरशासारखा स्वच्छ आहे. मी आतां ह्या हातावरून तुमच्य आयुष्यांत पुढें घडणाऱ्या गोष्टी सांगणार, त्या खरोखरीच सत्य आहेत किंवा नाहींत, हें तुम्हाला कसं कळवं ? परंतु तुमची खात्री पटविण्याकरतां मी तुमच्या आयुष्यांत मागें घडलेल्या कांहीं गोष्टी सांगतों, त्या जर तुम्हाला बरोबर पटल्या तर मी भविष्यकाळच्या ज्या गोष्टी सागेन, त्या सर्व गोष्टी बरोबर पटतील अशी खात्री ठेवा ! मागल्या गोष्टी जर पटल्या नाहींत तर मग भविष्य खोटं असच म्हणता येईल. सामुद्रिकांसारखी माझी पद्धत नाहीं. गिऱ्हाईक खुष होऊन त्यानें पैसे जास्त द्यावे, म्हणून ' तुमचं पुढलं वर्ष अति उत्तम आहे. तुम्हाला विपुल द्रव्ययोग आहे; तुम्हाला अचानक वैभव प्राप्त होईल, ' वगैरे खोट्या गोष्टी सांगण्याची माझी रीत नाहीं. जें हातावर दिसेल तें खरं आणि स्पष्ट सांगायचं ! मग तें वाईट कां असेना, चोरून मात्र ठेवायचं नाहीं ! "

अशी लाबलचक प्रस्तावना करून रायानें पुनः हात मननपूर्वक पाहिल्या-सारखे दाखविलें. आणि गंभीर आवाज काढून तो म्हणाला, " शेटजी, आतां मी आपणास मागल्या गोष्टी पटवितों. आज आपण कदाचित् लक्षाधीश असाल आणि आहातच ! कारण ही रेषाच तसें सांगते. परंतु बरोबर चाळीस वर्षें झालीं, आपण कंगाल, भिकारी, जवळ एक पैसा नाहीं, वणवण भटकत सबंध दिवस पायीं रखडत निव्वळ पैशा दोन पैशांचे चणे फुटाणे खाऊन दिवस घालविले ! "

" अगदीं बरोबर शाबास ! शाबास ! सामुद्रिक महाराज, धन्य आहे तुमच्यापुढें ! जी गोष्ट मी सुद्धां विसरलों होतों, ती तुम्ही माझ्या हातावरून तंतोतंत पटविली बस्स आतां माझी खात्री झाली ! मागल्या गोष्टी तुम्ही पटवाल यांत शंकाच नाहीं ! आतां मला भविष्य सांगा ! तुम्ही सांगाल तें भविष्य अगदीं बरोबर घडून येईल, असं माझं मन मला साक्ष देत आहे ! "

" सांगतो !—शेवटीं, हें वर्ष—हा महिना—नव्हे हा आठवडा तुम्हांला अत्यंत वाईट जाईल ! एक भयंकर संकट तुमच्यावर येऊं पहात आहे ! तुम्ही—' तुम्ही खून केला, ' असा तुमच्यावर आरोप येईल !—"

" अरे मारा बाप ! " शेटजींच्या मुखांतून भयभीत उद्गार बाहेर पडला.

" शेटजी भिऊ नका ! हें मी सांगतों, हें संकट येणार यांत तर शंकाच नाहीं ! परंतु यातूनहि तुम्हाला सुटतां येईल !

" तें कस ? तें कसं तें सांगा ? तुम्ही सागाल तसं करीन ! "

" द्रव्य द्यावं लागेल ! आणि भूमि द्यावी लागेल ! भूमि देतांना किंवा द्रव्य देतांना तुम्ही किंचित् अनमान केलात तर तुमच्या जवळचं सर्व द्रव्य जाईल, तुमची अपकीर्ति होईल आणि वेळप्रसंगीं तुमच्या जीवालाहि धोका पोहोंचेल ! तुमच्यावर येणाऱ्या संकटाची उद्यांपासून सुरवात होईल. शेटजी तुमच्या हातावर मला चागल्या गोष्टी सागतां आल्या नाहींत म्हणून वाईट वाटतं, पण काय करणार ? खरं दिसल तें सागितल ! "

शेटजी मोठ्या विचारात पडले ! त्याची चर्या काळवंडली ! ते पाहून धीर देत राया पुढें म्हणाला, " शेटजी, असे हताश काय झालांत ? तुम्हाला संकट कव्हा येणार तें कळल, सकट कोणत्या स्वरूपाचं आहे तेंहि कळलं, आणि तें संकट निवारण्याचा उपायसुद्धां कळला ! मग आतां सावधगिरी बाळगून हुशारीनें या संकटातून पार पडा म्हणजे झालं ! तुमच्यावर येणारें संकट निवारण व्हावं म्हणूनच योगायोग जुळवून आला असं म्हणा !— मी इकडे कां आलों ?—तुमचा हात का पहिला ?—हें सर्व कशाचं चिन्ह आहे ?–तुमचं संकट निवारण होण्याचंच हें चिन्ह नव्हे काय ? नाहींतर पुढें काय झालं असतं तेंहि मी तुम्हाला सागतों. तुमच्या प्राक्तनात लिहिल्याप्रमाणें संकट तुमच्यावर आलं असतं आणि त्या संकट निवारण्याचा बरोबर उपाय तुम्हाला माहित नसल्यामुळें तुम्हीं द्रव्य दिलं नसतं किंवा भूमीहि दिली नसती. आणि त्यामुळें झालं असतं काय ?—अपकीर्ति, द्रव्यनाश आणि शेवटीं प्राणनाश ! "

" असं झालं असतं खरं ! आतां तुम्ही सागितलं तें मी नीट लक्षांत ठेवीन ! " असें म्हणून शेटजी उठले आणि बाजूच्या खोलींत त्यांनीं आपली तिजोरी उघडली. बरोबर शंभर रुपये काढून त्यांनीं पुनः तिजोरी बंद केली. बाहेर आल्यावर ते रुपये रायाच्या पुढें ठेवीत ते म्हणाले, " मला सर्व गोष्टी तंतोतंत पटल्या ! तुम्ही सांगितलेलं भविष्य वाईट किंवा चागलं हा प्रश्न नव्हे. तुम्हीं सांगितलेल्या गोष्टीच्या महत्त्वाकडे लक्ष दिलं पाहिजे. ही मी आपली फी दिली आहे. ती घ्या ! "

रायानें मुकाट्यानें ते रुपये खिशात टाकले. बाहेर आल्यावर शेटजींनीं 'हे सामुद्रिक नाहींत—ब्रह्मदेवच आहेत !' असं मंडळींना सांगितलें आणि रायाला आपल्या हातानें वेलदोडे दिले. 'आता बरीच रात्र झाली, असें म्हणून मंडळींनीं शेटजीचा निरोप घेतला. घरीं येईपर्यंत राया एक चकार शब्दहि बोलला नाहीं आणि मंडळीनेंहि त्याला एका शब्दानेंहि विचारलें नाहीं. 'रस्त्यांत कोणत्याहि गोष्टीचा खल करावयाचा नाहीं, अशी त्या मंडळींची पद्धत होती. 'काय झालं ! तुम्ही शेटजींना काय काय सांगितलं ! शेटजींना कोण कोणत्या गोष्टी पटल्या !' असे अनेक प्रश्न वाटेंत लखूनानांच्या मनात घोळत होते. एक दोनदां रायाला विचारण्याकरितां त्यानें तोंडहि उघडलें होतें. परंतु सर्वच मंडळी गप्प आहेत हें पाहून त्यालाहि आपली जिज्ञासा घरीं पोहोंचेपर्यंत दाबून ठेवावी लागली. घरीं आल्यावर कपडे काढून दिवाण-खान्यांत सर्वजण एकत्र बसताच रायानें खिशातील शंभर रुपये पुढें काढून ठेवले "ही माझी फी ! आतां आणखी कोणाला हात दाखवायचा असेल, तर त्यानं इतकीच रक्कम इथं ठेऊन हात पुढें करावा ! तंतोतंत सर्व गोष्टी पटवितों कारण हा सामुद्रिक ब्रह्मदेव आहे !" असें म्हणून रायानें थोडक्यांत आपली हकीकत मंडळींना सांगितली. तेव्हां विठूकाकांनीं विचारलें, "खरंच का तुम्हाला भविष्य कळतं ! खरंच का तुम्हाला हात पाहतां येतो ?"

हा विठूकाकाचा स्वाभाविक जिज्ञासेनें विचारलेला प्रश्न ऐकून रायाला हंसू आलें. तें पाहून विठूकाका पुढें म्हणाले, "मग तुम्ही त्या शेटजींना 'उद्यांपासून तुमच्यावर संकट येणार, खून केल्याचा आरोप येणार' असं छातीठोक भविष्य कसं सांगितलंत ?"

"हीच तर मौज आहे !" राया म्हणाला. "भविष्य काळाचा पडदा आपल्या अकलेनं दूर सारून तिथं छापलेल्या अदृश्य गोष्टी बरोबर हुडकून काढणं, हेंच तर मुळीं आमच्या रायक्लबचं ध्येय आहे. आम्ही ज्या गोष्टी हातांत घेतों, त्या गोष्टी अमुक अमुक रीतीनेंच घडल्या पाहिजेत आणि त्यांचा परिणाम अमुकच होईल, अशी मुळांत योजना करूनच आम्ही कार्याला सुरवात करतों. इथं आल्यावर आम्ही ज्या गोष्टी हातांत घेतल्या, त्या गोष्टीची योजना ह्याच पद्धतीनें मी केलेली आहे. आतां ती कशी, तें तुम्हाला सांगतों. ह्या शेटजींनीं सटव्या कातकऱ्याचं शेत गिळंकृत केलं आणि त्या

धक्क्यानं तो मेला, ही गोष्ट तुम्हीच मला सांगितली. आतां मी जें कांहीं करणार आहें, तें हेंच. उद्यां त्या सटव्याच्या बायकोचा आणि मुलांचा शोध करून डॉक्टरसाहेबांना भीति घालावयाची ! कारण सटव्याचा पंचनामा झाला, तेव्हां डॉक्टरानं प्रेत पाहिलेलं असलंच पाहिजे. उद्यां मी डॉक्टराकडे गेल्यावर ते माझ्याकडे ' स्टुडट ' म्हणून न पाहता फौजदारसाहेबानं त्याना सागितल्या-प्रमाणें मी सी. आय्. डी. इन्स्पेक्टर ' आहे, अशा दृष्टीनं आतां पहातील आणि मला तशी ओळखहि देतील. तेव्हां मी कोण आहें हें बाहेर न फोडण्याची दहशत घालून त्याच्याकडून ह्या शेटजींना बरोबर शह देणार. सटव्या मेला, त्याचा पचनामा झाला परतु त्या सटव्याच्या बायकोला एक मोठा अधिकारी मिळाला असून तो ही सटव्याची केस पुनः उकरून काढण्याच्या उद्योगात आहे, अशी शेटजींना मी भीति घालणार आणि ' केवळ सटव्याचं शेत गिळकृत करण्याकरतांच शेटजींनी त्याचा खून करविला आणि फौजदाराची मूठ दाबून सर्व मिटवामिटव केली, ' अशाबद्दलचे भक्कम पुरावे सापडले आहेत, असंहि डॉक्टराकडून शेटजींना सांगवीन. अर्थातच शेटजींना यात संशय यायला कांहीं कारण नाहीं आणि ते चौकशी करण्याच्या भानगडींतहि पडणार नाहींत. कारण मी आज भविष्य सांगून त्यांचं मन तयार केलंच आहे. उलट भविष्याप्रमाणं आज गोष्टी घडल्या असं समजून ते वाटेल तसं द्रव्य खर्च करायला काकू करणार नाहींत. आणि सटव्याची गिळंकृत केलेली जमीन त्याच्या बायकोला मुकाट्यानं परत देतील—कां आहे कीं नाहीं मी ब्रह्मदेव

विठूकाका आणि लखूनाना आमच्या नायकाचें अचाट बुद्धिचातुर्य पाहून आश्चर्यानें थक्क झाले. रायाची बुद्धि इतकी अचाट होती म्हणूनच त्याच्या पुढें शेटजींनीं आतां स्वसंतोषानें ठेवलेल्या द्रव्यराशीप्रमाणें राशी पडत असत. अशा रीतीनें मंडळी गोष्टी बोलत असताना ' ताटें वाढलीं आहेत, ' असें सांगण्याकरितां गजाभाऊ बाहेर आला. तेव्हां उठतां उठतां राया म्हणाला, " लखूनाना, तुम्ही त्या सटव्याच्या बायकोमुलाचं नांव पत्ता आणणार होतां त्याचं काय ? "

" आतां जेवल्याबरोबर जातों आणि ती सर्व माहिती घेऊन येतों. "

जेवणें वगैरे झाल्यावर मंडळी पुनः दिवाणखान्यांत पान खात गप्पा गोष्टी

करीत बसली. बरीच रात्र झाल्यावर लखूनाना परत घरीं आला. आमच्या रायाला पाहिजे होती ती माहिती त्यानें मिळविली होती. " सटव्याच्या बायकोचें नांव ' मरी ' असें असून मुलीचें ' चिगली ' आणि मुलाचें ' पिल्या ' असें नांव होते. आपल्या मुलांना घेऊन म्हातारी जंगलांत राहते आणि कधीं गवताचा किंवा लाकडाचा भारा विकायला आणते, ' इतकी माहिती त्यानें रायाला दिली. रायानें तीं नावें टांचून घेऊन मरी आणि तिच्या मुलांचा शोध करण्याकरिता दुसऱ्या दिवशीं पहाटेस निघावयाचें असें ठरविलें. परतु आपला बेत त्यानें कोणालाहि सांगितला नाहीं. फार दिवस महाडांत राहणें चागलें नाहीं, हें तो जाणून होता. आता येथें जास्त कामे न वाढविता हातांत असलेली कामें झटपट उरकून येथून लवकर पाय काढावा, असा त्यानें निश्चय केला. विठूकाकांनीं नाटकांत आयुष्य घालविलें असल्यामुळें त्यांना गंजिफा आणि पत्ते खेळण्याचा शोक होता. राया विचार करीत पडला आहे, असें पाहून इतकी रात्र झाली होती तरी विठूकाकानीं पत्ते आणून मंडळीपुढें ठेवले. अर्थातच दोन डाव खेळून मग झोंपावे असा मोह उत्पन्न होऊन राजानें खेळण्यास सुरवात केली. राया एका बाजूला स्वस्थ विचार करीत पडला होता, आणि बाकीच्या मडळीचा खेळ चालू होता. जवळ जवळ दोन वाजेपर्यंत मडळी खेळत होती

दुसऱ्या दिवशीं सर्वांच्या अगोदर राया उठला. बाकी सर्व मडळी झोंपलेली आहेत, असें पाहून रायानें हळूंच आपले कपडे चढविले आणि कोणालाहि न उठविता तो घरातून बाहेर पडला. सटव्याच्या बायकोचा शोध करून तिला दवाखान्यांत डॉक्टरच्या समोर आणावें आणि मग आपण डॉक्टरवर योजलेला प्रयोग करावा, अशी त्याची इच्छा होती. गावाबाहेर थोडें दूर गेल्यावर सर्व जंगल लागतें, हें त्यानें पाहिलें होतें. आपण तेथें गेल्यावर वाटेंत आपणास मिळ, कातकरी लोक भेटतील, त्याच्याजवळ चौकशी केली असतां मरीचा आपणास सहज पत्ता लागेल, अशी त्याला खात्री वाटत होती. त्याप्रमाणें तो एकटाच गावाच्या बाहेर पडून जंगलांत शिरला. वाटेंत एकदोन कातकरी त्याला भेटले. त्यांच्याजवळ चौकशी करतांच रायाला अचूक पत्ता लागला. त्या कातकऱ्यांनीं त्याला नेमकें झोंपडींत आणून सोडलें. तिला पहातांच राया आश्चर्यचकित झाला. कारण आदल्या दिवशीं दवाखान्यांत पाहिलेली तीच ती म्हातारी होती !

"तुझं नांव मरी!" आश्चर्यानें रायानें विचारलें. "तूं सटव्याची बायको काय?"

"होय बाबा! माझा धनी मेला आणि मी रंडकीमुंडकी मागं राहिलें!"

"रडूं नकोस! म्हातारे, ईश्वर दयाळु आहे. आतां त्याला तुझी दया आली म्हणून समज. तुझीं दुःखं आतां संपलीं. आतां तुझ्या नवऱ्याचं शेत तुला परत मिळेल, तुला पैसा मिळेल आणि तुझ्या मुलीची अब्रू घेणाऱ्या त्या चांडाळाला बरोबर शिक्षा होईल. तूं काहीं काळजी करूं नको! चल मुलीला घेऊन आतां तू दवाखान्यांत चल."

"नको नको! तो फौजदार मला न् माझ्या चिगलीला आता फाड-फाडून खाईल!"

त्या फौजदाराची तुला भीति बाळगण्याचें कारण नाहीं. काल तुला त्यानं दमदाटी केली पण आज तूं चल. तुझ्या किंवा तुझ्या मुलीच्या केसाला धक्का लावण्याचं कोणाला सामर्थ्य नाहीं!" रायानें तिची परोपरीनें समजूत केल्यावर मोठ्या कष्टानें ती दवाखान्यांत येण्यास तयार झाली. मरीच्या घरचा पत्ता दाखविणारे दोघे कातकरी तेथेंच उभे होते. त्यापैकीं एकजण आता बोलूं लागला, "महाराज, ह्या फौजदाराची भीति म्हणून आम्ही गप्प राहिलों! नाहींतर आमच्या मरीच्या ह्या पोरीची छेड काढल्याबद्दल त्या नायकाची आम्ही हड्डी नरम केली असती!"

"मग अजून कां नाहीं करीत? अशा दुष्ट मनुष्याला देव शासन करील तेव्हां करील, पण तुम्ही का स्वस्थ बसता? मी आता तुमच्यामागे उभा आहें. कांहीं भिऊं नका! वाटेल तसा त्याला लोळवा, पण सांभाळा त्याचा जीव मात्र घेऊं नका!"

"ती नको महाराज काळजी! तुमचा धीर असल्यावर काय पाहिजे? एकदां ह्या एका नायकाची हड्डी नरम केली कीं, पुनः कोणी आमच्या बायका मुलींच्या वाटेस जाणार नाहीं!"

कातकऱ्यांना धीर देत राया त्या मंडळींना घेऊन हळुहळू दवाखान्यांत आला. त्यावेळीं आठ वाजले होते. रामजी डॉक्टर नुकतेच दवाखान्यांत आले होते. अद्यापि रोग्यांपैकीं कोणीच दवाखान्यांत आले नव्हते. 'आपणास इतका धीर देणारा आणि मरीला तिच्या नवऱ्याचं शेत सावकाराच्या घशांतून काढून देणारा हा गृहस्थ कोण असावा, याचा त्या कातकऱ्यांना काहींच उमज

पडेना. ते दोघेहि विचार करीत होते. परंतु दवाखान्यांत आल्यावर तेथें घडलेला प्रकार पाहून आपणाला धीर देणारा मनुष्य कोणीतरी फौजदारा-पेक्षांहि अधिकारी मोठा आहे, अशी त्यांची खात्री झाली. तो प्रकार असा—राया मंडळींना घेऊन दवाखान्यांत आला. त्याला पाहतांच रामजी डॉक्टर एकदम भीतीनें गळूनच गेला. त्याच्या सर्वांगाला कंप सुटून जवळ जवळ त्याची वाचाच बसली! रायाला 'या—बसा' वगैरे बोलण्या ऐवजीं तो 'त्—त्—प्—प्' करूं लागला. तें पाहून रायालाहि हंसें आलें. परंतु चर्येवर किंचितहि फरक न दिसूं देता धमकीवजा अधिकारयुक्त वाणींत राया म्हणाला, "काय डॉक्टरसाहेब माझी ओळख पटली वाटतं तुम्हाला? ठीक आहे आतां आपल्या बचावाचा उपाय काय? ज्या गोष्टीच्या तपासाकरिता इथं आलों त्या सर्व गोष्टी पुराव्यानिशीं माझ्या हातीं आल्या आहेत. हा एकच भक्कम पुरावा दाखवितो पहा; ही मरी, हिच्या नवऱ्याचा त्याच्या शेताकरितां त्या मार-वाड्यान खून केला—"

"नाहीं हो नाहीं इन्स्पेक्टरसाहेब!" गयावया करीत डॉक्टर म्हणाले.

"चूप—बोलूं नका! तो मेला स्वाभाविकरित्या असला तरी मी म्हणतों तो खूनच झाला. आणि मी आतां कमिशनरसाहेबांच्या मार्फत तसाच रिपोट करणार. तुम्ही पंचनाम्याच्या वेळीं तें प्रेत तपासलं आहे. फौजदारानें रुपये खाल्ले आहेत—तुम्ही खाल्ले आहेत आणि—"

"चूप—मध्यें मध्यें बोलूं नका! तो खून तुम्ही लांच खाऊन जिरविला आणि त्या तीनशेंड्या मारवाड्यानं सटव्याचं शेत जिरविलं! तसंच आतां ह्या मुलीवर जवळ जवळ 'रेप' होऊनहि तुम्हीं ह्या फौजदाराच्या मुरवतीनं गप्प बसला, ह्या केसचा रिपोर्ट केला नाहीं. तसंच हुकमाशिवाय परवां त्या मुलाचं प्रेत उकरून काढून तपासलं—"

"मेलों—ठार मेलों! इन्सपेक्टरसाहेब, मला वांचवा!" रायाचे पाय धरून डॉक्टर रडत रडत म्हणाले.

"माझे पाय धरून काय करतां? मी रिपोर्ट केल्यावर प्रांतसाहेब विचारतील तेव्हां उत्तर द्या—"

"नका नका! रिपोर्ट करूं नका!"

"उठा डॉक्टर, मी विचारतों तें सांगा—बाकी तुम्हाला सांगण्यासारखं कांहीं राहिलंच नाहीं. तुमची सर्व्हिस किती झाली?"

" सहा वर्षे राहिली पेन्शनचीं ! "

" मग ह्या इतक्या वर्षात किती कमाई केलीत ? "

" कांहीं नाहीं हो ! ह्या असल्या भिकार गावात काय मिळकत असणार ? "

" हें पहा डॉक्टरसाहेब मी आता स्पष्टच बोलतों ! ज्या गांवाच्या बाभळी त्याच गांवच्या बोरी ! मला ते काहीं सागूं नका ! रिपोर्टाकरिता ही आता लेखणी उचलू नये अशी जर तुमची इच्छा असेल तर आज रात्रीं दहा वाजतां मला तुमच्याकडून एक हजार रुपये मिळाले पाहिजेत. नाहींतर लक्षात ठेवा, मी तुम्हांला विष खायला देखील फुरसद देणार नाहीं ! "

" नका—नका— ! "

" अगदीं बोलूं नका ! आणि दुसर त्या मारवाड्याकडे आता जा आणि त्याला काय वाटेल ते सांगा, त्याच्याकडून रुपये पांच हजार रात्रीं बरोबर दहा वाजता माझ्या हातांत आले पाहिजेत. आणि ह्या मरीच्या शेताची सर्व खतपत्र तिच्या नावानें फिरवून उद्यां दोन प्रहरच्या आत तिच्या हातांत पडली पाहिजेत आणि वर तिला शेटजीनें एक हजार रुपये नग्द दिले पाहिजेत नाहींतर मी हिच्या नवऱ्याच्या म्हणजे सटव्याच्या खुनाचा चार्ज त्याच्यावर ठेवणार ! मग तुम्ही, तो फौजदार आणि तो शेट, अशा सर्वांच्या माना अडकतील. तसच त्या फौजदाराला जाऊन भेटा आणि त्याला सागा, ' जर तुला स्वतःचा जीव बचावणं असेल तर आज रात्रीं बरोबर दहा वाजतां मला पाच हजार रुपये मिळालेच पाहिजेत. आणि उद्या तुला पेन्शनचा अर्ज केलाच पाहिजे. ह्या इतक्या गोष्टी जर न झाल्या तर मी उद्या जे काहीं करायच ते करीन ! आणि डॉक्टर ह्या मुलीकडे पहा. किती दिवसात ही बरी होईल ? "

" दोन—दोन दिवसात ! देतों उत्तम औषध देतो ! "

" मरीबाई, तूं उद्यां त्या शेटजीच्या दुकानावर सकाळीं आठ वाजतां ये. बरोबर त्या मंडळींनाहि घेऊन ये. तूं काहीं बोलूं नको. शेटजी सर्व कांहीं करतील. आणि त्यानी जर काहीं केलं नाहीं तर मग मी आहे आणि तो शेट आहे." असे म्हणून राया पुनः डॉक्टरकडे वळून म्हणाला, " मी बरोबर दहा वाजता रात्रीं येथें येईन ! "

आपण शुद्धींत नाहीं, असें डॉक्टरसाहेबाना वाटलें. रायानें दम दिला आणि तो उत्तराची वाटहि न पहातां तेथून चालता झाला. डॉक्टरसाहेबानीं

चिगलीला - मरीच्या मुलीला —कसें बसें औषध दिलें आणि दवाखान्यात मुलाला बसवून प्रथम फौजदारसाहेबाकडे धूम ठोकली ! फौजदारसाहेब अस्वस्थच होते डॉक्टर येताच त्याचा भेसूर चेहरा दृष्टीस पडतांच फौजदारसाहेबांच्या छातींत चर्रर्र झाले ! डॉक्टरानीं धापा टाकीत कशीतरी आपली कर्मकथा त्याना सागितली. तेव्हां फौजदार दीर्घ श्वास सोडून म्हणाले, " डॉक्टर, अहो जिवावर आलेलं शेपटीवर गेल अस समजा ! हा इन्स्पेक्टर आणखी काहीं दिवस राहिल, तर सर्वांना विष खायची पाळी येईल. आजच्या एका दिवसात त्यानं ही दुसरी केस उपस्थित केली ! मी म्हणतों, पाच हजारावर माझ मिटल, हें मी माझ भाग्य समजतो. तुम्हीहि स्वतःला भाग्यवान् समजा, एका हजारावरच तुमचं तुटलं.

" पण हजार रुपये आणू कोठून ? "

" जीव गहाण ठेवा—दागदागिने विका, " काय वाटेल तें करा ! मीहि आता त्याच उद्योगाला लागतो. दहा वाजेपर्यंत वेळ आहे, हें तरी भाग्य ! "

" पण हा शेटजी कसा वळणार ?—हे मारवाडी कवडीचुंबक ! ' चमडी जायगा पण दमडी नय् जायगा ! ' हा पाच हजार रुपये कसे देणार ? "

" नाहींतर मर म्हणावं ! "

" अहो फौजदारसाहेब, तो मरेल आणि आपण जगू का ? त्याच्या केसमध्यें आपण दोघेहि गुतले जाणार ! "

" अरे हो ! काय राडेची ही भानगड झाली आहे !—बरं तुम्ही जा पुढं मी मागून येतोंच ! तोंपर्यंत काहीं रक्कम जमली तर पाहतो ! "

फौजदारसाहेब इतक्या लवकर वळतील, अशी डॉक्टरसाहेबाना कल्पनाहि नव्हती. पण त्याच्या कल्पनेबाहेर फौजदारसाहेबांनीं पांच हजार देण्याची तयारी दाखविली. डॉक्टरसाहेब तेथून उठून कुवरभाईच्या पेढीवर गेले. त्यावेळीं शेटजी देवपूजा करीत बसले होते. आज आपणावर मोठ संकट कोसळणार, हें त्यांना आपल्या दिवशीं कळलें असल्यामुळें गेल्या रात्रीं त्याचा डोळ्याला डोळा लागला नाहीं, आपणावर खुनाचा आरोप येणार, म्हणजे काय ? या गोष्टीचा त्यांना कांहीं केल्या उलगडा होईना. त्यानीं रात्रभर विचार केला, परंतु आपण कधीं खून केला नाहीं, असें असतां असा घाणेरडा आरोप आपणावर कसा येईल, हेंच त्याना कळेना. अशा रीतीनें विचारांत सर्व रात्र घालवून सकाळीं उठताच त्यांनीं संकट निवारणार्थ देवाला संकट घालण्याचा

विचार केला. स्नान वगैरे करून त्यांनीं देवखोलींत धरणं धरलं. आजच्यासारखी पूजा त्यांनीं कधीं ह्यापूर्वीं जन्मातहि केली नव्हती. अगदीं एकाग्र चित्तानं ते देवाला आळवीत बसले असता त्यांचा मुख्य मुनीम त्याना बोलावण्या-करिता आला.

" शेटजी, बाहेर रामजी डॉक्टर आले आहेत ! मी त्याना पुष्कळ सांगितलं पण आपल फार मोठ काम आहे, शेटजीवर मोठं संकट आलं आहे, म्हणून शेटजींची भेट झालीच पाहिजे, असं ते म्हणतात ! " मुनीम म्हणाला.

' शेटजींवर मोठं संकट आलं आहे,' हे मुनीमाचे शब्द ऐकताच शेटजींच्या पोटात धस्स झालें ! रामजी डॉक्टर कधींहि आपल्या घरीं न येणारा, तो असा अकल्पित येऊन सागतो, हें पाहून त्यानीं डॉक्टराना आंत पाठविण्यास सांगितलें. धन्याच्या हुकुमाप्रमाणें मुनीमाने रामजी डॉक्टरांना देवखोलींत आणलें. डॉक्टरांनीं आत येतांच दरवाजा ओढून घेतला. त्यांचा भेसूर चेहरा पाहतांच जी स्थिति फौजदारसाहेबांची झाली, तीच स्थिति आतां शेटजींची झाली. डॉक्टरसाहेबांनीं एकदम बोलण्यास सुरवात केली. ते म्हणाले, " शेटजी तुमच्या आमच्यावर मोठं संकट आलं आहे ! मागचा तो सटव्याचा खटला आता उपस्थित होऊं पहात आहे. त्या सटव्याचा तुम्ही त्याच्या शेताच्या अभिलाषानें खून केला--"

" बस्स् बस्स् ! भविष्य खरं ठरलं ! " एकदम ताडकन् उठून शेटजी म्हणाले. हा प्रकार पाहून डॉक्टर तर विस्मयचकित होऊन गेले. शेटजी असे हातवारे करीत ' भविष्य खरं ठरलं ! ' असें ओरडत काय उठले, हेंच त्याना कळेना. ते ' आ ' पसरूनच शेटजींकडे पहात राहिले. तेव्हां शेटजी म्हणाले," डॉक्टरसाहेब, मी खून केला असा माझ्यावर आरोप आहे ना ? "

" पण तुम्हाला ही गोष्ट कशी कळली ? "

" कशी कळली तें विचारूं नका ! पण इतकी गोष्ट मात्र खरी आणि ह्या आलेल्या संकटाच्या निवारणार्थ कोणता उपाय करावयाचा तेंहि मला कळलं आहे ! मी आज जो सकाळपासून देवाजवळ धरणं धरून बसलों आहे, तोहि एवढ्याच करितां ! ह्या येणाऱ्या संकटाच्या निवारणार्थ बरंच द्रव्य द्यावं लागणार आणि भूमि द्यावी लागणार, हें मला माहीत आहे. आणि त्याप्रमाणं द्रव्य आणि भूमि देण्यास माझी तयार आहे. बोला डॉक्टरसाहेब, आतां तुम्ही पुढं काय सांगणार आहांत तें सांगा ?

डॉक्टर रामजी आश्चर्यानें अगदीं थक्क होऊन गेले. फौजदार म्हणजे अधिकारानें चढेल बनलेला एक अत्यंत उर्मट प्राणी. लोकांकडून लांच खाईल पण दुसऱ्याला प्राणांतीहि लांच देणार नाहीं, तो गृहस्थ एक दोन नव्हे तर पांच हजार रुपये राजीखुषीनें देण्यास तयार झाला, याबद्दल तर डॉक्टर साहेबांना आश्चर्य वाटलेंच होतें. पण आता प्रत्यक्ष मेलेल्या मढ्यावरून तूप काढून घेण्यास कधींही न कचरणारा मारवाडी एका क्षणात आपण होऊन द्रव्य आणि भूमि देण्यास तयार झालेला पाहून डॉक्टर आश्चर्यानें थक्क कां नाहीं होणार ?

" शेटजी, आतां इतक्यांत फौजदारसाहेब येतील. आणि तेहि तुम्हाला नवीन सकटाची वर्दी देतील ! "

" कांहीं जरूरी नाहीं...मी हें संकट येणार म्हणून तयारीतच होतों. आतां बोला--पुढ काय करायचं ते बोला ! "

आज रात्रीं दहा वाजेपर्यंत पांच हजार रुपये तयार पाहिजेत आणि उद्यां दोन वाजण्याच्या आत त्या सटव्याचं शेत त्याच्या बायकोच्या नावें फिरवून तिला एक हजार रुपये दिले पाहिजेत."

" हें इतक केलं कीं संकट टळतं ना ? "

" अगदीं बिनबोभाट ! मग काळजी कशी ती नाहीं ! "

" ठीक आहे. तुम्ही सागितल्याप्रमाणं करतों रात्रीं नऊ वाजतां. माझा मुनीम तुमच्या दवाखान्यांत रुपये घेऊन येईल. आणि उद्यां दोन वाजण्याच्या आंत—पण त्या सटव्याच्या बायकोला मी कुठं शोधायला जाऊं ! "

" ती आपण होऊन उद्या सकाळीं तुमच्या पेढीवर येईल. "

" मग ठीक आहे ! "

इतक्यात फौजदारसाहेबहि तेथें आले. त्याना तोंड उघडण्याची जरूरीच पडली नाहीं. परंतु शेटजी इतक्या लवकर वळले हें पाहून त्यानाहि आश्चर्य वाटलें, थोडावेळ त्याचें बोलणें झाल्यावर फौजदारसाहेबांनीं आपल्या बगलेंतील पेटी शेटजी पुढें ठेविली. ती पेटी दागिन्यांची होती. ती उघडीत फौजदारसाहेब म्हणाले, " शेटजी, आज तुमच्यावर जें संकट आलं आहे, तेंच माझ्यावरहि आहे. मलाहि पैशाची जरूरी आहे म्हणून मी हे दागिने तुमच्या पेढीवर टके करण्याकरितां आणले आहेत. मुनिमाकडून ह्या सर्व लहानथोर आणि चिल्लर दागिन्यांची किंमत करा आणि वाजवी रक्कम माझ्या पदरात टाका. कारण मलाहि पांच हजार रुपयांची मूठ दाबावयाची आहे ! "

शेटजींनी आपल्या मुख्य मुनिमाला हाक मारून ती पेटी त्याच्यापुढें केली. त्यानें दागिन्याला कस लावून सर्वांचें वजन केलें. तेव्हां ते सर्व दागिने तीन शेर आणि पंधरा तोळे भरले. त्या दिवसाचा भाव तोळ्याला सव्वीस रुपये सहा आणे होता. परतु सव्वीस रुपयाच्या भावानें हिशोब करून साडेतीन हजार आणि दहा रुपये होतात, असें त्यानें सांगितलें. फौजदारानीं ती रक्कम मान्य करताच शेटजींच्या हुकमावरून मुनिमाने तीन हजार पांचशे दहा रुपये आणून त्याच्यापुढें ठेविले. ते रुपये उचलून फौजदार उठले. त्याच्याबरोबर डॉक्टरहि उठले. आपल्या दागिन्याची तितकीच किंमत येणार हें त्याना माहित होते. म्हणून त्यानीं बाकीच्या दीड हजार रुपयाची घरींच व्यवस्था करून ठेविली होती. डॉक्टर आणि फौजदार घरीं आले, तो त्याच्या वाड्यासमोर बरीच गर्दी त्याना दिसली. फौजदारसाहेबांना पहातांच एक जमादार पुढें झाला आणि सलाम करून म्हणाला, " साहेब हा बजाबा नाईक आणला आहे. माळावर तो विव्हळत पडला आहे, असा एका शिपायानें रिपोर्ट आणला म्हणून मी तिकडे गेलों. पहातो तो बजाबा नाईकाला कातकऱ्यानीं बाभळीच्या काठीनं मारलं ! "

" फार चागलं झालं ! योग्य बक्षीस मिळाल ! " फौजदारसाहेबाच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच जमादाराला आणि इतर शिपायाना आश्चर्य वाटलें. आपण बजाबाला फौजदारसाहेबाच्या पुढें नेताच ते तात्काळ सर्व कातकऱ्यांना कैद करण्याचा हुकूम देतील, असें त्याना वाटले होते. कारण बजाबा नाईक म्हणजे फौजदारसाहेबाचा प्रीतीचा मनुष्य !

" मग त्या कातकऱ्याना पकडून आणायचं काय ? " जमादाराने विचारलें.

" नाहीं. त्या कातकऱ्याच्या वाटेस जाता उपयोगी नाहीं. ह्या हलकट बजाबान त्या कातकऱ्याच्या पोरीला नासविली, त्याबद्दल त्याला योग्य तें बक्षीस मिळालं ! पाजी हरामखोर ! कोंवळ्या पोरीवर हात टाकायला पाहिजे ना ? नशीब समज त्या कातकऱ्यानीं तुझा तिथं मुडदा पाडला नाहीं ? " असें म्हणून फौजदारसाहेब बाजूला वळून म्हणाले, " डॉक्टरसाहेब, पहा त्याला आणि द्या काहीं औषध ! — आणि हे पहा बजाबा, आतां तुला सावध करून ठेवतों. तू किंवा दुसरे कोणी ह्या पुढं जर कातकऱ्यांच्या वाटेला जाल, तर साभाळून रहा ! ते तुम्हाला तर मारतीलच पण शिवाय सरकारी खटले तुमच्यावर होतील, हे लक्षांत ठेवा ! "

बजाबा नाईकाला कातकऱ्यांनीं बेदम मारलें, ही बातमी लखूनानांनी आमच्या मंडळींना येऊन सागितली. राया सकाळीं कोणालाहि न उठवितां एकटाच निघून गेला होता, त्यामुळें तो दहा वाजता परत येईपर्यंत राजा, बापू, आणि गजाभाऊ अगदीं अस्वस्थ होते. कोणतेंहि काम तो पूर्ण विचाराशिवाय करीत नाहीं, हें जरी त्याना माहित होतें, तरी सध्यां त्याच्या हातात आलेल्या कामामुळें त्याना भीति वाटत होती. कारण राया एका सरकारी खुनशी अधिकाऱ्याबरोबर खेळ खेळत होता. तो शेवटीं आपल्या प्रतिस्पर्ध्याला चीत करून अखेर साधणार, हें जरी निश्चित होतें, तरी न जाणों कदाचित् बाजू उलटली तर, भलत्याच थराला गोष्ट जाईल, अशी त्यांना दहशत वाटत होती. परतु दहा वाजतां तो परत आल्यावर त्याची प्रफुल्लित मुद्रा पाहून त्या तिघाना आनंद झाला. त्यावेळीं गजाभाऊचे दोन्ही चुलते-विठूकाका आणि लखूनाना-हे घरांत नाहींत असें पाहून राया म्हणाला, "गजाभाऊ, मी आता जें कांहीं सागणार आहें, त्याबद्दल तुला वाईट वाटतां उपयोगी नाहीं. आम्ही इथ येऊन ज्या काहीं भानगडी केल्या, त्या सर्व तुझ्या दोन्ही चुलत्याना माहित आहेत. आपण ह्या कामात हजारों रुपये मिळविले, त्यापैकीं आपल्यालाहि काहीं मिळावेत, अशी कदाचित् त्यानीं आशा बाळगली असली तर त्याबद्दल त्याना मी दोष देत नाहीं कारण मनुष्यस्वभावच तसा असतो! मीहि त्याना आपल्या मिळकतींतून काहीं भाग दिला असता; परतु मला देता येत नाहीं. कारण हे पैसे माझे एकट्याचे नव्हत. आपल्या क्लबच्या बाराजणाची ह्या पैशावर सारखी मालकी आहे. म्हणून मी ह्या हातीं घेतलेल्या कामात जें कांहीं आपल्याला मिळायचें तें तुझ्या चुलत्याच्या समक्ष आपल्या हातीं पडूं नये म्हणून मी निराळी व्यवस्था केली आहे."

"राया तू केलंस तें अगदीं बरोबर आहे!" गजाभाऊ म्हणाला.

"विठूकाका किंवा लखूनाना याना वाईट वाटेल, हा विचारहि माझ्या मनांत आला नाहीं."

"तरी देखील मला इथून जाताना जें करायचें तें मी करीन!" राया म्हणाला. "मी भरलेला बार बरोबर उडाला कीं नाहीं, हें मला आज रात्रीं दहा वाजतां एका विवक्षित स्थळीं गेल्यावर कळणार आहे. बार बरोबर उडाला तर नक्त अकरा हजार रुपये माझ्या हातात पडतील आणि उद्या

दुपारपर्यंत त्या सटव्याच्या बायकोचं काम होताच संध्याकाळीं पुनः एकदां शेटजीला भेटलों कीं, आपलें महाडचें कार्य आटोपलं! मग कुणालाहि कळूं न देतां आपण रात्रीच्या रात्रीं हें महाड सोडून रायगडाच्या मार्गाला लागूं!" इतक्यांत जिन्यावर पावलें वाजल्याचा आवाज ऐकूं येतांच राया हळूच म्हणाला, "आतां ह्या गोष्टीची जास्त वाच्यता नको!"

"तुझा विचार आम्हाला मान्य आहे!"

रायानें कोणतीहि योजना पुढें माडली कीं, ती मंडळींना पसंत पडायचीच! त्यानें सुचविलेली युक्ती, किंवा योजलेला बेत अथवा ठरविलेली योजना यावर कोणाकडूनहि शंका-कुशंका निघत नसे. थोडक्यांत सागावयाचें म्हणजे रायाच्या मुखांतून पडलेलें वाक्य मडळींना ब्रह्मवाक्यच असे! त्या बारा मंडळींनीं रायाच्या शब्दाला मान दिला होता म्हणून शेफारून जाऊन त्यानें कधींहि आपल्या अधिकाराचा दुरुपयोग केला नाहीं. वास्तविक पाहिलें असतां त्याच्या मंडळींत काम करणारीं अशी पांच सहाच मंडळी होती. बाकींच्या राहिलेल्या मंडळींचा क्वचित् प्रसंगीं एखाद्या क्षुल्लक कामांत उपयोग होई. तथापि त्या मंडळींविषयीं इतरांनीं कधींहि दुजाभाव मनात आणला नाहीं; किंवा रायानेंहि वांटणी करताना व्यस्त हिशोबानें वाटणी केली नाहीं. क्लब स्थापन होतांच ज्या एका जुटीच्या उच्च तत्त्वावर त्यानीं एकमेकाना 'आपलें' म्हटलें ती भावना प्रत्येकाच्या मनात सदैव जागृत होती. आज त्याच्या हातात हजारों रुपये खेळत होते; परंतु एक काळ असा होता कीं, त्या बारा जणापैकीं एका जवळहि दातावर मारायला फुटकी कवडी नव्हती! असो. मडळी गोष्टी बोलत असतांना जिना वाजल्याचा वर उल्लेख केलाच आहे. त्यावेळीं लखूनाना आणि विठूकाका हे बाहेरून परत आले होते. वर येतांच लखूनाना सागू लागले, 'बजाबा नायकाला कातकऱ्यांनीं अगदीं बेदम मारलं आहे. मी आतां येताना त्याला पाहिलं. फौजदाराच्या वाड्या-जवळच त्याला जमादारानं डोलीतून उतरविलं. इतक्यांत फौजदारहि आले. मला वाटलं होतं कीं, कातकऱ्यांचीं शंभर वर्षे भरलीं म्हणून! पण पहातों तो फौजदारसाहेब अगदीं गोगलगाय बनलेले! त्यांनीं उलट बजाबालाच शिव्या दिल्या, आणि कातकऱ्यांच्या वाटेला कोणी जाऊं नये, असा सक्तीचा हुकूम सोडला!"

"हा असा उलट प्रकार कसा," याबद्दल विठूकाका आणि

लखूनाना याना आश्चर्य वाटलें. रायानें त्यावेळीं तोंडानें एकहि शब्द न उच्चारतां जरी मुखावर हास्य दर्शविलं असतं, तरी त्या दोघाना त्या आश्चर्याची गुरु-किल्ली सापडली असती. परतु रायानें तसें कांहींच केलें नाहीं. उलट त्यानेंहि आश्चर्य दाखविलें. जेवतांना ' सकाळीं तुम्ही कुणीकडे गेलां होतां ? ' असा विठूकाकांनीं प्रश्न केल्यावर राया म्हणाला, " आमच्या मंडळीनीं रायगडावर जाण्याचा बेत केला आहे, हें तुम्हाला माहीत आहेच. त्याप्रमाणं तिथं जाण्या-साठीं वहानाची कांहीं व्यवस्था पहावी म्हणून मी सकाळींच उठून गेलों. तुम्हाला उठवावं, अशी माझी इच्छा होती. पण म्हटलं रात्रीच्या खेळामुळं तुम्हाला जाग्रण झालं आहे; तेव्हा त्रास देण चागलं नाहीं ! "

जेवण आटोपल्यावर रायानें स्वतः पत्ते खेळण्याची इच्छा दर्शविली. आतां रात्रीं दहा वाजेपर्यंत त्याला कोणतेंच काम नव्हतें. तोंपर्यंत जर आपण स्वस्थ बसलों, तर विठूकाका किंवा लखूनाना हातातील कामासंबंधीं कांहीं तरी प्रश्न विचारतील, तें त्याला टाळावयाचें होतें. म्हणून त्यानें हा खेळाचा बूट काढला. लवकरच त्याचा खेळ मोठ्या रगात आला. सध्याकाळीं दिवे लागेपर्यंत त्याचा खेळ चालला होता. दिवे लागतांच राया उठला आणि आळस देत देत म्हणाला, " छे बुवा, ह्या पत्त्यांच्या खेळात इतका वेळ फुकट गेला ! एका जागीं बसल्यामुळ हें सकाळच अन्न जिथल्या तिथंच पोटात थबकून राहिल आहे. आता चागलीच पांच मैलाची रपेट केल्याशिवाय हें अन्न कांहीं खालीं उतरायचं नाहीं ! राजाभाऊ मला आतां रात्रीं जेवायला नको. तुम्हाला वाटेल तर तुम्ही जेवा. पण मी एकटाच नदी किनाऱ्यावर जाऊन हवा खात बसणार ! "

रायाचें भाषण कोणत्या गोष्टीचें द्योतक आहे, हें मंडळीच्या तेव्हाच लक्षांत आलं. ' आपणास रात्रीं दहा वाजता एका विवक्षित स्थळीं जावयाचं आहे, ' ह्या त्यानें दिलेल्या सूचनेप्रमाणें तो आतां जाण्याकरितां निघाला आहे, तेव्हां आपण कोणी त्याची वाट पाहूं नये, एवढ्याचकरितां तो असें बोलला हें त्यांच्या लक्षांत आलें. रायानें मुकाट्यानें कपडे चढविले आणि तो एकटाच बाहेर पडला. म्हटल्याप्रमाणें तो खरोखरीच नदीतीरावर जाऊन बसला. साडे-नऊ वाजेपर्यंत तो एकटाच त्या काळोखात बसला होता. त्याच्या हातावरील रिस्टवॉच रेडियमचें असल्यामुळें साडेनऊ वाजलेले पाहतांच तो उठला आणि दवाखान्यांत जाण्याकरितां निघाला. आपण जात आहोंत तें कार्य होईल किंवा

नाहीं, अशी चुकून सुद्धा त्याला शका आली नाहीं. बरोबर दहा वाजतां तो दवाखान्यात आला. वास्तविक दवाखाना सात वाजतां बद व्हावयाचा. परंतु आज डॉक्टरसाहेब आतल्या बाजूला फौजदारसाहेबांच्या बरोबर बोलत बसले होते. राया सरळ जाऊन त्याच्यापुढें उभा राहिला आणि अगदीं धीटाईनें, किंचितहि न कचरता, घेतलेल्या सोंगाची बतावणी करीत म्हणाला, " मिस्टर विध्वंस, मग तुमचं काय ठरलं ? "

आपणांस 'फौजदारसाहेब' असें न म्हणता साध्या नावानें त्यानें हांक मारली. ह्या बद्दल मनुष्याचा दर्जा काय आहे, हें ते जाणत होते. त्यांनीं झटकन् खुर्ची पुढें केली आणि म्हटलें, " इन्स्पेक्टरसाहेब, तुम्ही सुचविलेलीच तोड आम्हाला पूर्णपणें मान्य आहे. तुम्ही ठरविलेली रक्कम तयार आहे ! " असें म्हणून फौजदारानीं नोटाचे दोन मोठे पुडके रायाच्या पुढें ठेवले; आणि ते पुढें म्हणाले " हे ठरलेले अकरा हजार रुपये ! "

" ही एवढी रक्कम माझ्या खिशात जाईल, असं मात्र आपण समजू नका ! तुम्हाला अनुभव आहेच, त्यावरून तुमची कल्पना होइलच कीं मलाहि बऱ्याच जणाची मूठ दाबावी लागेल. आता तुम्हीं मुळींच . काळजी करू नका. मात्र आता स्नेही म्हणून इतकच सांगतों कीं, ह्यापुढं फार जपून वागा. पुढं जर एखादी केस उपस्थित झाली, तर मला कांहीं करतां येणार नाहीं, हे मीं आतांच स्पष्ट सागतों. बर मी घेतों रजा ! " असे म्हणून रायानें ती पुडकीं उचललीं आणि सरळ रस्ता धरला !

राजा, बापू आणि गजाभाऊ घरीं वाट पहातच बसले होते. विठूकाका लखूनाना इतका वेळ त्याच्या जवळच बसले होते परंतु रात्रीच्या जाग्रणामुळें आता त्याचें डोळे पेगू लागतांच ते नुकतेच उठून झोपायला गेले होते. रायानें आत येताच गजाभाऊला दरवाजा लावून घेण्यास सागितलें आणि त्या चौघांनीं बसून त्या नोटा मोजून पाहिल्या. दहा दहा रुपयाच्या त्या नोटा होत्या. टरल्याप्रमाणें ते बरोबर अकरा हजारच रुपये होते. पुनः त्याची पुडकीं बाधून रायानें ती रक्कम व्यवस्थेनें आपल्या ब्यागमध्यें ठेविली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं तोंड धुताना विठूकाकानीं चौकशी केलीच ! तेव्हां रायानें त्याना मोठ्या चातुर्यानें उत्तर दिलें. तो म्हणाला, " विठूकाका, आणखी चोवीस तास तुम्हाला असंच मौन धरलं पाहिजे. आता आम्हीं पुढें

काय करणार आहोंत, ते जर तुम्हांला आम्हीं पूर्वीच सांगितलं, तर त्यातील स्वारस्य निघून जाईल, हें तुम्हीहि कबूल कराल. आम्ही कोणत्या गोष्टी हातीं घेतल्या आहेत, तें तुम्हांला माहीत आहे आणि त्याचा शेवट काय होणार तोही तुम्हाला कळला आहे. पण ह्या मधल्या गोष्टी तुम्हाला कळल्या नाहींत. त्या तुम्हाला आपोआप कळेपर्यंत थोडा दम धरा. शिवाय ह्या गोष्टी कळेपर्यंत तुम्ही फौजदारानाहि जाऊन भेटूं नका

" छे छे ! मी कशाला भेटतो आणि भेटून तरी काय ! त्यांच रडगाणंच ऐकायच कीं नाहीं ? पण काय हो, शेटजींना तुम्हीं परवा सांगितलेलं भविष्य काल त्याना पटलं असेल का ! "

" तेंच विचारण्याकरितां आपण आज संध्याकाळीं त्याच्या पेढीवर जाऊं !" रायानें उत्तर दिलें.

जेवण होईपर्यंत काहीं विशेष प्रकार घडला नाहीं. नाहीं म्हणावयाला लखूनानाकरिता सर्व मडळी जेवणाची खोळबून राहिली होती. तो आज सकाळीच शेटजींच्या पेढीवर ' लिखाण ' करण्याकरिता गेला होता. वास्तविक तो नेहमीं दहा वाजायच्या आतच परत येत असे. परतु आजच त्याला इतका वेळ झाला होता. जवळ जवळ बारा वाजले, तेव्हां लखूनाना परत घरीं आला. येताच त्यानें प्रथम रायाला शेटजींचा निरोप कळविला. तो म्हणाला, " आज तुम्हाला शेटजींनीं सध्याकाळीं मुद्दाम पानसुपारीला बोलाविल आहे. रीतसर आमत्रण देण्याकरता शेटजींचे मुख्य गुनीम येणारच आहेत, पण मलाहि त्यानीं सागितल. "

" पण नाना, तुला आज इतका वेळ कां झाला ? " विठूकाकांनीं मध्येंच विचारलें.

" ती सटव्याची बायको मरी तिच्या नावाच खरेदीपत्र लिहायचं होतं म्हणून मला वेळ झाला. तें मी लिहिल, नंतर मी, ती आणि मुनीम कचेरींत गेलों; तिकडे तें रजिस्टर केलं, तेव्हा माझी सुटका झाली. आज ती आठ वाजतांच आपल्या मुलीसह दुसऱ्या दोन माणसांना बरोबर घेऊन पेढीवर येऊन बसली होती. शेटजी तिच्याशीं फार ममतेनें बोलले. शेत तिच्या नावावर करून दिल्यावर शेटजींनीं हजाराचा तोडा तिला बक्षीस दिला. फार खूष होऊन दुवा देत ती म्हातारी गेली ! मला वाटतं आपल्या सबंध आयुष्यांत शेटजींनीं हेंच एक सत्कृत्य केलं असेल ! "

मंडळीचें जेवण चाललें असतांना लखूनानानें म्हटल्याप्रमाणें शेटजींचा मुख्य मुनीम आमंत्रण देण्याकरिता आला. रायानें मोठ्या प्रेमानें त्या आमंत्रणाचा स्वीकार केला. मरीची गोष्ट ऐकल्यावर त्यालाहि समाधान झालें. आपण हातीं घेतलेल्या कार्यांतील ही शेवटची गोष्ट निर्विघ्नपणें बिनचूक पार पडली म्हणून त्याला आनद होणें स्वाभाविकच आहे. सध्याकाळीं ती सर्व मंडळी शेटजींच्या पेढीवर गेली. शेटजींनीं मोठ्या आदरानें रायाचा हात धरून त्याला आपल्या जवळ बसविलें. आज शेटजींना फार आनंद झाल्यासारखा दिसत होता. ते म्हणाले, " महाराज, तुम्हाला मी प्रत्यक्ष ब्रह्मदेवच म्हणतों ! माझ्या ध्यानीं नाहीं कीं मनीं नाहीं, अशी एक जुनी गोष्ट तुम्ही भविष्य केल्याप्रमाणं आज अकल्पित उपस्थित होऊन माझ्यावर तुम्ही म्हणाला त्याच प्रमाणं—अगदीं तुमचेच शब्द—खुनाचा आरोप आला ! आणि मला जर हें भविष्य खरोखरच पूर्वी कळलं नसतं, तर मात्र मी द्रव्य आणि भूमिदान मुळींच केल नसतं आणि त्यामुळं माझा नाश झाला असता हेंहि तितकेंच सत्य आहे, पण आज मी सकटमुक्त झालों. आता मी तुमचं काय प्रिय करू तें सांगा ? मुळींच संकोच धरूं नका. ही पेढी तुमची आहे हे दुकान तुमचं आहे, इतकेंच काय पण मीहि तुमचाच आहे. आज तुम्ही माझा जीव वांचविला, हें मी कधींहि विसरणार नाहीं ! "

" शेटजी सकटमुक्त झाल्यामुळं तुम्हाला आनंद होणं साहजिकच आहे. पण मी तुम्हाला एकच गोष्ट विचारतों. आज तुम्हीं जें काहीं दान केल, त्याबद्दल तुमचं मन तुम्हाला काय सागतं ? त्या दानामुळं तुम्हाला आनंद होतो ना ?—मग एकच गोष्ट करा, गरीबगुरिबाना नाडूं नका, त्यांना मदत करा, त्यांचीं व्याजं सोडा म्हणजे तुम्हाला अंतःकरणापासून त्याचा दुवा मिळेल ! आता तुमच्या आयुष्याचीं जीं काय थोडी फार वर्षं राहिलीं आहेत, तीं अशा सत्कार्यांत घालवा, म्हणजे तुम्हाला खरी शांति मिळेल ! "

तुमचं प्रत्येक वाक्य मी वेदवाक्य समजतों !—आजपासून तुम्ही सागता तसाच मी वागणार ही खात्री ठेवा !– पण आता माझं ऐका, मी तुमचं काय प्रिय करूं तें सागा ? "

" तुमची इच्छाच आहे तेव्हां सांगतों. तुमची भेट व्हायला मुख्य कारण हे आमचे स्नेही लखूनाना आणि त्याचे बंधू विठूकाका हे आहेत. त्यांची मला प्रथम ओळख ठेवली पाहिजे. म्हणून त्यांच्या कुटुंबाकरितां आणि मातुश्रीकरितां अशीं तीन लुगडीं द्या म्हणजे झालं ! "

" बस्स ! फक्त लुगडींच ? " असें म्हणून स्वतः शेटजी उठले. आणि पुढल्या दुकानांत जाऊन त्यांनीं सहा उंची लुगडीं काढून तीं रायाच्या पुढें ठेविलीं. नंतर सहा धोतर जोडे आणि सहा खण आणले. शिवाय पाचशें रुपयांच्या नोटा काढून त्या रायाच्या हातांत दिल्या. खऱ्या अंतःकरणानें दिलेल्या त्या वस्तू आणि ती रक्कम रायानें घेतली तेव्हा शेटजी म्हणाले, " तुमची भेट ह्या आमच्या लखूनानामुळ झाली, ही गोष्ट मीहि विसरणार नाहीं. आजपासून त्याना मी माझ्या पेढीवर कायमचं ठेवलं. माझं काम असो वा नसो, त्याना मी मरेपर्यंत दरमहा पन्नास रुपये देत जाईन ! "

विठूकाका आणि लखूनाना खरोखरीच आनदसागरात पोहत घरीं आले ! घरांतील बायकानहि आनद झाला. आपल्या गजोबाचे मित्र त्या सर्वांना अत्यंत प्रिय झाले. गप्पा-गोष्टी करून जेवण होईपर्यंत नऊ वाजले. दिवाणखान्यात येतात्र राया म्हणाला, " विठूकाका, आता आम्ही आपलीं रजा घेतो. आम्ही तिघे आणि तुमचा गजोबा असे चौघे आता इथून जाणार ! "

" इतक्या रात्रीं ?—भलतच काहीं तरी ! आणि तुम्हाला जाऊ देणार कोण ? " रायानें त्याची समजूत केली. आपण नुकतेच विस्तवाबरोबर खेळ खेळलो आहोंत तेव्हां आता ह्या ठिकाणीं वाजवीपेक्षां जास्त एक क्षण सुद्धा राहणें किती धोक्याचें आहे, हें नीट समजावून सागताच विठूकाकाना उत्तरच देता येईना ! त्यानीं निदान सकाळपर्यंत तरी रहावें असाहि आग्रह केला परंतु ' आपण एकदा विचार करून ठरविलेली गोष्ट केव्हांहि बदलत नसतो ! " असें सागून मंडळी निघालीच ! शिवाय आपल्या जाण्यांत गुप्तपणा राखण्याकरिता त्यानीं विठूकाका किंवा लखूनाना याना पोंचविण्याकरिता खालीं सुद्धा येऊं दिलें नाहीं. ज्यानें त्यानें आपापले सामान डोक्यावर घेतलें. ' हें गांठोडं मी कस उचलूं ? मला लाज वाटते ! ' अशा पोकळ मिजाशींचे तें मित्र नव्हते. जाताना रायानें प्रत्येक मुलाच्या हातात दहा दहा रुपये दिले.

रात्र काळोखाची होतो. रस्त्यांत अगदीं सामसूम होतें, तरी आडगल्लींतूनच आमचे चौघे मित्र निघाले. राया सर्वांच्या पुढें होता. त्याच्या हातांत असलेल्या ब्यागमध्यें रोख बारा हजार रुपये होते. इतका ऐवज बरोबर घेऊन आपण अपरात्रीं अनोळख्या ठिकाणीं प्रवास करीत आहोंत, म्हणून त्याला कांहींच भीति वाटत नव्हती. वाटेंत हल्ला करण्यांत येईल, अशी भीत त्याच्या मनाला शिवलीच नाहीं. वेळ प्रसंग पडल्यास स्वरक्षणाकरिता जवळ

एखादी काठी घेण्याचीहि त्याला आवश्यकता भासली नाहीं. कदाचित् ह्याला कोणी फाजील आत्मविश्वास असें म्हणेल, परंतु वाचकानीं तसा गैरसमज करून घेण्याचें कारणच नाहीं कारण बुद्धिचातुर्य हेंच रायाजवळ आत्मरक्षणाचे फार तीक्ष्ण हत्यार होतें. ह्या हत्याराच्या सहायानें तो अशा एक दोन प्रसगांतून निभावला, ती हकीगत पुढें येणारच आहे. असो. राया म्होरक्या म्हणून सर्वांच्या पुढें जात होता बराच वेळ चालून गेल्यावर गाव संपतांच किर्र झाडी लागली. रस्त्याच्या कडेला दोन्ही बाजूनीं मोठमोठे वृक्ष आणि आजूबाजूला जंगलच होते, असें म्हटलें तरी चालेल.

"राया काळोखात रस्ता माहित नाहीं, आणि आपण गडावर कसें जाणार?" गजाभाऊ म्हणाला, "मी अगदीं लहान असताना एकदां वडिलांच्या बरोबर गेलों होतों. मला पक्की आठवण आहे वाटेंत कडा लागतो, भयकर जगल लागतं, दोन चारदा नाले ओलांडावे लागतात. आम्हीं सकाळीं निघालों तो दुपारीं पोंचलों. वाटेत चालवेना म्हणून डोल्यासुद्धा कराव्या लागल्या! आणि आता तर आपण अपरात्री हे डोक्यावर बोजे घेऊन निघालो आहोंत. शिवाय वाटेत श्वापदाचीहि भीति आहेच!"

"अरे, आपले वाडवडील जात येत होते, दिवसांतून दोन फेऱ्या करीत होते, म्हणून तुम्ही फुशारकी मारली होती ना? मग आतां आपणास कां जातां येऊ नये?" राया म्हणाला.

"छे! बुवा हा सिद्धान्त इथं तरी लागूं नाहीं!" आपला एक खांदा दुखला म्हणून ओझें दुसऱ्या खांद्यावर बदलीत बापू म्हणाला. रायाच्या ती गोष्ट लक्षात आली. आणि मडळींची मनःस्थितिहि त्यानें जाणली. पुढे काय करायचे हा बेत त्यानें योजूनहि ठेविला होता. परतु उघड बोलून न दाखवितां तो म्हणाला, "बापू, आपल्या पूर्वजांनीं आपल्या बुद्धिसामर्थ्यावर आणि बाहूबळावर ज्या काहीं अलौकिक गोष्टी केल्या, त्या आपण फक्त वाचतों. पण आपणास त्यांची कांहींतरी कल्पना होते काय? आपणास पुण्याहून मुबईस जावयाचं म्हणजे बुधवारात टागा करतों, स्टेशनवर येतो. तिथं टिकीट काढतों आणि गाडींत बसतों. चार तासानीं मुंबईत बोरीबंदरवर उतरतांच हमाल असतोच. एखादी लहानशी वळकटी नाहीं, तर ब्याग हमालाच्या स्वाधीन करून बाहेर येतांच ट्राम आहे. ह्या वरून विचार कर कीं आपण किती ऐदी, सुस्त, सुखावलेले आणि मिजासखोर बनलों आहोंत?

पूर्वीच्या वाडवडिलांच्या गोष्टी वाचून आपण आपल्या आणि त्यांच्या स्थितीचा कधींतरी विचार करतों का ?–फक्त आमचे वाडवडील असे होते आणि तसे होते, अशा तोंडानें फुशारक्या मात्र मारतों."

"होय. पण वस्तुस्थिति तशीच बदलली आहे, त्याला काय करायच ! आमचे वाडवडील मुंबई—पुण्याचा प्रवास घाटांतून पायीं करीत होते, हें खर पण आतां आम्हाला पुण्याहून स्टेशनवर पायीं जाता येत नाहीं, त्याला काय करावं ! टांगा केला तरी आम्हाला श्रम होतात. वाटेंत एखाद्या दुकानीं टांगा उभा करून एक कप चहा जेव्हा आम्ही घेऊं तेव्हांच आमच्यांत थोडासा तजेला येऊन आम्हीं स्टेशन गांठतों !" राजा म्हणाला.

"मग आपली स्थिति आतां अशी का झाली आहे, याचा आपण सूक्ष्म विचार नको का करायला ?" रायानें विचारलें. मंडळींना त्याच्या खांद्यावर आणि डोक्यावर असलेल्या त्या वस्तूंचा भार अगदीं असह्य झाला आहे, त्याना ठेचा लागूं लागल्या आहेत आणि आता त्याच्या श्रमामुळें श्वासोच्छ्वासहि जोरानें होऊं लागला आहे, हें त्याच्या पूर्ण लक्षात आले होतें. म्हणून त्याना बोलण्यांत गुतवून इच्छित स्थळीं न्यावयाचें होतें. तो पुढें म्हणाला, "आपण ऐदी आणि सुस्त बनलों, असे आपणावर आरोप आहेत. कोणी म्हणतात अनुकरणप्रिय बनलों, कोणी म्हणतात आपण व्यसनी बनलो, अशीं शेकडों कारण दाखवितात !"

"पण आपण असे नादान का बनलों ? तू कोणतं कारण शोधून काढल आहेस !" बापूने रायाला विचारलें.

"मी याच कारण शोधून काढल आहे, तें अस–आमच्या वाडवडिलांनीं हाडाचीं काडं करून प्रसंगीं रक्त साडून धनदौलत मिळवून ठेविली. पुढ आपल्या म्हण कीं राष्ट्राच्या म्हण दुर्दैवानं परकीयाची सत्ता इथ आली. त्यानीं तुम्हाला ऐदी बनविलें ! पूर्वी तुमच्याजवळ पैसा होता, तरी कष्ट करूनच तुम्हाला जे आवश्यक असे तें मिळवाव लागत असे, खरं ना ? परकीयांनीं जं केलं तें हेंच केलं ! तुम्हाला आवश्यक लागणाऱ्या अशा गोष्टी तुमच्या घरी आणून देण्याची त्यानीं व्यवस्था केली. तुम्हांलाहि श्रम न करता केवळ पैशाचा योग्य मोबदला देऊन ह्या वस्तू घरबसल्या मिळू लागताच मोठं सुख वाटू लागलं त्यामुळं तुमची कष्ट करण्याची संवय मोडत जाऊन द्रव्याबरोबरच तुमच्या शरीरसपत्तीचा ऱ्हास होऊं लागला. हळूहळू तुम्ही नाजूक

प्रकृतीचे बनलात. तोंपर्यंत तुमची सुखलालसाही त्या परकियांनीं इतकी अनावर वाढविली कीं, शिजलेलं अन्न, तयार कपडे, आणि चैनीच्या वस्तु तुमच्या दरवाजावर तुम्हाला मिळूं लागल्या. फक्त दरवाजा उघडून बाहेर डोकावण्याची खोटी कीं, हवी ती वस्तु तयार ! ”

खरं आहे, असं झाल आहे खरं ! ताप आला कीं क्विनाईनची गोळी जर घरबसल्या मिळते, तर गुळवेलीचा काढा करण्याची कोण खटपट करणार !

“ पण राजा, हें लक्षात ठेव कीं, जेव्हां क्विनाईन टाकून गुळवेलीचा काढा करण्याची आम्ही खटपट करूं लागूं तेव्हांच आमचा तरणोपाय होईल ! ” राया म्हणाला.

इतक्यांत बाजूच्या झाडींतून ‘ कोण आहे ! ’ असा दरडावून विचारलेला प्रश्न त्याना ऐकूं आला. तोंच हातात काठ्या आणि हत्यारें घेतलेले आठ दहा कातकरी पुढें आले. राया शिवाय करून त्या तिघांहि मित्रांच्या छातींत धस्स झालें ! प्रसंग आला, असेंच त्याना वाटलें. रात्रीं अशा जंगलांतून हल्ले होतात, दरोडे पडतात आणि खून होतात, असें त्यांनीं आजवर ऐकलें होते, पण आज प्रत्यक्ष अनुभव घेण्याची वेळ येऊन ठेपली, असा विचार मनात येऊन त्यांचे हातपाय लटपटूं लागले. रायानें चटकन् आपल्या खिशांतील ड्राय ब्याटरीचा चोरकंदील काढला आणि त्याचें बटन दाबलें. त्याबरोबर उजेड पडताच त्या कातकऱ्यापैकी एकजण आश्चर्यानें म्हणाला, “ कोण महाराज, तुम्ही इथं अशा रात्रीं कुठं ? ”

“ केवळ तुम्हालाच भेटण्याकरिता ! ” राया शांतपणें म्हणाला.

“ पण महाराज अशा वेळीं जगलातून जाणें फार धोक्याच असतं ! आम्ही आतां तुम्हांला ओळखलं म्हणून बरं नाहीं तर—”

“ काय झालं असतं ? ”

“ तुम्हांला लुटलं असतं—मारलं असतं—”

“ कोणी ? ”

“ दुसरं कोणी ?—आम्हींच ! ”

कातकऱ्यानें अगदीं सरळ आणि खरीं उत्तरें दिलीं. परंतु राया त्या उत्तरावर जास्त कांहीं बोललाच नाहीं. विषय बदलून तो म्हणाला, “ मरीबाई कुठं आहे ?—तिचं झालं ना काम ? ”

इतक्यांत मरी आणि तिची मुलगी चिगळी झाडींतून पुढें आली. रायाला

पाहतांच तिला कितीतरी आनंद झाला. आपला उपकारकर्ता आपणास भेटावा, अशी तिची फार इच्छा होती. परतु रायाचा तिला शोध कोठून लागणार ? आधल्या दिवशीं सकाळीं भेट झाल्यावर त्यानें ज्या ज्या गोष्टी करण्याचे आश्वासन दिलें होतें, त्याप्रमाणें सर्व गोष्टी एखाद्या यंत्राप्रमाणें सहज घडून आल्या. म्हातारीला शेत मिळालें आणि वर हजार रुपयेहि मिळाले, तेव्हा आपणावर इतके उपकार केले तो गृहस्थ आपणास भेटावा आणि आपण त्याचे मनःपूर्वक आभार मानावे, असे तिला वाटणें स्वभाविकच होतें. तिनें आमच्या मंडळींना मोठ्या आदरानें आपल्या झोपडींत नेलें. तेथे एक रकटें आथरलेले होते. आज म्हातारीच्या घरीं बरीच जमात जमली होती. आमच्या मंडळीची बाहेर चाहूल लागताच धावून आलेली सर्व मंडळी त्यापूर्वी त्या झोंपडींत बसूनच म्हातारीच्या मुलीचा प्रश्न सोडवीत होती. ‘ चिगली नासावली ! ’ तेव्हा तिचे पुढें काय करावें, म्हणून जमात विचार करीत होतो. राया आपल्या मित्रासह आत आल्यावर मंडळींना त्या रकट्यावरच बहुमानानें बसवून आपण सर्वजण बाजूला जमिनीवर बसले. कोपऱ्यात एक अंधुक दिवा जवळ होता. आज कितीतरी वर्षांनीं त्या झोंपडींत दिवा लागला होता. राजा आणि बापू त्या अंधारांत इकडे तिकडे पाहू लागले परंतु त्याना तेथें कोणतें वैभव दिसलें ? एका कोपऱ्यात चार हंडीमडकीं आणि तीन धोंडे ! रायानें रकट्यावर बसल्यानतर विचारलें, “ आज मरीबाईच्या घरीं मंडळी जमून काय विचार करीत होती ! ”

रायाला प्रथम ओळखणारा म्हणाला, “ महाराज, आम्ही काय विचार करणार ?—जमात म्हणते कीं; चिगलीला तिच्या आईनं एक झोपडं बाधून द्याव आणि तिथं तिनं राहवं. जातीन तिला त्रास देऊं नये आणि तिनं जातीशीं संबंध ठेवूं नये ! ”

“ पण त्या नायकाच काय झालं ? ” बजाबा नायकाचें झाले ती संपूर्ण हकिकत रायाला माहीत होती, तरी त्यानें ती हकिकत आता मुद्दाम विचारली.

मारे ठेंचून काढला ! तो कातकरी हातवारे करीत मोठ्या अभिमानानं म्हणाला. “ महाराज, तुम्ही आम्हाला धीर दिल्यावर मग काय ! लगेच त्या नायकाचा शोध करण्याकरिता माणसं पाठविलीं. तो माळावर आहे, अस कळताच आम्ही सर्वजण गेलों आणि बाभळीच्या काठ्यानीं झोडपून काढला ! आमच्या पोरीच्या अंगाला हात लावला म्हणजे काय गोष्ट आहे ! ”

" वर मी आता असं म्हणतों, ह्या नायकाला तर शासन केलं. कारण त्यानं गुन्हाच केला होता, पण चिगलीला का शासन करता ? तिनं स्वतः होऊन कांहीं गुन्हा केला नाहीं. बिचारी प्रसंगांत सांपडली, त्याला ती काय करणार ? तिनं गुन्हा केला नाहीं मग जातीनं तिला दूर का टाकाव ?" मी तर म्हणतों, उलट जातीनं तिच्यावर जास्त दयाच केली पाहिजे. जातीचा खरोखरीच जर त्या पोरीवर राग असेल तर तिच्यासाठीं मी सर्व जमातीला जेवण घालतों, मग तर झाल ! " ही रायाची सूचना सर्वांना मान्य होऊन जमातीचा प्रश्न झटकन् सुटला. रायाने आपल्या खिशांतून कांहीं रुपये काढून मंडळीपुढें ठेविले. परतु म्हातारी पुढें होऊन तिनें ते पैसे घेण्याचें साफ नाकारलें. ती म्हणाली. "महाराज, तुमच्या कृपेन तर मला हजार रुपये मिळाले ! सात जन्मांत सुद्धा एवढे रुपये आमच्या दृष्टीस पडायचं नाहींत ! एवढे रुपये मला काय करायचे आहेत, चिगलीच्या लग्नाला शभर रुपये खर्च होतील. दोनशे तिच्या नवऱ्याला देईन. पान-पंचवीस जमातींत खर्च करीन, तरी केवढी थोरली रक्कम राहील ! "

रायानें तो प्रश्न सोडविला, तसाच चिगलीच्या लग्नाचाहि त्यानें प्रश्न सोडविला. म्हातारी दोनशें रुपये देण्यास तयार आहे, असें पाहतांच जमातीला ती गोष्ट मानविली. लगेच आपणांतील एक तरुण त्या मंडळींनी पुढें केला. चिगलीला नवरा साजण्यासारखाच तो तरुण आहे, असें पाहून रायालाहि आनंद झाला. त्यानें लगेच आपली ट्रंक उघडून तींतून एक पुडा काढला. संध्याकाळीं नदीवर जाताना त्याने ती मिठाई घेतली होती. गडावर गेल्यानतर उपयोग करावा, म्हणून त्यानें तो पुडा तसाच ट्रंकमध्ये ठेविला होता. त्याचा आतां योग्य उपयोग झाला. त्यानें पुडा सोडताना त्या तरुणाला नाव विचारलें. तेव्हां त्याचे नांव ' भोळया ' असें मंडळींनीं सांगताच राया म्हणाला, " आम्हीं आमच्या जातींत मुलामुलीचं लग्न जुळवितो, त्यावेळीं जे प्रकार करतों, त्यापैकींच एक प्रकार मी आतां करतो, ह्या प्रकाराला ' वाङ्‌निश्चय ' असं म्हणतात.— ये, चिगले इकडे ये.-लाजू नको. भोळया तूंहि ये. हं-बस खालीं.—भोळ्या, हा घे मिठाईचा तुकडा !—अरे, तो तुला खाण्याकरतां नाहीं दिला. तो तू आपल्या हातानं चिगलीला दे. आणि चिगले, तूं हा तुकडा भोळयाला दे.— खा आतां ! गजाभाऊ, वाट ही मिठाई सगळ्यांना आणि सगळ्याचं तोंड गोड कर ! "

सर्व मंडळींना मोठा आनंद झाला. म्हाताऱ्या मरीला तर आनंदानें वेडच

लागण्याची पाळी आली! शेत मिळालें, पैसे मिळाले आणि मुलीचें पुढें कसें होईल ही एक तिला काळजी होती, तीहि आतां दूर होऊन मनासारखा जांवई मिळाला! मग तिला आनंद कां होऊं नये! हा इतका प्रकार झाल्यावर राया म्हणाला, "आतां आम्ही जातों. आम्ही आतां रायगडावर जायला निघालों आहोंत."

"अशा रात्रीं!" आश्चर्यानें तिघानीं एकदम विचारलें.

"होय! अशा रात्रीं—पायीं चालत—हा सगळा बोजा डोक्यावर घेऊन दहाबारा हजार रुपयाची माया जवळ बाळगून!" राया जोरातच म्हणाला, "तुम्हाला आश्चर्य का वाटलं? आम्हाला वाटेंत कोणी लुटील म्हणून काय?"

"महाराज, तुम्हाला कोण लुटणार आहे! ह्या पठारात तुमच्या केसाला धक्का लावण्याची कोणाची छाती आहे?"

"कोणाची छाती नाहीं कशी? आलों तेव्हा तुम्हींच शस्त्रास्त्र घेऊन अंगावर धावला होतात!"

"पण आम्हीं तुम्हाला ओळखलं नाहीं!"

"आणि ओळखलं नसतं तर तुम्हीं खात्रीनं आमच्यावर शस्त्र चालविलं असतं, खर ना?–अरेरे! ही तुमची दरोडेखोरी नाहीं का! खून–रक्तपात करून मिळविलेला पैसा तुम्हाला कधीं तरी लाभणार आहे काय? उलट मी सांगतों, अशा अडीअडचणींत सापडलेले वाटसरू लुटण्यापेक्षा त्याना जर तुम्हीं धीर देऊन सुरक्षित ह्या जंगल–पठारातून पार पडण्यास मदत केलीत, तर ते स्वसंतोषानं तुम्हांला तुमची मेहनत देतील. लुटून शंभर रुपये मिळण्या ऐवजीं अशा सचोटीच्या मार्गानं पुण्याची कमाई तुम्हांला एक रुपया मिळाला तर त्याची किंमत जास्त आहे. ही पापान केलेली कमाई आहे. ही कमाई सुख देत नाहीं!" पाप–पुण्याची व्याख्या करून रायानें त्या कातकऱ्यांना दोनच हितोपदेशाच्या गोष्टी सांगितल्या. त्याचा फार उत्तम तऱ्हेनें त्यांच्या मनावर परिणाम झाला. रायाला खरोखर इतक्या रात्रीं गडावर जावयाचें नव्हतें. परंतु त्या मंडळींची मनें वळवावयाचीं होतीं म्हणून तो 'गडावर जावयाचें आहे,' असें म्हणाला होता. 'दुसऱ्या दिवशीं सकाळीं न्याहारी करून आपण गडावर जाऊं' असें त्यांनीं शेवटीं ठरविलें.

आमच्या मंडळीजवळ त्यांची सर्व व्यवस्था होती. दोन भांडीं होतीं, मिठमिरची होती, धान्य होते आणि सर्वांत मोठी व्यवस्था म्हणजे विपुल द्रव्य होतें. सकाळीं उठतांच बापूनें चहा केला. मरीनें त्याना उत्तमपैकीं दूध आणून दिलें. चिगलीनें तीन धोंडे मांडून लाकडे गोळा करून आणिली. साखर आणि चहा त्याच्या संग्रहीं होतीच. चहा होईपर्यंत झोपडीजवळ पाच पंचवीस कातकरी जमा झाले. ती सर्व मडळी रायाबरोबर गडावर जाण्याकरिता गोळा झाली होती. त्यानीं बरोबर चार डोल्या आणल्या होत्या. ही इतकी मंडळी केवळ प्रेमामुळें आपणाबरोबर येत आहेत, तेव्हा त्यांना न दुखविता रायानें त्या सर्वांना ' चला ' म्हणून सांगितलें. चिगली आणि मरीसुद्धा येण्यास तयार झाल्या. तेव्हां रायानें तत्काळ आपला बेत बदलला. तो आपल्या मित्रांना म्हणाला, " राजा, ही इतकी मंडळी आपणाबरोबर खऱ्या प्रेमभावान येत आहेत. तर त्याचा हिरमोड न करतां ह्या मडळीबरोबरच आपण ही रायगड ट्रिप करूं! पूर्वजाच्या गोष्टी आपण ऐकतों पण त्या गोष्टी आपणास अनुभविता येत नाहींत. आज सुदैवानं योग आला आहे. छत्रपति महाराजाना ह्याच कातकरी भिल्ल लोकात राहून काय सुख मिळाल, त्याचा आपणहि आज अनुभव घेऊ ! "

" पण इतक्यात मडळींची तिथं खाण्यापिण्याची काय सोय ? " बापूनें विचारलें. " आपणाजवळ जें आहे, ते आपणास चौघाना- काटकसरीने दोन वेळा पुरेल ! "

" मग आतां अस करूं ! " विचार करीत राया म्हणाला, " त्याच्यापैकीं दोघाना गावात पाठवून तादुळ, डाळ, तेल, मिरची वगैरे साहित्य आणि पांच रुपयांची मिठाई आणवू. आपण गडावर जाऊन पोहोंचेपर्यंत ती मडळी येतीलहि ! "

" आमची चालत जाण्याची इच्छा आहे ! हळुहळू आजूबाजूची वनश्री पाहात आपण पायींच गडावर जाऊं ! असें मडळीनीं पुष्कळ प्रकारे त्याना समजाविलें. परंतु कोणीहि त्याचें ऐकेना. शेवटीं नाइलाजास्तव त्या चौघां मित्रांना त्यानीं आणलेल्या डोल्यात बसावें लागलें. गाधारी नदीवर विसावा घेण्याकरिता जेव्हा डोल्या थांबल्या, त्यावेळीं बापूनें बरोबर आलेली सर्व मंडळी मोजली. एकंदर चाळीस संख्या झाली. आठ दहा दिवसापूर्वी तेथें जोराचा पाऊस पडून गेल्यामुळे नदीला पाणी जोराचें होतें. सर्व पठार आणि

जगल हिरवेंगार दिसत होतें. आजुबाजूची माहिती विचारीत मंडळी पुनः मार्गाला लागली. अकरा वाजण्याच्या सुमारास सर्व मडळी रायगडाच्या पायथ्याशीं पोंचली. तेथे आमच्या मडळींना त्या कातकऱ्यांनीं ' मासाहेबांचा महाल ' दाखविला. छत्रपति शिवाजी महाराजांच्या मातुश्री जिजाबाई याना रहण्याकरितां महाराजांनीं तो महाल मुद्दाम बाधला होता. परतु आता तेथें काय होते ! फक्त नांव मात्र राहिलें होते. नाहीं म्हणायला घराचें जोतें काहीं ठिकाणीं जीव धरून होते, तेवढें दिसत होतें. रायगडच्या रस्त्याला लागल्यापासून आमच्या मंडळींना ' आज आपण नवीन सृष्टींत जात आहोंत ' असा क्षणोक्षणीं भास होत होता आणि निरनिराळीं स्थळें पाहून पूर्वीचा काळ त्यांच्या दृष्टीसमोर येऊन उभा रहात होता. मासाहेबाच्या महालात येताच म्हणण्यापेक्षा त्या पाचाड गावीं येताच आमच्या मडळींच्या मनात प्रथम विचार आले, ते जिजाबाईविषयीं होते.

" राया, खरोखर हा महाल म्हणजे एक फार थोर ऐतिहासिक स्थलच नव्हे काय ! राजा म्हणाला. " शिवाजी महाराजाच्या हातून जीं अद्वितीय कृत्यं घडलीं, त्या सर्वांच्या मुळाशीं जिजाबाईच नव्हे काय ? "

" तसंहि म्हटलं तरी चालेल ! कारण तसं म्हटलं तरीही शिवाजी महाराजांना कमीपणा येत नाहीं ! " रायानें उत्तर दिलें, " ती बाई मानी, करारी, हिम्मतबहाद्दर आणि मुत्सद्दी होती यात शंकाच नाहीं. स्वतःला विपन्नावस्था प्राप्त झाली असता त्या बाईनं आपल्या अंगीं असलेल्या गुणाचा योग्य उपयोग केला असंच म्हटलं पाहिजे."

" तूं म्हणतोस तसंच परवा मी एक शिवाजी महाराजाचं चरित्र वाचलं, त्यात तो ग्रंथकार म्हणतो."

" काय म्हणतो ? "

" त्यानें जिजाबाईच्या शिक्षणाची तर थोरवी मानिलीच आहे. इतकच नव्हे तर तो असंहि लिहितो, ' जे पुरुष नावलौकिकास चढतात, ते मातृदेवतेचे निःस्सीम भक्त असून, त्यांच्या हातून महत्कृत्यं घडण्यास आईचेंच प्रोत्साहन कारण असतं. नंतर त्यानं बाबर, अकबर, नेपोलियन, अलेक्झांडर इत्यादि पुरुषांचे दाखले घेऊन शिवाजीवरील आपत्तींची तुलना केली आहे. आईनें जितकीं संकटें जास्त पाहिलीं असतील, तितकें तिनें दिलेलं प्रोत्साहन जास्त किमतीचं असतं, असं सिद्ध करून तो ग्रंथकार म्हणतो, ' पृथ्वीच्या पाठीवर

जीं अनेक नामांकित नररत्नें निपजलीं, त्याचा लहानपणाचा इतिहास बहुधा असाच आहे. बाबर आणि अकबर बादशहांचीं उदाहरणें शिवाजीला तंतोतंत लागू आहेत. संकटात पडल्यानें मनुष्यास जगाचा अनुभव चांगला व लवकर येतो, म्हणून शिवाजी व त्यांची आई यांस त्यांच्या पूर्व विपत्तीचें कितीहि दुःख झालें असलें, तरी त्यांच्या हातून पुढें मोठमोठीं कृत्यें घडण्यास तीच विपन्नावस्था कारण झाली. आणि स्वराज्यस्थापनेचें काम त्यांच्या हातून सिद्धीस गेलें."

तीं स्थलें पहात आणि त्यावर ऐतिहासिक चर्चा करीत मंडळी रायगडावर आली. तेथील प्रत्येक बुरुज त्यांच्याशीं खरोखरीच बोलूं लागला. कित्येकदा त्यांना अत्यंत दुःखाचे हुंदके आले, कित्येकदा पूर्वीच्या शौर्याच्या गोष्टी आठवून त्याना आवेश आला, तर कित्येकदां आनंदानें त्यांची अंतःकरणें उचंबळूनहि आलीं. शेवटीं समाधी पाहतांच मात्र त्यांचा दुःखावेग अनावर होऊन त्या सर्वांनीं मनसोक्त अश्रूंहि गाळले. यालाच म्हणतात स्थळ—महात्म्य ! असो.

एका कुंडावर स्नानें करून पटांगणांत बसून त्यानीं जेवण केलें. सध्याकाळ-पर्यंतचा त्यांचा काळ सुखात गेला. राया आदिकरून त्या चौघांनीं जेवण उरकल्यावर सर्व कातकारी पटांगणात एकत्र जेवावयास बसले ते पाहून राजा म्हणाला, " ही कातकऱ्यांची गरीब जात किती आज्ञाधारक आहे पहा. आपण थोडेसे उपकार करताच आपणाकरिता जीव तोडूं लागली !"

" महाराजानीं हाच त्याचा एक अलौकिक गुण पाहून त्याना हाताशीं धरलं आणि त्याच्याच हिमतीवर स्वराज्याची स्थापना केली ! " राया म्हणाला, " पहा—फार बारकाईन अवलोकन कर म्हणजे सर्व काहीं तुझ्या लक्षात येईल ! त्यांची जूट कशी आहे ती आपण पाहिलीच. त्यांच्या गरजा काय आहेत, त्या रात्रीं आपणास मरीच्या झोपडींत दिसल्याच ! अशा ह्या असंख्य विश्वासू, कष्टाळु आणि अल्पसंतुष्ट पण हिम्मतबहाद्दर कातकरी, हेटकरी आणि मावळे यांचा शिवाजीनें यत्न केला तेव्हाच स्वराज्य स्थापन झालं !

संध्याकाळ झाली असें पाहून मंडळी परत निघाली. पाचाडगावीं येतांच कातकऱ्यांनीं एक बैल गाडी तयार ठेविली होती. त्या गाडीनें आमच्या मंडळीचा घाटातून प्रवास व्हावयाचा होता. सर्वांचा निरोप घेतल्यावर गाडी चालूं लागली. गाडीबरोबर गाडीवानाशिवाय चार कातकरी म्हणून सोबत

होतेच. त्यांच्याजवळ काठ्या आणि कोयते होते. पूर्वी ह्याच मावळे वीरांच्या हातांत तेजदार हत्यारें होतीं. पण आता काळ बदलतांच हत्यारांतहि असा बदल झाला. रात्रभर गाडी चालल्यावर दुसऱ्या दिवशीं पहाटेला मंडळी घाटावर आली. तेथें एका झाडाखालीं सर्वांनीं मिळून स्वयंपाक केला. अशा रीतीनें विश्रांति घेत मंडळी संध्याकाळीं शेलारवाडीला आली. गाडीवानासुद्धा त्या सर्व कातकऱ्यांना रायानें दहा रुपये दिले. तेथून ती मंडळी परत फिरली आणि आमचे चौघे मित्र रेल्वेच्या मार्गानें पुण्यास आले. तेथें एक दिवस विश्रांति घेतल्यावर आपल्या मुख्य ठाण्यावर गजाभाऊला ठेऊन राया, राजा, आणि बापू आपल्या गांवीं निघून गेले.

त्या नंतर विशेष म्हणण्यासारखें घडलें नाहीं. ज्या कांहीं किरकोळ गोष्टी घडल्या, त्या सर्व गोष्टींचा तपशील मंडळी पुनः एकत्र जमल्यावर लागणारच असल्यामुळें आता त्यांचा उल्लेख करीत नाहीं. गजाभाऊ पधरा दिवस पुण्यात राहिल्यावर चिंतामण ऊर्फ चाच्या आला. त्याच्यानंतर अण्णा त्याच्या मागून बळवंत ऊर्फ बाप्या अशी मंडळी आपल्या ठरलेल्या दिवशीं पुण्यात येऊन दाखल होत आणि आपल्या 'हेड ऑफिसा' चा चार्ज घेऊन पूर्वीच्या मित्राला मोकळे करीत. असें होता होता विजयादशमीला दोन दिवस राहिले असता सर्व मंडळी पुनः एकत्र झाली.

विजयादशमीच्या सुमुहूर्तावर स्थापन झालेल्या 'रायक्लब' ला ह्या विजयादशमीला चार वर्षे संपूर्ण झालीं. आता पाचव्या वर्षात घडलेल्या ठळक ठळक गोष्टी आहेत, त्या वाचकांना सांगण्याचा आमचा विचार आहे. रात्रीं जेवल्यानंतर ती सर्व मंडळी एकत्र बसल्यावर रायानें महाडास घडलेला सर्व वृत्तांत मंडळींना सविस्तर सांगितला. वाचकांना तो साद्यन्त माहीत आहेच. नंतर राया म्हणाला, "आता तुम्हाला मी माझी स्वतःची हकीकत प्रथम सांगतो. म्हणजे तुम्हाला आपापल्या गोष्टी सांगायला संकोच वाटणार नाहीं. माझी पहिली गोष्ट म्हणजे मी स्वतः माझ्या वधूची परीक्षा केली!"

"काय म्हणतोस?—आणि तुझ्या परीक्षेला उतरली नी?" राजानें विचारलें.

"होय."

"मग 'थ्रि चिअर्स फॉर' वहिनी!" असें म्हणून राजानें हिप् हिप हुर्रे!' अशी आरोळी मारली! त्याबरोबर बाकीच्या सर्वांनीं त्याचें अनुकरण केलें. रायानें वधुपरीक्षा केली, ती हकीकत त्याच्या क्लबच्या रहस्यमय

व्यवहाराप्रमाणें रहस्यमय आहे, म्हणून येथें सविस्तर सागण्याचा आमचा विचार आहे. करिता आपण रायालाच ती सागण्यास विनंति करूं.

" महाडाहून आल्यावर मी कोल्हापुरास घरीं जाण्याकरितां निघालों—" राया सागूं लागला, " महाडला किती दिवस मोडणार हें नक्की नसल्यामुळें 'मी आठ दिवसात येतो,' असें मोघम पत्र घरीं लिहिलं होतं. मी मातान्याला जाऊन पोहोचेपर्यंत वाटेंत म्हणण्यासारख्या कांहीं गोष्टी घडून आल्या नाहींत. तरी देखील वाटेंत एक ट्रंक सांपडलीच ! तिचा प्रकार पहिल्यानं थोडक्यांत सांगतों. मी बसलों होतो त्या डब्यांत बाकाखालीं कांहीं नव्हतं. एक दोन स्टेशनं गेल्यावर एक गृहस्थ माझ्या डब्यात चढला. त्याच्याजवळ एक लहान ट्रंक होती. ती त्यानं माझ्या बाकाखालीं घातली. डबा रिकामा असल्यामुळें तो मांझ्या बाजूलाच रिकाम्या बाकावर झोंपला. बिचारा कोठून दमून भागून आला होता कोणास ठाऊक ! माझ्या समोर बाकावर पडताच त्याला झोंप लागली. आणखीं दोन स्टेशनें गेल्यावर दुसरा एक गृहस्थ आमच्या डब्यांत आला. त्याच्याहि जवळ एक ट्रंक होती. ती ट्रंक त्यानं माझ्याच बाकाखालीं ठेवली. आणि तो गृहस्थ माझ्या समोरच्या बाकेवर झोंपला. पुढल्या स्टेशनावर माझ्या बाजूला झोंपलेला पहिला गृहस्थ धडपडून जागा झाला आणि घाईघाईनें बाकाखालची ट्रंक काढून तो खाली उतरला. त्याच्या ट्रंकेची अदलाबदल झाली, हें त्यावेळीं माझ्या लक्षांतहि आलं नाहीं. पुढल्या स्टेशनावर माझ्या समोर झोंपलेल्या गृहस्थाला उतरायचं होतं म्हणून तो उठून बसला आणि डोक्याचा फेटा बांधूं लागला. त्यावेळीं त्याची दृष्टि ट्रंककडे गेली. तो खाली वाकून पाहूं लागला, तेव्हा आपली ट्रंक गेली असें चटकन् त्याच्या लक्षात आलं आणि तो गृहस्थ आश्चर्यानं म्हणाला, " अरे माझी ट्रंक काय झाली ? ही ट्रंक कांहीं माझी नाहीं ! " ह्या त्याच्या उद्गारांबरोबर ट्रंकाची काय भानगड झाली हें माझ्या चटकन लक्षांत आलं. तो गृहस्थ मला विचारूं लागला, तेव्हां मी बाकेखालीं असलेली 'ट्रंक माझी' आहे असें त्याला ठांसून सांगितलें, त्यावर तो गृहस्थ म्हणाला, 'त्या चोरानं माझी ट्रंक नेली,' पण त्यांत त्याला कांहीं सुद्धां मिळणार नाहीं. एक पंचा, एक जुनी घोंगडी, भुईमुगांचे नमुने आणि कांहीं सटर फटर त्यांत आहे. बरं झालं नेली तें ! माझं दारिद्र्य गेलं असं मी समजतों ! असें म्हणून तोहि गृहस्थ पुढल्या स्टेशनवर उतरून निघून गेला, आतां माझ्या डब्यांत मी

एकटाच राहिलों. गाडी चालू झाल्यावर मी ती ट्रंक उचलून बाकावर ठेवली आणि त्याचें टाळें उघडलें. उघडून पहातों तों आत दोन लुगडीं, खण नुकताच विकत घेतलेला एक चंद्रहार—किमत सरासरी दीडशे एक असेल चार बागड्या किमत रुपये दोनशे. एक कुंकवाकरता लहानशी रुप्याची नक्षीची डबी आणि इतर किरकोळ वस्तु इतका माल त्याच्यात होता. मी ती ट्रंक तशीच बंद करून बाकेखालीं ठेविली. पुढें साताऱ्याच्या स्टेशनवर माझ्या डब्यात आणखी काहीं उतारू आले. एक साधारण वयवत मनुष्य, एक मध्यम वयाची विधवा, आणि पंधरा सोळा वर्षांची एक तरुणी. माझा डबा रिकामाच पाहून ती मंडळी आंत आली. मुलगी स्वरूपानं रेखलेली, बांध्यानें चांगली आणि सुदृढ अशी होती. आल्याबरोबरच तिनं मला विचारलं, ‘ काहो, तुम्हाला कुठं जायचं आहे ? ’ हा तिन मला प्रश्न केलेला पाहातांच ती बाई दबकूं लागली. तेव्हा ती मुलगी म्हणाली, ‘ विचारलं म्हणून काय झालं ! त्याची सोबत आपणास कितपत आहे, हे कळलं तर त्यांत काय वाईट झालं ? त्यानाहि जर कोल्हापुरापर्यंत जायचं असेल तर अनायासं आपल्याला त्यांची संगत होईल. प्रवासांत एकाला दोन असलेलं बर ! ’ तेव्हां ती वृद्ध बाई म्हणाली, बिंदू, किती बोलशील ? भाटासारखी तू बोलत असतेस तुला म्हणाव तरी काय ? आता तुला तिकडं कोल्हापुरात पाहुला न्यायचं आहे. तिकडे अशीच का तूं वागणार ? काय बाई तुझ्या नशिबात आहे देव जाणे ! ’ त्यावर ती बिंदू म्हणाली, ‘ मला पाहणाऱ्या मंडळींना काय वाटेल, त्याची मला मुळींच पर्वा नाहीं समजलीस मावशी ? पण विधिलेखनानं ज्यांच्याबरोबर मला आयुष्य घालवायचं त्यांना काय वाटेल याची मी काळजी वाहिली म्हणजे पुष्कळ आहे ! ’ हें तिनं सडेतोड पण शुद्ध मनानें दिलेलं उत्तर ऐकून मला खरोखरीच आनंद झाला. मी तिला उत्तर दिलें, मलाहि कोल्हापूरास जावयाचें आहे. तेव्हां ती आनंदानें म्हणाली, ‘ बरं झालं बाई ! तुमची कोल्हापूरापर्यंत आम्हाला सोबत आहे म्हणायची ! ’ हें तिचं उत्तर ऐकून मी म्हणालों, ‘ मग तुम्हाला प्रवासाची भीति वाटते कीं काय ? ’ त्यावर तिनें उत्तर दिलं ‘ मला स्वतःला मुळींच भीति वाटत नाहीं. पण माझ्याबरोबर हीं जुनी माणसं आहेत ना ! आमच्यासारख्या मुलीना त्यांनीं जपायच्या ऐवजीं आम्हालाच त्याना जपावं लागतं. ह्या जुन्या मंडळींना ‘ अजागळ ’ म्हणणं म्हणजे पाप आहे.

पण काय करूं, तसं म्हटल्याशिवाय माझा उद्देश तुमच्या लक्षांत यायचा नाहीं !' ती मुलगी माझ्याशीं अशा तऱ्हेनें बोलूं लागली हें त्या वृद्ध मनुष्याला सहन झालं नाहीं. तो दरडावून म्हणाला, 'बिंदू, इकडे ये आणि बैस मुकाट्यानं ! किती वटवट करशील ?' तेव्हां ती मुलगी मुकाट्यानं उठून बाजूला सरली. बराच वेळ ती कांहीं एक बोलली नाहीं. मुकाट्यानं खिडकींत बसून बाहेरची वनश्री अवलोकन करीत असतांना तो संध्याकाळचा निसर्गाचा रम्य देखावा पाहून तिला राहवेना. ती उल्हसित अंतःकरणानं म्हणाली. 'अहाहा—! काय नयनमनोहर देखावा दिसतो आहे. खरंच एखादा कवि किंवा एखादा लेखक जर इथं असता तर त्यानं ह्या प्रसंगाचं किती बहारीनं वर्णन केलं असतं बरं ! काय हो, हा देखावा पाहून तुम्हाला काय वाटत ?' असा तिनं बोलतां बोलता मला प्रश्न करतांच मी म्हणालों, 'काय वाटतं तें तुम्हाला काय सांगू ? ह्या सन्ध्यासमयीं निसर्गानं हा जो हृदयकंपित करून सोडणारा वेष धारण केला आहे, त्याचं यथातथ्य वर्णन करावयास कवीची प्रासादिक वाणीच पाहिजे !' माझं उत्तर ऐकताच ती आनदातिशयानं म्हणाली, 'आहे—तुमचंहि हृदय कवीचं आहे ?' नतर त्या निसर्गरचनेवर माझं आणि तिचं बराच वेळ भाषण झाल्यावर मी विचारलं, 'तुम्ही आता कोल्हापूरास जाणार आहात तें कशाकरता ? तुम्हाला दाखविण्याकरता का मावशी नेत आहे ?' ह्या माझ्या प्रश्नावर ती म्हणाली— 'होय, मला दाखविण्याकरता माझे मामा आणि मावशी मला कोल्हापूरास घेऊन जात आहेत' हें तिचं उत्तर ऐकून खरोखरीच मला अत्यंत वाईट वाटलं. आणि मी म्हटलं, 'तुम्हाला दाखविण्याकरता नेणार यावरून जुन्या अजागळ रुढीनुसार ही मडळी तुमचं लग्न करणार असं दिसतं !' माझं उत्तर ऐकताच ती चटकन् म्हणाली, 'ही पाहण्याची चाल जुनी असली, तरी त्यांत अजागळपणा आहे, असं म्हणणार नाहीं. खरोखरीच ही चाल फार चांगली आहे. परंतु पूर्वजानीं अत्यत दूरदृष्टीनं केलेल्या ह्या चालीचा अलीकडल्या मुलींना मुळींच अर्थ कळत नाहीं, असंच मी म्हणतें. मंडळी पाह्याला आली म्हणजे गुडघ्यांत मान घालून मुली बसतात आणि आपलं जन्माचं मातेरं करून घेतात. वास्तविक नवरा जसा तिला पहाणार तसं तिनंहि नवऱ्याला पाहून आपली पसंती किंवा नापसंति दर्शवली पाहिजे. वडील माणसं सर्व कांहीं जुळवतात, परतु जन्माची गांठ बसायची असते नवरा बायकोची !'—

पुनः तिला तिच्या मानानं दाबलं आणि आपल्याजवळ येऊन बसावयास सांगितलं. तेव्हां निरुपायास्तव ती मुलगी उठून आपल्या मामाजवळ जाऊन बसली. मी एकटाच विचार करीत बसलों. आमच्या झालेल्या संवादावरून त्या मुलीविषयीं माझ्या मनांत अत्यंत आदर उत्पन्न झाला, इतकेच नव्हे तर मला तिच्याविषयीं हळहळहि वाटू लागली. तिनं आपला पति कसा असावा, पतीची निवड कशी करावी, कुमारीकांचीं कर्तव्यं काय आहेत, याविषयीं थोडक्यात आपलं मत प्रकट करतांना जुन्या चालीरीतीविषयीं तिच्या मनांत असलेला आदर मला स्पष्ट दिसून आला. ती अत्यत सरळ आणि उघड्या मनाची होती. मामा किंवा मावशी यांना ती जुनी खोडं म्हणून सम्बोधित होती; तरी ते वडील आहेत, ही भावना तिच्या मनांत जागृत होती, हेंही माझ्या लक्षात आलं, कारण त्यानीं दरडावून बोलताच ती मुकाट्यानं निमून गेली. असे अनेक गुण त्या थोड्याच वेळात माझ्या दृष्टोत्पत्तीस आले. बराच वेळ गेल्यानंतर पुनः तिच्याशीं बोलण्याचा मला योग आला. तेव्हा तिनं दिलेल्या उत्तरावरून खरोखरीच सागावयाच म्हणजे मला ती आपली स्वतःची बायको व्हावी, अशी इच्छा उत्पन्न झाली. क्षणभर माझ मन अस्वस्थ झालं, अशा मुलीला तिचे मामा कोणाला दाखवायला नेणार हे मला माहीत नसल्यामुळें मी मनांत म्हणालो, 'ज्याला अस स्त्रीरत्न लाभेल तो खरोखरीच भाग्यवंत होय!' नंतर रात्र झाली, अस पाहून ती तीन मंडळी पलिकडल्या बाजूला बाकावर झोंपलीं. मी खिडकीवर डोके टेकून विचार करीत होतों. रात्रींतून ती दोनचारदा उठून आजूबाजूला पाहात मी जागा आहें, अस पाहून म्हणाली, 'तुम्ही अद्यापि जागताच का? बाकी प्रवासांत झोपणं काहीं चांगलं नाहीं. केव्हा कोण खिडकीतून हात घालील, तें कळायच देखील नाहीं. एखाद्या स्टेशनावर सभ्यपणानं डब्यात येऊन डब्यातील मंडळी निजलेली आहेत, अस पाहून त्यांचीं बोचकीं लांबविणारे चोर कांहीं थोडे थोडके नसतात!' तिचं एकएक वाक्य ऐकून मी तर निरुत्तरच होऊन गेलों!"

"खरच निरुत्तर करण्यासारखीच ती मुलगी होती यांत शकाच नाहीं!" राजा म्हणाला.

"आम्हाला अशींच चाणाक्ष वहिनी मिळाली पाहिजे!" मध्येंच गोप्या म्हणाला.

नंतर राया पुढें सागू लागला. तो म्हणाला, "सकाळीं आमची गाडी

मिरज स्टेशनवर आली. आमची गाडी ' डायरेक्ट कोल्हापूरास जाणारी असल्यामुळ स्टेशन सोडून पुढल्या प्लॅटफार्मवर ती उभी राहिली तोंड वगैरे धुवून चहा घ्यावा ह्या उद्देशान मी उठलो. तेव्हा ती म्हणाली, ' ह्या स्टेशनवर नळ नसायचाच !—' असा तिनं उलट प्रश्न केलेला पाहून मी तिच्या तोंडाकडेच पहात राहिलों. नंतर क्षणभरान मी म्हणालों, ' इथं नळ आहे किंवा नाही, हें माझ्या लक्षात नाहीं. पण पाहून येतो. ' तेव्हां तिनं आपला तांब्या पुढं करून ' असल्यास कृपा करून एवढा भरून आणा ! ' अशी मला विनंति केली. मी तांब्या घेऊन खालीं उतरलों, इतक्यांत दादासाहेब घाई घाईनं येत असताना मला दिसले. "

" हे दादासाहेब कोण ? " मध्येच अण्णानें विचारले.

" तुला नाहीं का माहिती ? " राजा म्हणाला, " हे दादासाहेब रायाचे सर्वांत वडील बंधू ! हे मिरज सागली वगैरे संस्थानातून अडतीचा धंदा करतात. मधले भाऊ आहेत, त्याचं नांव भाऊसाहेब. हल्लीं कोल्हापूरास आपल्या घरीं असतात. आणि आपल्या रायाच घरच नाव बाळासाहेब असं आहे ! "

" आतां आल लक्षात ! बरं बाळासाहेब, आता तुमची हकीकत सागा ! "

" दादासाहेबानीं मला पाहतांच ते मोठ्या आनदानें म्हणाले—" राया आपली हकीकत पुढें सागू लागला, " बाळा तू याच गाडीला आलास हें अति उत्तम झालं ! कारण तुझ्याकरितां आईनं पसत करून ठेवलेली वधू ह्याच गाडीनें कोल्हापूरास जाण्याकरितां येणार आहे. मी त्याच मंडळीच्या बरोबर जाण्याकरितां हा आलों आहे. मी गाडींत त्याचा शोध करतों, तोंपर्यंत ती माझी ब्यॉग आणि बेडींग तूं घेऊन ये. अस म्हणून दादासाहेब घाईघाईन जाऊ लागले, तेव्हां मी त्यांना अडवून म्हणालों, ' दादासाहेब ' जरा थांबा ही काय भानगड आहे, ती मला प्रथम नीट कळू द्या -' तेव्हां ते उभे राहून म्हणाले, ' अरे वेड्या भानगड कसली ? आज दोन वर्षे झालीं, आईसाहेबानीं ही मुलगी तुझ्याकरिता पाहून ठेविली आहे. मी सातान्यास दोन वर्षांपूर्वी नवीनच अडतीचं दुकान घातलं, तेव्हां चार महिने आईसाहेब तिथं येऊन राहिल्या होत्या. आमच्या घराशेजारींच हे श्रीपतराव पुण्यास सहा वर्षे होते. तेथें मुलीचं शिक्षण चागलं झालें आहे. आईसाहेब तेथें मजकडे आल्या त्या श्रीपादरावाची ही मुलगी बिंदूहि—"

" बिंदू " हें नांव कानीं पडताच मी एकदम आश्चर्यानें विचारलें, " काय म्हटलंत दादासाहेब ? त्या मुलीचं नांव बिंदू ? "

" कां बर ? असा चमकलास कां ? " असा मला दादासाहेबानीं प्रश्न केला.

" मग ती, तिची मावशी आणि मामा असे त्रिवर्ग माझ्याच डब्यात बसलीं आहेत. तिच्याकरिता पाणी नेण्यासाठीं मी हा तांब्या घेतला आहे !

" भले बहाद्दर ! मग तुझी आणि तिची ओळखसुद्धा झाली म्हणायची ! " दादासाहेब आनदानें म्हणाले, " मग कसं काय ? आपल्या आईसाहेबानीं केलेली मुलीची निवड तुला पसत आहेना ? आईसाहेबाना तर ती मुलगी फार फार आवडली. अति बोलकी, तरतरीत, शहाणी आणि धीट मुलगी आहे. स्वरूपानं तर विचारायलाच नको. अरे हो, तू तर पाहिलीसच आहेस ! आमच्या भाऊसाहेबाच्या कुटुंबाला ह्या धाकट्या जाऊबाई अगदीं पसंतच आहेत. धाकट्या भावोजींना अशीच बायको पाहिजे. जोडा अगदीं नामी शोभेल ! ' असें तुझ्या दोन्हीं वहिनींचं खास मत आहे. तूं मागच्या खेपेस आला होतास, त्याच वेळीं तिला पाहण्याकरिता बोलवायच ठरलं होत. पण तू तर लग्नच करायच नाहीं, अस आईसाहेबाना म्हणालास आणि तसाच दिवाळीचा सणहि न करता निघून गेलास. पण आता तुझ पत्र आलं, तेव्हा मी विचार केला कीं, मुलीला अगोदरच आपल्या घरीं आणून ठेवावं, तूं घरीं आल्यावर ती कोण आहे, हे प्रथम तुला कळूंच द्यायचं नाहीं. अर्थात तू तिच्याशीं मोकळया मनानं बोलशीलच. कारण तुझा मोकळा स्वभाव आम्हाला माहितच आहे आणि बिंदूचाहि स्वभाव मोकळाच आहे. तेव्हा ' समानशीले व्यसनेषु सख्यम् ' तुला ती पसत पडणार अशी आमची सर्वांची खात्री होती ! " असें म्हणून दादासाहेब वळून म्हणाले, " अरे, पण मी तुझ्याशींच काय बोलत उभा राहिलों, ती मंडळी—"

' मी पुन्हा दादासाहेबाना अडविलें आणि म्हटलें, दादासाहेब, मी तिला पाहिली—"

" अरे, तिला म्हणजे कुणाला ? " दादासाहेबांनीं विचारलें.

" तिला—तिला तुमच्या बिंदूला—" खरोखरीच त्यावेळीं बिंदूचें नांव घेण्यास माझ्या मनाला थोडा संकोच वाटून मी चाचरत बोललों. तेव्हा दादासाहेब म्हणाले, " अरे वेड्या, ' तुमच्या बिंदूला ' काय म्हणतोस ? मी ' माझ्याच बिंदूला ' असं म्हण—"

रावाचें भाषण ऐकतांच सर्व मंडळी ' खो खो ' हंसूं लागली. तेव्हां त्याच्या बरोबर रावाहि पोट भरून हासला. नंतर तो पुढें म्हणाला," मी दादासाहेबाना म्हणालों,—' दादासाहेब ' बिंदू, तुम्हा सर्वांना पसंत आहे, हें खरं, आणि मी तिला पाहिलं आहे, तिच्याशीं बोलले आहे, हेंहि खर पण मला तिची चांगली ओळख झाल्याशिवाय—" '

' " अरे होईल आता चांगली ओळख ! तूं चल—" असें म्हणून दादासाहेब मला ओढू लागले. '

' " थाबा दादासाहेब, मी काय सांगतो तें ऐका. तुम्ही मंडळीना इथंच उतरण्यास सांगा. " मी म्हणालों. '

" तें का ! " दादासाहेबानीं आश्चर्यानें विचारलें, तेव्हां त्याची थोडक्यात समजूत करून मी मनांत कोणता बेत योजला होता, तो त्यांना सांगितला. माझा बेत पसत पडला, तेव्हां ते माझ्या म्हणण्यास कबूल झाले. मग आम्ही दोघेहि डब्याजवळ गेलों. दादासाहेबांना येताना पाहतांच खिडकींतून डोकावीत असलेली बिंदू झटकन् मागें झाली. आम्ही डब्याजवळ जाताना बिंदूचे मामा म्हणाले, " या दादासाहेब, इतका वेळ झाला तेव्हा मला वाटल कीं तुम्ही येत नाहीं. तुम्हाला वेळ झाला कीं आमची गाडी लवकर आली ! तेव्हां दादासाहेब म्हणाले, " गाडी वेळेवरच आली पण मी थोड्या भानगडींत गुंतलों होतों आपला कोल्हापूराला आमच्या घरीं जाण्याचा बेत रहित झाला हे मी सागण्याकरितां आलों. कारण बाळासाहेब कोल्हापूरास येत नाहींत. '— दादासाहेब बोलत असता मी बिंदूच्या मुखेदुकडे बारकाईनें पाहत होतो. ' बाळासाहेब —म्हणजे —मी कोल्हापूरास येत नाहीं, असं ऐकता तिची मुद्रा झटकन् पालटली. तिच्या चेहऱ्यावर निराशा स्पष्ट दिसूं लागली. दादासाहेब पुढे म्हणाले, ' मला आतां बाळासाहेबाची तार आली कीं, ' कांहीं अत्यंत जरूरीच्या कामामुळें मला कोल्हापूरास येता येणार नाही. पण एक दोन दिवसांनीं मी मिरजेला येऊन तुला भेटतों अशी त्याची तार आल्यामुळें मी विचार केला कीं, तुम्हाला आणि बिंदूला कोल्हापूरास न पाठविता इथंच उतरून घ्यावं. कारण बाळासाहेब इथंच येणार आहेत. मग कसं काय, मामासाहेब तुमची काय इच्छा आहे ! " '

" .आपण इथं उतरायला सांगत असाल, तरीही आमची तयारी आहे ! " असें म्हणून मामा उठले. तेव्हां दादासाहेब माझ्याकडे पाहून म्हणाले, " हे

माझे स्नेही यांचंहि नांव बाळासाहेब आहे. हे कोल्हापूरास आमच्या आई साहेबांना भेटण्याकरितां जात होते. यांचा आमचा फार घरोब्याचा परिचय आहे. बाळासाहेब, तुम्ही आतां उतरा आणि चला ह्या मंडळीबरोबर आमच्याच घरीं ? कसं काय बाळासाहेब, काय म्हणणं आहे तुझं ? येतोस ना आमच्या घरीं ? मी मानेनें ' हो ' म्हटलें. नंतर मी, माझे सामान आणि ती नवीन मालकीची झालेली ट्रंक खाली उतरवून त्या मंडळीचेंहि सामान खालीं काढलें. स्टेशनावरून एका हमालाला बोलावून आणल्यावर सर्व सामान त्याच्या स्वाधीन करून आम्ही निघालों. आमच्या दादासाहेबांच मिरजेंतहि एक अडतीचं दुकान आहे. ते आपल्या कुटुंबाला घेऊन आपल्या प्रत्येक अडतीच्या दुकानावर वर्षांतून दोन दोन चार चार महिने राहत असतात. त्याप्रमाणं सध्या ते आमच्या वहिनींची प्रकृति थोडी नादुरुस्त असल्यामुळं अलीकडे आठ दहा महिने मिरजेतच राहत आहेत. वाटेत मी बिंदूबरोबर मुळींच बोललों नाहीं. ती कोण आहे, हें कळताच ती ' आपली भावी वधू ' या दृष्टीनं आतां मी तिच्याकडे पाहूं लागलों. माझ्या या आकस्मित परिचयामुळं आमच्या घरच्या मंडळींनीं योजलेला सर्व बेत ढांसळून पडला ! "

" तो कसा राया ? " मध्येंच बापूनें विचारलें.

" का बरं ? ढासळून नाहीं का पडला ? " राया म्हणाला. बिंदूला घरीं बोलावून ती कोण आहे, हें मला कळूं न देता तिचा माझा परिचय करून द्यावा, अशी आमच्या मंडळींची इच्छा होती परंतु बिंदू कोण हें मला कळलं ! तिला मात्र मीं कोण हें कळलं नाहीं ! "

" अद्यापि कळलं नाहीं ? " राजानें विचारलें.

" त्यावेळीं कळलं नव्हतं पण मागून कळलं ! "

" तेव्हां तर मोठी मौज झाली असेल ! " गोप्या हंसत हंसत म्हणाला.

" मौज झाली किंवा नाहीं, हें मी काय सांगूं ! पण काय हकिकत घडली ती सांगतों. " असें म्हणून राया पुढें सांगू लागला. " आम्ही सर्वजण घरी आल्यावर वहिनीला मोठं आश्चर्य वाटलं. तिनं त्या मंडळीबरोबर मला पाहतांच आनंदानं ' अगबाई ! भावोजी पण आले ! ' असे उद्गार काढलेच ! त्याबरोबर बिंदू कावऱ्याबावऱ्या दृष्टीनं मजकडे पाहूं लागली. आपल्या बायकोच्या उद्गारामुळं सर्व गोंधळ उडणार आहे, असं पाहून दादासाहेब चटकन् पुढं होऊन

म्हणाले. ' हो ! बाळासाहेब कोल्हापूरास जात होते, पण मीच त्यांना उतरवून घेतलं ! पण इकडे ये ! तो भार्गवराम आला का ? ' असं बोलून त्यांनीं वहिनीला एका बाजूला नेलं, आणि हळूच तिला सांगितलं ' काय तूं हा गोंधळ केलास ? त्या मडळींना ' हेच ते बाळासाहेब ' असं अद्यापि मुळींच माहित नाहीं आणि बाळासाहेबाला ही मडळी कोण आहेत, हेंहि माहीत नाहीं. आणि तूं तर बाळासाहेबाला ' भावोजी म्हणून हांक मारलीस ! आपलं काय ठरल होतं, हें तू विसरलीस ? आतां कशी तरी संपादणी करून वेळ मारून ने म्हणजे झाल ! तेव्हां वहिनी म्हणाली, ' बाई बाई ! गोंधळच झाला म्हणायचा ! मला वाटलं तुम्ही सर्वजण सगतीनं आलात; तेव्हां—"

' तेव्हां आणि जेव्हां आता करीत बसू नको ' चुकीची दुरुस्ती कर आणि 'प्रथम मंडळीकरता चहा कर. " दादासाहेब म्हणाले.

आम्ही सर्वजण घरात गेलों. बिंदु थोडी चमकल्यासारखीच झाली होती. मीहि बिंदूबरोबर त्यावेळीं बोललों नाहीं. भावी वधू म्हणून तिच निरीक्षण करण्याचा विचार मी ठरविला. मी बाहेर बसलों असतांना माझे दोन्ही कान आत लागले होते. चहा तयार होताच वहिनी आतून म्हणाली ' भावोजी, चहा घ्यायला या ! ' तेव्हां मी बुचकळ्यात पडलों. माझं रहस्य फोडायच नाहीं, असं दादासाहेबांनीं तिला सांगितलं असूनहि, ती मला पुनः ' भावोजी ' म्हणून हाक मारीत आहे याचा अर्थ काय ? असा मी स्वतःशीं विचार करतों, तोंच आत चाललेला संवाद माझ्या कानीं आला.

" वहिनी हे कोण भावजी ? बिंदूनें विचारलें. "

" हे बाळासाहेब इकडे फार जुने स्नेही आहेत. अगदीं सख्या भावासारखं त्यांचं प्रेम आहे. नेहमीं त्यांच आमच्याकडे येणं जाण असतं. तिकडून त्यांना भावासारखं मानतात; म्हणून मी त्यांना ' भावोजी ' म्हणतें पण तुला काय शंका आली बिंदू ? -- ह्या वहिनीच्या प्रश्नाला बिंदूनं उत्तर दिलं नाहीं. माझंहि समाधान झालं ! मी चहा घेण्याकरतां उठून आंत गेलों. वहिनीजवळ बिंदू बसली होती. मला पहातांच ती उठूं लागली. तेव्हा मी म्हटलं, ' तुम्ही उठतां का ? बसा मी कांहीं कोणी परका नाहीं. तुमचा माझा परिचय झालाच आहे ! —तरी देखील बिंदूला बसण्याचा संकोच वाटूं लागला ! मी कोण, हें जरी तिला माहित नव्हतं, तरीहि आपल्या वडील जावेजवळ परक्या

मनुष्यासमक्ष बसणं, तिला गैर वाटल. आमची वहिनी मुळांत अतिशय थट्टेखोर असल्यामुळं मला चहा देत असतांना ती हंसत हंसत म्हणाली, ' भावोजी, केव्हां केव्हां नांवाच्या सादृश्यामुळं किती बर घोटाळा उडतो म्हणून सांगूं! तुमचं नाव बाळासाहेब, आणि माझ्या धाकट्या दीराचंहि नाव बाळासाहेब ! इकडचा परिचय म्हणून घरोब्यामुळं मी तुम्हाला ' भावोजी ' अशी हांक मारतें. त्यामुळं आमच्या ह्या बिंदूची प्रथम अगदीं तिरपीट उडाली !

" ' इश्श्य ! हें काय वहिनी ! ' बिंदू माझ्याकडे पहात कपाळाला किंचित् आठ्या घालून म्हणाली. ' नावासारखीं नांवं पुष्कळ असतात. हे मला माहित आहे. पण प्रथम तुम्ही ह्यांना ' भावोजी ' म्हणून हाक मारल्यावर—"

" तुम्ही गोंधळून गेलात काय ? " मी हंसत तिचं वाक्य पुरं केलं; आणि वहिनीला विचारलं, " पण कायहो वहिनी, तुमचे खरे भावोजी म्हणजे बाळासाहेब, दोन चार दिवसांत येणार आहेत, असं मघा दादासाहेब म्हणत होते, तें खर का !—मग मला वाटतं तो येण्यापूर्वीच मी इथून जावं हें चांगलं ! नाहींतर ह्या नावामुळं सगळाच गोंधळ उडायचा ! "

" हो असं तर खरंच ! " वहिनी हसत हंसत म्हणाली. " नाहींतर त्या जुळ्या भावाच्या बायकोसारखी आमच्या बिंदूची स्थिति व्हायची ! " अस म्हणून वहिनी मोठमोठ्यानं हंसूं लागली. तेव्हां किंचित् ओशाळलेली बिंदू म्हणाली, " तर तर ! आपल्या माणसाची अशी ओळख विसरण्याइतकी आणि परक्याला आपला म्हणण्याइतकी काहीं मी खुळी नाहीं ! "

" अस्सं ? " असं बिंदूला हास्यमुद्रेनं हिणवित वहिनी मला म्हणाली, " मग भावोजी, तुम्ही किनई आमचे ' भावोजी ' येईपर्यंत रहाच इकडे ! "

" नको बुआ ! " मी उत्तर दिले. माझ्या राहण्यामुळें गोंधळ उडणार, हें तर मला स्पष्ट दिसतच आहे. "

" कांहीं गोंधळ उडणार नाहीं ! " बिंदूनं निश्चित स्वरात उत्तर दिलें.

" बिंदू, गोंधळ उडणार नाहीं, हें तूं कशावरून सांगतेस ? तू बाळा-साहेबांना – माझ्या भावोजींना पूर्वी कधीं पाहिलं आहेस का ? "

" पाहिल नसलं तरी आपलं माणूस आपल्याला ओळखतां येणार नाहीं, असं का तुम्हाला वाटतं ? "

बिंदूचं हें उत्तर ऐकून मला मोठं कौतुक वाटलं ! तिनं मला ह्यापूर्वी पाहिलं नसलं तरी तिच्या मनाची सर्व ओढ माझ्याकडेच आहे, हें माझ्या लक्षांत

आलं! तिचं तें उत्तर ऐकून मी तिच्याकडे एकदां पूर्ण दृष्टीनं पाहिलं आणि विषय बदलून वहिनीला म्हणालो, " तें जाऊ द्या वहिनी! तुम्ही मघां त्या जुळ्या भावांच्या बायकोबद्दल काय म्हणत होतात तें सांगा!"

" तुम्हाला नाहीं का माहीत ती गोष्ट?" वहिनी सांगूं लागली, दोन जुळे भाऊ होते. त्यापैकीं मोठा काहीं व्यापारानिमित्त परगांवीं जाऊन राहिला. तिथं त्यान स्वतःचं लग्न केलं आणि संसार थाटला! त्याची बायको फार प्रेमळ आणि माणसांची चहाती होती. नवराबायको असं एकटं राहून एकलकोंडा संसार करणं. तिला मुळींच पसंत नव्हतं. कुटुंबवत्सल घरांत रहावं, आपलं घर भरलेलं असावं, आणि सर्वांशीं मिसळून गुण्यागोविदानं वागावं अशी तिची फार इच्छा होती. नवऱ्याला मात्र स्वतत्र रहाणं आवडत असे. शेवटीं बायकोनं कटकट लावताच तिला घेऊन तो घरीं आला. त्याच्या दुसऱ्या भावाचंहि लग्न झालं होतं. घरीं आल्यावर दोघे भाऊ एकमेकाना भेटले. आणि त्या दोघी जावाहि एकमेकींना भेटल्या सर्वांना आनंद झाला. पण तो आनंद काहीं फार वेळ टिकला नाहीं. थोडा वेळ गेला नाही. तोंच 'हा माझा नवरा कीं तो माझा नवरा?' अशी त्या दोघींनाहि क्षणोक्षणीं शंका येऊं लागली, कारण देघेहि भाऊ सारखेच! त्यांना मात्र आपल्या बायका चटकन् ओळखता येत. आणि ते आपल्या बायकोजवळ बिनचूक जात, परंतु प्रत्येकाच्या बायकोला मात्र संशय येई कीं 'हे माझेच का?—नाहीं तर भावोजी असतील!' अशी शंका मनांत येऊन दोघीहि आपापल्या नवऱ्याला बिचकूं लागल्या. रात्रीं तर त्या दोघींच्या मनाची अशी काहीं तिरपीड उडत असे कीं सागून सोय नाहीं. एका ठिकाणीं झोंपल्यावरहि बायकोच्या मनात सशय येई कीं, माझ्याजवळ झोपलेले भावोजीच आहेत. अशी शंका येतांच ती ताडकन् उठून खोलीच्या बाहेर पळून जाई!"

" ही वहिनीची गोष्ट ऐकतां ऐकतां आमचं पोट दुखूं लागलं. बिंदूहि हंसतच होती. इतक्यांत आग धुवून तिची मावशी आंत आली. तेव्हा आमचं बोलणं थांबलं. मी बाहेर येऊन बसल्यावर दादासाहेब मला विचारूं लागले, कसं काय बाळासाहेब, आमची पसंती चुकली नाहीं ना? बिंदू तुला पसंत पडलीना? तिचे वडील सर्वस्वी माझ्यावर विश्वासून आहेत. फार योग्य मनुष्य? —इतक्यांत दादाचा मुनिम आला. आपल्या मालकाला पाहून तो आश्चर्यानं म्हणाला, 'दादासाहेब, तुम्ही आज कोल्हापूरला जाणार होतां

ना ? ' तेव्हा दादासाहेबांनीं उत्तर दिलं, ' निघालों होतो, पण स्टेशनावर हा बाळासाहेब भेटला तेव्हां त्याला घेऊन परत आलों. "

" आणि ती मंडळी येणार होती, त्याचं काय झालं ? " मुनिमान विचारलं.

" मंडळी सुद्धा घेऊन आलो आहे ! दादासाहेबांनीं उत्तर दिलं, आणि ते पुढें विचारूं लागले. पण कायहो रामभाऊ, तो भार्गवराम अद्याप कसा आला नाहीं ? अगदीं अजागळ मनुष्य आहे बुवा ! मेहनती आहे एवढंच ! बाकी अक्कल कशी ती नाहीं ! त्याला रात्रीं यायला सांगितलं होतं. पण अजून त्याचा पत्ता नाहीं. काय गोंधळ केला आहे हरि जाणे ! "

" त्याला काहीं काम सांगितलं होतं का ? रामभाऊंनीं विचारलं "

" काम म्हणजे ! ह्या मुलीला देण्याकरतां दोन दागिने, लुगडीं खण मी त्याला पुण्याहून येताना रामनारायण शेटजीच्या पेढीवरून आणायला सांगितलं होतं. "

" दोन दागिने लुगडीं आणि खण हीं जिन्नसाची नावं ऐकताच मला गाडींत सापडलेल्या ट्रंकची चटकन् आठवण झाली. दादासाहेबांनीं भार्गवरामाचं वर्णन केल, त्यात तो अजागळ आहे अस ते म्हणालेच होते आणि आगगाडीच्या डब्यांत ट्रंकची अदलाबदल करणारा मनुष्यहि अजागळच होता, हें मी प्रत्यक्ष पाहिलच होतं ! तेव्हा तोच मनुष्य असेल अशी मला शंका आली. जेवण झाल्यावर दादासाहेब काहीं कामानिमित्त बाहेर गेले. बिंदूचे मामा गांवांतच त्याच्या कोणा एका नातलगाला भेटण्याकरता म्हणून बाहेर गेले आणि मावशी रात्रीं गाडींत जाग्रण झालं असल्यामुळें खालच्या माजघरांत झोपली. मी, वहिनी आणि बिंदु वरच्या दिवाणखान्यात गोष्टी बोलत बसलों होतों. बोलता बोलता मी बिंदूला विचारल, ' सकाळीं मिरजेच्या स्टेशनावर ' इथ पाणी नसायचंच ! असं तुम्ही म्हणालांत त्याचा अर्थ माझ्या लक्षात आला नाहीं ! "

" ह्या मिरजेला पाण्याची हाकाटी आहे, हें मला माहित आहे. गेल्या वर्षी दुष्काळ पडला त्यावरून आमच्या बाबाच्याजवळ आलेले काहीं गृहस्थ बोलत होते, पाण्यावांचून आपली प्रजा मरत आहे, परंतु मिरजकर तिकडे कांहींच लक्ष देत नाहींत; गावातील सगळ्या लोकानीं कितीदा तरी श्रीमंतांना अर्ज केला, परंतु श्रीमंत आपल्या प्रजेच्या या दुःखाकडे ढुंकूनहि पहात नाहींत असं ते सांगत होते. तेव्हां मला मिरजेला पाणी नाहीं—पाण्याची नेहमीं हांकाटी असते अस कळलं ! "

" खरंच का हो वहिनी तुमच्या मिरजेला पाणी नाहीं, मी विचारलें. "

" पाणी असणार कोठून ! पाऊस पडेल तर पाणी असणार ना ? ' वहिनी म्हणाली, ' आज महिना झाला, पावसाचं एक टिपूसहि नाहीं, तेंच सांगलीला पाहा, नाहींतर वर शेडबाळला पाहा. मिरजेच्या आजूबाजूला चार पाच मैलांवर सारखा धूमधार पाऊस पडतो आहे. ह्या मिरजेनंच काय पाप केलं आहे हरी जाणे ! प्रजा पाण्याकरतां दर वर्षी अशी तडफडते ! ह्या पाण्याच्या त्रासामुळं इथले अर्धे लोक गाव सोडून परगावीं गेले. पण त्याचं मिरजकरांना कांहींच वाटत नाहीं. गरीब प्रजेला पाण्याकरता दुःख होतंय याची श्रीमंतांना कल्पना कशी होणार ? कारण त्याच्याजवळ नोकर चाकर आहेत. गाड्या आहेत. कृष्णेच पाणी नोकर कावडी भरून आणतातच आहेत ! "

" ' मग इथल्या हॉस्पिटलला कुठलं पाणी आहे ? ' बिंदूनें विचारलें. ' मी ऐकलं आहे कीं हॉस्पिटलमध्यें पाणी मुबलक आहे म्हणून ! ' "

" ' त्या डॉक्टरांनीं स्वतःच्या खर्चानं नळ घेतला आहे ? ' वहिनीनं उत्तर दिलं, ' पाहा हा परका डॉक्टर इथं येऊन त्यानं ही पाण्याची स्वखर्चानं सोय केली. पण हे आमचे संस्थानिक स्वतःच्या प्रजेची काळजी घेत नाहींत. "

" ' अशा ह्या संस्थानिकाना चागले ताळयावर आणले पाहिजेत ! ' बिंदू आवेशानें म्हणाली. "

" ' पण त्याना ताळयावर आणायचं कोणी ? प्रजेनं अर्ज केले. विनंत्या केल्या. राजवाड्यावर जाऊन धरणं सुद्धा धरून पाहिलं, पण श्रीमंत ऐकतील तेव्हां ना ! ' वहिनी म्हणाली. "

" ' असे संस्थानिक असल्यावर प्रजेनं अशा मुळमुळीत उपाय करून काय उपयोग ! श्रीमंत कावडीनं कृष्णेच पाणी आणतात ना ? तेंच पाणी प्रजेनं लुटण्याला सुरवात करावी ! ' बिंदू म्हणाली. "

" ' अहो ! वहिनी तुम्ही आपल्या भावोजीकरितां शोधून काढलेली वधू अगदीं योग्य आहे ! ' मी म्हटलें. "

" ' तुम्हाला हो काय माहीत ? ही भावोजीकरितां शोधलेली वधू आहे म्हणून ? ' "

मघां दादासाहेब म्हणत होते म्हणून कळलं ? ' "

" मग सांगा पाहूं ?--' माझ्या वहिनीनं प्रत्यक्ष मलाच प्रश्न केला. ' मग सांगा पाहूं ? आम्ही पसंत केलेली ही वधू आमच्या भावोजीना पसत पडेल कीं नाहीं ? "

वहिनीचा हा प्रश्न ऐकून मी काय उत्तर देतों तें ऐकण्याविषयीं बिंदू माझ्याकडे मोठ्या आतुरतेनें पाहूं लागली. तिच्या नजरेंत मला मोठी मौज दिसली. एखादा विद्यार्थी आपल्या परीक्षेचा निकाल ऐकण्यास जसा उत्कंठित झालेला असतो, तशी तिची उत्कंठित मुद्रा पाहून मी म्हणालों. " हें मी कसं सांगू? प्रत्येकाच्या आवडी निवडी केव्हांहि निराळ्याच असणार! आतापर्यंत जो मला अनुभव आला त्यावरून याचे गुण बाळासाहेबाना आवडतील, अशी माझी पूर्ण खात्री आहे. परंतु—' असं म्हणून मी थाबलों. तेव्हां भान न राहून बिंदूनं मला चटकन् विचारलं, ' परतु काय ? "

" ह्या तिच्या प्रश्नाबरोबर मला आणि वहिनीला हंसूं कोसळलं! बिंदू थोडी विरमली. तें पाहून मी विषय थट्टेवर नेण्याच्या उद्देशानं म्हणालों, ' ती गोष्ट वहिनी तुम्हाला माहीत असून तुम्ही मला विचारता!—तुम्हाला माहितच आहे कीं, तुमच्या बाळासाहेबाना सुंदर बायको नको म्हणून!' — माझ्या बोलण्यातील खोंच वहिनीच्या लक्षात येऊन ती म्हणाली, ' होय बाई! भावोजीचा सुंदरपणावर मोठाच कटाक्ष आहे. आपली बायको सुंदर असली म्हणजे लोक तिच्याकडे टकमक पहात राहतील म्हणून आपण जी बायको करणार, ती अगदीं काळीकुळकुळीत–दगडी कोळशासारखी—तिच्या चेहऱ्याला काळेपणाचा तजेला असला पाहिजे असं त्यांच म्हणणं आहे! "

" आमची ही थट्टा खरीच समजून बिंदूच्या नेत्रांतून खरोखरच बिंदू बाहेर पडले!"

" अरेरे! राया, कितीरे तूं निष्ठूर आहेस!" मध्येंच बापू म्हणाला.

" आणि रायाची वहिनी तरी काय कमी आहे!" अण्णानें त्याला दुजोरा दिला. " बिचाऱ्या त्या गरीब बिंदूच्या नेत्रांत अश्रबिंदू गळाले, यांत काहीं नवल नाहीं! मी अशा कित्येक बायका पाहिल्या आहेत कीं, त्यांना ' आपण सुंदर नाहीं म्हणून नवऱ्याची आपणावर प्रीति नाहीं ' ह्या सौंदर्याच्या वैगुण्याबद्दल रात्रंदिवस दुःख होत आहे. आणि इकडे बिचाऱ्या बिंदूला काय वाटलं असेल?—' आपण सुंदर नसतों तर फार बरं झालं असतं ' असंच वाटलं असेल!!"

" होय अगदीं अस्संच वाटलं!" राया म्हणाला " तिच्या तपश्चर्येवरून तिला मी म्हणतों असच वाटलं. हें मी ताडलं. तिचा चेहरा गोरामोरा झालेला पाहून वहिनीनं लगेच बाजू सांवरून धरली. ती म्हणाली, " बायको सुंदर

नसावी, असं जरी भावोजीचं मत असलं, तरी माझ्या शब्दाबाहेर ते काहीं जायचे नाहींत. सुंदर मुखावर लोकांची नजर जाणारच! त्यावरून बायकोवर राग करणं न्याय्य होईल का?' "

अशा आमच्या गोष्टी चालू असतांना मावशी वर आली. अर्थात् आमच्या गोष्टी तितक्याच थांबल्या. सध्याकाळपर्यंत काहीं विशेष म्हणण्यासारखा प्रकार घडला नाहीं. रात्रीं नको नको म्हणत असतांना मावशीनें वहिनीला चुली-जवळ जाऊं न देतां बिदूकडूनच स्वयंपाक करविला. 'तुमची प्रकृति चागली नाहीं, आम्ही इथ आहोंत, तोंपर्यंत बिदू करील स्वयंपाक!' अस मावशीनं सांगून बिदूला स्वयंपाक करायला लावला. "

" मग कसा काय स्वयंपाक केला तिनं!" मध्येंच मनोहरानें विचारलें.

" तुझ्यापेक्षा शतपटीनं चागला केला. समजलीस मनूताई!" वेडावून ओरडून राजा म्हणाला. " कसला गचाळ स्वयंपाक करतोस तो माहीत आहे ना! धड पोट सुद्धा भरत नाहीं!"

" मग जा ना त्या कसब्याच्या खाणावळींत आमटीचे भुरके मारायला!" चिडून मनोहर म्हणाला. " कसा ओय् ओय् करीत मग पडला होतास तंगड्या ताणून!"

" नकोरे बुवा ती आठवण!" बापू मध्येच म्हणाला. " देवा नारायणा! आमटीचा भुरका मारताच झुरळ तोडांत! शी—शी—शी! बिचारा तो मेंबर बाहेर येऊन ' बाक् बाक् ' करायला लागला. तें पाहून आम्हालाहि भडभडून आलं! राजा तर घरीं आल्यावर आंतड्या बाहेर पडेपर्यंत ओकला!"

" म्हणूनच म्हणतो, पोट भरत नाहीं तर जा खाणावळीत जेवायला! त्याच्या तोंडात झुरळ आलं, पण तुझ्या आमटींत उंदराच पिलू येईल!"

हा थोडा वेळ विनोद झाल्यावर मनोहरानें पुनः पहिला प्रश्न रायाला केला. तेव्हां तो म्हणाला, " जेवण कस झाल होतं हें तुम्हाला लवकरच स्वतः अनुभवायला मिळेल. तेव्हा मग तमचं तुम्हीच काय ते ठरवा.

" अरे, जेवण उत्तम झाल होतं एवढं सुद्धां तुला नाहीं कळत?" बापू म्हणाला. " रायाची वहिनी आणि तिच्या हातचा स्वयपाक वाईट होईल, हे शक्य तरी आहे!"

" अरे रायाची वहिनी काय म्हणतोस!" त्याच्या पाठीवर थाप मारून राजाभाऊ म्हणाला. " रायाची बायको आणि आपली वहिनी म्हण!"

" प्रधानजी, तुमचं म्हणणं जेहेत्ते बरोबर आहे! –काय समजलात ? " राजा म्हणाला. " आणि रायाजी जेहेत्ते तुम्ही आपली वधू परीक्षा पुढं चालू करा. "

" दुसऱ्या दिवशीं सकाळच्या प्रहरीं--" राया सांगूं लागला. " मावशी स्वयपाकाला गेली, त्यामुळं आम्हाला बोलायला बराच अवसर सापडला. मी दिवाणखान्यांत गेलों, तेव्हां बिंदू एक पुस्तक वाचीत बसली होती. मला पाहताच ती उठली. ' कोणत पुस्तक वाचता ? ' असा प्रश्न केल्यावर तिनं तें पुस्तकच माझ्यापुढं केलं आणि ती म्हणाली, ' किती असंभवनीय गोष्टी यात लिहिल्या आहेत! लेखकाला मनुष्य स्वभावाचं वर्णन तर मुळींच करता आलेलं नाहीं अस दिसतं. साध्या व्यवहारांतली गोष्ट सुद्धा सरळ रीतीनं लेखकाला लिहिता आलेली दिसत नाहीं ! "

" ' असं काय कथानक आहे ते ? ' मी विचारलें. "

" ' एक अनाथ मुलगी दाखविली आहे. तिच्या अनाथपणाचं वर्णन करताना लेखकानं ती दारिद्र्याची मूर्तिमंत पुतळी आहे, असं तिचं चित्र रंगविलं आहे. नतर तिच्या सौंदर्याच वर्णन करतांना स्वर्गातील मेनका उर्वशी इत्यादि अप्सरांचेंहि सौंदर्य तिच्यापुढं फिकं होतं, असं वर्णन केल आहे; आणि ते वर्णन करतांना तिचें सौंदर्य खुलून दाखविण्यासाठीं ती काळ्या बुट्ट्यांचा शालू नेसली होती, तिच्या हातात सोन्याच्या बांगड्या होत्या पण त्या तिच्या गोंडस हाताला फार शोभा देत होत्या, असं वर्णन केल आहे ! यावरून हीं दोन्ही वर्णन परस्पर विरोधी आहेत, असं तुम्हाला नाहीं का वाटत ? ती मुलगी अनाथ असेल, स्वरूपानंहि सुंदर असेल, पण लेखकाचं वर्णन पहा कस चमत्कारिक ते ? अनाथ मुलीजवळ बुट्ट्याचा शालू कोठून आला ? आणि तिला सोन्याच्या बागड्या तरी कोणी दिल्या ? ही झाली वर्णन करण्याची शैली ! अशा ह्या मुलीवर एका मनुष्याची नजर होती. तो मनुष्य श्रीमंत होता. त्यानं तिला तूं ' आपल्याजवळ राहतेस का ? ' म्हणून विचारतांच ती ' हो ' म्हणते, आपण गरीब आहोंत, आपणाला हा मनुष्य आश्रय देतो आहे, म्हणून आपण ' नाहीं ' म्हणूं नये. असे तिचे विचार दाखविले आहेत. ही काय गोष्ट कीं भाकडकथा ! स्त्रियांच्याविषयीं ह्या लेखकाची कल्पना कांहीं विपरीतच दिसते. एकादी स्त्री घ्यावी, आणि तिच्या अंगीं वाटेल तसे गुण चिकटवावेत, असंच ह्या लेखकांना वाटतं ! ' "

" ' मग तुमच्या मतें त्या लेखकानं कसं लिहायला पाहिजे होतं ? ' मी विचारलें. "

" ' परिस्थितिनं गांजून ती स्त्री कदाचित् ' हो ' म्हणण्याचा संभव आहे. मी नाहीं म्हणत नाहीं. परंतु असं हजारांत एक उदाहरण ! पुरुषानं विचारायचं आणि स्त्रीनं हो म्हणायचं, हें वर्णन तर अगदींच हिडीस आहे. सुंदर फुलाला पाहून कोणीहि मोहून जाईल, परंतु ते फूल तोडायला गेल्यास हाताला काटे बोचतात, ही जर पुष्पांची वस्तुस्थिति झाली, तर स्त्रीपुष्पाचं वर्णन काय करायचं ! एक तर मनुष्य अनोळखी स्त्रीला असं कधींच विचारायचा नाहीं. मग ती कंगाल भिकारीण का असेना ! आणि कदाचित् पुरुष डामरट असला तर विचारीलहि. परंतु ती स्त्री त्याला फाडफाडून खाईल ! ' "

असं म्हणून तिनं मला माझं मत विचारलं. मी गोंधळलों. खरोखरीच तिचे प्रगल्भ विचार ऐकून मी स्तब्ध झालों. तिनं थोडक्यांत स्त्रीजातीविषयींचा अभिमान किती सूक्ष्म प्रकारें व्यक्त केला ! त्यावरून तिच्या स्वतःच्या निर्मळ चारित्र्याची मला सहज अटकळ करता आली. मीं तिच्या प्रश्नाला ' हो मलाहि असंच वाटतं ! असं कांहींतरी उत्तर देऊन मी वेळ मारून नेली परंतु माझ्या उत्तरानं तिचं समाधान झालं नाहीं, ती मला पुढें म्हणाली, ' तुम्हाला आम्हां स्त्रियांच्या बाबतींत मत तरी काय देता येणार ? मला असच वाटतं ! ' असं म्हणून ' तुम्ही हो ला होच ' करणार ! स्त्रियांच्या नाजूक परिस्थितीचा फायदा घेऊन पुरुष इतकीं अनन्वित कृत्यं करतात याबद्दल पुरुषांना दोष देणारे लेखक फारच थोडे आहेत. होतां होईल तों हे पुरुषलेखक स्त्रियांनाच दोष देणारे आढळतात ! " '

" ' हें आपलं म्हणणं मला खास पटतं ! ' मी उत्तर दिलें. ' मी कांहीं फारशीं पुस्तकं वाचलीं नाहींत, तरी देखील, तुम्हीं म्हणतां तशाच तऱ्हेचा प्रकार मलाहि आढळून आला. परंतु मी म्हणतों अशी पुरुषलेखकावर टीका करून काय उपयोग ? तुम्ही पुढं होऊन आपली स्त्रियांची बाजू मांडली पाहिजे ! ' "

" होय—तसा सध्यां काळ आला आहे खरा ! ' बिंदू म्हणाली. "

" ' मग काय तुम्ही लेखिका होणार तर ? ' मी विचारलें. मग लग्न करण्याच्या भानगडींत कां पडतां ? "

" ' कां बरं लेखिका होण्यांत लग्नामुळं कसला व्यत्यय येणार? लग्न झाल्यावर मला लेखिका होतां येणार नाहीं, असं कां तुम्हाला वाटतं ? ' "

" ' लग्न झाल्यावर तुम्ही आपला प्रपंच सांभाळाल, पतीची मर्जी सांभाळाल, कीं पुढें होणाऱ्या मुलाबाळांचं संगोपान कराल, कीं लेखिका बनाल? तुम्हाला ह्या स्वतःवर एकामागून एक पडणाऱ्या जबाबदाऱ्या पार पाडता पाडतां स्त्रियांची बाजू समाजापुढं मांडण्यासाठीं लेखिका बनता येईल किंवा नाहीं, याची शंकाच आहे! ' "

"तुम्हाला शका वाटत असेल पण मला नाहीं वाटत शंका! जिला खरी खरी कळकळ आहे, ती त्यांतूनहि—तुम्ही म्हणता त्या सर्व जबाबदाऱ्या बिनचूक आणि मोठ्या उत्साहानें पार पाडून आणि वेळांत वेळ काढून आपल कर्तव्य करील अशी, माझी खात्री आहे! ' "

" ' हें तुमचं म्हणणं जरी दिसायला रास्त दिसतं. तरी तुम्हा स्त्रियाचं जिणं म्हणजे परस्वाधीन! कारण स्त्री म्हणजे जवळ जवळ गुलामच!–पति चागला समंजस आणि तुमच्या मताप्रमाणें वागणारा असला तर तुम्ही म्हणतां त्याप्रमाणं तुम्हाला सर्व गोष्टी करता येतील. परतु तेच जर का पति हेकेखोर आणि संशयी मनाचा असेल, तर मात्र तुम्हीं म्हणता तशी एकही गोष्ट तुमच्या हातून व्हावयाची नाहीं. ' मी म्हणालों. "

" ' पण मी म्हणतें, मला पतीच्या म्हणजे बाळासाहेबाच्या स्वभावाची चांगलीच ओळख आहे म्हणावयाची! पण माझा अनुभव कांहीं निराळाच आहे! ' मुद्दाम तिच्याकडे पहात मी खोचून म्हणालों. "

" ' तुम्हाला काय अनुभव आहे! ' असें तिनें चटकन् विचारलें. "

" छे बुवा! ते काहीं विचारू नका! तुमच्या पतिराजाविषयीं मी वेडंवाकडं सागितलेलं एकतर तुम्हाला खपायच नाहीं. कदाचित् तुम्ही ऐकून घ्याल आणि तुमचं मन जर का पतिविषयीं कलुषित झालं, तर त्याचा परिणाम काहीं चागला व्हावयाचा नाहीं! ' "

" ' कां बर परिणाम चांगला व्हावयाचा नाहीं? उलट मी म्हणतें—एखाद्या सतीला आपल्या पतीचे गुणदोष अगोदर कळले आणि ती सती जर शहाणी विचारी असेल, तर त्यापासून तिचा केव्हाही फायदा होईल, असं नाहीं का तुम्हाला वाटत?—म्हणून म्हणतें सागा—तुम्हाला काय अनुभव आहे तो मला सागा? ' बिंदूचा आग्रह पाहून मी एक क्षणभर विचार करून

म्हणालों, ' तुम्ही विचारतां म्हणूनच सांगतों. बाळासाहेबाचा स्वभाव एककली – हेकेखोर आहे. कॉलेज सोडून तो काहीं मंडळींच्या नादीं लागला म्हणून दादासाहेब वगैरे वडील मडळींची त्याच्यावर इतराजी झाली. परंतु दोन चार वर्षांत त्यानं बराचसा पैसा घरीं पाठविला म्हणून सर्व मंडळीचा त्याच्यावरील राग दूर झाला, आणि आपला बाळासाहेब सुधारला ! ' असं ते समजूं लागले. परतु मी जी कांहीं चौकशी केली; त्यावरून मला असं कळल कीं; बाळासाहेब म्हणजे एक सोनेरी टोळी आहे ! काहीं मंडळीच्या सहाय्यानें तो लोकाना वाटेल तसें लुबाडतो आणि त्याला काहीं व्यसनंहि लागलीं आहेत, असंहि मला कळलं आहे—कां विचारांत का पडलांत ? मी म्हटलं ना–बाळासाहेबांची माहिती ऐकून तुमचं मन कलुषित होईल म्हणून ! " '

" ' माझं मन कलुषित झाल नाहीं. मी विचार करीत होतें तो स्वतःच्या जबाबदारीविषयीं होता. तुम्ही म्हणतां असं जर असेल, तर माझ्या पुढील आयुष्यात मी समजत होतें, त्यापेक्षां मजवर जास्त कर्तव्याची भर पडणार असं मला वाटतं ! "

" ' यांत तुमच्या कर्तव्यात काय भर पडणार ? मी मुद्दाम विचारलं. तेव्हा बिंदू म्हणाली. ' तुम्ही म्हणता तसा खरोखरीच प्रकार असेल, तर तिकडचीं व्यसनं सोडविण्याचा, वाईट संगतीपासून त्यांची मुटका करण्याचा आणि त्यांचा एककलीं स्वभाव बदलण्याचा मला प्रयत्न केला पाहिजे. ' "

" ' पण तुम्हाला त्यात यश येईल असं वाटतं का ? ' मी विचारलं. "

" ' यश येईल किंवा नाहीं हा माझा प्रश्न नाहीं. आपलं ससारिक आयुष्य सुखाचं जावं म्हणून मला हें माझं कर्तव्य केलंच पाहिजे; आणि ते मी करणार ! पुष्कळ स्त्रियाकडून चुकतं हेंच ! पतीचे दुर्गुण, त्याचीं व्यसन. आणि त्याचे वाईट आचारविचार हे न सुधारतां किंवा ते सुधारण्याचा प्रयत्नहि न करता तशा पतीबरोबर आपला संसार करण्याचा त्या प्रयत्न करतात. त्यामुळं त्यांचा संसार सुखाचा न होता दुःखाचा होतो. ' "

" आता वधूपरीक्षा करायची काहीं बाकीच राहिली नव्हती ! बिंदू आपल्या संसाराला धीट समंजस आणि विचारी अशी आहे, ही माझी खात्री झाली. तिच्या कुलशीलासंबंधानं विचार करण्याची मला जरूरीच नव्हती. आमच्या वडील मडळींनीं तो प्रश्न पूर्वींच सोडविला होता. तिच्या स्वरूपाबद्दल किंवा

प्रकृतिबद्दल मला किंचित्हि बोलायला जागा नव्हती, तिच्या काव्यमय कोमल विचारांवरून सात्विक मनोवृत्तीची साक्ष पटत होती. एकंदरीनं सांगायचं म्हणजे आमच्या आईसाहेबांनीं माझ्याकरतां जी वधू शोधून काढली, ती मला सर्वतोपरी पसंत पडली ! ”

“ मग तूं तशी ओळख तिला दिलीस ना ? ” उत्सुकतेनं बापूनं विचारलं. रायाच्या वधूपरीक्षेचा काय निकाल झाला आहे, तो ऐकण्यास सर्व मंडळी उत्सुक झाली होती.

“ अरे बिंदूच तुझी वहिनी होणार, घाबरू नकोस ! ” राजा म्हणाला. “ रायानें सांगितलेली ही एवढी सविस्तर हकिकत ऐकून तुला एवढंहि कळूं नये, तेव्हा आश्चर्यच आहे !—आश्चर्य तरी कसलं ? तुझी विशाल बुद्धिमत्ता आणि अक्कल याचा विचार केला म्हणजे आश्चर्य वाटण्याचं कारण नाहीं ! ”

“ आणि तुझी अक्कल किती आहे, हेंहि आम्हाला माहीत आहे ! ” बापू म्हणाला. “ ह्या पुण्याच्या ड्रेनेजमधून तुमच्या अकलेचे झरे वहातात, आम्हाला माहीत आहेत ! ”

“ बापू, लागलास का उखाळ्या पाखळ्या काढायला ? ” गजाभाऊ म्हणाला. तूं राजाची बाजू घेणारच ! कारण तू त्याचा प्रधानच कीं नाहीं ! पण तुला आणि त्याला काडीची अक्कल नाहीं समजलास ! ”

“ अहो, अकलेचे गड्डे, बसा आतां गप्प आणि रायाची वधूपरीक्षा ऐका ! ” राजा म्हणाला.

“ माझी वधूपरीक्षा आता संपत आली. ” राया पुढें बोलूं लागला, “ आता आपण प्रकट व्हावं, असं माझं मन मला सांगूं लागलं, दोन दिवसांनं बाळासाहेब येणार आहेत अशी बिंदूला सर्वांनीं आशा लावून ठेवली होती त्याप्रमाणं आज आपण सर्वांचा निरोप घेऊन जावं आणि पुनः ‘ बाळासाहेब म्हणून यावं असं मी ठरविलं, परंतु हा विचारहि मला पसत पडेना. जातांना दादासाहेबांच्या जवळ एक पत्र द्यावं आणि त्या पत्रांत स्वतःचा फोटो घालून ‘ मी स्वतः कबूल केल्याप्रमाणें एककल्ली, व्यसनी आणि दुराचारी आहे,’ तेव्हा हें कळूनहि आपली इच्छा माझ्याशीं लग्न करण्याची असल्यास मला तसं स्पष्ट कळवावें आणि कळलेल्या गोष्टींवरून माझ्याशीं विवाह करून आपलं आयुष्य सुखाचं जाणार नाहीं, असं जर आपल्याला वाटत असेल, तर आपण लायक पतीची निवड करून लग्न करावें आणि सुखी व्हावें अशी माझ

अंतःकरणापासून इच्छा आहे, ' अस त्या पत्रांत लिहावं, असं मी ठरविले, आणि दादासाहेबांच्या पेढीवर बसून एक सविस्तर पत्रहि लिहिलं. संध्याकाळीं दादासाहेब आल्यावर मी त्याना माझा विचार कळविला, बिंदू मला पसंत आहे, असं कळताच त्यानाहि आनंद झाला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी पत्र दादासाहेबांच्या स्वाधीन करून वहिनीचा आणि बिंदूचा निरोप घेतला. त्यावेळीं बिंदूची चर्या मला अत्यंत गंभीर दिसली. मी आदल्या दिवशीं सांगितलेल्या गोष्टींचा तिच्या मनावर परिणाम झालेला दिसला. मी वळतां वळता म्हणालों, " काल तुम्हाला मी भलत्याच गोष्टी सांगून तुमच्या मनांत अस्वस्थता मात्र उत्पन्न केली अस दिसतं ! "

" कायहो भावोजी, आमच्या बिंदूच्या मनांत कसली अस्वस्थता उत्पन्न केलीत तुम्ही ? ' वहिनीनें मध्येच विचारलें. "

" ' काहीं नाहीं ! त्यांनी काल विचारल म्हणून बाळासाहेब कसे आहेत, तें मी त्याना सागितल ! —बर जातो आतां. दया लोभ ठेवा ! ' अस म्हणून मी वळलों. मी पुनः परत येणार आहें, असं वहिनीला आणि दादासाहेबांना सांगून ठेवलं होतं. ह्या आमच्या सर्व पुढल्या गोष्टी ठरल्या असल्यामुळं मला वहिनीनं राहण्याचा आग्रह केला नाहीं. ' दुपारीं जेवण वगैरे झाल्यावर बिंदू एकटीच असतांना ' नुक्तच हें पोष्टांतून पत्र आल आहे;' अस सागून तिच्या हातीं पत्र द्या, ' असं मी दादासाहेबाना सांगितलं होतं. मी बरोबर काहींच सामान न घेता बाहेर पडलों. सध्याकाळपर्यंत दादासाहेबांच्या एका मित्राच्या घरीं वेळ काढण्याचा माझा विचार होता. इतक्यात मुंबईहून गाडी येण्याचा वेळ झाला आहे, तेव्हां सहज स्टेशनवर चक्कर मारून यावें, असा अकल्पित विचार माझ्या मनांत आणि, आणि माझे पाय त्या बाजूला वळले. एकदा अस वाटे कीं, आपण लिहिलेल पत्र वाचून त्या पत्रांत लिहिल्याप्रमाणं ती काय उत्तर लिहिने, तें पहावं, आणि पुनः वाटे कीं, असंच जाऊन तिच्यापुढं उभं रहावं ! स्टेशनवर येईपर्यंत या दोन विचारापैकीं कोणतांच विचार निश्चित झाला नाहीं. मी स्टेशनावर पोहोंचण्यापूर्वीच गाडी आली होती. आपल्या ओळखीपैकीं कोणी आहे कीं काय, हें पाहण्याकरितां मी स्टेशनांत शिरणार तोंच दरवाजात तिकिट कलेक्टरबरोबर एक मनुष्य बोलत असलेला माझ्या दृष्टीस पडला. मी त्या मनुष्याला तात्काळ ओळखलें. डब्यात ट्रंकाची अदलाबदल करणारा तो मनुष्य होता. मी पुढें झालों, तेव्हां त्याचा संवाद मला स्पष्ट ऐकूं आला.

" आमचे दादासाहेब पेढीवाले गेले नाहींत म्हणतां ?" तो मनुष्य तिकिट कलेक्टरला विचारीत होता. " पण ते परवां कोल्हापूरास जाणार होते, त्यांचं तसं ठरलंहि होतं. त्यांनीं मला बजावून सांगितलं होतं—"

" तें सगळं खरं परंतु ते गेले नाहींत म्हणून सांगतो ना ! परवां ते स्टेशनावर आले होते. मींच त्याना तिकिट दिलं. ते गाडींत बसणार होते इतक्यात त्यांच्याकडे कोणी पाहुणे मंडळी त्याच गाडींतून आली. ही पाहुणे मंडळी म्हणजे दोन पुरुष आणि दोन बायका होतीं. तेव्हां दादासाहेब परत येऊन कोल्हापूरची काढलेली तिकिट मला परत देऊन म्हणाले ' कोणी प्यासेंजर भेटला तर द्या ही तिकिट आणि करा वसूल पैसे !' हे तिकिट कलेक्टरचं भाषण ऐकून तो मनुष्य म्हणाला, " मोठा गोंधळ झाला बुवा ! "

" व्हायचाच गोंधळ ! कारण तुम्ही आहांतच तसे बृहस्पति ! " तो तिकिटकलेक्टर म्हणाला, " बरं भार्गवराम, मी सांगितलेली ती वस्तु आणलीय काय ! "

" कांहीं आणलं नाहीं ! हा असा हात हालवीत आलों आहें ! आता दादासाहेब किती जोडे मारतील ते मारोत ! " असें म्हणून भार्गवराम स्टेशनाच्या बाहेर पडला आता सर्व प्रकार माझ्या पूर्ण लक्षांत आला. आपणास डब्यात जी ट्रंक सापडली, त्या ट्रंकमधील सर्व वस्तु दादासाहेबानीं आपल्या भावी वधूकरतांच मागविल्या होत्या. त्या भार्गवरामच्या हलगर्जीपणामुळ जाणार होत्या. त्या न जातां आपणासच मिळाल्या. ह्या घडून आलेल्या योगायोगाबद्दल मला किती तरी कौतुक वाटलें ! मी तसाच भार्गवरामाच्या मागून निघालो. चारपांचशें रुपयाचा माल घालविल्याबद्दल दादासाहेब भार्गवरामालां जोडे मारतील, हा विचार मनात येऊन ते त्याचे जोडे चुकविण्याकरिता मी परत त्याच्या मागून पेढीवर आलों. "

" कायरे बाळासाहेब आलास ? " हासत दादासाहेबानीं मला विचारलें.

" होय—आताच्याच गाडींनं आलों ! " माझें उत्तर ऐकतांच दादासाहेब उठून आंत गेले. वहिनी, मावशी आणि बिंदू त्यावेळीं स्वयंपाकघरांत होत्या. त्याना दादासाहेब म्हणाले, " ऐकलंस का, बाळासाहेब आला ! --मला वाटलं होतं कीं, कामामुळें मला येतां येणार नाहीं असं त्याचं पत्र येईल. पण नाहीं ! लिहिल्याप्रमाणं आला म्हणायचा ! बरं आता चहा घेऊन वरच्या दिवाणखान्यांत ये म्हणजे आपण सर्वजण बसून घेऊं !—अरे हो, बिंदू तुझ्या

नांवाचं हें पोस्टांतून पत्र आलं आहे हें घे!' असें म्हणून दादासाहेबांनीं माझं पत्र बिंदूला दिलं."

"आतां मी कशाला चहा घेऊन येऊं? भावोजींचा चहा बिंदू घेऊन येईल!" वहिनी बिंदूकडे पहात हासत हांसत म्हणाली,

"हो — हो — तेंहि खरंच! असें म्हणून दादासाहेब बाहेर आले आणि त्यांनीं मला वरच्या दिवाणखान्यांत येण्यास सांगितलं. माझं बेडींग ब्याग आणि ती डब्यांत सापडलेली ट्रंक मी वरच्या दिवाणखान्यातच ठेवली होती. वर गेल्यावर मी म्हणालों, " दादासाहेब, मी काहीं जिन्नस बरोबर आणले आहेत, ते तुम्हाला दाखवावयाचे आहेत!" असं म्हणून मी ती ट्रंक उघडली आणि आंतील जिन्नस बाहेर काढून दादासाहेबापुढें ठेवले दोन उंची लुगडीं, खण, चंद्रहार, बांगड्या आणि कुंकवाचा करंडा ह्या सर्व वस्तु पाहून दादासाहेब म्हणाले, " अरे तूं ह्या वस्तु आणल्यास? आणि अगदीं मोजक्याच कशा आणल्यास? कारण मी ह्याच पुण्याहून आणायला भार्गवरामाला सांगितलं होतं!"

"खरं कीं काय?" मी आश्चर्य वाटल्यासारखें दाखवून म्हणालों. इतक्यांत जिन्यात पाय वाजूं लागले. थोड्या वेळानं दिवाणखान्यात येऊन वहिनी म्हणाली " पाहिलंत का, ही बिंदू चहा घेऊन आत येत नाहीं? तुम्ही म्हणा बिंदू मोठी धीट आहे. पण हें पहा! तरी खालीं मावशीनं सांगितलंच कीं न लाजता वर चहा नेऊन दे म्हणून! तरी देखील ती अडखळलीच!"

"बिंदू, आण चहा आंत!" दादासाहेब आतून म्हणाले. तेव्हा दोन्ही हातात दोन कप घेऊन खालच्या मानेनं बिंदूं आंत आली. सरळ टेबलाजवळ आल्यावर ती चहाचे कप टेबलावर ठेऊं लागली तें पाहून वहिनी म्हणाली, 'हें काय? टेबलावर काय ठेवतेस? हातात देना!' तेव्हां तिनं उजव्या हातांतील कप माझ्यापुढं करतांना किंचित् वरच्या मानेनं माझ्याकडं पाहिलं. त्याबरोबर ती चमकली आणि तिच्या हातांतील दोन्हीं कप खालीं पडले! कप फुटले आणि चहा सांडला! त्याचें बिंदूला भानच राहिलें नाहीं. ती माझ्याकडे पहातच राहिली!"

" बिंदू हें ग काय? चहा सांडला, कप फुटले, तुझं लक्ष कुठं आहे." वहिनी म्हणाली. तिचे शब्द कानीं पडतांच बिंदू मागं वळून जाऊं लागली. हें पाहून दादासाहेब म्हणाले " बिंदू इकडे ये. हा समजुतीचा घोटाळा नसून

हा बाळासाहेब माझा भाऊ आणि तुझा भावी पतीच आहे ! तुम्हाला परस्परांची ओळख व्हावी म्हणून मी तुझा थोडा विनोद केला. बरं आतां पुनः एक कप चहा घेऊन ये ! ” जातांना पुनः एकदां माझ्याकडे पाहिलं. त्या पाहाण्यात किती तरी अर्थ भरलेला होता. ‘ तुम्ही मला फसवलं पण याचं मी उट्टं काढीन ! ’ असं तिची चर्या सागत होती. ती खालीं गेली असं पाहून मी दादासाहेबांना विचारल माझं पत्र कुठं आहे. ? ”

“ मी तिला मघांच दिलं ! बरं आता इथंच बैस. बिंदूचा आता तुला राग घालविला पाहिजे. मी जातों खालीं कारण भार्गवराम आला आहे ! असं म्हणून दादासाहेब आणि वहिनी खालीं निघून गेली. आणि ‘ येईल माझी भावी काता आता–’ म्हणून तिची वाट पहात दिवाणखान्यात बसलों. थोड्या वेळानें बिंदू चहा घेऊन वर आली. किंचितहि न लाजता सरळ माझ्याजवळ येऊन तिनं चहा माझ्या हातीं दिला. त्यावेळीं तिची चर्या अत्यंत गंभीर दिसत होती. चहा घेत असताना मी तिच्याकडे पाहात विचारल, तुम्हाला म्हणे आज पोष्टांतून पत्र आलं ? ”

“ होय–आम्हाला एक पत्र आलं आहे आणि आम्ही त्या पत्राचं उत्तर लिहिणार आहोंत ! बिंदूनें सरळ उत्तर दिलें. ”

“ काय उत्तर देणार तें आम्हाला कळेल का ? ”

‘ जशास तसं, या न्यायानं वेळ आली म्हणजे कळेल ! ’

“ इतक्यांत दादासाहेबाचे रागाचे शब्द माझ्या कानी आले. बहुतकरून भार्गवरामावर हा दादांचा राग असावा, असं तात्काळ जाणून मी हातातील कप टेबलावर ठेवला आणि तसाच उठलों. दादासाहेब भार्गवरामावरच रागावले होते. ‘ तूं अजागळ आहेस,–महा मूर्ख आहेस ! ’ अस ते त्याला रागावून म्हणत असताना मी त्यांच्याजवळ जाऊन म्हणालों, ‘ दादासाहेब, रागावूं नका. मी सर्व गोष्टीचा उलगडा करतों ! ’ असं म्हणून मी सर्वांना वर येण्यास सांगितलं. इतक्यांत मामासाहेबहि बाहेरून आले. तेव्हां तेहि मजकडे आश्चर्यानं पाहात राहिले. आम्हीं सर्वजण वर दिवाणखान्यांत आल्यावर ट्रंककडे बोट दाखवून मी भार्गवरामाला ‘ हीच का तुमची ट्रंक ? ’ असें विचारतांच तोहि आश्चर्यानं मजकडे पाहूं लागला. थोडक्यांत सांगायचं म्हणजे सर्वांच्या आश्चर्यांचें मीच केंद्र बनलों. मग हळुहळू मी सर्व गोष्टींचा उलगडा करून सांगताच सर्व कोडं उकललं आणि बिंदूची व माझी दिलजमाई झाली.

" हं जुळलं–अति उत्तम झालं ! " बापू आनंदानें म्हणाला.

" आनंद व्हायचाच ! " त्याच्या पाठीवर थाप मारून राजा म्हणाला. " कारण तुझंहि जुळल्यूना लेका ! आता सांग ती हकिकत आणि हो एकदांचा मोकळा ! खरंच राया, लग्न करायला जर कोणी हपापलं असेल तर आपल्या मंडळींत हा एकटा बापू आहे. इथून घरीं गेल्यावर त्यानं स्वतःला मुलगी पाह्यला सुरवात केली ! "

" खरं कायरे बापू ? " रायानं विचारलं. " एवढी रे कसली तुला घाई झाली आहे ? "

" घाई म्हणून काय विचारतोस राया ? इथून गेल्यावर त्यानं वडिलांच्या स्वाधीन पैसे केले. अर्थातच म्हाताऱ्याला मोठा आनद झाला. आणि एवढी मोठी रक्कम पाहिल्यावर कोणाला आनंद होणार नाहीं ! म्हातारीनं तर बापूचा पाट सतरा ठिकाणीं नाचवायला सुरवात केली. तेव्हां यानं आईला काय सांगितलं तें माहित आहे का तुला ? म्हणे तुम्हांला हा पैसा पाहून आनंद झाला. पण हा पैसा मिळवायला मला काय करावें लागलें याची आहे का तुम्हाला कल्पना ? रात्रंदिवस हाडाचीं काडं केलीं —' "

" तर तर ! बाळ पहा कसा अगदीं झिजला आहे तो ! " चाऱ्यानें बापूला हालवून सांगितलें. " बिचाऱ्याचं सारखं मांस वाढत चाललं आहे ! पहा हाड तरी लागतंय का कुठं अंगाला ? सगळीं हाडं मासांतल्या मासांत जिरून गेली ! "

" ऐकरे चाऱ्या ! " राजा पुढें म्हणाला. " बिचाऱ्या आईला असं सांगितल्यावर तिला तें खरंच वाटणार ! पुढें बापू काय म्हणतो, ' आई, मी श्रमाला भीत नाहीं ग, पण इतकें करून माझ्या जेवणांचे हाल होतात. म्हणून वाईट वाटतं ! असं सांगितल्यावर अर्थात्च म्हातारीला ह्या आमच्या ' बाळा ' चं जेवण करण्यासाठीं एक ' बाळी ' पहाणं प्राप्त झालं ! सगळ्या ठिकाणीं शोध शोधली. शेवटीं मुलगी कांहीं मिळेना, असं पाहून जी एक मिळाली तीच ठरविली झालं ! "

" एकूण बापूचं ठरलं तर ? " गोप्यानें मध्येंच विचारलें. " मग आमची ही वहिनी कशी काय आहे ? "

" कशी असेल रे गोप्या, असं तुला वाटतं ?—साग, तुला काय वाटतं तें सांग ! " राजानें विचारलें. " आता एका वहिनीचं वर्णन तूं ऐकलंच

आहेस त्यावरून कल्पना करून ह्या दुसऱ्या वहिनीचं वर्णन तूं करून सांग पाहूं !"

"त्यात वर्णन कशाला करायला पाहिजे ? बापूनें स्वतःच्या बायकोची निवड रायासारखीच केली असली पाहिजे. कारण आपण एकाच कंपूची मंडळी ! ती सुंदरच असेल, बांधेसूद असेल, हुषार असेल, बोलकी असेल, स्वयंपाक करण्यात पटाईत असेल, थोडक्यात सांगायचं म्हणजे आपली ही दुसरी वहिनी पहिल्या वहिनीसारखीच—अगदीं तिला शोभण्यासारखी असेल !"

"अगदीं चुकलास ! गोप्या साफ चुकलास ! अगदीं सपशेल घसरलास ! तूं वर्णन केलंस अशी मुलगी आणून ह्या आमच्या बापूच्या शेजारीं उभी केली तर ह्या सुंदर बाळाला दृष्ट लागेल !"

"मग राजा कशीरे आहे आमची वहिनी ?"

"ती सुंदर म्हणजे काळी कुळकुळीत आहे; बांधेसूद म्हणजे अंगानं आडवी तिडवी सुटलेली आहे; हुषार म्हणजे बसल्या जागेवर पाय पसरून बसणारी आहे; बोलकी म्हणजे भांडण करण्यांत पटाईत आहे, आणि स्वयंपाक करण्यात पटाईत म्हणजे दुसऱ्यानं केलेला स्वयंपाक चट्ट करण्यांत पटाईत असं म्हण !" असें म्हणून बापूला हातवारे करीत राजा म्हणाला, "अहाहा ! काय पण बाळानं आमच्या करिता वहिनी शोधून आणली आहे !"

"खरच का बापू हा राजा म्हणतो तशी तूं बायको शोधलीस ?" रायानें विचारलें.

"तूं काय ऐकतोस त्याचं राया ? ह्या राजाला थट्टा केल्याशिवाय चैनच पडत नाहीं !"

"मग काय तुझी बायको अप्सरा आहे, असं तुझं म्हणणं आहे कीं काय ? पण राया आतां ह्या गोष्टीचा खल कशाला ? लग्न ठरलं, तिथिनिश्चय होऊन ह्या येत्या फाल्गुनांत बापूच्या लग्नाचा शंख वाजणार आहे, तेव्हा दिसेलच आपणाला !"

"बरं हीं दोन लग्नं जुळलीं !" "गोप्या म्हणाला." आणखी कोण कोण लग्न जुळवून आलं ?"

"चाऱ्या आणि बाप्याचीं लग्नं जुळलीं आहेत आणि मन्याचं जुळूं घातलं आहे !" गजाभाऊ म्हणाला. "बरं पण राया, तुझ्या वधूपरीक्षेचा

शेवट काय झाला ? बिंदूची आणि तुझी दिलजमाई झाल्यावर पुढं काय झालं, ते नाहीं सांगितलंस ? ”

“ हो तें राहिलच कीं सांगायचं ! ” गोप्या म्हणाला.

“ पुढं कांहीं विशेष प्रकार घडला नाहीं. आठ दिवस आमचे मजेंत गेले ! ” राया म्हणाला, “ मी काय उद्योग करतो, हें बिंदूनं मला कितीदा तरी विचारल. परतु मी तिला मुळींच कशी ती दाद लागूं दिली नाहीं. अधर्म अत्याचार आणि अनाचार न करतां मी उद्योग करीत असतो एवढच तिला सांगितल. पुढें तिचे मामा म्हणाले कीं, मुन्सफसाहेब मार्गशीर्षात रजा काढणार आहेत, तेव्हां त्याच संधीला लग्न उरकून घेऊं; आणि लग्न पुण्यात करू. दादासाहेबांनीं ती गोष्ट मान्य केली ! ' ”

“ मग रायाच लग्न पुण्यात होणार तर ? वाहवा मजा आहे ! ” गोप्या आनंदानें म्हणाला.

“ बरं फार रात्र झाली आता—झोपा ! ” असें म्हणून राया उठला तेव्हां मनोहर म्हणाला, ‘ राया, माझी एक गोष्ट ऐक आणि मग आपण उठूं ! परवां मंगळवारीं मी ह्या शेजारच्या बागेत गेलों होतों. त्यापूर्वीहि दोनचार वेळा गेलों होतों. परंतु परवा ती गोष्ट माझ्या लक्षांत आली. बागेच्या पलीकडे प्रेमळ विठोबाचं देऊळ आहे, तें तुला माहीत आहेच. तेथें एक बाई देवदर्शनाकरितां आली होती. तिचं वय सोळा सतरा वर्षांचं असेल. ती इकडे तिकडे पाहात देवळात शिरली आणि देवदर्शन करून बाहेर आल्यावरहि बराच वेळ बागेजवळ रेंगाळत होती. तिच्या त्या रेंगाळण्यावरून ती कोणाची तरी मार्गप्रतीक्षा करीत असावी, असा मी सहज तर्क केला. मी बसलो होतो तेथे ती थोड्या वेळानें हळुहळू येऊं लागली. माझ्याजवळ आल्यावर तिनं एक दोन फुलं तोडल्यासारखं केलं. माझं तिच्याकडे लक्ष होतं परंतु मी दुसरीकडे पहात आहे असं दाखविलं नंतर ती निघून गेली. तिच्यामागं जावं असा एक विचार माझ्या डोक्यांत आला. परतु मला त्याचं इतकं महत्त्व वाटलं नाहीं. थोड्या वेळानें एक मनुष्य मी बसलों होतों तिथं आला. याचं वय चोवीस पंचवीस वर्षांचं असेल जवळ आल्यावर एकदां माझ्याकडं टवकारून पाहिलं आणि माझ्या बाजूला तो बाकावरच बसला. तोहि टेहळणी करीतच होता. थोड्या वेळानं तो मनुष्य उठला. आणि त्या स्त्रीनं फुलं तोडलीं होतीं, त्याच झाडाजवळ

जाऊन तोहि त्या झाडाचीं पानं तोडूं लागला. एक पान तोडून तें चुरगळून त्याचा त्यान वास घेतला. पुनः दुसरं पान तोडलं, ते त्यान बाजूला फेंकून दिलें. पुनः तिसरं पान तोडलं. हा त्याचा खेळ मी पहात होतो. नंतर त्यानें झाडाच्या फादीला हात लावून नखानं साल काढण्याचा प्रयत्न केला. आपण त्याच्याकडे पहात आहोंत, हे त्याच्या लक्षात येऊ नये, म्हणून मी स्वाभाविकच तोंड बाजूला फिरविलं. पुनः इकडे पाहून हळूंच त्याच्याकडे पाहिलें तेव्हा तो मनुष्य पलिकडे जात असलेला माझ्या दृष्टीस पडला. आजूबाजूला पहात हळुहळूं तो मनुष्य बागेतून बाहेरहि पडला. तो गेल्यानंतर माझ्या मनात विचार येऊ लागले. ती स्त्री ज्या झाडाजवळ गेली त्याच झाडाजवळ तो पुरुष गेला. तिनं फुलं तोडलीं, त्यान पानं तोडलीं, तेव्हा यात काहीं तरी रहस्य असावं असा मला संशय येऊन मीं त्या झाडाजवळ गेलों, आणि तें झाड कशाच आहे, तें पाहू लागलों. परतु मला ते झाड काहीं ओळखता आलं नाहीं. नतर दुसऱ्या दिवशीं म्हणजे गेल्या बुधवारीं मी त्याच वेळीं बागेत गेलों. आणि त्या बांकेवर न बसता कोपऱ्यातील बाकेवर बसलों. मी बसलों होतों तिथून मला तें झाड स्पष्ट दिसत होत. मी बाकेवर बसून थोडा वेळ झाला नाहीं तोंच तो गृहस्थ आला. थोडा वेळ बागेंत फिरल्यासारखं करून तो नेमका त्या झाडाजवळ गेला. त्यानं इकडे तिकडे पहात एक दोन पान तोडलीं. नतर फादीला वरील पोकळींत त्यानं हात घातला. तेथें त्यानं काय केलं, तें मला दिसल नाहीं. पुनः त्यानं मागें बघून पाहिलं आणि थोडा वेळ थाबून तो निघून गेला. बागेंतून बाहेर पडून तो दिसेनांसा झाल्यावर तो त्या झाडाजवळ काय करीत होता, त्यान पोकळींत हात घालून काय पाहिलं, तें जाऊन पहावं, या उद्देशानं मी उठलों, तोंच आदल्या दिवशीं पाहिलेली ती स्त्री देवळात जाताना माझ्या दृष्टीस पडली. तेव्हां ती स्त्री काय करते, हें पाहण्याच्या उद्देशानं मी पुनः जागच्या जागीं बसलों. थोडा वेळानं देवदर्शन घेऊन ती स्त्री बाहेर आली आणि इकडे तिकडे पहात ती बागेंत शिरली. एक दोन झाडांचीं फुलं तोडल्यावर ती नेमकी त्याच झाडाजवळ आली, आणि त्या झाडाचीं आपण पानं तोडतों, असें दाखवून त्या पोकळींत तिनं हात घातला तिच्याकडे माझं पूर्ण लक्ष असल्यामुळं तिनं कांहीं तरी पांढरी वस्तू त्या पोकळींत ठेवली, हें मी स्पष्ट पाहिलं. ती निघून गेल्यावर मी उठलों आणि कोणाचं लक्ष नाहीं,

असं पाहून त्या पोकळींत हात घातला, तो एक कागदाची घडी माझ्या हाताला लागली. मी चटकन ती काढून आपल्या खिशात घातली!"

"त्या कागदाच्या घडींत काय होतं?" रायानें प्रश्न केला.

"हें! असें म्हणून मनोहरानें आपल्या खिशातून एक घडी काढून रायाच्या हातीं दिली. रायानें ती पुडी उघडून पाहिली, तो आंत तासाचे दोन बारीक सल्ले होते. वजन सरासरी अर्धा तोळा असेल. सल्ले हातात घेऊन राया विचार करीत असताना मनोहर म्हणाला. "राया, तो कागद आता उलगडून पहा. त्यावर काहीं मजकूर लिहिला आहे!"

रायानें तो कागद सारखा केला. त्यावर पेन्सिलीनें दहा बारा ओळी लिहिल्या होत्या. अक्षर वेडेंवाकडे होतें. परतु ते स्पष्ट वाचता येण्यासारखें होतें. रायानें वाचण्यास सुरवात केली—

"तुमच्या मी पाया पडतें. माझी तुम्हाला कशी दया येत नाहीं? मी संकटांत सापडलें असतां तुम्हीच मला मदत केलीत, आणि आतां तुम्हीच मला संकटात घालता याचा अर्थ काय? मी तुमची बहिण आहे अस समजा. तुमची वस्तु परत पाठविली आहे. मला पुनः भेटण्याचा प्रयत्न करू नका. माझ्या घरात कोणाला सशय-आल्यास माझी काय स्थिति होईल, याचा विचार करा. मी तुमच्या पाया पडतें."

रायानें ते पत्र वाचल्यावर मनोहर पुढें म्हणाला, "मी ही घडी त्या पोकळींतून काढून घेतल्यावर त्या स्त्रीच्या मागे गेलों. ती स्त्री गणपतीच्या देवळावरून उजव्या बाजूच्या बोळात शिरली. तेथे रस्त्यावर कांहीं मुलं खेळत होतीं. त्यांतून एक आठ वर्षांची मुलगी तिला पाहून म्हणाली, "शांतावहिनी, आज पण मला चुकवून देवळांत गेलीस ना? मी आतां तुझ्याशीं बोलायचीच नाहीं. जा!" त्यावर ती स्त्री शांतावहिनी म्हणाली, 'कमू, उद्या तुला मी खरंच नेईन हो देवळात!' असें म्हणून ती घरांत शिरली नंतर मी त्या घरात कोण रहातं त्याचा शोध केला. तेथें सहस्रबुद्धे नावाचे एक गृहस्थ राहातात. त्याना कोर्टांत नोकरी आहे. त्याचा मुलगा गंगाधर म्हणजे त्या शातावहिनीचा नवरा, बॉम्बे ऑफिसमध्यें कारकून आहे. त्याला धाकटे दोन भाऊ आहेत. ते शाळेंत शिकतात. आणि ती कमा त्याची धाकटी बहिण. शिवाय घरात दोन तीन म्हाताऱ्या बायका आहेत!"

" ह्या पत्रावरून ती स्त्री कांहीं प्रसंगांत सांपडून त्या पुरुषाची ओशाळी झाली असावी असं दिसतं ! " राया म्हणाला, " आणि तो मनुष्य त्या प्रसंगाचा फायदा घेत असावा, असं स्पष्ट दिसतं ! "

" होय. कारण काल मी पुनः तिकडे जाऊन बसलो होतो. पण स्त्री कांहीं देवळांत आलेली दिसली नाहीं. मी पुष्कळ वेळ तिची वाट पाहिली. बऱ्याच वेळानें तो मनुष्य मात्र आला. आणि त्याने इकडे तिकडे पाहून त्या पोकळींत हात घालून पाहिला. परंतु तिथं कांहींच हाताला लागल नाहीं. तेव्हां त्यानें आपल्या खिशातून एक पुडी काढून ती पोकळींत ठेवली. माझं लक्ष होतंच ! तो निघून गेल्यावर मी उठलो. बागेंत आणखी बरीच मडळी आलेली होती. परंतु त्या सर्वांची नजर चुकवून मी ती पुडी काढून घेतली. ही ती दुसरी पुडी—" असें म्हणून मनोहरनें पुडी रायाच्या पुढें केली.

रायाने ती पुडी उघडली, त्यांत तांदुळमण्याची सोन्याची माळ होती, आणि एक पत्र होते. रायानें ते पत्र उघडलें आणि वाचण्यास सुरवात केली. पत्रातील मजकूर पुढीलप्रमाणें होता.

' प्रियकर शान्ता, तुझ्यासाठीं माझा जीव सारखा तळमळत आहे, कसेंहि करून एकदाच माझी भेट घे. मी पुनः तुला कधींहि त्रास देणार नाहीं. परवां पाठविलेले सल्ले तुझ्या नाजुक करंगळीला सैल झाले नाहींत ना ? दसऱ्याकरितां आज तादळी पोत पाठवीत आहें. दिवाळीकरिता मोठा दागिना—तुला आवडेल असाच देईन. पण प्रत्यक्ष भेट झाल्याशिवाय नाहीं. तुळसीबागेत कीर्तनाचा सप्ता चालू आहे, त्या निमित्तानें रात्रीं नऊ वाजता ये. केव्हां येणार तें कळीव. येणार ना ? तुझ्या भेटीसाठीं उत्कंठित झालेला तुझा—बाळकृष्ण '

" राया, तुझ्या बिंदूचं म्हणणं मला आता हा प्रसंग पाहून आठवलं ! " अण्णा म्हणाला, " स्त्रियांच्या नाजुक परिस्थितीचा फायदा घेऊन पुरुष अनन्वित कृत्ये करतात, हें तिचं म्हणणं किती खरं आहे पाहा ! "

" अण्णा, माझ्याहि डोक्यात आता हाच विचार आला होता ! " राजा म्हणाला " पण राया, तूं कांहीं बोलत नाहींस हें कसं ? "

" आतां उद्या ह्या गोष्टीचा विचार करूं ! " असें म्हणून राया उठला. त्यावेळीं मध्यरात्रीचे बारा वाजून गेले होते. रायानें आपल्या वधूपरीक्षेची हकीकत तीन तास अगदीं खुलवून सांगितली. कादंबरीवजाच ती हकीकत होती. सर्वांच्या मनावर त्या वधूपरीक्षेचा परिणाम झाला होता. परंतु आतां

मनोहरनें आपली गोष्ट सागताच तीच आतां सर्वांच्या डोक्यांत घोळूं लागली. राया उठलेला पाहून गजाभाऊ म्हणाला, " राया, मीहि तसाच एक प्रकार पाहिला आहे तो सागूं का ? "

" नको बुवा, आतां फार रात्र झाली ! " राया आळस देत म्हणाला.

" प्रधानजी; तुमच्या अर्जाचा निकाल आतां उद्यां केला जाईल ! दरबार बरखास्त ! " असें म्हणून राजाहि उठला.

दुसऱ्या दिवशीं उठताच राया पत्र लिहिण्याकरितां बसला. तो आपल्या भावी पत्नीला पत्र लिहीत असेल, असेंच इतराना वाटलें. परंतु चहा घेण्याकरिता जेव्हा सर्व मडळी एकत्र बसली, तेव्हां राया म्हणाला, " आता हें नवीन काम आपण हातीं घेऊं. शान्ताबाईचं पत्र आपण वाचलंच आहे. ती कोणत्या संकटांत सांपडली, त्यामुळं ह्या बाळकृष्णाचा तिच्यावर शह बसला, हे आपणांस कळलं पाहिजे त्याकरितां काय करायचं तें मी ठरविलं आहे. आज आपण एक काम करू हे एक पत्र मी लिहिलं आहे. वाचून दाखवितों म्हणजे मी काय करण्याच योजलं आहे, तें तुमच्या लक्षात येईल. " असें म्हणून त्यानें हातांत घडी करून ठेवलेलें पत्र उघडलें. एका कागदाच्या चिटोऱ्यावर पेन्सिलीनें वेड्यावाकड्या दहा बारा ओळी लिहिल्या होत्या. एखाद्या स्त्रीनेंच तें पत्र लिहिलें आहे, असें त्यावरून स्पष्ट दिसत होतें. रायानें वाचून दाखविलें, ' माझा नाद सोडा म्हणून सागतें पण तुम्ही ऐकत नाहीं, तेव्हां मी तरी काय करूं ! मला कसं बरं येता येईल ! पण गडे, मला दिवाळीला कोणता दागिना देणार आहांत ! मला दागिन्याची भारी हौस आहे. आपल्या गळ्यात चंद्रहार असावा, मोहनमाळ असावी, हातात भारी बांगड्या असाव्यात,—पायांत भरीव तोडे असावेत कानात मोठ्या मोत्यांचीं कुडीं असावींत,—अस मला सगळ असावं, असं वाटतं ! तुम्हीं मला बांगड्या आणि कुडीं ह्या दिवाळीकरतां द्याल का ! केव्हां देणार ! माझी हौस तुम्ही पुरवालना !—' हा इतकाच मजकूर मी ह्या पत्रांत लिहिला आहे. भेटण्याबद्दल काहींच उल्लेख केलेला नाहीं. हें पत्र मनोहरानं आज त्या बागेत संकेत स्थळीं नेऊन ठेवावं ! " असं म्हणून रायानें पुढें काय करावयाचें ठरविलें होतें, तें सर्वांना समजावून सांगितलें. सर्वांना त्याचा बेत पसंत पडला. सर्वांनीं चहा घेतल्यावर बाप्या आणि बाप्पा मंडईत भाजी आण-

ण्याकरिता जाण्यास निघाले. इतक्यांत पोष्टाच्या शिपायानें वर येऊन दोन तीन पत्रें दरवाजातून आत टाकिलीं. त्यांत एक पत्र बापूचें, दुसरें मनोहराचें आणि तिसरें रायाचें होतें. दादासाहेबानीं तें पत्र लिहिलें होते. त्यांत त्यांनीं कळविलं होतं कीं, ' बिंदूच्या वडिलांकडून—श्रीपादराव पंडित मुन्सफ यांचें साताऱ्याहून पत्र आलें असून त्यानीं मार्गशीर्ष शुद्ध दशमीचा मुहूर्त कायम केला आहे, त्यांना तीन महिन्याची रजा मिळाली आहे. एक दोन दिवसात आपली सर्व मंडळी घेऊन ते पुण्यास जाणार आहेत. सदाशीव पेठेंत ते पूर्वी रहात होते, त्याच घरांत ती मंडळी उतरतील. आपणाकरिता तेथे जवळच घर घे. आतां अवघे दोनच महिने राहिले आहेत. '

" कुणाचं पत्र आलं तें राया ? " श्रीपादनें विचारलें.

" बहुतकरून बिंदू वहिनीकडूनच आलं असावं, खर ना राया ? " श्रीपाद हासत म्हणाला.

" नाहीं—दादासाहेबाकडून तें आलं आहे ! " राया म्हणाला. " मुहूर्त मार्गशीर्ष शुद्ध दशमीचा धरला आहे. आणि दादासाहेब पुण्यात आमच्या मंडळीकरिता जागा पाहण्यास सांगतात. "

" मग राया, ही आपली जागा काय वाईट आहे ? " राजा म्हणाला, " ह्या चार खोल्या, दिवाणखाना, स्वयंपाकघर, शिवाय नळही वरच आहे ! आणखी जागा पाहिजे असल्यास बाजूचीहि माडी अद्यापि रिकामीच आहे. घरवाल्याला विचारलं तर तो आणखी खालच्या खोल्या आणि बखळहि देईल. एवढी जागा काय थोडी झाली ! त्यातून आपला वरपक्ष आहे ! "

" इतकी जागा आमच्या मंडळींना सहज पुरेल ! " राया म्हणाला.

लगेच त्यानीं घरवाल्याकडे जाऊन भाड्याचें नक्की करून जागा ठरविली. आणि त्याप्रमाणें दादासाहेबाना पत्रहि लिहिलें. दुपारीं दोन मजूर लावून रंग लावण्यासहि सुरवात केली. ह्या कामाची देखरेख करण्याचें काम गजाभाऊ प्रधानाकडे होतें. त्यानें दोन दिवसांत तें लग्नघर तयार करून घेतलें. असो.

सध्याकाळीं एक एकजण बाहेर पडूं लागला. सर्वांच्या अगोदर मनोहर बाहेर पडला. सर्वांच्या मागून राया आणि त्याच्या बरोबर पंधरा सोळा वर्षांची एक तरुणी जिना उतरूं लागली. राया कुलूप लावीत असतां ती तरुणी सरळ खालीं उतरून रस्ता चालूं लागली. तिनें सैल बुचडा बांधला असून डोक्यांत दोन फुलें खोंविली होतीं. तिच्या गळ्यांत सौभाग्याच्या मंगल

मण्याची गळसरी असून तादळी पोत होती. प्रत्येक हातांत काचेच्या तीन तावड्या बागड्या आणि दोन सोन्याच्या बांगड्या होत्या. तिच्या हाताला त्या विशेष शोभत होत्या. ती लुगडें अगदीं चापून चोपून नेसली होती. लांब काढलेला पदर खांद्यावरून किंचितहि ढळणार नाहीं, अशा बेतानें धरून तीं रस्त्यानें चालत होती. मधून मधून पायात घातलेले तोडे वर करण्याकरितां ती चालता चालता ओणवी होई. बागेला वळसा घालून ती तरुणी प्रेमळ विठोबाच्या देवळांत शिरली. जाणाऱ्या येणाऱ्यांतून जो तो त्या तरुणीकडे टकमक पाही. देवळात जाताना तिनें एकदां मागें वळून बागेकडे पाहिलें, तेव्हा तिच्या दृष्टीस कोणीं ओळखीचीं माणसें पडतांच तिनें किंचित् हास्य केलें.

त्यावेळीं बागेत ठिकठिकाणीं आमच्या रायक्लबचे मेंबर्सच बसलेले दिसत होते. त्याच्याकडे पाहून ती तरुणी हांसली याचा अर्थ काय ? हा काय बरें प्रकार असेल ? वाचकहो, ती तरुणी कोण हे कळावें, अशी जर तुमची इच्छा असेल, तर ती तरुणी कोठें जाते, काय करते, तें आपणास लांब राहून अवलोकन केलें पाहिजे. ती तरुणी देवळांत गेल्यानंतर थोड्या वेळानें बागेंत एक तरुण आला. कोपऱ्यांत एका बाजूला मनोहर बसला होता त्यानें आपल्या इतर मित्राना खूण केली. तो तरुण इकडे तिकडे फिरून हळुहळू त्या ठराविक झाडाजवळ येऊन त्या झाडाचीं पानें तोडूं लागला. नंतर आजुबाजूला एकदा दृष्टि फेंकून त्यानें फांदीच्या पोकळींत हात घातला. रायानें सकाळीं लिहिलेलें पत्र थोड्या वेळापूर्वी मनोहरानें त्या पोकळींत ठेविलें होतें, तें पत्र त्या तरुणाच्या हातीं लागलें. त्यानें तें झटकन् काढून आपल्या खिशात घातलें. पुनः तो थोडा वेळ बागेत फिरला आणि निघून गेला. त्याच्या मागून राजा निघाला. तो तरुण बागेतून बाहेर पडल्यावर समोर किर्लोस्कर थिएटराजवळ जोगळेकराच्या हॉटेलमध्यें गेला. राजा त्याच्या मागे होताच ! तो तरुण हॉटेलमध्यें ज्या टेबलावर बसला, त्याच्या मागें राजा बसला. त्यानें चहा, उसळ आणि बटाट्याचे ताजे वडे मागितले. राजानें फक्त चहाच मागविला. नोकरानें बशा आणून पुढें ठेवताच त्या तरुणानें खिशातून पत्र काढलें आणि वाचलें. त्याची चर्या आनंदानें प्रफुल्लित दिसूं लागली. राजा मागें बसला होता, तरी त्याला समोरच्या आरशांत त्या तरुणाचें तोंड स्पष्ट दिसत होतें.

पत्र वाचून झाल्यावर त्यानें थोडीशी उसळ खाल्ली, पुनः पत्र वाचलें,

नंतर एक बटाट्याचा वडा मोडून तोंडांत टाकला, पुनः तें हातांतील पत्र वाचलें, अशा रीतीनें त्यानें आठ दहादा तें पत्र पुनः पुनः वाचून नतर चहा घेऊन झाल्यावर त्यानें सीझर सिगारेटची डबी मागविली आणि त्या डबींतून एक सिगारेट काढून ती पेटविली. पैसे चुकते करून तो बाहेर पडल्यावर राजाहि त्याच्या मागे बाहेर पडला. त्यानें त्या तरुणाच्या मागें जाऊन काय काय माहिती मिळविली, ती आपणास मागाहून सर्व कळेलच! परतु ती तरुणी देवळातून देवदर्शन घेऊन बाहेर पडली असल्यास तिचा पुनः शोध लागणें कठीण पडेल, म्हणून आपण देवळाकडेच जाऊ चला.

देवदर्शन घेऊन बराच वेळ झाला, तरी ती तरुणी देवळातच रेंगाळत होती. बराच वेळ झाला, तेव्हा मनोहर देवळात गेला. त्याला पाहताच ती तरुणी पुढें आली. तिच्याकडे पाहून मनोहर म्हणाला, "मला वाटतं ती बहुधा आतां देवळांत येणार नाहीं. तिचा येण्याचा वेळ टळला. आता आपण घरीं जाऊं—" असें म्हणून तो पुढें निघाला, त्याच्यामागून ती तरुणी जाऊ लागली. गणपतीच्या देवळावरून बोळांत येताच तेथें खेळत असलेल्या मुलींकडे पाहून मनोहरनें 'ती मुलगी—तिचं नाव कमळा,' असें एका मुलीकडे बोट दाखवून त्यानें त्या तरुणीला सागितलें.

"कमा, तुझी शान्तावहिनी आहे कां ग घरांत?" त्या तरुणीनें पुढें होऊन त्या मुलीला विचारलें. तेव्हां कमा त्या तरुणीकडे पहात राहिली. तेव्हा ती म्हणाली, "तूं मला ओळखणार नाहींस, पण तुझी शान्तावहिनी ओळखतील!—जा, तिला साग कीं गोपी भेटायला आली आहे म्हणून!"

ती मुलगी खेळ टाकून धांवत आत गेली. आणि थोड्या वेळानें तिच्या बरोबर शान्तावहिनी दरवाजाजवळ आली. आपणास गोपी भेटायला आली आहे, ही गोपी कोण, हें ती पाहू लागली. तेव्हां ती तरुणी पुढें झाली आणि म्हणाली, "शाताबाई, मला तुम्ही ओळखलं नसाल. पण मी तुम्हाला ओळखलं! पण मला तुमच्याशीं काहीं बोलायचं आहे."

"खरंच नाहीं मी ओळखलं!" त्या तरुणीकडे पाहात शांता म्हणाली.

"मागून सगळं सांगतें—पण घरांत चला. दरवाजांत उभं राहून काय सागूं?" असें त्या तरुणीनें म्हणताच 'चला तर घरात,' असें म्हणून शांतानें तिला आत नेलें. तिला आंत येतांना पाहून एका म्हातारीनें 'कोण ग ती?' अशा शांताला प्रश्न केला. परंतु तिनें उत्तर देण्यापूर्वीच 'आपल्या शांता-

वहिनीची मैत्रिण आहे !' असा कमानें झटकन् जबाब दिला. अर्थातच शांताला उत्तर देण्याचें कारणच राहिलें नाहीं. खोलींत आल्यावर ती तरुणी म्हणाली, शांताबाई, मला तुमच्याबरोबर अगदीं गुप्त काहीं बोलायचं आहे !" बाजूला बसलेल्या कमाकडे ती पहात आहे, असें पाहून शांता म्हणाली, " कमा, तू जा आतां खेळायला. मग मी हाक मारीन ! "

कमा उठून गेल्यावर ती तरुणी म्हणाली, " शांताबाई, तुम्ही साप्रत एका मोठ्या संकटांत सापडलां आहात, ही गोष्ट खरी ना ! हें सकट असं आहे कीं, तुम्हाला तें स्वतःला टाळता येत नाहीं, कीं दुसऱ्याला सागतांहि येत नाहीं ! "

" मी नाहीं समजलें तुम्ही काय म्हणतां तें ! "

" तुमच्या माग कोणी बाळकृष्ण नांवाचा—

त्या तरुणीच्या मुखातून ' बाळकृष्ण ' हें नाव ऐकतांच शांताबाई दचकली. आणि ती भयभीत होऊन कावऱ्या बावऱ्या नजरेनें गोपीकडे पाहूं लागली. तेव्हां ती म्हणाली, " शांताबाई, मी तुमची मैत्रिणच आहें. तुम्हांला संकटांतून सोडविण्याकरितांच मी आलें आहें. तो दुष्ट मनुष्य तुमच्या कधींहि वाटेला जाणार नाहीं, असा मी बंदोबस्त करणार आहें ! माझ्यावर विश्वास ठेवा ! "

" पण तुम्हाला हें कस कळलं !—अगबाई, आता काय करू ! "

" भिऊं नका ! माझ्यापासून तुम्हाला मुळींच भिण्याचं कारण नाहीं ! पण तुम्ही त्या दुष्टाच्या हातीं कशा सांपडला तें मला सागा ! "

उत्तर देण्याऐवजीं शान्ताबाई रडूं लागली. गोपीनें तिची समजूत केल्यावर हळुहळूं ती बोलू लागली ती म्हणाली. " तिकडचं मी ऐकलं नाहीं—त्याची मी आज्ञा मोडली म्हणूनच मला ही घोर शिक्षा होत आहे. गेल्या श्रावण महिन्यातील ती गोष्ट ! ' मी पर्वतीला आज जाऊं का ?' " अस एका सोमवारीं मी तिकड विचारल. तेव्हा ' आज पावसाचा रंग दिसतो, आज जाऊं नकोस, ' असं मला सागण झाल ! दुपारीं शेजारच्या अंबिकाबाई पर्वतीला जाण्याकरतां निघाल्या. त्यानीं मलाहि विचारलं. मी सासुबाईना विचारलं तेव्हां त्या ' जा ' म्हणाल्या. आम्हीं दोघी निघालों. गोष्टी बोलत बोलत हां हां म्हणता पर्वतीला जाऊन पोंचलों. तो श्रावणी सोमवार असल्यामुळें तिथं फारच दाटी होती. त्या दाटींत अंबिकाबाईची आणि माझी चुकामुक झाली इतक्यात जोराचा पाऊस आला. देवळात एकच गर्दी उडाली. कितीतरी वेळ झाला,

पाऊस काहीं थांबेना आणि अंबिकाबाईहि कुठं दिसेनात! आता काय करावं म्हणून मी विचारात पडले. त्यांतून एकटीच मी कधीं पर्वतीला गेलें नव्हतें त्यामुळें आता घरीं कसं जायचं ही मला चिंता पडली! घरीं लवकर येणं झालं तर मला रागं भरणं होईल, ही भीतीहि वाटूं लागली. तेव्हा मी थोडा पाऊस कमी होताच तिथून एकटीच निघालें, अर्धा रस्ता कसाबसा मी चाललें. तोच पुनः जोराचा पाऊस लागला. मी भिजून चिंब झाले, माझ्यापुढं काहीं बायका जात होत्या. त्या मराठ्याच्या होत्या त्याच्या मागून मागून मी झप् झप् चालले होतें. घरच्या भीतीमुळ माझं मन बावरलेलं होतं, त्यात डोक्यावर सारखा पाऊस पडत होता. किती तरी वेळ मी सारखी चालत होतें. जातां जाता त्या बायका एका रस्त्याला वळल्या. त्याच्यामागून मी जात असल्यामुळं आपण भलतीकडे जात आहोंत हें माझ्या लक्षातहि आलं नाहीं. पुष्कळ पुढ गेल्या-नतर आजूबाजूला घरं दिसूं लागलीं. परंतु तीं काहीं मला ओळखता येईनात. तेव्हा मी अगदींच भ्यालें. सध्याकाळ झाली त्यांतून आपण रस्ता चुकलों, त्यामुळं गागरून जाऊन मला रड कोसळलं. माझं डोकं फिरूं लागलं आणि मला भोवळ येऊन मी पडतें कीं काय अशी मला भीतीहि वाटूं लागली. रस्त्याच्या कडेला एका घराच्या भितीला धरून मी कशीबशी उभी होते. त्यावेळीं तो मनुष्य माझ्याकडे आला. आणि मला, 'बाई तुम्हाला कुठं जायचं आहे?'--असं विचारूं लागला. मीं त्याच्याकड पाहिल आणि जास्तच हुंदके देतदेतच माझी हकीकत सागितली. मला कसब्यांत जायचं आहे, अस ऐकतांच तो आश्चर्यान म्हणाला, 'तुम्हाला कसब्यात जायचं आणि तुम्ही इकडे आलात? अरे बापरे! बरं झाल, मी तुम्हाला पाहिलं म्हणून; नाहींतर रात्रभर इथच तुम्हाला रहाव लागलं असतं मग तुमच्यावर काय प्रसग येता हरि जाणे!

"काय डामरट मनुष्य तरी!" गोपी म्हणाली, "असल्या दुष्ट माणसाना आमच्या बिंदू वहिनीनं 'डामरट' म्हटलं तें अगदीं बरोबर आहे!"

"कोण ही बिंदू वहिनी!" शांताबाईनें मध्येंच शांतपणानें विचारलें.

"तें सर्व मी मागाहून सागते, 'पण प्रथम तुमची सगळी हकीगत मला ऐकूं द्या!"

'त्यानं असं म्हणतांच मला अतिशय भीति वाटली आणि मी गयावया करीत म्हटलं 'मला घरीं पोचतं करा, मी तुमच्या पायां पडतें! तुमचे उपकार मी

जन्मभर विसरणार नाहीं ! ' तेव्हां त्यानं मला विचारलं,—' मी तुम्हाला घरीं पोंचतं करतों पण माझं एक काम तुम्ही कराल ना ! '—ह्या त्याच्या प्रश्नाला मी भांबावलेली असल्यामुळं चटकन् उत्तर दिलं—' करीन ! वाटेल तें काम करीन ! पण मला लवकर घरीं पोचतं करा ! ' तेव्हा तो म्हणाला, ' पहा बरं, घरीं पोचतं केल्यावर ओळख सुद्धां विसरून जाल ! कारण म्हणतात ना गरज सरो आणि वैद्य मरो ! '—तेव्हा मी ' नाहीं हो नाहीं अस करणार ! आज सोमवार आहे, शिवाला स्मरून सागते, मी खरंच तुमचं काम करीन ! पण मला लौकर घरीं पोचतं करा. ' मीं वेड्यासारखी शपथ घेतली ! गागरून गेलेल्या माझ्या मनाला आपण काय म्हणत आहोत, याची सुद्धा शुद्ध नव्हतीं. मग त्यानं माझं नांव विचारलं. नंतर आम्ही दोघंजणं चालू लागलो त्यानं छत्री उघडून माझ्यावर धरली होती. मी सारखी झपूझप् पावले उचलीत होते. वाटेंत कितीदां तरी त्याचा मला धक्का लागला परंतु त्याच्या मनात पाप आहे अशी मला कल्पनाच नव्हती. बरंच चालून गेल्यावर वाटेंत आम्हाला एक रिकामा टांगा भेटला. तेव्हा त्या टाग्यांत त्यान मला बसायला सागितलं. तेव्हा ' माझ्याजवळ पैसे नाहींत. ' असं मी म्हटलं. त्यावर— ' तुमच्याजवळ पैसे नसले तरी माझ्याजवळ आहेत ना ! तुम्ही बसा टाग्यांत !' — मी टाग्यात बसल्यावर तो माझ्या शेजारीं बसला आणि पाऊस लागूं नये म्हणून त्यानें मेणकापड लावून घेतलं. कसब्यांत गणपतीच्या देवळाजवळ जाऊं दे ' अस गाडीवाल्याला सागतांच त्यानं टागा हाकला. गाडींत बसल्यावर माझ्या डोक्यांत सारखे विचार येत होते. ' तिकडनं लवकर घरीं येणं होऊं नये म्हणून ' मी सारखी देवाला आळवीत होते. इतक्यात माझ्या शेजारीं बसलेल्या त्या माणसानं माझ्या मांडीला हात लावला. त्या बरोबर माझ्या सर्वांगावर भीतीचे रोमाच उभे राहिले ! मी चटकन् वळून त्याच्याकडे पाहिलं, तेव्हा त्याची चर्या मला चमत्कारिक दिसली. तो मला म्हणाला, ' आतां ही ओळख विसरणार नाहींस ना ? तुझी माझी अशी भेट व्हावी, हा ईश्वरी योगायोगच होता. वाटेल तर तूं आता मजबरोबर माझ्या घरीं चल. हें ओलं लुगडं सोडून दुसरं नेस, मग तुला मी घरीं पोचवीन ! मी अगदींच गोंधळून गेलें. मी काहीं बोलत नाहीं असं पाहून तो म्हणाला, ' मग काय टांगा माझ्या घरीं न्यायला सांगूं ना ? " त्याबरोबर मी म्हटलं ' नको नको ! मला घरीं पोचतं करा ! ' तेव्हां ' जशी तुझी मर्जी ! ' असं बोलून तो बराच

वेळ गप्प होता. आता माझ्या मनात त्या मनुष्याविषयीं शंका कुशंका येऊं लागल्या. थोड्या वेळानं तो म्हणाला, ' मग शांता, मला तूं केव्हा भेटणार ? मी उद्यां तुझ्या घरीं येऊं का ? तूं सागशील तेव्हा मी घरीं येईन. ' त्यावेळीं मी त्याचं बोलणं खोडून काढण्याऐवजीं भीतीनं गप्पच राहिलें. माझी दातखिळी बसल्यासारखी झाली ! तेव्हां तो पुढें म्हणाला, ' तुला जर माझी घरीं भेट घेतां येत नसेल तर मी सागतों अस कर. उद्या संध्याकाळीं पाच वाजता प्रेमळ विठोबाच्या देवळात ये म्हणजे मग आपण बोलूं ' इतक्यात आमचा टागा बुधवार चौकांत आला. "

" पण त्यावेळींच तुम्ही त्याला ' मी येणार नाहीं, असंच सागायला पाहिजे होतं ! " गोपी म्हणाली.

" होय हो ! मलाहि आता असच वाटतं ! पण त्यावेळीं काय झालं असेल तें असो ! मी त्याच्या आहारींच गेलें ! पुढें कसब्यात गणपतीच्या देवळाजवळ येताच टागेवाल्यानं टांगा उभा केला. मी खालीं उतरत असताना त्यानं टांगेवाल्याला रुपया दिला आणि माझ्या मागून येऊन तो मला म्हणाला, " शाता उद्या देवळांत येशील ना ? तूं जर आलीस नाहींस, तर मी घरीं येईन हो ! '—त्यावेळीं घर जवळ आलं असल्यामुळं आपल्याला कोणी पाहील, या भीतिनं ' मी येईन पण आपण येऊं नका ! ' अस म्हणून मी झटकन् तेथून निसटलें. थोडी पुढं गेलें नाहीं, तोंच अंबिकाबाई दिसली. ती देखील माझ्यासारखीच पावसानं चिब भिजली होती ' अग शाता, तूं होतीस कुठं बाई ? मी तुला कितीतरी शोधलं ! ' अस म्हणाली. तेव्हा ' आपली चुकामुक झाली होती, असं सासूबाईंना सागूं नका हो, नाहीं तर त्या रागावतील ! असं म्हणून मी चटकन् घरांत शिरलें. मला भिजलेली पाहाताच सासूबाई प्रथम रागावल्या, पण म्हणाल्या, ' जा लवकर लुगडं बदल ! अजून कचेरींतून कोणी आलं नाहीं म्हणून बरं झालं ! हें सासूबाईचं भाषण ऐकून मलाहि धीर आला. मी झटपट लुगडं बदललं आणि केस तसेच पुसून बाधले व कामाला लागलें. त्या रात्रीं मला मुळींच झोंप लागली नाहीं. उद्या आपण देवळांत जाऊच नये, असंच मला राहून राहून वाटे. परंतु आपण गेलों नाहीं, तर तो घरीं येईल. ही मला जबरदस्त दहशत होतीच ! मला कांहीं सुचेना. तिकडच्या कानावर ही गोष्ट घालावी असं वाटे, आणि पुनः तिकडून रागं भरणं होईल, याचीहि भीति वाटे. दुसऱ्या दिवशीं

मला अन्नसुद्धां गोड लागलं नाहीं. मुकाट्यानं ठरविल्याप्रमाणं संध्याकाळीं मला देवळात जावंच लागलं. तो माझी वाट पहात देवळांत उभा होता. ”

“ आता सर्व आलं माझ्या लक्षात ! ” गोपी म्हणाली. “ त्या दुष्टानं तुम्हाला अशा रीतीनं पकडींत पकडलं काय ! ”

“ होय हो ! त्या दिवशीं तो कांहींच्या कांहींच माझ्याशीं बोलला त्याचा माझ्या मनावर इतका परिणाम झाला कीं, घरीं आल्यावर मी आजारीं पडलें. महिनाभर मी अगदीं बिछान्याला खिळून होतें. तापात मी बरळत दचकून उठे, ते पाहून डॉक्टरांनीं मला ‘ हिस्टेरिया ’ झाला असं सांगितलं.”

“ मग तो मनुष्य म्हणाल्याप्रमाणें कधीं तुमच्या घरीं आला नाहीं ना ? ” गोपीनें विचारलें.

“ नाहीं. मला त्याची आजारीपणात आठवणच नव्हती. आता पंधरा दिवसांपासूनच मी हिंडूं फिरूं लागलें. एकदां मी दुपारी दरवाजात उभी होते. तेव्हां त्याला रस्त्यात पाहिलं. त्याबरोबर मला भीतीच वाटली. घरात येईल या भीतीनं मी तिथंच उभी राहिले. त्यावेळीं सासूबाई आणि आत्याबाई झोपल्या होत्या म्हणून बर झालं, तो जवळ आल्यावर म्हणाला, शाता, तूं आजारी होतीस. हें मला कळलं. मी रोज इथं चक्कर मारून जाई, तुला ज्या डॉक्टरचं औषध चालूं होतं, त्या डॉक्टरकडे मला खोकला झाला आहे असा बहाणा करून औषध घेण्याकरिता गेलों आणि गोष्टीवरून गोष्ट काढून तुला काय झालं आहे, तें त्याला विचारलं. तू आजारी होतीस पण मला एक दिवसहि चैन पडत नव्हतं ! ’ इतक्यात घरांत सासूबाई उठल्या असतील असा मला संशय येऊन मी घाईघाईनें म्हटलें, ‘ तुम्ही आतां जा, सासूबाई उठल्या. मी उद्या देवळांत भेटेन. ’ मी घरात आल्यावर आपण त्याला भेटण्याचं कबूल केलं, हें वाईट केलं असं माझं मन मला सांगूं लागलं. मी पुष्कळ विचार केला, पण त्याच्या कचाट्यातून सुटायला मला कांहीं मार्गच दिसेना. दुसऱ्या दिवशीं मी देवळांत गेलें, तेव्हां मी परोपरीनें त्याची समजूत करून पाहिली. पण तो कांहीं ऐकेना. तो म्हणाला ‘ तुला माझ्याशीं फार वेळ बोलत उभं राहता येत नाहीं. तेव्हा मी उद्यां सर्व पत्रानं काय करायचं योजलं आहे, तें तुला कळवीन. ’ असं म्हणून त्यानं मला बागेंतील एक झाड दाखविलं —‘ झाडाच्या फादीला पोकळी आहे, तिथं मी उद्यां पत्र ठेवून जाईन ते तूं उद्यां संध्याकाळीं येऊन घेऊन जा आणि परवां देवदर्शनाला येशील,

त्यावेळीं त्याचं उत्तर तिथंच ठेऊन दे म्हणजे मला ते मिळेल. त्यामुळं कोणा-लाहि संशय येणार नाहीं आणि तुलाहि आपल्या घरच्या मंडळीची भीति बाळगण्याचं कारण नाहीं!'—मी 'होय' म्हटलं आणि तेथून कशीबशी निसटलें. 'धरलं तरी दंश करतं आणि सोडलं तरी दश करतं!' अशी माझी कैचींत सांपडल्यासारखी स्थिति झाली झाली. अशा रीतीनं आज आठ दिवस झाले. आमचा पत्रव्यवहार सुरू झाला. त्यान मला पाठविलेलं पहिलं पत्र अतिशय हिडीस लिहिलं होतं. पण मी तो आपला उपकारकर्ता आहे, हें न विसरता त्याला समजुतीचं उत्तर लिहिलं. पुनः त्याच उत्तर आलं तेहि तसंच! तिसऱ्या पत्रात त्यानं मला सल्ले पाठवून दागिन्याची लालूच दाखविण्याची सुरवात केली. पण मी ते सल्ले परत केले."

"आता आलं माझ्या लक्षांत!" गोपी म्हणाली.

इतक्यांत 'दादा आला, दादा आला असें ओरडत कमा आत आली, तेव्हां शांताबाई झटकन् उठून उभी राहिली.

"मी उद्या दुपारीं येईन आणि सर्व काहीं सांगेन. आता जाते मी!" असें म्हणून गोपी जाऊं लागली, तेव्हा शांताबाईनें कोनाड्यातील कुंकवाची डबी घेतली व कुंकूं लावलें.

वाचकहो, ही गोपी कोण होती, हें तुमच्या लक्षात आले असेलच. नसल्यास तिच्या पाठीमागून चला म्हणजे तुम्हाला आपोआप कळेल. शांताबाईच्या घरातून बाहेर पडल्यावर ती रस्त्यानें चालू लागली. नाक्यावर येतांच तेथें उभा असलेला मनोहर तिच्याकडे पाहून किंचित् हंसला परंतु तो कांहीं एक बोलला नाहीं. मनोहरबरोबर ती तरुणी मंडळींच्या बिऱ्हाडीं आली. ती वेळ दिवे लावण्याची होती. मनोहर आणि ती तरुणी जिना चढत असताना त्यांच्या मागून राजा आला. ते तिघे वर चढून दिवाणखान्यात आल्यावर तेथें बसलेल्या मंडळीकडे पाहून राजा म्हणाला, "राया, आतां ह्या वहिनीबाईंना काय नाव द्यायचं? कारण एकदा ह्या 'गोपीकाबाई' होत्या, नंतर त्या 'इंदिराकाकू' झाल्या. मागून 'भामिनी' झाल्या आणि एकदां 'चंद्रकला' झाल्या. अशा ह्या पांचपन्नास नावानीं ओळखण्यापेक्षा आता एक ठराविक नाव ठेवूं!"

"पण आता माझं नांव 'गोपी' आहे हो!" हंसत आणि मुरडत गोप्या म्हणाला. कारण तो स्त्री वेष घेतलेला गोप्याच होता! रायानें त्याला खाली

बसायला सागून काय काय हकिकत घडली, ती सागण्यास सांगितलें. तेव्हां गोप्यानें क्रमाक्रमानें सर्व वृत्तांत शाताबाईनें सांगितला तसा सागितला, आणि आपणास उद्यां तिच्या भेटीला गेल पाहिजे हेंहि सागितलें. नतर राजा आपली हकिकत सागू लागला. बाळकृष्णाच्या मागे जाऊन हॉटेलात चहा घेतल्यावर आपण त्याच्या मागें कोठें कोठें फिरलों, तें सागून तो म्हणाला, " सिगारेट ओढीत ओढीत ती स्वारी हॉटेलमधून बाहेर पडल्यावर बुधवारातून मोती-चौकाकडे निघाली. वाटेंत त्याला दोघेचौघेजण भेटले परतु प्रत्येकाच्या बरोबर बोलण्यासाठीं अर्धा मिनीटहि थाबला नाहीं. मोतीचौकांत तो एका सराफाच्या दुकानात चढला. दुकानदारानें ' या बाळासाहेब ! ' असं म्हणून त्याच स्वागत केल. तो वर चढून शेटजीजवळ बसल्यावर मी दुकानाकडे पाठ करून रस्त्यावर उभा राहिलों. तेव्हा त्याचा पुढील संवाद कानीं आला. ' शेटजी, तुमच्या दुकानावर नक्षीच्या बागड्या तयार आहेत काय ? ' बाळकृष्णान विचारलें. "

" तयार नाहींत पण तयार करून देऊ.—किती वजनाच्या पाहिजेत ? शेटजींनीं उलट विचारलें. "

" किती वजनाच्या असतात ? " बाळकृष्णानें प्रश्न केला.

" कोणी आठ तोळ्याच्या करतात, कोणी दहा तोळ्याच्या करतात तर कोणी बारा तोळ्याच्याहि करतात ! शेटजींनीं उत्तर दिलें. "

" मग मला बारा तोळ्याच्या पाहिजेत. त्या बागड्यावर उत्तम नक्षीकाम पाहिजे ! " बाळकृष्ण म्हणाला.

" उत्तम नक्षी पाहिजे असेल तर उत्तम मजुरी द्यावी लागेल. जसा मजु-रीचा दाम तसं काम ! " शेटजी म्हणाले.

" जास्त मजुरी पडली तरी कुच फिकीर नाहीं !—वर शेटजी तुमच्या दुकानावर मोठ्या, गोल आणि पाणीदार मोत्याचीं कुडीं तयार आहेत काय ?"

" तयार नाहींत पण तयार करून देऊं.—मोतीं दाखवूं का ? असें म्हणून शेटजीनें पेटी उघडली आणि त्यांतून काहीं तावड्या फडक्याच्या पुरचुंड्या बाहेर काढल्या. त्यापैकीं काहीं नमुने बाळकृष्णाला दाखविल्यावर त्यानें एक पसंत केला. तेव्हां शेटजी म्हणाले " हे चवदा मोतीं साडे तिनशेंचे आहेत ! "

" ठीक आहे. ह्याच मोत्याचीं कुडीं बांधा ! उद्या सध्याकाळपर्यंत मला बांगड्या आणि कुडीं तयार करून पाहिजेत ! "

" उद्या ! " आश्चर्यानं शेटजी म्हणाले, " नक्षीच्या बांगड्या एका दिवसात होणं कधीं तरी शक्य आहे काय ? रात्रीचा दिवस केला तरी कमींत कमी चार दिवस लागतील ! "

" मग असं करा, उद्यां दुपारपर्यंत हीं कुडीं तयार करून ठेवा; आणि बारा तोळ्यांच्या बांगड्या, चार तोळ्याची मोहनमाळ आणि चार तोळ्याचा चंद्रहार हे जिन्नस पुढल्या बुधवारला तयार पाहिजेत. मी उद्यां ह्या कुड्यांचे पैसे देईन आणि बाकीच्या दागिन्याबद्दल चेक देईन. पण किती रक्कम होईल ? "

" सर्व मिळून हजाराच्या घरांत आकडा जाईल ! "

" कुच फिकीर नहीं ! असें म्हणून बाळासाहेब उर्फ बाळकृष्ण उठला. शेटजींनीं त्याला पान खाण्याचा आग्रह केला परंतु पान न खाता सिगारेट पेटवून तो खालीं उतरला. बुधवारात आल्यावर त्याला दोन मनुष्यें भेटलीं. त्यापैकीं एकजण त्याला हातवारे करीत म्हणाला, अरे बाळकृष्ण, तूं आहेस कोठें ? आम्ही घरीं गेलों होतों, तेव्हा तुझा मामा तुझ्या नावानं सारखा कोकलत होता ! ' "

" त्या थेरड्याला कोकलायला काय झालं ? " बाळकृष्ण म्हणाला." बरं पण आता तुम्ही कुठं चाललांत ? "

" जरा इथंच थोडं काम आहे. पण तूं कुठं चाललास ? "

" मी आता लक्ष्मीविलास सिनेमाला जातों, तुम्ही लवकर या. मी तुमची वाट पहातों—असं म्हणून बाळकृष्ण निघून गेला, "

" मग तूं त्याच्या मागं गेलास नाहीं वाटतं ? " मध्येच रायानें विचारलें.

" नाहीं ! " राजा म्हणाला. " त्याला सोडून मी त्या दोघांच्या मागं गेलो, आणि त्यांना हळूंच विचारलं,—' काय हो हा बाळकृष्ण कोण ? ' तेव्हा त्यापैकीं एकजण म्हणाला–' का बरं ? ह्या बाळ्ष्णानं तुम्हाला गंडा दिला कीं काय !–सांभाळा हो ! केव्हा टोपी घालील तें समजायचं नाहीं ! बाळ मोठं गुणी आहे ! मामाला सारखा लुबाडतोय लेकाचा ! " '

" तसं काहीं नाहीं ! " मी म्हणालों. ' पण म्हटलं हे बाळकृष्णपंत कोण, हे माहीत असलेलं बरं ! काय हो, त्याचे मामा कोठले ? ' "

" मावे सरदार त्याचे मामा ! बुरजाजवळ तो वाडा आहे तो ! त्या

सरदारसाहेबानीं स्वतःला मुलबाळ नाहीं म्हणून एक दत्तक घेतला. त्यान चार वर्षे उधळपट्टी केली आणि तो मरून गेला. आता ह्या भाच्याला जवळ केल आहे. ह्या म्हाताऱ्याचा पैसा असाच जाणार ! आणि ती लक्ष्मी टिकावी तरी कशी ? म्हाताऱ्याच्या कजुषपणामुळ इतकीं वर्षे कोंडून राहिलेली ती लक्ष्मी ह्या मार्गान बाहेर पडत आहे ! नूतन मराठी विद्यालय बांधण्याकरिता मंडळी मदत मागण्याकरिता गेली, पण म्हाताऱ्यान एक पै दिली नाहीं. [illegible]र्व्यानीं आश्रम बांधला, तेव्हा किनीतरी बड्या मंडळींनीं भीड घातली, पण छे, ह्या कंजुष मारवाड्यानं कधीं कुणाला हात उचलून दिल आहे, अस नाहीं ' मग ही कोंडलेली लक्ष्मी नाहीं का बाहेर पडणार ! ' ”

“ त्यानं दिलेली, माहिती आपणास पुष्कळ झाली अस मी समजून तेथून निघालों आणि तसाच लक्ष्मीविलास सिनेमाकडे वळलों. तिथ दरवाजात बाळोबा उभे होतेच ! थोड्या वेळात एक पात्र तिथ आलं. बोलून चालून कसबीण ती ' तिन बाळोबाला पाहताच इतक्या मंडळीसमक्ष नाना प्रकार केले. ती मुरडली काय, हासली काय अन् मान मोडून लचकली काय, मंडळींना ती एक मौजच झाली. एक ‘ क्ष ’ मनुष्य बाळोबाजवळ जाऊन म्हणाला, ‘ बाळासाहेब, ह्या उडवून ! पाहता काय ? पाखरू पिंजऱ्याबाहेर पडल आहे ! अगदीं काळजाचा लचका तोडून नेत ! ’ तेव्हा बाळोबान विचारल, “ ही ती दाणे आळीतली मोहना ना ! ”

“ ‘ मोहना नाहीं–मोहनप्यारी म्हणा ! ’ तो मनुष्य म्हणाला, “ आज महिना झाला, ती तुमचीच चौकशी करते. मला काल कळलं तेव्हा मी तिला इथ यायला सांगितलं ! कारण मला माहिती की तुम्ही इथ सिनेमाला रोज नियमान येता म्हणून ? ’ त्याचं हे भाषण ऐकून बाळोबा हुरळले. अलीकडे ते बड्या सरदाराचे वारस म्हणून जाहीर झाले होते, त्यात त्याचा रंगेलपणाहि प्रकट होत होता. तेव्हा अशा उल्लू गर्भश्रीमंत तरुणाना आपल्या जाळ्यात पकडण्यास ‘ क्ष ’ माणसासारखीं काहीं माणस नेहमीं टपलेलीच असतात ! बाळकृष्णाबरोबर बोलत असलेला मनुष्य तशाचपैकीं होता. त्यानं बाळोबाला अस खुलवून आणि चढवून सांगताच बाळोबाच लोणी विरघळू लागल. त्यान झटकन् खिशातून पाच रुपयाची नोट काढून त्या मनुष्याजवळ दिली आणि त्याला सांगितल, “ मग काय ती मोहनप्यारी सिनेमा पाहायला आली आहे काय ? बाक्सचीं टिकिट काढ आणि बसव तिला नेऊन आत ! ' ”

" आणि तुम्ही नाहीं का येत ?—वाः महाराज ! तुम्ही नाही मग काय उपयोग ?—तुम्हीं याल तर ती बसेल ! "

" ' बर मी येतो ' असे म्हणून बाळोबा आत जाऊन बॉक्समध्ये बसला. थोड्या वेळानं ती मोहन प्यारी, तिच्या बरोबर एक कुणबीण आणि तो मनुष्य आत गेले. बाळोबाच्या अगदीं जवळ त्या गादीच्या कोचावर बसताना तिन हजार नखरे केले ! मग मी फार वेळ तिथं उभा राहिलो नाहीं. सिनेमा सुरू झाला आणि मी परत आलो ! "

दुसऱ्या दिवशीं गोप्यानें कबूल केल्याप्रमाणे तो शांताबाईला भेटण्याकरितां गेला. आदल्या दिवसासारखाच त्यान स्त्रीवेष घेतलेला होता. मात्र आज लुगडे बदलून तो नेसला होता. मनोहरानें त्याला नेऊन शांताबाईच्या घरापर्यंत पोचते केलें. शांताबाई गोप्याची वाटच पहात होती. गोप्याच्या—तो वेष घेतलेली स्त्री आहे, असा तिला किंचितहि संशय नव्हता. आणि असा तिला संशय तरी यावा कसा ? गोप्यानें त्याला वेषच तसा बेमालूम दिला होता. गोप्या येताच शांताबाईनें तिच हास्यमुद्रेन स्वागत करून त्याला आपल्या खोलींत नेलें. ती दुपारची वेळ असल्यामुळे शांताबाईची सासू आणि आत्याबाई झोपल्या होत्या. कमू शेजारच्या घरीं मुलीच्या बरोबर खेळण्याकरिता गेली होती. दोघी मैत्रिणी एकत्र बसल्यावर शांताबाई म्हणाली, " कालपासून मी विचार करते, पण तुम्हाला कधीं पाहिल्याच मला स्मरतच नाहीं. "

" कधींच जर मला तुम्ही पाहिलं नाहीं, तर मग स्मरणार कुठून ? " हासत गोप्या म्हणाला, " आम्ही आठ दिवसच झाले, पुण्यात येऊन ! दादाचं मार्गशीर्षात लग्न आहे म्हणून आम्ही सर्वजण सांगलीहून आलों. चार दिवसापूर्वी मी आणि दादा सध्याकाळीं फिरण्याकरिता बाहेर पडलों. इथ फुटक्या बुरुजाजवळच आम्हीं उतरलों आहोंत. कुणाचा वाडा आहे, तो नाही बाई मला माहीत ! पण मी तुम्हाला एकदा घरीं घेऊन जाईन ! पण तें असो. त्या दिवशीं फिरायला बाहेर पडल्यावर कोपऱ्यातील बागेत गेलो. तिथ बसलों असता मी तुम्हाला देवळात जाताना पाहिलं ! काय असेल तें असो ! तुम्हाला पाहताच तुमची ओळख व्हावी, मैत्री व्हावी, असंच मला वाटू लागलं ! तुम्ही थोडा वेळ इकडे तिकडे पाहून बागेत आला. आणि एका झाडाजवळ फुल तोडू लागला ! "

"त्याच झाडाच्या फांदीला पोकळी आहे, तिथं मी पत्र ठेवायला गेलें होतें.!"

"होय माझ्या तें लक्षात आलं! कारण मी तुमच्याकडेच पहात होतें. तुमचं मात्र मजकडे लक्ष नव्हतं! तुम्ही तिकडं कांहींतरी ठेवलं, असा मला आणि दादालाहि संशय आला. कारण तोहि तुमच्याकडे पहात होता. तुम्ही निघून गेल्यावर दादानं उठून तिकडे जाऊन बारकाईनं पाहिलं तेव्हा, तुमचं त्याला तुमचं पत्र आणि त्या पत्रांत सल्ले सापडले. पत्र वाचल्यावर आम्ही विचार केला तुम्ही कोणत्या तरी संकटात सापडलां असतां कोणीतरी दुष्ट मनुष्य तुमच्या परिस्थितीचा फायदा घेत आहे, असं आमच्या लक्षांत आलं! तुम्ही निघून गेल्यावर थोड्या वेळानं तो दुष्ट मनुष्यहि त्या बागेंत आला. आम्ही प्रथम त्याला ओळखलं नाहीं. आणि ओळखणंहि शक्य नव्हतं. परंतु जेव्हा तोच त्याच झाडाजवळ जाऊन इकडे तिकडे पहात, पान तोडूं लागला, तेव्हा आम्हाला संशय आला. आणि तो संशय खराहि ठरला! त्यानंहि तिथं एक पत्र ठेवलं. तो निघून गेल्यावर दादानं तेंहि पत्र काढून आणलं. त्या दुष्टाचं तें पत्र वाचताच सर्व गोष्टी आमच्या पूर्ण लक्षात आल्या. नंतर आम्ही विचार ठरवून दुसऱ्या दिवशीं दादानं तुमच्यावर पाळत ठेवली आणि तुमचं घर पाहिलं. त्याप्रमाणं मी काल येऊन तुम्हाला भेटलें. आता दादा त्या दुष्ट माणसाची अशी खोड जिरवील कीं ह्यापुढं तो तुमच्या वाटेसहि जाणार नाहीं! तुम्ही आता मुळींच काळजी करूं नका!"

"तुमचे आणि तुमच्या दादाचे उपकार मी कधींहि विसरणार नाहीं!" अंतःकरणपूर्वक शांताबाई म्हणाली, "कसं मला त्यानं पकडींत पकडलं आहे! आठवण पडली कीं माझं रक्त आटत असतं. मी तिकडचं ऐकलं असतं तर एवढा प्रसंग कां येता. त्यांनीं मला जाऊं नको म्हणून सांगितलं असतां मी पर्वतीला गेलें, त्याबद्दल मला ही शिक्षा पोचली! असंच हो, त्या आमच्या यमूचं झालं!"

"कोण ती यमू?" गोप्यानं विचारलं.

"आमच्या शेजारीं—आम्ही पूर्वी गणेश पेठेत रहात होतों, तिथं शेजारीं ही यमू होती. घरांत सासू सासरा, नवरा, दीर असं भरलेलं घर! एकदां ती सोमवार पेठेंत हळदी कुंकवाला गेली होती. तेव्हां वाटेंत तिची मूद हरवली. आता सासू ओरडेल, नवरा मारील, म्हणून भयभीत होऊन सर्व

रस्ता शोधूं लागली. बिचारी गरिब गाय! चारदां तिनं ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत चकरा घातल्या पण मूद काहीं मिळाली नाहीं, त्यांतून संध्याकाळ झाल्यामुळ तर रस्ताहि दिसेना. तिथं पारावर एक मनुष्य बसला होता. त्याला ती मूद सापडली होती. परतु तो काहीं बोलेना. सध्याकाळ झाली तेव्हां ती अगदी रडकुंडीस आली, तें पाहून तो म्हणाला, 'तुझ काहीं साडल आहे काय?'—'होय बाबा, माझी मूद साडली आहे. शोधते पण कुठंच मिळत नाहीं. 'तेव्हां तो मनुष्य म्हणला, 'मी शोधून दिली तर मला तूं काय देशील?'—'काय देऊं? माझ्याजवळ काय आहे! पण तुम्हाला मिळाली का? द्या हो द्या! द्या हो द्या! नाहीतर मला घरीं सासू राग भरील!' अशी तिची केविलवाणी स्थिती पाहून त्याला वाईट वाटण्याऐवजीं तिचा हात धरून तो म्हणाला, 'माझ एक काम करशील, तर तुझी मूद देतों!" तिनं चटकन आपला हात त्याच्या हातातून सोडवून घेतला. आणि ती गयावया करीत मूद मागू लागली. परतु तो मनुष्य कांहीं देईना. इकडे तर काळोखही पडला. बिचारीला घरीं जाण्याची घाई झालेली! शेवटीं त्याच्या म्हणण्याला तिला 'हो,' म्हणाव लागल!"

"अरेरे! काय ही बिचारीची दशा!" गोप्या मध्येंच म्हणाला.

"कमकुवत मनाची बाई परिस्थितींत सापडली, कीं तिचा असाच खेळखंडोबा होतो!"

"मग पुढें काय झालें तें ऐका—" शांताबाई सांगूं लागली, 'त्या चांडाळान मग तिला मूद दिली आणि उद्या दुपारीं ये म्हणून सांगितल. शिवाय माझ्या सारखीच तिला दहशत घातली. 'उद्या जर तूं दुपारीं आली नाहींस तर मी तुझ्या घरीं येईन!" बिचारी भग्न हृदयी होऊन धांवपळ करीत कशी तरी घरीं आली. दुसऱ्या दिवशीं दुपारीं त्याच्या बोलावण्याप्रमाण तिला जाव लागलं. आपण जर गेलों नाहीं, तर तो आपल्या घरीं येईल, आणि मग सर्वत्र अनर्थ उडेल, एवढ्याकारितां ती मुठींत जीव धरून गेली. त्यावेळीं तिच्या मनाची काय स्थिति झाली असेल, याची मला पूर्ण कल्पना करतां येते. त्या दिवशीं संध्याकाळीं मी सहज तिच्या घरीं गेलें होतें. तेव्हां तिची ती काळवंडलेली चर्या पाहून मी तिला विचारलं, त्या बरोबर ती रडूं लागली. नंतर तिन मला सर्व हकिकत सांगितली. पण मी तरी काय सांगणार! होऊं नये ती गोष्ट होऊन गेली. पुढं तो मनुष्य तिला फार त्रास देऊं लागला. होतां होतां

एकदां ती गोष्ट तिच्या सासूच्या लक्षांत आली. मग काय ! तिनं आकाशपाताळ एक करून सोडलं ! नवऱ्याला ही गोष्ट कळतांच त्यानं तिला अतिशय मारली. आणि घरांतून हांकून दिलं. तिसऱ्या दिवशीं गोसावी पुऱ्यांतील एका विहीरींत तिचं प्रेत सापडलं ! ! ! ! ”

“ हर हर ! काय हा प्रसंग ! शेवटीं तिला आपल्या जीवाचा बळी द्यावा लागला ! ” गोप्या म्हणाला. नंतर थोडा वेळ इतर कांहीं गोष्टी होऊन शांताबाईनें त्याला चहा दिला. उठता उठतां गोप्या म्हणाला, “ मी एकदा तुम्हाला आमच्या घरीं न्यायला येईन. ”

“ पण तुमच्या दादांचा शरीरसबंध कोणाबरोबर जुळला आहे, तें नाहीं सागितलंत ? ” शांताबाईनं विचारलं. “ मंडळी इथलीच आहे कीं, बाहेरगांवची आहे ? ”

“ मातारचे मुन्सफ—”

“ पडित मुन्सफाची बिंदू का ? ” एकदम शांताबाईनें विचारलं, “ मग मी तिला ओळखतों ! इथं पुण्यांत ते होते. आमचे मामंजी कोर्टांत त्याच्याच हाताखालीं होते. मुन्सफ साहेबाचा आमच्या मामंजीवर अतिशय लोभ असल्यामुळं ते पुण्यांत होते, तेव्हा त्यांचा आमचा विशेष घरोबा झाला होता ! ”

“ मग तुम्ही आमच्या बिंदू वहिनीला ओळखता तर ! ” गोप्या म्हणाला.

“ मग दादानं तुमची संकटातून मुक्तता केली हें तिला कळल्यावर तिला किती तरी आनंद होईल ! ”

होईल म्हणजे ! झालाच पाहिजे ! खरंच तुमच्या दादाला बायको चागली मिळाली हो ! ”

गोप्यानें घरीं आल्यावर सर्व हकिकत मंडळीना सांगितली, तेव्हां राया म्हणाला, “ ती बिंदूला ओळते म्हणतोस ? मग हें तर एक लचांड झालं बुवा ! ”

“ यात कसलं लचांड ? ” राजानें विचारलें. “ आपण शांताबाईची ह्या हिडीस–संकटांतून मुक्तता केली, याबद्दल तिला खात्रीनं आनंदच होईल ! ”

“ आनंद होईल पण पुढं तिनं विचारलं ‘ तुमच्या गोपी वन्सं कुठं आहेत ?’ म्हणजे गोपी वन्सं कोठल्या दाखवायच्या ? ”

“ अरे ! हें एक लचाड झालं खरं ! ” गजाभाऊ म्हणाला.

संध्याकाळीं मनोहर ठरलेल्या वेळीं बागेंत जाऊन बसला. आज त्याच्या-

बरोबर दुसरे कोणीहि बागेंत गेले नव्हते. मंडळी बिन्हाडींच गप्पागोष्टी करीत आनंदानें वेळ घालवीत होती. बापूला त्याच्या वडिलांचं पत्र आल होतं. तें पत्र त्यानें एकट्या रायालाच दाखविलें होतें. त्या पत्रांत बापूच्या वडिलांनीं लिहिलें होतें कीं ' वधूची घरची मंडळी नक्की जबाब मागत असून देण्याघेण्याच बोलणं करीत आहेत. सर्व गोष्टी आपल्या आटोक्यांतल्या आहेत. तरीहि तुला विचारल्याशिवाय मला नक्की जबाब देतां येत नाहीं. मुलगी कशी आहे, ती तू प्रत्यक्ष पाहिली आहेसच ! तेव्हा तूं सागत असल्यास आम्ही ' हो ' किंवा ' नाहीं असा वधूपक्षाला जबाब देऊं ! हें वडिलांचें आलेले पत्र त्यानें रायाला दाखवून ' मी वडिलांना काय उत्तर लिहूं ? ' असें विचारले होते आणि आतांहि तो हळूच रायाला तेंच विचारीत होता. तेव्हा राया म्हणाला, " बापू तुझ्या पत्राचं उत्तर मला एकट्यालाच देतां येत नाहीं. आता सर्व मंडळी बसलों आहोंत, तेव्हां ह्या गोष्टीचा विचार करूं ! "

" छेरे राया ! माझ्या वडलांच पत्र असं तू मंडळींत वाचलस, तर हा राजा त्यावर भरमसाट टीका करायला लागेल. हा गभीर प्रश्न आहे ! आणि राजाच्या पोरकट बुद्धीला —"

" अहो वयोवृद्ध–तपोवृद्ध ढुड्डाचार्य ! सांभाळून बोला ! माझी बुद्धी पोरकट आणि लेका तुझी बुद्धी पुळचट ! " असें म्हणून राजा बाजूला वळून रायाला म्हणाला, " राया, ह्या दरबारच्या शिरस्त्याप्रमाणं तुझ्याजवळ बापूनं दिलेलं आपल्या वडिलाच पत्र विचाराकरता पुढं मांडलच पाहिजे ! ह्या गाढवाला कांहीं अक्कल नाहीं, तेव्हां आपल्याला त्याचा विचार केलाच पाहिजे ! लग्नाकरतां हुरळून आपल्या संमतिशिवाय जर एखादी घोरपड त्यानं गळ्यात बांधून घेतली, तर त्याच्याकरतां विनाकारण आपल्याहि त्रास भोगावा लागणार ! "

" राजा त्यात आपल्यालारे कसला त्रास ? " श्रीपाद म्हणाला. " त्याची बायको हिडिंबा असली, तर एकट्या बाप्यालाच तिच्यापुढ हात जोडून बसावं लागेल ! "

" आणि तुम्ही आम्ही कोरे राहूं वाटतं ? बापूच्या जगदंबेन कदाचित् वक्रदृष्टी केली, तर ती आपली ' वहिनी ' म्हणून तिच्यापुढ हात जोडून नाकदुऱ्या काढता काढतां आपला सर्वांचा जीव मेटाकुटीस येईल, हें आहे का तुम्हाला माहीत ? " हें राजाचें बोलणें ऐकून ' अशी तर गोष्ट खरीच ! ' असें

म्हणून रायानें आपल्या खिशांत असलेलें पत्र काढून मंडळीच्या पुढें टाकलें. त्या पत्रावर बराच वेळपर्यंत खल झाला. तेव्हां गंभीरपणानें राया म्हणाला, बापू, अशी घाई करूं नकोस! थोडी कळ सोस. राजानं वर्णन केलं तशी जरी तूं वधू म्हणून पसंत केलेली ती मुलगी नसली, तरी राजाच्या म्हणण्यांत अगदीं सत्यांश नाहीं, असं मात्र नाहीं! कारण हा विषय थट्टेचा नव्हे! ह्या जन्माच्या गाठीं असतात!"

"राया, मी ह्या सर्व गोष्टींचा पूर्ण विचार केला आहे." बापू म्हणाला, "मला इतकं कळतं कीं, बायको ही संसाराकरता करायची आणि तशी ती संसारी आहे, अशी माझी खात्री आहे. राजा म्हणतो, त्याप्रमाणं ती सुंदर नाहीं आणि काळी आहे ही गोष्ट मात्र खरी! त्याला आपली वहिनी सुंदर असावी असं वाटतं, त्याप्रमाणं त्याची बिंदू वहिनी सुंदर आहेच. मग ही एक वहिनी काळी असली म्हणून काय बिघडलं? मी म्हणतों, काळीच बायको चांगली! कारण लोक तरी तिच्याकड टकमक पहात राहाणार नाहींत आणि आपल्या मनात हेवादावा उत्पन्न व्हयचा नाहीं! आतां ती स्थूल आहे, ही गोष्ट खरी! कारण आईबापाच्या घरीं सुखानं बसून खायला मिळतं म्हणून तिचा देह सुटला आहे. एकदां आपल्या ह्या बाराजणाच्या रामरगाड्यांत आली कीं, कामामुळं आपोआप तिचा स्थूलपणा जाईल!"

"हा सिद्धांत मात्र नमूद करण्यासारखा आहे खरा!" राजा म्हणाला. "आमची ही लठ्ठ वहिनी आपल्या ह्या बाराजणांच्या रामरगाड्याच्या कामाच्या चरकात घातली कीं मग काय! तिच्या डोक्यावरून, गालांवरून, खांद्यावरून सारखे घामाचे ओहोळ सुरू होतील आणि असं पाणी जाऊन जाऊन ती पुढं नाजुक पुतळी बनेल खरं ना?"

इतक्यात मनोहर जिना चढून वर आला. मंडळींत येऊन बसल्यावर त्यानें आपल्या खिशांतून एक पुडी काढून रायाच्या पुढें ठेवली. रायानें ती उचलून उघडली. त्यांत सुदर मोत्यांचीं कुडीं होतीं, सर्वांनीं तो दागिना आपापल्या हातांत घेऊन पाहिला आणि त्याची तीनशें पासून साडे तीनशेंपर्यंत किंमत केली. नंतर रायानें ते पत्र उघडून वांचून दाखविलें. पत्र बरेंच मोठें होतें, म्हणून तें तेथें देत नाहीं. त्याचा सारांश असा होता कीं—'कुडीं तुला आवडतील ना? आता तुझ्याकरितां बांगड्या मोहनमाळ, चंद्रहार आणि तोडे करावयास दिले आहेत. आठ दिवसांनीं खात्रीनें तयार होतील.

हे सर्व जिन्नस मला त्या झाडाच्या पोकळींत ठेवतां येणार नाहींत म्हणून तुझी भेटच झाली पाहिजे, तेव्हा तूं बुधवारीं रात्रीं मी सांगितल्याप्रमाणें कोठे भेटशील तें जरूर लिहून कळीव. "

" कळवितों म्हणावं लेका ! बरोबर कळवितों ! " राजा म्हणाला.

रायानें एक क्षणभर विचार केल्यावर कुड्यांबरोबर बाळकोबानें पाठविलेलें पत्र पुढें ठेवून त्याने उत्तर लिहिण्यास सुरवात केली—

' प्रियकरा तुमचं माझ्यावर इतकं प्रेम असेल, अशी मला कल्पना सुद्धां नव्हती. अहाहा ! कुडीं किती सुंदर आहेत म्हणून सांगूं ! मला तीं भारी आवडलीं ! पण मला तुम्ही फसविणार नाहीं ना ? माझ्यापेक्षा एखादी सुन्दर ' मोहना ' पाहून तुम्ही मला विसरून तर नाहींना जाणार ? ह्या बुधवारीं तुम्ही दागिने आणणार आहांत म्हणता; मग तुमची भेट घेणार नाहीं असें का तुम्हाला वाटतं ? तुमच्या भेटीसाठीं मी किती उत्सुक झालें आहें म्हणून सांगूं ? माझ्या प्रियकरला भेटण्यासाठीं बुधवारीं संध्याकाळीं मी जिवाचं रान करून भेटीला येईन. मी एक जागा पाहून ठेवली आहे. तिथं आपणास कशाचीच धास्ती नाहीं. तुम्ही दिवे लागतांना या. मी आल्यावर खूण करीन. मग माझ्या मागून कोणाला संशय न येऊं देतां तुम्ही या. पुढील सर्व व्यवस्था मी करून ठेवतें. याल ना ?—मला फसविणार नाहीं ना ?–सगळे दागिने घेऊन याल ना ? पहा बरं, नाहींतर मी बोलायची सुद्धां नाहीं !–यायचंच गडे, बुधवारीं संध्याकाळीं !—पण आपण इतके बहुमोल दागिने आणणार ते मी कोणत्या वस्त्रावर घालूं ? त्या दागिन्यांना सुंदर पैठणी नको का ? –सुचवलं आहे, मग आपली मर्जी ! पण बुधवारीं यायचं हो ! '

" हें पत्र फार मोठं होईल नाहींरे राजा ? " रायानं विचारलं.

" भलतंच ! प्रियकरणींकडून आलेलं केवढंहि मोठं पत्र प्रियकराला लहानच वाटायचं ! " राजा म्हणाला " पण इतकं पत्र पाहिजेच, राया, तू एक नवीन शुक्लकाष्ट पत्रांत लिहून ठेवलेलंच आहेस ! शेंदीडशें रुपयांची पैठणी मिळवायला एखाद्या प्रियकरणीला आपल्या प्रियकरास किती तरी आळवावं लागलं असतं. त्या मानानं हें पत्र कांहीं मोठं नाहीं खास ! बाळकोबाला उल्लू बनवायला इतकं पत्र पाहिजेच पत्र वाचून त्याला गुदगुल्या झाल्या पाहिजेत ! "

मनोहर तें पत्र घेऊन गेला आणि संकेत स्थळीं तें नेऊन ठेवलं. पुढें थोडा वेळ त्यांच्या 'बाळकोबा' ह्या व्यक्तीवर गोष्टी झाल्यावर राजा म्हणाला. "हें शिजू घातलेलं अन्न बुधवारपर्यंत शिजून तयार होईल. तोंपर्यंत मंडळींनीं काय करायचं?—हो प्रधानजी, आता तुमचा अर्ज दरबारापुढ येऊं द्या!"

"महाराज, माझा अर्ज इतकाच आहे—" हात जोडून गजाभाऊ म्हणाला, "तुमच्या गैरहजेरींत आम्ही तुमच्या राज्यात बंदोबस्त करीत असतांना ज्या कांहीं गोष्टी पाहिल्या त्या खाविंद चरणीं आतां विदित करीत आहोंत!—इथं मुलींच्या किती तरी शाळा आहेत. ह्या शाळांतून जाणाऱ्या मुली—पण त्याना मुली म्हणण्यापेक्षां 'घोडमुलीच' म्हटलं पाहिजे. कारण त्यात लग्न झालेल्या कांहीं कोणी दिसत नाहींत. त्या पुढं 'गृहिणी व्हाव्या,' 'सुमाता व्हाव्यात,' ह्या उद्देशानं त्यांच्या वडील मंडळींनीं त्याना शाळेंत घातलं आहे. पण मी दोन दिवसाच्या टेहळणीवरून तेथें जो प्रकार पाहिला, त्यावरून मला असं वाटतं कीं, ह्यापैकीं बहुतेक मुली आपल्या आईबापाचं कुळ उद्धारतील आणि पुढं यदाकदाचित् त्यांची लग्न झाल्यावर सासर-माहेरच्या अशा दोन्हीं कुळाच्या मागल्या बेचाळीस पिढ्याहि त्या चांगल्याच उद्धारतील! मला वाटतं, त्या शाळा नसून मुलींनीं धागडधिंगा घालण्याचे ते अड्डेच आहेत!"

"हें पहा प्रधानजी, आमच्या ह्या पुण्यनगरींत आम्हीं मुद्दाम स्त्रीशिक्षणा-करतां घातलेल्या ह्या शाळांवर टीका करण्याचा तुम्हाला मुळींच अधिकार नाहीं!' राजा म्हणाला, "अलिकडं नुकतीच कुठं ह्या स्त्रीशिक्षणाची लोकांना गोडी लागूं लागली आहे, आणि तुम्ही अशी टीका करतां याचा अर्थ काय? लोकाना बोलायला जागा राहूं नये म्हणून आम्ही अशा शाळावर विद्वान् शिक्षक नेमले आहेत, आणि कित्येक शाळांत तर मुलांमुलींना एकत्र अभ्यास करण्याची सवलत दिली आहे. मोठमोठ्या लोकांची ह्या शाळाविषयीं किती उच्च मतं आलेलीं आहेत, तीं तुम्हीं वाचून पहाल तर तुम्हालाहि बोलायला जागा राहणार नाहीं, समजलांत!"

"ह्या बड्या लोकांनीं डोळे मिटून दिलेले अभिप्राय कुछ कामाचे आहेत! तुम्ही जरा डोळे उघडून पहा म्हणजे ह्या शाळांत चाललेले एक एक प्रकार तुमच्या दृष्टीस पडूं लागतील." गजाभाऊ म्हणाला. "येथील पोलीसचा

रेकॉर्ड काढून पहा म्हणजे ह्या शाळातील मुलींचे, मास्तरणींचे आणि मास्तरांचे कितीतरी खटले दाबादाबी करून मिटविलेले तुम्हाला दिसतील. सासून हॉस्पिटलमध्ये, तसंच पंचहौद मिशन् हॉस्पिटलमध्ये ह्या शाळातील मुलींचे आणि मास्तरणींचे, चार महिन्यांचे, सहा महिन्याचे आणि सात महिन्यांचे कितीतरी दाखले सापडतील!"

"गजाभाऊ जाऊ दे त्या गोष्टी!" राया म्हणाला, "थोरा मोठ्यानीं काढलेल्या ह्या शाळावर टीका करण्याचा आपला अधिकार नाहीं. पण तू काय सागत होतास तें सांग?"

"मी त्या दिवशीं विश्राम बागेवरून जात असताना दिवे लागण्याच्या सुमारास दोन मुली माझ्यापुढे जात होत्या. मला त्यांत काहीं विशेष वाटल नाहीं. परतु मी पाठीमागं असल्यामुळं त्या दोघींत हळूहळू चाललेला संवाद माझ्या कानी पडला. त्यामुळ त्या गोष्टींत मला विशेष वाटूं लागलं. त्या दोघी मुली वयानं चौदापासून अठरा याच्या दरम्यान होत्या. त्यापैकीं एक दुसऱ्या मुलीला म्हणाली, 'भानुमति, आता घरीं गेल्यावर मला आईनं इतका वेळ का झाला म्हणून विचारलं, तर काय सागूं?'—ह्या तिच्या प्रश्नाला भानुमतीन उत्तर दिलं, 'आज स्पेशल क्लास होता म्हणून सांग! आणि आज आपला मास्तरानीं स्पेशल क्लास नव्हता का घेतला इंदू,—आहे कीं नाहीं मास्तराच्या स्पेशल क्लासांत मजा! पण इंदू, मास्तर तुझ्याजवळ आले तेव्हां तूं इतकी घाबरलीस ग कां?'—असं भानुमतीनं विचारल्यावर इंदू म्हणाली, 'मला बाई भीतीच वाटली! पण बरं झाल त्यावेळीं कोणी परकं तिथं नाही. आता बाई मी कधीं नाहीं यायची ह्या स्पेशल क्लासला. कळल तर काय होईल?'—तेव्हां भानुमती तिच्याकडं पहात म्हणाली, 'अहाग भित्रे! तिथं पाहायला येणार कोण! येऊन जाऊन मोठ्या बाईचीच भिती ना! परका तर कोणी आतच यायचा नाहीं, मोठ्या बाईनीं तसा बंदोबस्त केला आहे आणि असा स्पेशल क्लास चालू असताना मोठ्या बाई तर तिकडे ढुंकूनही पहाणार नाहींत. आज तूं क्लासला नवीन होतीस म्हणून कांहीं विशेष प्रकार झाला नाहीं. पण पुढल्या शनिवारीं तूं जर क्लासला येशील, तर किती तरी तुला मौज वाटेल, तुला ह्या गोरे मास्तरांचा अनुभव नाहीं!'—तेव्हां इंदू म्हणाली, 'नको बाई मला तो अनुभव! जगाला कळलं नाहीं तरी—! पण जाते बाई आतां! इतका वेळ झाला! आई आणि बाबा रागावले नाहींत

म्हणजे झालं ! '—असं म्हणून ती मुलगी वळून बाजूच्या बोळात शिरली. मी क्षणभर विचार केला कीं, ह्या दोन मुलींपैकीं कोणत्या मुलीच्या मागं जावं ? भानुमतीच्या भाषणावरून ती मुलगी दिसली रंगलेली आणि इंदूच्या पोषाखावरून ती मुलगी ' होऊं घातली ' होती. प्रयत्न केला तर भानुमती सुधारेल असं मला वाटेना. परंतु इंदूबद्दल मला खात्री वाटूं लागली म्हणून मी तिच्याच मागं गेलों. ती शनवारांत मारुतीच्या देवळाजवळील वाड्यांत शिरली. चौकशी केल्यावर कळलं की भास्करराव आपटे नांवाचे सुशिक्षित सुधारक तिथं रहात असून ते अकाउंटन्ट आहेत. इंदू त्याची मुलगी असून आपल्या मुलीनं ग्राज्युएट व्हावं अशी त्याची इच्छा आहे !"

" चांगली होईल ग्राज्युएट म्हणावं अकाउंटन्ट साहेब ! " मध्येच बापू म्हणाला.

" आजचा शनवार ना ! " एकदम उठून राया म्हणाला. " आज त्याचा स्पेशल क्लास असेलच ! चल गजाभाऊ ऊठ, मला हें भास्करराव आपट्यांचं घर दाखीव ! गोप्या चल अशाच ह्या वेषांत आमच्या बरोबर तिकडे गेल्यावर काय करायचं तें वाटेंत सागतों ! " असें म्हणून रायानें स्त्रीवेषधारी गोप्याला आणि गजाभाऊला बरोबर घेतलें आणि ते तिघे घाई-घाईनें बाहेर पडले.

अद्यापि गोप्यानें स्त्रीवेष उतरविला नव्हतां, हें वाचकांच्या लक्षात असेलच ! ते तिघे झपूझप् चालत निघाले होते. वाटेंत राया गोप्याला कांहीं सागत होता. थोड्या वेळानें भास्करराव आपट्याच्या घराजवळ येताच रायानें गोप्याला आत जाण्यास सागितलें आणि ते एका बाजूला रस्त्यावर उभे राहिले. गोप्या सरळ जिना चढून वर गेला. मधल्या दालनांत कोणी नव्हतें. पलीकडच्या खोलींत भांड्याचा आवाज ऐकू येत होता. त्यावरून स्वयंपाकघरांत बायका असाव्यात असा गोप्यानें तर्क केला. इतक्यांत बाजूच्या दिवाणखान्यांतून ' हा हत्ती मारला ! ' असा आनंदाचा उद्गार त्याला ऐकूं आला. त्यावेळीं भास्करराव आपल्या मित्रमंडळीबरोबर बुद्धिबळें खेळत बसले होते. आज शनिवार असल्यामुळें ते लवकर ऑफिसातून आले होते, आणि नेहमीप्रमाणें मित्रमंडळी जमल्यावर त्यांचा खेळ सुरू झाला होता. गोप्यानें हळूंच पुढें होऊन दरवाजातून डोकावीत विचारलें, ' इंदू आहे का ? "

"कोण आहे?" भास्कररावानीं दरवाजाकडे पाहून विचारलें, "इंदू का?—नाहीं बाळ! आज ती क्लासला गेली आहेसं वाटतं? पण तूं कोण, तिची मैत्रिण का? मग तूं नाहीं गेलीस क्लासला?—कोणाची ग तू मुलगी?"

भास्करराव असे प्रश्न विचारीत आहेत तोंच दरवाजातून मोठ्यानें हुंदका ऐकूं आला. त्याबरोबर ते आणि त्याच्याबरोबर खेळणारी त्याची मंडळी दरवाजाकडे पाहूं लागली. गोप्या दरवाजात उभा राहून डोळ्याच्या आड पदर धरून एकसारखे हुदके देऊं लागला. तें पाहून भास्करराव आश्चर्यानें म्हणाले, "अग तूं रडायला का लागलीस?—इकडे ये, तुला रडायला काय झाल बाळ?"

गोप्या आंत आला आणि बाजूला उभा राहून स्फुदून स्फुदून रडूं लागला. ते रडण्याचें कारण विचारीत होते, तेव्हां थोड्या वेळानें रडण्याचा हुंदका थोडा कमी झाला. असें दाखवून गोप्या पदरानें डोळे पुशीत हुदके देतच म्हणाला, "बाबासाहेब, तुमच्या इंदूला वाचवा हो! हे मेल्या मास्तरानीं कसले स्पेशल क्लास काढले आहेत ते तुम्हाला माहीत तरी आहे का?—बाबासाहेब, अजून माशानं माणीक गिळलं नसेल हो! इंदूला अद्यापि जाऊन क्लासांतून आणवा!-हे मेले गोरे मास्तर आणि त्या मेल्या मोठ्या बाई, मेल्याचं तळपट होवो!" असें म्हणून गोप्यानें पुनः रडण्याला सुरवात केली! सर्व गोप्यानें केलेलें नाटक होतें, हें वाचकाच्या लक्षांत आलेंच असेल!

आग भडकली! भास्कररावांनीं आपल्यापुढें असलेला बुद्धिबळांचा पट भर्कन दूर फेंकून दिला व ते उठले. खुंटीवरचे कपडे घालीत घालीत "मुली रडू नको!—चला गोविंदराव गोपाळराव आणि रामभाऊ तुम्हीहि चला! ही काय अंधेरनगरी आहे, ही पाहिलीच पाहिजे!" असें म्हणून ती सर्व मंडळी उठून बाहेर पडली. भास्कररावाच्या अवसानावरून ते तेथें गेल्यावर 'एका अकांतच नाटक पुरें करतील' अशी गोप्यानें खूण गाठ बांधली. ते जिना उतरून थोडा वेळ झाला नाहीं, तोंच गोप्या हळूच बाहेर येऊन जिना उतरला. रस्त्यावर राया आणि गजाभाऊ त्याची वाटच पहात होते. त्या दोघां मित्रांनीं नुकतेंच त्या चौघांना जिना उतरून जाताना पाहिलें होतें. त्या चौघांत भास्करराव सर्वांच्या पूर्वीच खालीं उतरले होते. हातांतील काठी अवसानांत धरून पाय आपटीत त्यांना जातांना पाहून गोप्यानें आपली भूमिका बरोबर वठविली हें रायानें ताडलें. थोड्या वेळानें गोप्या जवळ

आल्यावर राया म्हणाला, " गोप्या तूं गजाभाऊबरोबर आतां बिऱ्हाडीं जा. मी ह्या मंडळींच्या मागून जाऊन भास्करराव ह्या स्पेशल क्लासाची कशी तपासणी करतात, तें पाहून येतो ! "

भास्करराव आपल्या मित्रांसह शाळेच्या मोठ्या दरवाजापर्यंत आले. दरवाजा बंद होता. आत कोणी दिसेना, असें पाहून त्यानीं आंत हात घालून आतून दरवाजाला घातलेली कडी काढली. कम्पाउन्डांत त्यांना कोणीहि दिसलें नाहीं. परंतु थोडे पुढें जाताच इमारतीच्या वरल्या माडीवरून मुलीच्या खिदळण्याचा आवाज ऐकूं आला. तो स्पेशल क्लासच चालला आहे, असें भास्कररावानीं जाणलें आणि ते सरळ जिना चढून वर आले. ज्या ठिकाणीं तो स्पेशल क्लास चालू होता, त्या स्पेशल क्लासाचा दरवाजा आंतून बंद होता. भास्करराव बाहेर उभे होते. परंतु तितक्यांतच आत काय धांगडधींगा चालला आहे, याची कल्पना झाली. त्यांचा पारा चढत चालला ! रागाच्या भरात त्यानीं हातांतील काठी दरवाजावर मारून 'दरवाजा उघडा' असें दरडावून सांगितलें. त्याबरोबर आंत मोठा गोंधळ उडाला. बाका पडल्याचा आवाज होऊन लगेच ती खोली निस्तब्ध झाली ! पुनः भास्कररावानीं जोरानें रागारागांत दोन चारदा काठी दरवाजावर आपटून दरडावलें. परंतु दरवाजा कांहीं उघडेना ! हा त्याच्या काठ्यांच्या आवाज ऐकून एक पोक्त वयाची, डोळ्याला चष्मा लावलेली बाई जिना चढून वर आली. ती दृष्टीस पडतांच रागानें लाल झालेले भास्करराव तिच्या अंगावर खेंकसून जाऊन म्हणाले, ' अग ए××× ! हा तुमचा स्पेशल क्लास का चालला आहे दरवाजा बंद करून ? दरवाजा उघडायला सांगतेस कीं, लाथ मारून दरवाजा फोडू ! "

" पण तुम्ही कोण आहांत ? " त्या बाईनें धिटाईनें विचारलें. " माझ्या शाळेच्या आवारात येऊन शिस्तीला सोडून तुम्ही हें गैरशिस्त वर्तन करीत आहांत त्याचा प्रथम मला जबाब द्या ! "

" चांडाळणी ! तुला जबाब देतों ! " असें म्हणून भास्कररावानीं आपल्या हातातील काठी उगारली. तें पाहून बाजूला उभे असलेल्या रामभाऊंनीं त्यांचा हात धरला आणि ते म्हणाले, भास्करराव शांत व्हा ! दरवाजा उघडल्यावर हा स्पेशल क्लास पाहिल्यानंतर आपण ह्या बाईंना काय तो जबाब देऊं !—बाई, दरवाजा उघडायला लावा ! ; ह्या भास्करराव आपट्यांची मुलगी ह्या स्पेशल क्लासांत बसली आहे ! "

" असेल ! क्लास संपला म्हणजे ती बाहेर येईल ! म्हणून तुम्ही माझ्या शाळेंत येऊन असं उद्दामपणानं वर्तन कराल काय ? "

" दार बंद करून स्पेशल क्लास चालले आहेत काय ? " असें त्वेषानें म्हणून भास्कररावानीं दरवाजावर लाथ मारलीच ! आता आपण दरवाजा उघडला नाहीं तर बाहेर आलेली मंडळी गोष्ट भलत्याच थराला नेतील, असें वाटून आत असलेल्या गोरे मास्तरांनीं हळूच दरवाजा उघडला. त्याबरोबर आतून ' बाबा ! ' अशी अस्पष्ट आरोळी ऐकू येऊन इंदू धाडकन् खालीं पडली. भास्कररावांनीं दरवाजांत उभे राहूनच आपल्या बेशुद्ध पडलेल्या मुलीकडे क्रूर दृष्टीनें पाहून आपली दृष्टी इतर कोपऱ्यात चोरासारख्या उभ्या असलेल्या तीन मुलींकडे वळविली. शेवटीं त्याची दृष्टि मास्तराकडे जाताच त्याच्या रागाचा बंधारा फुटला ! हातातील काठीचा एक जोरानें रट्टा मारून ते त्वेषानें म्हणाले " हरामखोरा ! कड्या लावून तुझं हें मुलींना विद्यादान चाललं आहे काय ? तुझी आतां पुरती गठडी वळवतों, तूं काय समजलास ? —अग ए सटवे, मला जाब विचारतेस ना हडळी ! ये आता अशी पुढें ? आणि दे माझ्या प्रश्नाचीं उत्तरें ! टाचेखालीं छिनून टाकतों काय समजलीस आहेस तूं ? लोकानीं विश्वासानं आपल्या पोरी तुझ्या स्वाधीन केल्या त्या अशा करता काय ? पोट जळत नसेल तर उघड जाऊन बाजारात बैस ! "

" भास्करराव, हा चिखल तुडविण्यात आता काय हंशील आहे ? " रामभाऊ पुढें होऊन म्हणाले. " आपल्या इंदूला घेऊन चला कसे इथून ! "

रामभाऊंच्या म्हणण्याप्रमाणें खरोखरीच चिखल तुडविण्यांत काहीं अर्थ नाहीं असें वाटून राया तेथून निघाला आणि आपल्या बिऱ्हाडीं आला. त्याच्या पूर्वीच गोप्या आणि गजाभाऊ आले होते. गोप्यानें मंडळींना आपण रायाच्या शिकवणीप्रमाणं भास्करराव आपल्यांच्या घरीं कोणती भूमिका केली, तें सांगितलें होतें. तेव्हां पुढें काय झालें, हें ऐकण्यास सर्वजण अत्यंत उत्सुक झाले होते. रायानें परत आल्यावर तो सर्व प्रकार सांगितला. तेव्हा गजाभाऊ म्हणाला, " राया, तूं उगाच इतक्या लवकर परत आलास ! आणखी थोडा वेळ थांबला असतास, म्हणजे तुला भास्कररावांनीं पुढें काय काय केलं त्या मास्तर आणि मास्तरणीला कसं ठेचलं तें कळलं असतं ! "

" मी परत आलों तेंच बरं केलं ! पुण्यांत ही अशी सर्वत्र घाण भरलेली आहे. ही घाण आपण किती काढणार ? "

" मरो ती घाण ! " राजा म्हणाला, " प्रधानजी तुम्ही दरबारात फिर्याद आणली, आणि तिचा तात्काळ फैसलाहि झाला ! तेव्हां आता त्या फिर्यादीवर जास्त वाटाघाट नको. बरं मनुताई, जेवण झालं का ? गोपे, ऊठ आणि ह्या पोषाखातच आमचीं ताटं वाढ—खरंच राया, आता जर तुझी बिंदू इथं आली तर तिला कोणतं चित्र दिसेल ? आपण सगळे टोळभैरव आणि ही एकटीच स्त्री आपणांत माडीला मांडी लावून खिदळताना पाहून तिला काय वाटेल ? "

" मोठी मौज होईल नाहीं ? " हांसत गोप्या म्हणाला, " पण पुढं होऊन मी म्हणेन कीं, " अहो बिंदू वहिनी अशा कपाळाला आठ्या घालून पाहू नका. मी ह्या अकरा टोळभैरव झोटिंगांची बहिण—हडळ पण तुमची गोपी वन्सं ! आहे हो ! "

मंडळी जेवीत असताना त्याचा बोलण्याचा विषय ' भास्करराव आपटे आणि त्यांची मुलगी इंदू ' हाच होता. ' किती तरी मुली आज हायस्कूलात जात आहेत बापाला आपल्या मुलीची काळजी नसते, असें नाहीं. तिनें शिकावें म्हणून तर तिला शाळेंत घातलेली असते. परंतु बिचाऱ्याला स्वतःच्या उदरभरणार्थ कराव्या लागणाऱ्या अनेक भानगडीमुळें तिच्याकडे लक्ष देण्यास वेळ होत नाहीं आणि दोन इंग्रजी शब्द येऊं लागताच शेफारून गेलेल्या मुलींपुढें बिचाऱ्या बाळबोध आईची मात्रा चालत नाहीं. त्यामुळें दोन्ही बाजूचा दाब नसल्याकारणानें मुलीचें मन मोकाट सुटतें आणि त्याचे परिणाम वर लिहिल्या प्रमाणेंच होतात ! ' रायाचें हें म्हणणें सर्वांना पटलें.

" आतां हा विचार अजिबात बंद करा आणि मी सुचवितो, त्या प्रश्नाचा आतां गंभीर विचार करा ! " बापू म्हणाला, " आतां आपल्या रायाच लग्न आलं आहे. राया आपला ' जनरल ' आहे तेव्हां त्याचें लग्न मोठ्या थाटात झालं पाहिजे, अशी माझी सूचना आहे ! "

" अरे चोरा ! " राजा म्हणाला, " बापू किती लुच्चा आहेस तूं ! रायाचं लग्न थाटात करावं, असं तूं सुचवितोस म्हणजे तुझंहि लग्न थाटमाटांत होईल, असं कां तुला वाटतं ? पाहिलंस राया कसा वस्ताद बापू आहे तो ! "

" राजा, माझ्या ध्यानीं मनीं नसतांना मी सहज बोललों, त्यांत तूं राईचा डोंगर करून दाखविलासच ! " बापू म्हणाला.

" तें कांहीं असो. " राया म्हणाला. " तुम्ही आतां प्रश्नच काढला आहे, तेव्हां

ह्या गोष्टीचा आपण विचार केलाच पाहिजे. प्रथम मी माझं मत सांगतों. मला लग्नांत थाटमाट करायचा नाहीं. फक्त वैदिक पद्धतीनें शास्त्रसंमत विवाह करावयाचा ! चार वाजंत्री लावली आणि मशाली पेटविल्या कीं लग्न होतं, असं थोडंच आहे ! थाटामाटांत पैसा खर्च करण्यापेक्षा तीच रक्कम जर एखाद्या धार्मिक आणि परोपकारी संस्थेला दिली तर तिचा सत्कार्यीं तरी व्यय होईल ! ”

“ आम्हाला तुझं मत पटलं ! ” सर्वांची एकवाक्यता झाली !

असो. बुधवारपर्यंत मंडळीच्या हातीं दुसरें कोणतेंहि काम नव्हतें. नाहीं म्हणायला मनोहरानें एक वेळ बागेत जाऊन बाळकोबानें झाडाच्या पोकळींत ठेवलेले पत्र आणले होतें. त्या पत्रात ‘ मी बुधवारीं सर्व दागिने घेऊन येईन आणि पैठणीहि आणीन पण तूं मात्र विसरूं नकोस ! ’ असें फार आळवून प्रेमाच्या ओथबलेल्या रसानें लिहिले होते. रायानें त्या पत्राचें उत्तर दोन ओळींत दिलें होते —‘ प्रियकरा, मी कसं बर विसरेन ? दिवे लावण्याच्या सुमारास मी येईन आणि खूण करतांच तुम्ही माझ्या मागून या —! ’ ह्या पत्राप्रमाणें आपल्या प्रियकराला घेऊन येण्यासाठीं दुपारीं रायानें गोप्याला पुनः स्त्रीवेश दिला, आजच्या नाटकांत कोणी कोणती भूमिका घ्यावयाची ते सर्व ठरवून रायानें ज्याला त्याला कामें वाटून दिली. अद्यापि गोप्याला प्रेमळ विठोबाच्या देवळात जाण्यास बराच अवकाश होता. इतक्यात एक गाडी येऊन रस्त्यावर उभी राहिली.

आपणाकडे कोणी मंडळी येत आहे, याची कोणालाच कल्पना नव्हती. आणि कल्पना तरी येणार कोठून ? जर मंडळींनीं बाहेरच्या माणसाशीं कोणत्याहि बाबतींत संबंधच ठेवला नव्हता, तर त्यांच्याकडे कोण येणार ? कामाशिवाय बाहेर पडावयाचें नाहीं, अशीच त्याची शिस्त होती. आपलीं कामे आपणच करावयाचीं असा त्याचा निर्धार असल्यामुळें त्यांचीं धोतरें धुण्याकरितां किंवा स्वयंपाकाचीं भाडीं घासण्याकरिता त्यांना नोकराचीहि आवश्यकता नव्हती. त्यांचें बिऱ्हाड म्हणजे त्याचें स्वतंत्र राज्य होते. त्या राज्यांत ते बाराजण वाटेल तसा धिंगाणा घालीत. परंतु आजूबाजूच्या मंडळींना काडीइतकाहि उपसर्ग पोचूं देत नसत. आतांहि मंडळीं तसाच धिंगाणा घालीत बसली होती. अशा वेळीं एक मनुष्य हळूहळूं जिना चढून वर आला. परंतु आपणाकडे कोणी येणारच नाहीं, ही ठाम समजूत

असल्यामुळें दरवाजाकडे कोणाचेंच लक्ष गेलें नाहीं. वास्तविक त्यांच्या जिन्याचा खालचा दरवाजा नेहमींच बंद असे. परंतु आज कोणाच्या तरी हलगर्जीपणामुळें तो दरवाजा उघडा राहिला, म्हणूनच त्या मनुष्याला जिना चढून वर जाता आलें. जिना चढतांना त्याला वर मंडळींत चालू असलेली थट्टामस्करी ऐकू आली, म्हणून त्यानें हळूच दरवाजाच्या फटींतून डोकावून आंत पाहिले. आतील प्रकार त्याला स्पष्ट दिसला. तेव्हां त्यानें एक सुस्कारा सोडून तो मुकाट्यानें त्याच पावलीं मागे फिरला.

" आहेत का वर ? झाली का भेट ? इथंच ना राहतात ? " तो मनुष्य गाडीजवळ येताच आंत बसलेल्या स्त्रीनें विचारलें.

" होय–प–ण—! "

" पण काय ?—असे थाबलात का मामा ?—सागा, नाहींतर मी वर जाऊन पाहून येतें. "

" नको—बिंदू, तूं मात्र वर जाऊं नकोस ! आता इथून घरींच परत जाणं चागलं ! "

" कां पण ? मी वर कां जाऊं नको ? वर काय भानगड आहे, ती मला कळलीच पाहिजे. मी वर जाणार आणि वर काय प्रकार आहे, तो स्वनेत्रांनीं पाहणार ? " असें म्हणून मामाच्या उत्तराची वाट न पाहतां बिंदू गाडींतून खालीं उतरली.

ही बिंदू कोण, हे वाचकानीं ओळखलेंच असेल ! मुन्सफ पंडित आपल्या मडळीसह रजा घेऊन पुण्यास गेले आहेत, हें दादासाहेबांनीं रायाला पाठविलेल्या पत्रात लिहिलें होतें, त्याची वाचकांना आठवण असेलच ! नतर त्या पत्राला उत्तर देतांना ' आपल्या मंडळींसाठीं घर भाड्यानें घेतले ' असें रायाने कळवितांच दादासाहेबानीं मुन्सफांना पत्र लिहिलें, कीं ' आम्हीं पडक्या बुरुजाजवळ घर भाड्यानें घेतलें आहे. बाळासाहेब तेथेंच आहे. बुधवारीं सौभाग्यवतीला घेऊन मी येतों. मागून दोनचार दिवसांत कोल्हापूराहून आई आणि भावजय तेथें येईल. ' असें पत्र मुन्सफसाहेबांना आल्यावरून वहिनीला—दादासाहेबांच्या पत्नीला—भेटण्याकरितां बिंदू आपल्या मामाला बरोबर घेऊन निघाली. आपल्या मुलीनें लग्नापूर्वी तेथें जाऊं नये, अशा मताचे मुन्सफसाहेब नव्हते. त्यांनीं मुलीला योग्य तेंच स्वातंत्र्य दिलें होतें. तिच्या एकंदर विचाराच्या दिशेवरून वाचकांना

त्याविषयीं खात्री पटलीच आहे! असो. बिंदूहि हळूच वर आली. मामानें असा कोणता प्रकार वर पाहिला, तो प्रकार आपणांहि मुकाट्यानं पहावा, अशी तिची इच्छा होती. ती जिना चढत असतांना पुढील वाक्ये तिला स्पष्ट ऐकूं आली ' प्रियकरा, असा काय बरं वाटेंत हात धरतां? आतां ही शाता आपलीच ना! मग अशी घाई का?—कोणी पाहिल ना? सोडा गडे! पण ते दागिने. द्याना माझ्याजवळ!"

हें भाषण ऐकून बिंदू जिन्यातच थबकली. नतर तिनें हळूच आत डोकाविलें. त्यावेळीं स्त्रीवेषात गोप्या लगट करून रायाजवळ बसला होता, आणि दागिने घेण्याकरितां त्याच्या हाताला झोंबत होता! ही त्याची तालीम चालू होती. बाळकोबानें वाटेंतच अति प्रसंग केला तर पुढें काय करावयाचें, हें राया त्याला सामत होता. परंतु बिंदूला तें कोणतें दृश्य दिसलें! आपला भावी पति एका स्त्रीबरोबर इतक्या मंडळींत बसून निर्लज्जपणानें वागत आहे, असें तिला दिसलें! तिला तो देखावा जास्त वेळ पाहवेना! ती तशीच खालीं उतरली आणि गाडींत बसली. तिचा चेहरा अगदीं कलाहिन झाला होता. तिनें भावी कालाचे जे अनेक सुखाचे मनोरे रचले होते, ते सर्व क्षणार्धांत जमीनदोस्त झाले! मिरजेला असतांना बाळासाहेबाच्या गुणांचें वर्णन करतांना स्वतः त्यानींच आपणास जें सांगितलें, त्याकडे आपण लक्ष दिलें नाहीं परंतु आपले भावी पतीराज खरोखरीच दुर्व्यसनी, दुराचारी आणि वाईट मंडळीच्या संगतींत आहेत, असेंच आता तिला वाटूं लागलें. आपल्या वडिलांनीं पसंत केलेली आपली ही पतीची निवड अजिबात चुकली, हें तिच्या आतां प्रत्यक्ष अनुभवास आलें. गाडींत कशीबशी येऊन बसल्यावर तिचें डोकें फिरूं लागलें. डोळ्यांपुढें अंधारी येऊन आपण आतां बेशुद्ध पडणार असेंच तिला वाटूं लागलें. ज्या माडीवर ती नुकतीच चढली होती, आणि जेथें तिनें आपल्या भावी पतीच्या कंठांत इतर मडळीसमक्ष हात घालतांना, प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलें होतें, तीच गोपी आता खालीं उतरतांना तिला मागें मुरडून हांसत पाहतांना तिच्या दृष्टीस पडली. त्याबरोबर तिला तो देखावा असह्य होऊन तिनें गाडींत मागल्या बाजूला आपली मान टाकली, आणि ती बेशुद्ध झाली!

"तरी मी तुला सांगितलं वर जाऊ नको म्हणून!" मामा तिला बोलत होते. परंतु बिंदूनें मागें मान टाकलेली पाहून ते पुढें होऊन गडबडीनें म्हणाले,

" बिदू, पोरी असं काय करतेस ? वेडी नाहींतर !—अरे, ही तर बेशुद्धच झाली ! काय पोरीच्या नशिबांत आहे नकळे ! पण आतां काय करावं ? हिला मूर्च्छा आलेली दिसते ! आता पाणी कुठं मिळणार ? अरे रामजी, तुला बळवंतराव सहस्रबुद्धयाचं घर माहीत आहेना ? इथंच ते कसब्यांत राहतात—"

" ते साहेबाच्या कचेरींत होते, तेच ना ? गणपतीच्या जवळ बोळात राहतात, ते का ? त्यांची सून शांताबाई—"

" अरे हो तेच ! त्याच्याकडे ने लवकर ! हाक—"

रामजी घोडेवाल्यानें गाडी हांकली ! मामा आपल्या भाचीजवळ बसून तिला शुद्धीवर येण्याकरितां 'बिदू - बिदू' अशा हाका मारून हालवू लागले. इतक्यात गाडी बोळात शिरली. गाडी दरवाजाजवळ उभी राहताच मामानें रामजीला घरातून पाणी आणावयास सांगितले. बळवतराव आणि त्याचे चिरजीव गंगाधर हे दोघेहि नुकतेच कचेरींतून आले होते रामजीला घाबऱ्या घाबऱ्या आलेला पाहताच त्याना चमत्कारिक वाटलें मुन्सफसाहेबाचा तो घोडेवाला असे त्यानी तत्काळ ओळखले. रामजीनें थोडक्यात 'ताईसाहेब गाडींत बेशुद्ध झाल्या आहेत,' असें सांगतांच ती सर्व मडळी बाहेर आली. बिदूच्या डोळ्याला पाणी लावून थोडा वारा घालतांच ती पुनः सावध झाली. 'केव्हा आलां ? कधीं आला ?' वगैरे बळवंतराव आणि मामा याच्यामध्ये प्रश्नोत्तरें झालीं. बिदूला शांताबाईनें आपल्या खोलींत नेऊन गादीवर बसविले. गंगाधर आणि त्याचे वडील बाहेर मामाजवळ बोलत होते.

" बिदूताई, असं एकाएकीं काय झालं तुला ? " शांता विचारू लागली, " ही हवा कशी कुंद झाली आहे पाहिलीत ना ? पण तुम्ही पुण्यास येऊन आम्हाला कळविल सुद्धा नाहीं !--पण तुमचा चेहरा इतका काळवंडला का ? मला सांगण्यासारखं नाहीं का ? "

" शांता, माझ्या सुखाचं आयुष्य संपलं आणि आजपासून दुःखाच्या आयुष्याला सुरवात झाली ! " निराशेच्या स्वरात बिदू म्हणाली.

" अस कां म्हणतेस बिदूताई ? तुझं ह्या मार्गशीर्षात लग्न आहे, मला कळलं आहे. तेव्हां मी म्हणतें, आता लग्न झाल्यावर तुझ्यासारखी सुखी आणि भाग्यवान् तूच !

" साफ चुकतेस !—माझी पारख चुकली ! आतां बाबाना कोणत्या तोंडानं सांगूं ? हें लग्न आता मी मोडलं तर बाबांच्या इभ्रतीला धक्का बसेल.

सर्व जुळलं निमंत्रण पत्रिका काढल्या, आता आहे तेंच गोड मानून लग्न केलं पाहिजे!—अरेरे! जगांत ही काय नटवेगिरी आणि फसवेगिरी भरली आहे! मी स्वतःला शहाणी म्हणवित होते, पण मीहि घसरलें!"

"मी नाहीं समजले बिंदूताई!—तुझी निवड चुकली म्हणतेस?–छे, असं कसं होईल? मला ते तुझ्या गोपीवन्सकडून कळलं आहे—"

"कोणती गोपी वन्स? मला कुणी वन्संच नाहीं! बिंदू म्हणाली.

"नाहीं कशी? ती प्रत्यक्ष माझ्याकडे आली होती. चार दिवसापूर्वी आम्ही दोघी इथच बोलत बसलों होतों.

"शाता, तुझा काहीतरी गैरसमज झालेला आहे खास! मला वन्संच नाहीं मग तुला भेटणार कोण?"

"असं कस होईल?" आश्चर्यानें विचार करीत शांता म्हणाली, "बरं पण तुझी आज अशी एकाएकीं का अवस्था झाली, तें साग?

बिंदूनें आपली थोडक्यात हकीकत सागितली, आपल लग्नाचं कस जुळल, आपणांस पाहण्याकरिता मिरजेस नेले असतां तेथें; प्रत्यक्ष भावी पतीबरोबर एकमेकाच्या सहवासात आपण आठ दिवस कसे घालविले, पुढें लग्नाचे नक्की होऊन तिथी सुद्धा ठरून आपण पुण्यांत केव्हां आलों, वगैरे सर्व वृत्तात सांगून ती पुढें म्हणाली, "माझ्या मोठ्या जाऊबाई पुण्यांत बुधवारी येतील, असं मोठ्या दीराच्या पत्रावरून कळलं म्हणून मी त्याना भेटण्याकरिता आलें. चौकशी करण्याकरिता मामाना वर पाठविलें, तेव्हा त्याना तिथं भलताच प्रकार आढळला. तेव्हा मी वर जाऊन हळूच डोकावल!–काय सागूं तुला शांता, माझ्या नशिबीं आता दुःखच आहे ग!"

"तूं स्वतः पाहिल म्हणतेस?—"विचार करीत शान्ता म्हणाली, "बिंदूताई हा कांहीतरी घोंटाळा आहे, यात शकाच नाहीं. तुला गोपी म्हणून कोणी वन्स नाहीं म्हणतेस आणि असा प्रकार तू समक्ष पाहिला म्हणतेस?"

इतक्यात बळवंतराव आत आले, आणि बिंदूची चौकशी करू लागले. तिला एकाएकीं बेशुद्ध होण्याला काय झालें, याचें थोडक्यात शांताबाईनें कारण सागितलें, तेव्हां ते म्हणाले, "मामा तुम्हीहि असाच काहीं प्रकार तिथं पाहिला म्हणता? मग आता स्वस्थ बसून उपयोग नाहीं. ह्या गोष्टीची तत्काळ शहानिशा केली पाहिजे. अजून लग्नाला अवकाश आहे. खरोखरीच तसंच काहीं आढळून आलं तर हें लग्न मोडून टाकता येईल. चला, मी येतों तुमच्या बरोबर! आपण आताच जाऊन मनाची खात्री करून घेऊं?

मामांना ही सूचना मान्य झाली. लगेच बळवंतराव, त्यांचे चिरंजीव गंगाधर तयार झाले. तेव्हां ' माझ्या सोबतीला शान्ताला, ' असें बिंदूनें सांगतांच तिलाहि बरोबर घेतलें. अशी ही सर्व मंडळी शहानिशा करून घेण्याकरिता निघाली असतां आमच्या मंडळीच्या बिऱ्हाडीं काय प्रकार चालू होता तो आपण पाहूं. गोप्या देवळांत जाण्याकरितां बाहेर पडला, हें वाचकाना माहित आहेच. त्यांच्या दिवाणखान्यांत बिंदूला कोणता देखावा दृष्टीस पडला तोहि वाचकानीं पाहिलाच आहे. देवळात गेल्यावर बाळकोबाला आपल्यामागून येण्यास खूण केल्यावर वाटेंत जर कदाचित् त्यानें लगट केली किंवा हात धरला, तर गोप्यानें कसें वागावयाचें याबद्दल राया त्याला सूचना करीत असतांना बिंदू जिन्यानें वर आली आणि तिनें तो प्रकार पाहिला. त्यामुळें तिच्या समजुतीचा कसा घोंटाळा झाला हेंहि वाचकांच्या ध्यानात आलेंच असेल ! परतु असा कांहीं प्रकार झाला असेल अशी आमच्या मंडळीपैकीं एकालाहि कल्पना नव्हती. संध्याकाळ होतांच गोप्याला एकटेंच देवळांत पाठवून ती सर्व मंडळी आपापल्या उद्योगाला लागली. पुढें काय करावयाचें तें अगोदर रायानें ठरविलें असल्यामुळें आतां पुढें काय करावयाचें हें कोणालाच विचारण्याची जरूरी पडली नाहीं. रायानें झटकन् आपली मोठी ट्रंक उघडून त्यांतून भराभर तीन प्रकारचे कपडे काढले. राजा आणि बापू यांना त्यानें शिपायाचे पोशाख दिले, आणि स्वतः ड्रीलचा कोट घालून कास मारला आणि डोक्यांत इन्स्पेक्टराची टोपी चढवून पेटींतील ' हंटर ' त्यानें हातीं घेतला. दिवाणखान्यांत दिवा लावलेला होता. पोशाख होतांच त्यानें रस्त्याच्या बाजूच्या खिडक्या बंद करायला सांगितल्या. इतक्यांत रस्त्यावरून त्यांना शिटी फुंकल्याचा आवाज आला. बाळकोबाला घेऊन गोप्या आला, अशी सूचना देण्याकरितां टेहेळणीवर असलेल्या श्रीपादनें ती शिटी वाजविली होती. लगेच सर्व मंडळी बाजूच्या खोलींत जाऊन त्यांनीं दरवाजा बंद करून घेतला. थोड्या वेळानें स्त्री वेषधारी गोप्या आणि त्याच्या मागून बाळकोबा जिना चढून वर येऊं लागले ' मी शिकार आणली हें सुचविण्याकरितां जिना चढत असतांना गोप्या एकदां खाकरला ! दिवाणखान्यांत येताच गोप्या म्हणाला, " बसा गडे तुम्ही आतां ह्या बैठकीवर ! घर किनई आतां आपलंच आहे. कोणीसुद्धां इथं यायचं नाहीं अन् आपल्याला पाहायचं नाहीं ! थांबाना, असं काय ? मी आतां ही पैठणी नेसतें अन् दागिने घालतें. पैठणी

नेसून ह्या दागिन्यांत मी कशी दिसतें, तें तुम्हाला पाह्यचं आहेना ?—पाह्यचं आहे ना ! मग द्या तर गडे ते दागिने आणि ती पठैणी !"

"देतों ! आतां हें सर्व तुझ्याकरितांच आहे. पण इथं माझ्यासमोर ही पैठणी नेस आणि हे दागिने घाल !"

"इश्श ! मला बाई लाज वाटते !" असें म्हणून गोप्यानें मुरडत ते दागिने आणि पैठणी झटकन् उचलली !

"थाब जरा थांब ! तूं अगदीं तोंड झांकून का घेतलं आहेस ? मारवाडणी सारखा हा पदर दूर कर !"

"थांबा—अशी बाई नका करूं गडे !—मी पैठणी नेसून मगच तुम्हांला तोंड दाखवीन ! असें म्हणून गोप्या त्या सर्व बहुमोल वस्तु घेऊन आंत गेला. थोड्या वेळानें बाजूच्या खोलीचा दरवाजा उघडून बाप्या बाहेर आला. आणि बैठकीवर बसलेल्या बाळकोबाला त्यानें विचारलें, "कायहो, कोण तुम्ही ? कोण पाहिजे तुम्हाला !"

"मी-मी-ती-ती शांताबाई !"

"मी मी, ती ती, शातावाई काय ?—शुद्धीवर आहात का तुम्ही किं झोंकून आलां आहात टकोरा भर ?"

"मी आलों होतों—-ती-शांता-मा तिनं—"

"नीट सांग नाहींतर पोलिसला हांक मारतों !"

"मला शाताबाईनं इकडं आणलं म्हणून मी आलों. ती आंत गेली आहे, तिला हांक मारा !"

"आंत गेली आहे ती तुझी आई लेका ! हाक कोणाला मारायला सांगतोस ?" असें दरडावून बाप्या दरवाजांकडे वळून म्हणाला, "फौजदार-बाहेर या आणि धरा या हलकटाला !"

धाडकन् दरवाजा उघडला आणि हातात चाबूक घेतलेला राया बाहेर आला. विचारपूस करण्याच्या भानगडींत न पडता त्यानें पहिल्या सपाट्याला बाळकोबावर जोरानें चाबकाचा फटका लगावला ! त्यानंतर लगेच दुसरा, नंतर तिसरा असे पाच सहा फटके सडकल्यावर बाळकोबाच्या स्थितीचें काय वर्णन करायचें ! 'अ-आ-इ-ई !—अग बाई—ग ! ! मेलों ग ! ! !' असें विव्हळत आर्त स्वर त्याच्या मुखांतून बाहेर पडूं लागले ! तोंच काड् काड् जिना वाजून मामा, त्याच्या मागून बळवन्तराव नंतर गंगाधर आणि

त्या तिघांच्या मागून बिंदू आणि शाता अशी मंडळी वर आली. राया आणि त्याची मंडळी तर स्तब्धच झाली! हा मध्येच काय गोंधळ झाला याची त्याना अटकळच करतां येईना. रायाहि प्रथम क्षणभर गोंधळला. परंतु त्याचे प्रसंगावधान अत्यंत दाडगें असल्यामुळे त्याने एक वेळ सर्वांच्याकडे पाहिले आणि तो धिटाईनें म्हणाला, "मामा तुम्ही बिंदूला घेऊन आलात फार चागलं झालं! बळवतराव, तुम्ही आपल्या मुलाला आणि सुनेलाहि आणलें आहे, हेहि एका अर्थी बरच झालं! हा इथं उभा असलेला सर्प पाहिलात?" असं म्हणून त्यानें तडाड्दिशीं चाबकाचा तडाखा उडविला, आणि शाताबाईकडे पाहून तो बळवतरावाना म्हणाला, "या हरामखोर, पाजी मनुष्यानं एका अब्रूदार घराण्यातील कुलशीलवंत सासुरवाशिणीला बिघडविण्याचा प्रयत्न चालविला होता. ह्या चाडाळाचे एक एक रगढग जर तुम्ही ऐकाल तर मी हे मारतो असे कोरडे"—असं म्हणून रायानें एक कोरडा ओढला! "तुम्ही शंभर मारून एक मोजला असता! नाईक, बाधा ह्या हरामखोराच्या मुसक्या आणि घेऊन चला फरासखान्यावर!"

"नाहीं—नाहीं—आता नाहीं!—मी तुमच्या पाया पडतों!—मला पुरी अद्दल घडली!—" असें रडत रडत म्हणत बाळकोबाने रायाचे पाय धरले! शरण आलेल्याला मरण देऊं नये, हें तत्त्व रायाला माहीत नव्हतें असें नाहीं. तरी देखील त्याने खाली वाकलेल्या बाळकोबाच्या पाठीवर शेवटचा एक तडाखा लगावलाच!

"ऊठ!—इथ हजर असलेल्या सगळ्यांच्या पाया पड आणि बायकाच्या कधींहि वाटेला जाणार नाहीं अशी शपथ वहा!"

बाळकोबाने रडत रडत शपथ वाहिली आणि सर्वांच्या तो पाया पडला. शाताबाईच्या पाया पडण्याकरिता तो वाकला असतांना वाचकहो, तिच्या मनांत काय विचार आले असतील याची तुम्हीच कल्पना करा! बिंदूची सोबत म्हणून ती तेथें आली. दिवाणखान्यात पाऊल टाकताच तेथे बाळकृष्णाला पाहून तिची भीतीने तिरपिटच उडाली! आतां आपला सर्व गोप्यस्फोट होतो, असे वाटून तिच्या सर्वांगाला दरदरून घाम सुटला! जी गोष्ट आपल्या नवऱ्याला किंवा सासऱ्याला कळूं नये, म्हणून तिनें स्वतःला हृद्रोग लावून घेतला, तीच गोष्ट आतां त्यांना कळणार या विचारानें तिचे हातपाय लटपटले असले, तर त्यांत काय नवल नाहीं! परंतु आमच्या रायाला तिची काळजी

होती. आपल्या भगिनीची अब्रु चव्हाट्यावर न आणता तिच्या अब्रूचें रक्षण करणें हे ब्रीद होतें! त्यानें किती चातुर्यानें ती बाजू साभाळली बरें! शांताबाई प्रत्यक्ष आली असताना तिच्या शुद्ध शीलाला किंचित्‌हि धक्का न लावतां तिच्या समक्ष त्यानें तिचा घोर अपराध करणाऱ्या त्या पातक्याला जन्माची आठवण राहील, अशी शिक्षा केली, याला म्हणतात प्रसंगावधान!

"चल निघ!" बाळकोबा सगळयाच्या पाया पडल्यावर राया दरडावून म्हणाला, "पुनः जर कधीं देवळात किंवा बागेत दृष्टीला पडलास तर सांभाळून रहा!"

जिवानिशीं सुटलो, असें बाळकोबाला वाटलें! चाबकाच्या कोरड्यामुळें त्याच्या पाठीवर, पोटावर आणि माड्यावर कित्येक ठिकाणीं चामडी फाटली होती. त्या माराच्या वेदना सुरू होत्या. परंतु जीव वाचला, यांतच आनंद मानून तो भरभर जीना उतरूं लागला. रायानें त्याच्या मागून जाण्याकारतां बाऱ्याला खूण केली. नंतर तो म्हणाला, "बळवतराव, मामा आणि तुम्ही गगाधर ह्या बैठकीवर बसा." इतक्यांत जिन्यांतून 'बाळासाहेब' अशी हाक ऐकूं आली. हांकेच्यां आवाजावरून आपले दादासाहेब आले, हें रायानें ओळखले. थोड्या वेळाने दादासाहेब त्याच्या मागून वहिनी वर आली, आत येतांच दादासाहेब म्हणाले, "बिंदू इथच आहे का?—भले महाराज!—वर जा, तें खालचं आमच सामान वर आणण्याची व्यवस्था करा!"

"दादासाहेब, ही बिंदू आतांच तुमच्यापुढें, पांच मिनिटं झालीं, आली! मी अद्यापि तिच्याशी चकार शब्दहि बोलला नाहीं!"

आणि बोललास म्हणून आम्ही कांहीं नको म्हणतों कां?"

"पण बोलायला तोंड कुठ आहे?" भिवया चढवून रागांतच बिंदू म्हणाली.

"होय, आम्हीं तुम्हालाच पाह्यला आलों होतों!" मामा म्हणाले. "तुम्ही, आणि वहिनी आज येणार, असं तुमचं पत्रच होतं. म्हणून वहिनींना भेटण्या-करता, बिंदू पाठीस लागली. तिला घेऊन मी मघांच आलों, होतों. गाडी खालीं उभी केली आणि वर आलों, तेव्हा इथं काहीं भलताच प्रकार आमच्या नजरेस पडला!"

'तो काय बुवा?" आश्चर्यानें दादासाहेब म्हणाले, "आणि हें काय नवीन लचाड आहे बाळासाहेब?"

" काय सांगूं ? " मामासाहेब रायाकडे पहात म्हणाले, " मला सागण्याला सुद्धां शरम वाटते ! "

" मामासाहेब, बेलाशक सांगून टाका, मुळींच शरमूं नका ! " राया म्हणाला.

" काय बाई तरी ! कांहीं वाटत पण नाहीं ! " बिंदू कपाळाला आंठ्या घालून वहिनीकडे वळून म्हणाली.

" सांगा— मामा तुम्ही जें कांहीं पाहिलं असेल, तें सरळ सागा ! मनात मुळींच काहीं ठेवूं नका. अशा गोष्टी जर तुम्ही पोटात ठेवूं लागलात, तर उगाच तुमचं पोट मात्र फुगायचं ! "

" काय सागूं बाळासाहेब माझं कपाळ ! " मामा रागातच म्हणाले. " तुम्ही धडधडीत इथं आठदहा मडळींत बसून तो कृष्णकाला चालविला होतात अन् दुसरं काय ! "

तो सर्व प्रकार तुम्ही पाहिलात काय ? रायानें विचारलें.

" काय हे बाळासाहेब !—तुम्ही मला पुनः विचारतां ?—मनाची नाहीं तर नाहीं पण जनाची तरी लाज धरा ! "

" मामासाहेब, रागवूं नका ! आता गोष्ट ओघालाच आली आहे, तेव्हां माझ्या लाजलज्जेचा मुळींच विचार न करतां, आणि तुम्ही स्वतःहि न शरमतां सर्व काहीं सागून टाका झालं ! आतां दादासाहेब आले आहेत, वहिनी आहे हे बळवंतराव आहेत.—ते मला ओळखत नाहींत, पण मी त्याना आणि त्याच्या सर्व मंडळींना ओळखतों म्हणा !—तेव्हा मनात कांहीं न ठेवतां सर्व काहीं उघड करून टाका ! "

" उघड काय करू ! तुम्ही त्या बाईला जवळ बसवून गळ्यात गळा घालीत होतात, ते पाहिल्यावर आमच्या बिंदूची काय स्थिती झाली, याची तुम्हाला कल्पना तरी ? हा प्रकार पाहून ती पोर बेशुद्धच लाली ! म्हणून तिला ह्या बळवंतरावांचं घर जवळ होतं म्हणून तिकडे नेली. ह्या शांताबाईनं पाणीबिणी लावल्यावर ती हुषार झाली. बळवंतरावांना सर्व हकीकत सांगितली, तेव्हां ते म्हणाले, ' असा कांहीं प्रकार असेल तर आपण लग्न मोडून टाकूं ! "

" एकूण तुम्ही लग्न मोडण्याकरतां आलां आहांत तर ! " राया म्हणाला, " त्याहि गोष्टीला माझी पूर्ण तयारी आहे. कारण मी बिंदूला ' मी कसा आहें ' हें प्रथमच स्पष्ट सांगितलं होतं. कांहो वहिनी, तुम्हाला आठवतं ना ? —हो, पण हें माझं आणि बिंदूचं लग्न मोडण्यापूर्वी अनायासं योगायोग

जुळून येऊन तुम्ही सर्व मंडळी इथं एकत्र भेटला, तसच आणखी एक स्त्रीला तुम्हाला मी भेटवितों !" एकदम मध्येंच विषय बदलून राया म्हणाला.

"अरे बाळासाहेब, ही आहे तरी काय बुवा भानगड ?" दादासाहेब म्हणाले, "तुझी एक एक नवीन कुलंगडी आणि लफडीं पाहून माझी अक्कल तर बुवा गुंग झाली ! आता मी मुन्सफसाहेबांना कोणत्या तोंडान जाऊन भेटूं ?"

"दादासाहेब, अगदीं उजळ माथ्यान जाऊन सरळ मुन्फसाहेबाना भेटा आणि ह्याच तोंडानं सांगा कीं, आमच्या बाळासाहेबाचीं सर्व कुलंगडीं बिंदून स्वतः पाहिलीं, तरी ती स्वसंतोषानं बाळासाहेबाबरोबरच विवाह करील !"

"बस्—बस् हें फार झालं !" मामासाहेब रागानें म्हणाले. "तुम्हाला जनामनाची कांहीं लाज नाहीं, पण मुन्सफसाहेब ही गोष्ट कबूल करायचे नाहींत !"

"आनंदानं कबूल करतील आणि ते ह्या बाळासाहेबालाच आपला जांवई करतील !" असें म्हणून फटींतून पहात असलेल्या गोप्याला बाहेर येण्याची रायानें खूण केली.

तेथें इतकी मडळी जमली होती परंतु एकालाहि ह्या चालू प्रकाराचा उलगडा होईना. सर्वजण एकमेकाकडे टकमका पहात होते. इतक्यांत दरवाजा उघडून स्त्रीवेषात असलेला गोप्या बाहेर आला. त्याबरोबर 'हीच ती !' असे उद्गार बिंदूच्या मुखातून बाहेर पडले. तोच तिला उत्तर म्हणूनच कीं काय तुमची गोपीवन्स ही बिंदूताई ! असें शांताबाई म्हणाली.

"हें नाटकांतलं नाटक !' राया हांसत म्हणाला. "मामासाहेब, मी कृष्ण बनून जिच्याशीं कृष्णकाला केला, ती ही राधा पाहा !" असे म्हणून रायानें हळूच पुढें होऊन गोप्याच्या डोक्यावरील तो केसांचा टोप काढला "—पाहिलंत ? ही स्त्री नसून हा माझा एक जिवलग मित्र आहे ! आतां थोडक्यात आज मी जें नाटक केलं तें सांगतो. मघां ज्याला मी चाबकाखाली झोडपून काढला, तो पाजी मनुष्य एका शीलवंत स्त्रीच्या कच्छपीं लागला होता. आमच्या तें लक्षात येताच मी ह्या माझ्या मित्राला स्त्रीवेष देऊन त्याला आपल्या जाळ्यांत धरलं. प्रथम थोडे दिवस ह्या गोप्याकडून त्याच्याशीं पत्रव्यवहार केल्यावर आज त्याला इथं भेटीला बोलावलं होतं. त्याप्रमाणें गोप्यानं जाऊन त्याला इथं आणलं. मामासाहेबांनीं जो प्रकार मघां पाहिला, तो प्रकार काय होता, हें आतां तुमच्या लक्षांत आलंच

असेल !—आता सागा पाहूं तुम्ही पुढें काय करणार तें ?—लग्न मोडणार का ?"

"काय गोंधळ झाला होता !" मामासाहेब खजील होऊन म्हणाले.

"हा सर्व समजुतीचा घोटाळा होता !" बळवंतराव आता बोलूं लागले.

"बरं पण बाळासाहेब, तुम्ही चाबकानं इतका झोपडून काढलत, तो जर का पोलीसाकडे फिर्याद घेऊन गेला तर ?"

"पोलिसात जाण्याची त्याची छातीच नाहीं ! आणि यदाकदाचित् तो पोलिसांत गेला तर त्याच्या पापाचा घडा पूर्ण भरला असच आपण समजलं पाहिजे !" इतक्यांत जिना चढून बाप्या वर आला आणि तो रायाला म्हणाला, "त्याच्या पापाचा घडा पूर्ण भरला !—तो कुठं जातो, हें पाहण्याकरता त्याच्या मागून मी गेलों, तो वाटेतच त्याला पोलिसानी पकडलं ! आज सकाळीं त्यानं मोतीचौकातील एका सराफाला हजार रुपयाचा चेक दिला होता. तो चेक घेऊन शेटजी दुपारीं सेंट्रल बॅंकमध्यें वटविण्याकरता गेले. बॅंकेच्या मॅनेजरला संशय आला. कारण बाळकोबानं तो चेक मामाच्या नांवान त्याची खोटी सही करून दिला होता. म्यानेजरला संशय येतांच त्यानं चौकशीला सुरवात केली. पोलिसची चौकशी सुरू होऊन आपल्या नांवाचा खोटा चेक कोणी तरी बॅंकेत नेला आहे, असें कळतांच सरदार-साहेबानी त्या मनुष्याला पकडून आणून त्याच्यावर रीतसर खटला करण्याची पोलिसला परवानगी दिली. त्याप्रमाणें पोलिस आणि शेटजी बाळकोबाचा तपास करीत असता तो आतां त्याच्या तावडीत सापडला ! मी पोलिसजवळ चौकशी केली, तेव्हां त्यानं मला ही सर्व हकीकत सागितली. आता निदान सात वर्षं बाळकोबा चामडं कुटायला जातील, असं तो पोलीस म्हणाला !"

"शेवटीं खोट्याचा परिणाम खोटाच व्हायचा !" राया म्हणाला, "बरं पण मामासाहिब, आतां तुम्ही मुन्सफसाहेबांना जाऊन काय सागणार ? लग्न मोडायला सांगणार ना ?"

"तें आतां तुम्हीच बिंदूला विचारा !" मामासाहेब म्हणाले.

"हें इथून नाटक केलं होतं हें काय बाई मला माहीत !" बिंदू खालच्या मानेनें म्हणाली.

"मग नाटक पाहिलंत ना ? आतां तिकिटा परत देऊन थिएटरच्या बाहेर

जा! कारण आतां नाटक खलास झालं! काढा—काढा लवकर तिकिटा, नाहींतर तिकिटाचे पैसे द्या! आम्ही वशिल्याचीं माणसं आमच्या नाटकाला घेत नसतो!" रायाच्या विनोदाला तिरक्या नजरेनें त्याच्याकडे तिने एक दृष्टिक्षेप केला तोच दृष्टीक्षेप तिकिटाचे पैसे होता आणि दिलसफाईचा पुरावा होता!

सर्व गूढ कोडें उकललें आणि आनंदी आनंद झाला! बरीच रात्र झाली, असें पाहून बळवंतराव जाण्यास निघाले, तेव्हां रायानें त्यांना थोडा वेळ बसवून गोप्याकडे पाहून म्हटलें, "अहो बिंदूच्या गोपीवन्स! ही इतकी मंडळी तुमच्या घरीं आली. त्यांना कांहीं चहा वगैरे द्याल कीं नाहीं?"—सर्वांना चहा दिल्यावर मंडळी निघून गेली. तेव्हां रायानें बाजूची भाड्यानें घेतलेली माडी दादासाहेबाना दाखविली तितक्या वेळात आमच्या सर्व मंडळीने त्याचं सामान वगैरे जिथल्या तिथें लावून ठेवलं होतं. घर आणि तेथील व्यवस्था पाहून दादासाहेब आणि वहिनी खूष झाल्या. आपणास पुरेशी ही जागा आहे, असं त्याचं मत पडल. जागा दाखवून झाल्यावर रायानं आपल्या भाऊ आणि भावजयीला स्वयंपाकघरात आणलें. त्यावेळीं तेथें मन्या, चाच्या बाप्पा आणि तात्या जारीने स्वयंपाकाच्या उद्योगात गुंतले होते. ते पाहून दादासाहेब म्हणाले, "कारे बाळासाहेब, एव्हांपासूनच तूं चार आचारी ठेवलेस कीं काय?

स्वाभाविक, सरळ विचारलेल्या या दादासाहेबाच्या प्रश्नानें त्याच्या मडळींना हंसू आलें. तो म्हणाला "दादासाहेब, माझं लग्न आहे हें तुम्ही विसरता! लग्न समारंभ अगदीं कडाक्यानं करावयाचा ठरविला असल्यामुळ मी बारा आचारी गुंतवून ठेवले आहेत. कारण एकदा लग्नसराई सुरू झाली कीं, या पुण्यात आचारीच मिळत नाहीं."

"बारा आचारी!" आश्चर्यानें वहिनी म्हणाली, "आणि ते कशाला?"

"स्वयंपाक करायला!" रायानें शांतपणानें उत्तर दिलें. "वहिनी, हे स्वयंपाक करीत आहेत, हे कोणी आचारी नाहींत. आम्हीं सर्व मित्रच आहोंत!"

दुसऱ्या दिवशीं दोनप्रहरीं वहिनीला भेटण्याकरितां बिंदू पुनः आली. येतांना तिनें आपल्याबरोबर शांतालाहि आणलें होतें. त्यावेळीं सर्व मंडळी दिवाणखान्यात बसली होती. रायाप्रमाणेंच त्याचे वडील बंधू आणि वहिनी मोकळ्या मनाचे असल्यामुळें आमच्या मंडळी बरोबर तेहि आपलेपणानेंच

मंडळींत वागूं लागले. बिंदू आणि शांता येतांच दादासाहेबानीं त्यांनाहि बसायला सांगितलें. बिंदू बसली परंतु शांता बसेना. बरीच मंडळी तिला अपरिचित असल्यामुळें तिला सकोच वाटणें स्वाभाविकच होतें. तोच तिची दृष्टि बाजूला बसलेल्या गोप्याकडे गेली. तेव्हा तिला चमत्कारिक वाटूं लागलें. आपण त्याला स्त्री समजून जवळ बसविलें, इतकेंच नव्हे तर जाताना त्याच्या कपाळीं कुंकूंहि लावलें, या गोष्टीची आठवण होऊन तिला किती चमत्कारिक वाटले असेल, याची वाचकानींच कल्पना करावी. बराच वेळ त्यांच्या गप्पागोष्टी चालल्या होत्या. 'रायाची बायको,—आपली सर्वाची वहिनी बिंदू, किती प्रेमळ मनाची आहे,' याची आतां सर्वांना पूर्ण खातरी पटली. संध्याकाळपर्यंत सर्व मंडळी आनंदानें गप्पागोष्टी करीत होती. चहा झाल्यावर शाता आणि बिंदू याच्याबरोबर गोप्या मनोहर त्याना घरीं पोंचविण्याकरितां गेले. पुनः संध्याकाळीं सर्व मंडळी दिवाणखान्यांत एकत्रच बसली होती. आपला भाऊ बाळासाहेब आणि त्याची इतकी मित्रमंडळी काहींएक उद्योग न करता घरांत बसून आहेत, याचें दादासाहेबाना फार आश्चर्य वाटले. कदाचित् आपण आलों म्हणून ही मडळी आज आपापल्या उद्योगाला न जाता घरीं राहिली असतील, असें त्यांना वाटलें. परंतु दुसऱ्या दिवशींहि तोच प्रकार! मात्र दुसऱ्या दिवशीं रायाच्या प्रत्येक मित्राकडे त्यानीं फार बारकाईनें नजर ठेविली होती. त्यापैकीं एकालाहि कांहीं व्यसन, किंवा एखादा दुर्गुण असलेला त्यांच्या दृष्टीस पडला नाही. कामें अगदीं यंत्रासारखीं सुरळीत चाललीं होतीं. सकाळीं उठल्याबरोबर दोघांनीं स्नान करून झटपट पाणी भरलें, एकानें दूध आणून दिलें, एकानें चहा केला, तर एक मंडईत जाऊन भाजी घेऊन आला; तोंच इतराच्या आघोळी होऊन ज्यांनीं त्यानीं आपापलीं धोतरे बडविलीं. नंतर कोणी भाजी चिरून दिली, तर दोघानीं स्वयंपाकाची तयारी चालविली, आणि एक पोळ्या लाटण्यांकरिता बसला. तसेंच जेवण होतांच दोघांनीं स्वयंपाकघर आवरून सर्व भांडीं वगैरे घांसून जिकडे तिकडे लख्ख करून ठेवले. वहिनीसाहेबांना इकडची काडी तिकडेसुद्धां कोणी करू दिली नाहीं. हा सर्व प्रकार पाहून दादासाहेब आणि वहिनी यांना, आश्चर्य वाटलें यात आश्चर्य तें काय! ही सर्व मंडळी काय उद्योग करतात असें रायाला विचारावें म्हणून ते संधी पाहात होते. परंतु एकातात बोलायला दादासाहेबाना संधीच

सांपडेना शेवटीं त्याला एका बाजूला नेऊन दादासाहेबांनीं प्रश्न केलाच ! तेव्हां राया म्हणाला, " दादासाहेब, आमचा दिनक्रम पाहून तुम्हाला आणि वहिनीला मोठा अचंबा वाटला तो योग्यच आहे. परंतु आतां तुम्ही जे मला इथ एकातात आणून विचारीत आहांत, त्या प्रश्नाचं उत्तर मी अस एकांतांत देऊं इच्छित नाहीं. मंडळींत जाऊन बसूं आणि मग बोलूं ! " असें म्हणून रायाने दादासाहेबांना पुनः दिवाणखान्यांत आणलें.

" आपणां सर्वास असे निरुद्योगी पाहून आमच्या दादासाहेबाना आश्चर्य वाटलं आहे ! " आंत आल्यावर राया आपल्या मंडळींना उद्देशून म्हणाला. " तेव्हा आपला उद्योग काय आहे, हे त्याना सागण्याची तुम्ही सर्वजण मला परवानगी देता काय ? "

" राया, दादासाहेब तुझे बंधू आहेत ! " राजा म्हणाला. " तेव्हा तेहि आमचेच बंधू आहेत, असं आम्ही समजतों ! करिता त्याना सागायला काय हरकत आहे ! "

सर्व मंडळींनीं समति देतांच रायानें दादासाहेबाना थोडक्यांत आपल्या क्लबची माहिती करून दिली. मूळ मुंबईत झावबाच्या वाडींत आपला क्लब कसा स्थापन झाला आणि कोणकोणते उद्योग केले, ती तपशीलवार ·पण थोडक्यात माहिती सागून राया म्हणाला, " दुराचारी, दुष्ट, दुर्व्यसनी, कंजूष आणि जुलमी अशाच मंडळींच्या मागं लागण्याचा आम्ही आजपर्यंत उद्योग केला. ह्या आमच्या उद्योगात ' सुक्याबरोबर ओलंहि जळतं ' ह्या न्यायानं कदाचित् चांगल्याहि माणसांना आमच्या पासून उपसर्ग झाला असेल, परंतु त्याला नाइलाज आहे ! "

" बाळासाहेब, आतां मला तुमच्या रायक्लबची पूर्ण कल्पना झाली ! " दादासाहेब म्हणाले, " माझ्या सर्व शंकांचं पूर्ण निरसन झालं ! परंतु मी असं विचारतों कीं, तुमचा उद्योग असा किती दिवसपर्यंत चालणार ? त्याला कांहीं मर्यादा असेल कीं नाहीं ? "

" होय मर्यादा तर आहेच ! " राया म्हणाला. " आमचे रायक्लबचे आम्ही बारा मेंबर आहोंत. तेव्हां प्रत्येकाच्या वांटणीला एकंदरीनं बाराबारा हजार रुपये आले कीं, आम्हीं हा उद्योग सोडणार मग ज्याचा तो स्वतंत्र आहे ! "

" प्रत्येकाच्या वांटणीला बारा बारा हजार रुपये ? " दादासाहेबांनीं आश्चर्यानं विचारलं. " म्हणजे ही झाली तरी किती रक्कम !—बारं बार

चवेचाळीस! म्हणजे तुम्हाला दीड लाख रुपये कमविले पाहिजेत!— अबू ब बू! बाळासाहेब, अरे दीडलाख म्हणजे झालं काय? सर्व जन्म घालवलांत तरी मिळणं कठीण!"

"दादासाहेब, तुम्हाला इतकं आश्चर्य का वाटतं? दीड लाख म्हणजे 'दर्यामें खसखस' आहे! आतांपर्यंत ह्या पांच वर्षांत आम्हीं एक लाख दहा हजार रुपये तर मिळविलेच!"

"काय म्हणतोस काय बाळासाहेब?" आश्चर्यातिरेकानें दादासाहेबांनीं विचारलें, "एक लाख दहा हजार रुपये तुम्ही मिळविलेत? कोणाला खर तरी वाटेल का?"

"यांत मी काय खोटं सांगतों?—आमचा हिशेब अगदीं उघड आहे! मी कॉलेज सोडून प्रथम तीन वर्षांनीं घरीं आलों, तेव्हां तुमच्या पेढीवर पांच हजार रुपये जमा केले आणि परवां आलों, तेव्हां तीन हजार जमा केले. एकंदरीनें आठ हजार रुपये जमा केले, हें तर तुम्हाला माहीत आहे ना? हे आठ हजार रुपये माझ्या एकट्याच्याच वांटणीचे! मग बारा जणांच्या वांटणीचे! किती झाले?—शहाण्णव हजार रुपये झाले ना? ही शेवटची वांटणी झाल्यावर पुढें आम्हीं जो उद्योग केला त्यांत आम्हाला चवदा हजार रुपयांची मिळकत झाली आणि ते फक्त चौदा हजार रुपये आतां इथं, ह्या खोलींत त्या पेटींत आहेत!" असें म्हणून रायानें कोपऱ्यांत ठेवलेल्या एका पेटीकडे बोट दाखविलें. बिचारे दादासाहेब आश्चर्यानें अगदीं थक्कच होऊन गेले. क्षणभरानें ते म्हणाले, "आज दहा वर्षें झालीं, मी चार ठिकाणीं अडतीचीं दुकानं घातलीं आहेत. सारखा रात्रदिवस मेहनत करतों आहें, हजारों विवंचना आणि चिंता लागून डोकं भ्रमिष्ट होण्याची वेळ आली आहे आणि इतकंहि करून ह्या दहा वर्षांत मला दहा हजार रुपये कमवतां आले नाहींत!"

"दादासाहेब, तुम्हाला पैसे का मिळाले नाहींत. हें मी काय सांगूं?" राया म्हणाला, "परंतु मी खात्रीनं सांगतों कीं, ज्याला डोकं आहे, तो एकटा एका मुंबईतच एका वर्षांत एक लाख रुपये सहज मिळवूं शकेल!"

"बाळासाहेब, तुझं म्हणणं अक्षरशः खरं आहे?" दादासाहेब म्हणाले, "मुंबईत एका दिवसांत 'खाक्याचे लाखे' झालेले मी ऐकले आहेत.

ज्याला डोकं आहे, तो कुठंहि पैसा मिळवील, ही गोष्ट जरी खरी असली, तरी त्याला सद्दीचा जोर हा लागतोच ! ”

“ मग त्याला तुम्ही सद्दीचा जोर म्हणा, दैव म्हणा कीं नशिब म्हणा ! ” राया म्हणाला.

“ म्हणा का ! तसं आहेच ! ” दादासाहेब ठांसून म्हणाले. “ दैवाशिवाय कोणत्याच गोष्टी होत नाहींत. पुष्कळ डोकं चालविलं, सतत प्रयत्न केले आणि दैवच जर गांडू असेल, तर कांहींसुद्धां वळायचं नाहीं; आणि तेंच अनुकूल असू द्या कीं, प्रयत्नाशिवाय लक्ष्मी घरांत चालत येते ! ते भोपचे आप्पासाहेब मुजूमदार तुला माहीत आहेत ना ? आज अठरा वर्षांचं वय असेल. त्याची पूर्वीची हकीकत तुला माहित आहे का ? हा आप्पासाहेब म्हणजे नेव्वळ पोरकं पोर ! आईबापाचा सुद्धां पत्ता नाहीं. पंधरा वर्षांपूर्वी भय्यासाहेब मजूमदार पंढरपूरच्या यात्रेला गेले होते चार बायका करूनहि त्यांना शेवटीं पुत्रसंतान झालं नाहीं. पंधरा वर्षांपूर्वी भय्यासाहेब मुजूमदार पंढरपूरास गेले असतांना ते तेथील ‘ अनाथ बालकाश्रम ’ पाहयला गेले. तेथील तीं पोरकीं पोरं पाहून त्यांपैकीं एक मूल आपण जवळ बाळगावं, अशी त्यांना इच्छा झाली आणि त्या पांच पंचवीस मुलांतून त्यांनीं ह्या आप्पासाहेबाला निवडून काढलं.‘ मुलाचें पालन-पोषण चांगल होईल म्हणून कोणतीहि हरकत न घेतां त्या मुलाला त्यांच्या स्वाधीन केलं. तोच हा आप्पासाहेब आज ह्या एवढ्या इस्टेटीचा वारस होऊन बसला ! ”

“ ह्या दैवाच्या गोष्टी आहेत खऱ्या ! ” मध्येंच राजा म्हणाला. “ ज्याच्या जातकुळीचा पत्ता नाहीं आणि आईबापांचा ठावठिकाण नाहीं, असा मुलगा वास्तविक हेलपाटीच करतांना दृष्टीस पडायचा; परंतु दैवानं त्याला इतक्या थोर इस्टेटीचा मालक बनविलं, असंच म्हटलं पाहिजे ! नाहींतर थोर कुळांत जन्मलेले दैवानं थप्पड मारल्यामुळं कित्येक दुर्दैवी आज झारेपळ्या घेऊन फिरताहेत ! ”

“ म्हणूनच सांगतों, ह्या दैवाचं कांहीं सांगतां येत नाहीं !—हो पण बरी आठवण झाली. ह्या पंढरपूरच्या अनाथ बालकाश्रमाचं नांव काढतांच पांच वर्षांपूर्वी मुंबईत घडलेल्या एका गोष्टीची मला आठवण होते. कारण त्या गोष्टीचा तुम्हाला जरी उपयोग होण्यासारखा नसला तरी तत्त्व लक्षांत ठेवण्या-सारखंच आहे !—पण मी आतां काय सागत होतों !—” दादासाहेब विचार करूं लागले.

" ह्या दैवावर तुम्ही कांहीं बोलत होतात दादासाहेब ! " गोप्यानं सुचविलं.

" होय होय ! हें दैव अनुकूल आहे तोंवर ठीक आहे. परंतु तें प्रतिकूल होतांच क्षणार्धात अस्मानी सुलतानी होऊन जाते. सांगलीची गोष्ट तुला माहीत आहे ना बाळासाहेब ? "

" तुमच्या बाळासाहेबाला माहीत असेल पण आम्हाला कुठ माहीत आहे ? आम्हाला तरी ऐकू द्या ! " चिंतामणी म्हणाला.

" सांगलीचे पूर्वीचे चीफ तात्यासाहेब फार थोर, दिलदार आणि कनवाळू होते. त्यांच्याजवळ बळवंतराव नांवाचा एक मनुष्य होता.-होता कां ?-अद्यापि आहेच ! हा मनुष्य म्हणजे अगदीं क्षुल्लक ! परतु दैव अनुकूल होतांच तात्यासाहेबांचा अगदीं उजवा हात बनला. तो इतका कीं, दिवाणसाहेबांचा हुकूम चालत नसे तितका त्याचा हुकूम चालूं लागला. त्यानें पावड्यानं पैसा मिळवला. दैव अनुकूल होतं पण लेकाचा मिष्कील होता. ' मला दोनशें रुपये द्याल, तर श्रीमंताकडून तुमचें काम मी करून देतों, ' असें सांगून तो कोणाजवळून शंभर तर कोणाजवळून दोनशें तर कोणाजवळून पांचशे, अशा रकमा काढी. बिचारे गरजू लोक श्रीमंताजवळ त्याचं वजन आहे हें माहीत असल्यामुळं त्याला पैसे देत. "

" पण श्रीमंताजवळून तो त्याचं काम करून देई का ? " गजाभाऊनें विचारलें.

" कसलं आलं आहे काम ! त्या गरजू मनुष्याला अमूक अमूक वेळीं वाड्यावर या ' असें सांगून तो वाड्यावर बोलवीत असे. ती वेळ बहुधा संध्याकाळची असे. तो गरजू मनुष्य वाड्याच्या दरवाजाजवळ येऊन उभा राहिला म्हणजे ' मी आता तुमचंच काम श्रीमंतांना जाऊन सांगतों ' असें त्याला सांगून तो आत श्रीमंताजवळ जाई. बिचाऱ्या त्या माणसाला वाटायचं कीं आता आपलं काम खात्रीनं फत्ते होणार. इकडे या बळवंतरावानं उर्फ बाळासाहेबानं श्रीमंताजवळ हळूच विचारावं कीं, ' आतां संध्याकाळ झाली, गाडी जोडायलं सांगूं कां ? म्हणजे तात्या साहेबांनीं ' होय किंवा नाहीं ' असें सांगावें किंवा इतर गोष्टी काढाव्यात. मग बळवंतरावानं बाहेर येऊन त्या मनुष्याला एका बाजूला नेऊन म्हणावें,—' तुम्ही कांहीं काळजी करूं नका. तुमची सर्व गोष्ट मी आतां तुमच्या समक्षच तात्यासाहेबांच्या कानावर घातलीच आहे, आणि ते मला ' बरं ' म्हणून म्हणालेहि आहेत. आतां तुम्हाला जो

काहीं अर्ज वगैरे करावयाचा आहे, तो योग्य मार्गानं करा म्हणजे तुमचं काम फत्ते झालं ! ”

“ पण त्याचं काम फत्ते होत असे का ! ” पुनः गजाभाऊने विचारले.

“ कसा मूर्ख आहेस रे तू गजाभाऊ ! ” मध्येच राजा म्हणाला. “ त्या मिष्कील माणसाला रुपये देणारे लोक जितके नादान तितकाच तू नादान आहेस ! अरे, त्याचं काम कुठून, फत्ते होणार ? तो बळवंतराव त्याच्या कामाबद्दल एखादा ‘ ब्र ’ तरी तात्यासाहेबाजवळ काढीत असे का ? त्याला तसें भासवायचं परतु हा लेकाचा तात्यासाहेबाजवळ जाऊन बोलायचा भलतंच ! ”

“ मग त्यानं बराच पैसा मिळविला असेल, नाहीं दादासाहेब ? ” श्रीपादनें विचारलें.

“ बराच म्हणजे पावड्यानं पैसा मिळविला म्हणून सांगतो ना ? पण जेव्हा सद्दीचा जोर संपला तेव्हां क्षणार्धांत त्याच्या घरादारावरून गाढवाचा नांगर फिरला ? ”

“ कसा काय ? ”

“ श्रीमंत तात्यासाहेबाच निधन झाल्यावर रिजन्सच्या हातात कारभार येतांच त्याचीं कुलंगडीं बाहेर पडलीं. तेव्हा त्याचं घरदार जप्त झालं, इतकंच नाहीं तर त्यानं कोनाकोपऱ्यांत द्रव्य पुरून लपवून ठेवलं असेल, या संशयावरून त्या मिष्किल माणसाचं घर सुद्धां खणून काढल ? ”

“ तुम्ही पढरपूर अनाथ बालकाश्रमावर कोणती गोष्ट सागणार होता ? ” क्षणभर पसरलेली स्तब्धता मोडून हळूच बापूनें विचारलें,

“ ती गोष्ट तुम्हाला सांगावी किंवा नाहीं, याचा मी विचार करीत होतों. कारण ती मुंबईतील थोर घराण्यांतील गोष्ट आहे ! ”

“ मग त्यांत काय झालं ?—आम्हाला नाव सांगू नका म्हणजे झालं ! नाहींतर नाव बदलून सागा ! ” राजा म्हणाला.—

“ ही सूचना ठीक आहे ! मी नाव बदलून सागतों—” असें म्हणून दादासाहेब घसा साफ करून बोलूं लागले, “ पांच वर्षांपूर्वी मी मुंबईत हनुमान गल्लींत अडतीचं दुकान घातलं, त्यावेळीं मी सहा महिने मुंबईत त्या दुकानाचा जम बसेपर्यंत राहिलों होतों. माझ्याशीं देवघेव करणारे एक कृष्णराव नांवाचे तरुण गृहस्थ होते. अद्यापि आहेत ते. गृहस्थ मोठा देखणा, ‘ अपटूडेट ’ आणि मिट्ठास बोलका ! त्याचा धंदा एकच होता

असं नाहीं. दलालीचा धंदा करी, सट्ट्यांचा व्यवहार करी, कस्टमचीं कामं करी, असे सगळे कांहीं धंदे त्याच्याजवळ होते. कोणाला घरावर पैसे पाहिजेत तरी कृष्णरावाजवळ गिऱ्हाईक तयार, कोणाला घर विकत घ्यावयाचं असलं तरी त्याच्याजवळ गिऱ्हाईक तयार ! कोणाला मोतीं विकून किंवा विकत घेऊन देईल, कोणाचे शेअर विकील, बाहेरगांवीं माल पाठवील, काय वाटेल तें करील. त्यामुळं त्याच्या मोठमोठ्या मंडळींत ओळखी ! कित्येक थोरामोठ्यांच्या घरीं त्याचा इतका घरोबा कीं, त्यांच्या घरांतील मीठमिरच्या अशा क्षुल्लक गोष्टी-पासून तों लग्नकार्यांत हजारों रुपयांची खरेदी त्याच्याकडून व्हायची ! घरांत स्वयंपाकघरापर्यंत त्याचं जाणं, त्याच्याशिवाय त्यांच्या घरांतील काडी सुद्धा हलूं नये, अशी त्यानं आपल्या मिट्ठास भाषणानं आणि मोकळ्या वर्तनानं बऱ्याच बड्या मंडळींच्या घरीं आपली छाप बसविली होती. मनुष्य खरोखरीच सरळ ! ज्यांना आपलं म्हटलं, त्या मंडळींबरोबर त्याचा सर्व व्यवहार अगदीं आरशासारखा स्वच्छ ! लाडी-लबाडी किंचितहि नसायची ! शिवाय त्याच्यांत मोठा गुण हा होता कीं, तो नजरेचा अतिशय शुद्ध होता. बाहेर वाटेल ती झक् मारील, पण जिकडे आपलेपणा आहे, तिथं त्याचं वर्णन खरोखरीच कित्ता घेण्यासारखं होतं. यांत शंकाच नाहीं ! तो माझ्या दुकानावर आला म्हणजे तो तासन् तास बोलत बसे. तो ज्याच्या जवळ बसेल, त्याला असं वाटे कीं, हा आपणाजवळून उठूंच नये ! ”

“ आमच्या ह्या राजासारखीच ती वल्ली होती म्हणायची ! ” हासत राया म्हणाला.

“ कोण हा आपला राजा ? ” बापू एकदम म्हणाला, “ मग जुळलं !—अरे, ह्या राजाला कोणी एक क्षणभरहि आपल्याजवळ बसावायचं नाहीं ! आपल्या रायक्लबची ही घाण आहे घाण ! ”

“ लेका, तुला घाण यायचीच ! आणि न आली तरच नवल ! ” राजा म्हणाला.

मंडळींत असे मधून मधून प्रेमाचे खटके उडत, तें पाहून दादासाहेबांना मोठी मौज वाटे. परंतु त्यात एक गोष्ट त्यांच्या विशेष लक्षांत आली ती ही कीं, बाराहि मित्राची वर्णनीय एकी ! वास्तविक पाहिलें असतां त्या बारा जणांत राया, श्रीपाद आणि गोपाळ हे दोघे भाऊ, बापू आणि मनोहर हे पांच ब्राह्मण, राजाराम आणि बळवंत हे दोघे मराठे, राजाभाऊ हा प्रभू,

नात्या हा तेली, अण्णा हा वैश्य, चाऱ्या हा सोनार आणि भाऊ हा शिंपी अशी निरनिराळ्या जातींची मंडळी होती. शिक्षणांत राजा, राया आणि बापू याचा कॉलेजपर्यंत अभ्यास झाला होता. आणि गोप्याला तर नुसतें ' ट फ ' च, करतां येत होतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे त्या बारा जणांत जातीच्या बाबतींत विषमता होती, तशी शिक्षणात होती आणि वयांतहि होती. कारण बाप्याचें वय अठ्ठावीस वर्षांचें सर्वांत जास्त होतें, तर गोप्या अवघा पंधरा वर्षांचा होता. असा जरी प्रकार होता, तरी सर्वजण एकमेकाच्या विचारानें, परस्परांशीं प्रेमानें आणि एकजुटीनें रहात आहेत, हें पाहून दादासाहेबानीं त्या मंडळींचें का कौतुक वाटूं नये ? त्याची एकी जबरदस्त होती आणि म्हणूनच रायक्लब होता.

" कृष्णराव तरुण आणि रंगेल असल्यामुळं त्याला बाहेरचा नाद जरा विशेष होता—" दादासाहेब पुढें सांगूं लागले, " मुंबईत त्याची एखाद्या कोनाकोपऱ्याला राहणाऱ्याहि नायकिणीची ओळख नाहीं, असं नाहीं ! आणि मौज ही कीं, त्याहि साम्राज्यात तो सर्वांना प्यारा होता. बेट्याचा वशिलाहि असा दांडगा असे कीं, एखादी नायकीण दोनशें रुपये देऊनहि बैठकींत चार चार तास गावयाची नाहीं, तिला हा हकानं सांगून सर्व रात्र गात बसवायचा ! कित्येकजणी तर कृष्णरावाकरिता वेड्या होत. तो म्हणजे त्यांना कांहीं पैसे देत होता किंवा त्याचा प्रपंच चालवीत होता, असंहि नाहीं. उलट त्यांच्याकडे साधंहि नाहीं पण मसाल्याचं दूध पिऊन वर पानपट्टी खाऊन त्यांचीच एखादी जिन्नस आपलेपणानें मागून घेई ! दुसरी अशीहि मौज कीं, दरमहा दोनशें रुपये देणारे त्याचे शेट येऊन बसले असतांहि त्या घरीं कृष्णराव गेला, तर शेटजीनं त्याला प्रेमानं जवळ बसवून ' आओ कृष्णराव ! अरे भला माणस, तमे छो क्यां ? ए अंजनी कहे छे, के तमे महिना दाढा अहींया आवता पण नथी ! ' असं म्हणावं किंवा ह्या रंगेल प्राण्यानं आपल्या शेट-जवळ बसलेल्या त्या अंजनीला खुशाल आत बोलावून तिच्याशीं गप्पा मारीत बसावं ! इकडे शेटजी बमून कंटाळले कीं, मुकाट्यानं उठून जात पण कृष्णरावाजवळ बसलेल्या आपल्या पात्राला बोलावीत नसत !—का, आहे कीं नाहीं मजा ! असंहि असून हा प्राणी नेहमीं नवीन नवीन स्थळं धुंडण्याच्या नादांत असायचाच ! मुंबईत कुठं कुठं अड्डे आहेत, कुठं कोण रहातो, आणि कुठं काय प्रकार चालतो, याची बित्तंबातमी त्याला असे. माझ्याजवळ सर्व

कांहीं तो अगदीं मोकळ्या मनान सांगत असे, त्याचे हे सर्व खेळ माहीत असूनहि अशा मनुष्याला आपल्या घरांत कसा येऊं द्यावा, अशी मलासुद्धां कधीं शंका आली नाहीं. मग इतरांची काय गोष्ट ! हा खुशाल घरात जाऊन ' वहिनी आम्हाला चहा नाहीं का ? असें म्हणून तिच्याकडून चहा मागून घेई आणि वर फराळाचहि खाई ! अशी ही गुलजार व्यक्ति होती ! '

" आहे खरी बुवा गुलजार व्यक्ति ! " बापू म्हणाला.

" एके दिवशीं दिवे लागण्याच्या सुमारास कृष्णराव माझ्याकडे घाबऱ्या घाबऱ्या आला आणि मला कांहीं सांगूं लागला. त्याच सांगण ऐकून मीहि विचारांत पडलो त्याला कोणता सल्ला द्यावा, हेंच मला सुचेना ! परंतु त्याला मी जो सल्ला दिला आणि प्रथम त्यानें मला जी गोष्ट सांगितली, ती मी तुम्हाला आतां नांव बदलून एखाद्या गोष्टीच्या रूपानं सांगतों. " असें म्हणून दादासाहेबानी बाजूला बसलेल्या आपल्या पत्नीकडे पाहून म्हटलें, " आली का तुझ्या लक्षांत ती गोष्ट ? "

" हो !-ती-" वहिनी पुढें कांहीं बोलत होती तोंच " अग, नांव घेऊन काय सांगतेस ? " असं म्हणून दादासाहेबानीं तिला दाबले !

" हें पाहिलत, बायकांना पोंच कमी असतो, तो हा असा ! " दादासाहेब बाकीच्या मंडळीकडे पाहून म्हणाले, " त्याच्या तोंडीं कोणतीहि गोष्ट रहात नाहीं म्हणतात तेंच खरं ! चिनी लोकात एक फार मोठं ' ब्रदरहुड ' म्हणजे बंधुत्वाच नात जुळविणारी एक संस्था आहे. तिची एक शाखा कलकत्त्याला आहे. हिंदुस्थानात राहणाऱ्या चिनी लोकांकरितां ही शाखा घातली आहे. प्रत्येक चिनी मनुष्याला ह्या शाखेचा सभासद होता येत. जेव्हा सभासद करण्याचा विधि करतात, त्यावेळीं शपथ घ्यावी लागते. ती शपथ कशाकरिता असते ? केवळ तो मनुष्य सभासद होताना ज्या काहीं गोष्टी त्याला सांगण्यांत येतात, त्या त्यानं आपल्या बायकोला सुद्धा सांगतां उपयोगी नाहींत, इतकी सक्त मनाई आहे. कारण त्याना माहीत आहे कीं, एकदा एखादी गोष्ट बायकोच्या कानावर गेली, कीं तिला वाचा फुटलीच ! "

" हो—हो ! आम्ही बायका म्हणजे जशा कांहीं अगदीं वाचाळच ! " वहिनी किंचित् ठसक्यांत म्हणाली.

" वाचाळ नाहींतर काय ?—एकदा सोडून दहादा ! इतकंहि असून वाचाळ म्हटलेलंहि खपत नाहीं, काय न्याय आहे ! " दादासाहेब म्हणाले.

ह्या पतिपत्नीच्या भाषणात इतर कोणालाहि बोलतां येईना. सर्वजण मुकाट्यानें तो नवराबायकोचा विनोदी खटका ऐकत होते. नंतर दादासाहेब म्हणाले, " मुंबईत प्रार्थनासमाजाजवळ एक श्रीमंत, थोर, विद्वान आणि घरदाज असे सुधारक गृहस्थ रहात होते. एका इंग्लिश फर्ममध्यें त्यांना मोठ्या पगाराची नोकरी होती. घरांत ते स्वतः त्यांची वडील वृद्ध बहिण, बायको आणि दोन मुली इतकी मंडळी. मोठ्या मुलीचें वय सतरा वर्षांचं होत पण ती विधवा होती. बिचारीचं पंधराव्या वर्षी लग्न होऊन सहा महिन्यांनीं अपघातानं तिचा नवरा मेला ! तेव्हांपासून बापानं तिला आपल्याचकडे ठेविली, —आतां तिच आणि तिच्या धाकट्या बहिणीचं काय बरं नांव ठेवावं ? "

" ठेवा इंदुमति आणि भानुमति ! नाहींतर ठेवा शालिनी आणि मालिनी श्रीपादनें सुचविलें. "

" बर तर मोठीला आपण इंदुमती म्हणूं आणि धाकटीला भानुमती म्हणू धाकटी भानुमती कोटांत ' एम्प्रेस गर्लस् स्कूल ' मध्यें जात असे, ही मुलींची शाळा कोटांत राणीचा पुतळा आहे, तिथ आहे. वडील नोकरीवर जाताना तिला आपणाबरोबर ट्राममध्ये घेऊन जात असत आणि संध्याकाळीं परत येताना स्वतः घेऊन येत असत, किंवा आपला ऑफिसचा शिपाई पाठवित असत, परंतु पुढें पुढें ही भानुमती एकटीच शाळेंत जाई. ह्या शाळेंत जाणाऱ्या मुली कशा धीट असतात, तें तुम्ही पाहताच ! त्यातून हायस्कूलात किंवा कॉलेजांत जाणाऱ्या मुली तर कांहीं विचारूच नका ! गर्दीतून सुद्धा त्या बिनदिक्कत निघून जातात. हा त्याचा धीटपणा चांगला किंवा वाईट आहे, अशी कोणतीच टीका करण्याचा माझा उद्देश नाहीं परंतु रस्त्यानं जाणाऱ्या येणाऱ्यांच्या बोलण्याचा मात्र त्या विषय होतात. आणि टवाळांच्या टीकेला तें एक खाद्य होतं ! अशी ही हायस्कूलांत उच्च शिक्षण घेणारी पधरा वर्षांची मुलगी रस्त्यानें जात आहे आणि बाळबोध आईजवळ गृहशिक्षण घेणारी पंधरा वर्षांची मुलगी आईबरोबर त्याच रस्त्यानें जात आहे, अशा जर दोन मुली आपण एकाच वेळीं पाहिल्या तर ' हें चित्र पहा आणि तें चित्र पहा ! ' असंच आपणास म्हणाव लागेल. डाव्या हातांत पुस्तकें उजव्या हातात छत्री, पायात स्लीपर अशा ताड् ताड् चालताना पदराची शुद्धि नसलेली ती मुलगी आणि खालच्या मानेनं, पदर सांवरून आईच्या पावलावर पाऊल टाकीत चाललेली ही मुलगी ! अशा

ह्या दोन चित्रांतून तुम्ही कोणतं चित्र पसंत कराल ? ”

“ कोणालाहि दुसरंच चित्र पसंत होईल ! ” गजाभाऊ म्हणाला.

“ बरं जाऊं द्या तीं चित्रं ! हें विषयांतर झालं ! ” दादासाहेब म्हणाले, “ भानुमती अशी केव्हां केव्हां एकटीच शाळेंत जात असे. त्या शाळेंत सर्व जातींच्या मुली होत्या. विशेष भरणा पारशी मुलींचा असून खिश्चन आणि दक्षिणी पांढरपेशांच्याहि मुली त्या शाळेंत होत्या. ह्या मुलींच्या वयमानाकडं पाहिलं कीं आश्चर्य वाटतं. वीसवीस बावीस बावीस वर्षांच्याहि मुली त्यांत होत्या. चार चार मुलांची आई शोभेल; अशी एक मुलगी पाहून कोणाला आश्चर्य वाटणार नाहीं ? ”

“ अशा मुलींना आमच्या प्रधानजीनं ‘ घोडमुली ’ असं नांव दिलं आहे ! ” राया मध्येंच म्हणाला.

“ घोडमुली नाहींतर काय ! ” दादासाहेब म्हणाले, “ एकदां ही भानुमति एकटीच शाळेंत जाण्याकरितां निघाली आणि गिरगांवच्या नाक्यावर येऊन ट्रामची वाट पहात उभी राहिली. इतक्यात तिच्याच वर्गातील एक पारशी मुलगी स्वतःच्या गाडींतून जात असतांना तिनं भानुमतीला पाहिलं आणि गाडी उभी करून तिला आपल्या गाडींत घेतलं. ह्या पारशी मुलीचं नांव आपण शिरीनबाई ठेऊं. स्वतःच्या गाडींतून ही शिरीन शाळेंत जाते, यावरून तिच्या घरच्या श्रीमंतीची सहज कल्पना होण्यासारखी आहे. गाडींत बसल्यावर ‘ तूं अशी रोज ट्रॅमनेंच का शाळेंत येतेस ? ’ असा शिरीननें प्रश्न केला. त्याला होकारार्थी उत्तर मिळाल्यावर ती म्हणाली—“ मी रोज ह्याच रस्त्यानं शाळेंत जातें. मला तुझं घर माहीत असतं तर मी तुझ्या घरीं गाडी उभी केली असती. मग आपण दोघी बोलत गेलों असतों. बरं आतां संध्याकाळीं परत जातांना तूं माझ्याच बरोबर ये. ” ह्यानंतर त्या दोघींच्या इतर गोष्टी झाल्यावर त्या शाळेंत गेल्या. संध्याकाळीं ठरल्याप्रमाणें भानुमति तिच्या गाडींत बसून घरीं आली. आपल्या मुलीची ही गाडींतून जाण्यायेण्याची सोय झाली; हें पाहून आईला आनंद झाला. संध्याकाळीं वडिलांना कळल्यावर त्यांनाहि त्यांत काहीं वावगं दिसलं नाहीं. त्यांनीं शिरीनच्या बापाचं आणि आडनाव विचारतांच ‘ फ्रामरोज चोकशी ’ यांना ओळखलं. ‘ फार बडा मनुष्य आहे ? ’ असं ते म्हणाले. अशा रीतीनं चार

दिवस सकाळ-संध्याकाळ एकत्र राहिल्यावर भानुमती आणि शिरीन ह्या दोघींची स्वाभाविकच मैत्री जुळली. पुढें दुसऱ्या दिवशीं रविवारची सुटी आली तेव्हां शनिवारीं शाळेंतून परत येताना शिरीननें विचारलें, " उद्यां रजा आहे. उद्यां तूं काय करशील ? "—" कांहींतरी वाचीत नाहींतर विणकाम घेऊन बसेन ! " असं भानुमतीनं उत्तर दिल्यावर—" मग संध्याकाळीं फिरायला येशील का माझ्याबरोबर ? असं शिरीननें विचारल्यावर भानुमती ' होय ' म्हणून म्हणाली ! "

" पण यांत त्या पंढरपूरचं अनाथ बालकाश्रम कुठं आलं ? " बापूनें विचारलें.

" तूं अगदीं महामूर्ख आहेस, बापू ! " राजा रागानें म्हणाला " आला नाहीं पण पुढें येईल ! उगाच मध्यें मध्यें व्यत्यय आणतो. कशी रंगांत गोष्ट आली आहे ! "

" गोष्ट नाहीं बरं ही ! " दादासाहेब म्हणाले, " अगदीं सत्य घडलेला हा प्रकार आहे, आता ही शिरीन मुलगी कशी होती, तें सांगतों. हिचं वय एकवीस वर्षांचं होतं. घरची श्रीमंती, मुबलक खाणं पिणं आणि सर्व गोष्टींत स्वातंत्र्य, त्यामुळं ती धिप्पाड दिसत होती. अशा ह्या सर्व अनुकूल स्थितींत तारुण्य प्राप्त झालेलं मग काय विचारता ? जगांतील सुखाचा स्वाद तिनं घेतला असल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं. थोडक्यांत सागायचं म्हणजे ही शिरीन बरीच निर्ढावलेली होती असो. दुसऱ्या दिवशीं म्हणजे रविवारीं साडेचार वाजतां शिरीन फिरायला जाण्याकरितां आली. भानुमती तिची वाट पाहात तयारच होती. दोघीहि गाडींत बसल्या. महालक्ष्मीवर जावयाचं असं त्यांनीं ठरविलं होतं. त्याप्रमाणं गाडी महालक्ष्मीला जाण्याकरितां निघाली. भानुमति ह्यापूर्वी बऱ्याच वेळां आपल्या वडिलांबरोबर इंदूताईसह महालक्ष्मीवर गेली होती. त्यामुळं महालक्ष्मीवर जाणाचा रस्ता तिच्या ओळखीचा झालेला होता. परंतु आतां ती शिरीनबरोबर गाडींतून जात असतांना तिला तो रस्ता नवीनच दिसूं लागला, तेव्हां तिनं विचारलं, " शिरीन, आपण महालक्ष्मीला जायचं असं ना ठरविलं ? मग हा रस्ता कांहीं महालक्ष्मीवर जाणारा नव्हे ! "

" होय महालक्ष्मीवरच जावयाचं पण प्रथम मी माझ्या आत्याकडं जरा जाऊन येतें. तिला आठवड्यांतून मी एकदां भेटत असतें. ह्या इकडेच ती

जवळ राहते. तिला भेटून आल्यावर मग आपण महालक्ष्मीला जाऊं ! ” शिरीननें स्पष्टीकरण केल्यावर भानुमती काय बोलणार ? थोड्या वेळानं एका वाक्यावर ?—चल, थोडा वेळ बैस. मी आत्याला भेटताच येऊं परत ! ’ —भानुमतीला त्यात गैर वाटल नाहीं. शिरीनच्या मागून ती गाडींतून खालीं उतरली. सडकेनं थोडं चालून गेल्यावर एका गल्लींत शिरीन वळली. आणि दोन चार घरें टाकल्यावर एका चाळीवजा घराजवळ येऊन शिरीननें त्या बंद असलेल्या दरवाजावर आपल्या बोटातील आंगठीन ठोकलें. भानुमती तिच्या मागें उभी होती. थोड्या वेळान दरवाजाची आतील कडी वाजून दरवाजा किलकिला उघडला आणि एका म्हाताऱ्या पारशिणीनं हळूंच बाहेर डोकावलें. शिरीन दृष्टीस पडतांच ‘ आवो शिरीनबाई आवो—आवो ! ’ असें म्हणून तिनें शिरीनला आंत येण्यास सांगितले.

“ मारासाथे मारी दोस्तदारीण छे ! ” असें म्हणून शिरीन भानुमतीला घेऊन त्या म्हातारीच्या मागून घरात शिरली, ती बाहेरची जागा ग्यालरी-सारखीच होती. तेथून आंत गेल्यावर तेथें सात आठ खुर्च्या मांडलेल्या होत्या. त्यांपैकीं एक खुर्ची मोठी ऐस पैस अशी लांब हात लावलेली होती. त्या खुर्चीवर ती म्हातारी बसली. नंतर तिनं शिरीन आणि भानुमती याना बसायला सांगितलं ! बराच वेळ कोणीहि बोललं नाहीं. भानुमती इकडे तिकडे पाहू लागली. दोन्ही बाजूना दोन खोल्या होता. परतु दरवाजे बंद होते. एका कोपऱ्यांत मच्छरदाणी लावलेला लहान पलंग होता. बाजूला स्टूल त्यावर फ्लावरपॉट ठेवलें होतें. हें मी इतक्या बारकाईन वर्णन करतों, याचं कारण ती जागा कृष्णरावानं मागाहून मला नेऊन दाखविली. तिकडे बसल्यावर शिरीन आणि ती म्हातारी कांहींच बोलत नाहींत, असं पाहून भानुमतीनं सहज बाजूला वळून शिरीनकडे पाहिलं. त्यावेळीं तिचा आणि म्हातारीचा कांहीं नेत्रसंकेत होत असलेला भानुमतीच्या दृष्टीस पडला. थोडया वेळानं ती म्हातारी उठून आंत गेली. तिनें आपलें शरीर आंत जाईल इतक्या बेतानंच दरवाजा बंद केला. आणखी कांहीं वेळ गेल्यानंतर तिनं आंतूनच किंचित् दरवाजा उघडून शिरीनला हांक मारली. तशी ती चटकन् उठली. आणि भानुमतीला ‘ जरा बैस, मी आतां पांच मिनिटांत येतें, ’ असें सागून ती आंत गेली. नंतर ती आंत गेल्यावर म्हातारी बाहेर आली पुनः तिनं दरवाजा बंद करून घेतला. भानुमती जवळ येतांच ‘ तमे चाय लेशो

के !—नाय तो कोलड्रिंग मागवटे ' असं म्हणाली. भानुमतीनें ' मला कांहीं नको ' असं सागितलं, तरी तिनं " ए छोकरा–' म्हणून हांक मारलीच !' त्याबरोबर बाहेरून एक मुसलमान छोकरा आंत आला. त्याला ' महंमद, एक राजबरी आईस लेई आव ' असा तिनं हुकूम फर्माविला. छोकऱ्यानं हुकूमा-प्रमाणं दहा पधरा मिनिटांत राजबरी आईस भरून एक ग्लास आणलं. भानुमतीला मोठा विचार पडला. मुसलमान मुलानं आणलेलं ग्लास आपण कसं घ्यावं, ह्या विचारांत ती गोंधळली. म्हातारी तिला आग्रह करीतच होती. इतक्यात दरवाजा उघडून शिरीन बाहेर आली. तेव्हा स्वाभाविकच भानुमतीचं लक्ष तिकडं गेलं. शिरीन बाहेर आल्यावर तिनं दरवाजा बंद केला नाहीं. त्यामुळं आतील देखावा भानुमतीच्या दृष्टीस पडला. तिथंहि एक पलंग असून त्या पलंगावरून एक मनुष्य अस्ताव्यस्त कपड्यानं उतरत होता. हा प्रकार पहातांच भानुमतीला चमत्कारिक वाटलं. तिनं शिरीनकडे पाहिलं, तेव्हा तिची चर्या आरक्त झालेली दिसली. बाहेर येताच शिरीननें आपल्या पोलक्याच्या खिशात हात घातला. त्यावेळीं तिच्या पोलक्याचीं बटण सर्व सुटलेली भानुमतीच्या दृष्टीस पडली. शिरीननें खिशांतून एक पाच रुपयांची नोट काढून त्या म्हातारीच्या हातीं दिली आणि ' माईजी, हूं हमणा जाऊं छू ! ' असें म्हणून तिनं भानुमतीला मानेनेंच चलण्याची खूण केली ! भानुमतीला कसंसंच वाटूं लागलं ! हा काय प्रकार असावा, हे तिच्या कांहींच लक्षांत येईना ! " तूं आंत जाऊन काय केलंस ? " असा शिरीनला प्रश्न करावा, अशी एक विचाराची लाट तिच्या डोक्यात आली. परंतु ती आपल्या आतेला भेटायला गेली होती, तेव्हां आंत कोणी तरी तिच्याच नातलगांपैकीं असावा, असं शेवटीं तिला वाटलं ! गाडींत बसल्यावर सरळ महालक्ष्मीवर आली. तोंपर्यंत शिरीन काहीं एक बोलली नाहीं. थोडा वेळ इकडे तिकडे फिरतांच आणि सायंकाळचा तो समुद्राचा देखावा पाहताच भानुमती मागल्या सर्व गोष्टी विसरली. घरीं आल्यावर जेवण वगैरे झाल्यानंतर ती आपल्या अभ्यासाच्या खोलींत अभ्यास करीत बसली असता तिची वडील बहीण इंदुमती खोलींत आली आणि एक पुस्तक घेऊन वाचीत बसली. थोड्या वेळानें तिला आठवण पडतांच ' आज तूं तुझ्या नवीन मैत्रिणीबरोबर कुठं कुठं फिरायला गेली होतीस ? ' असा इंदुमतीनं प्रश्न केला. त्याबरोबर तेथें पाहिलेलं सर्व चित्र भानुमतीच्या डोळ्या-

पुढं उभं राहिलं. तिनं अगदीं अथपासून तों इतिपर्यंत सर्व प्रकार जसा तिनं पाहिला, तसा आपल्या बहिणीला सांगितला. इंदूमती मुकाट्यानं ऐकत होती. भानुमतीला जें कळलं नाहीं, तें तिला कळलं! तिच्या डोक्यांत नानाप्रकारचे विचार भ्रमण करू लागले. ऐकलेल्या गोष्टीमुळं तिला सर्व रात्रभर झोंप लागली नाहीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं सहज बोलतांना 'भानू' तूं आपल्या मैत्रिणीला आपल्या घरीं एकदां सुद्धां चहाला बोलाविलं नाहींस?" असं इंदुमती म्हणाली. तेव्हां 'आज तिला मी संध्याकाळीं बोलविणार आहें' असं भानुमतीनं उत्तर दिलं. संध्याकाळीं भानुमतीनं आपली मैत्रिण शिरीन हिला घरीं चहाकरितां आणलं. इंदुमतीची आणि शिरीनची ओळख झाली. थोड्या वेळानं भानुमती चहा घेऊन येण्याकरितां आंत गेली. ती संधि साधून इंदुमतीनं तिला म्हटलं, "शिरीन बाई, मला पण न्याल काहो तुम्ही आपणाबरोबर फिरायला!"

"हो न न्यायला काय झालं! मी रविवारीं बहुतकरून एकटीच फिरायला जात असतें. काल मी तुमच्या भानुमतीला नेलंच होतं."

"तिकडेच मला न्याल का?" असा इंदुमतीनं प्रश्न करायला आणि भानुमती चहा घेऊन यावयाला एकच गांठ पडली. तिचा प्रश्न ऐकून शिरीनबाई थोडी चमकलीच होती. ती इंदुमतीकडे पाहूं लागली. तेव्हां "भानुमती आधीं बोलूं नको!" अशी इंदुमतीनं तिला केलेली खूण तिच्या लक्षांत आली. कारण नेत्रपल्लवी भाषेंत ती प्रवीण होती. आपणास एक जोडीदारीण मिळाली, म्हणून शिरीनला स्वाभाविकच आनंद झाला!"

"व्हायचाच!" मध्येंच राजा म्हणाला, "आपणासारखी दुसरी केव्हा होते, हीच त्याची इच्छा!"

"मग शिरीनची आणि इंदुमतीची गट्टी जमली!" दादासाहेब पुढें सांगूं लागले, "ती रोज शाळेंतून घरीं जातांना भानुमतीबरोबर तिच्या घरीं गाडींतून उतरे आणि थोडा वेळ इंदुमतीबरोबर बोलून मग घरीं जाई. रविवारीं इंदुमतीला आपणाबरोबर फिरावयास न्यावयाचं असं शिरीन भानुमतीला म्हणाली होती. परंतु त्या भाबड्या भानुमतीला त्यांत कांहीं विशेष वाटलं नाहीं. कारण तिला जगाचा काहींच अनुभव नव्हता. परंतु इंदुमतीची गोष्ट निराळी होती. तिनें थोडा काळ का होईना, पण पतिसुख अनुभविलं होतं आणि आतां अशी संधि येतांच तिच्या मनानें उचल खाल्ली!

रविवार केव्हां उजाडतो, म्हणून ती तळमळूं लागली. शेवटीं एकदांचा रविवार उजाडला! त्याच दिवशीं तिच्या सुदैवानें म्हणा किंवा दुर्दैवानें म्हणा तिच्या धाकट्या बहिणीला अडचण आली. अर्थात् संध्याकाळीं ठरल्याप्रमाणें शिरीन गाडी घेऊन आली, तेव्हां तिला ती गोष्ट कळली. 'भानुमती नाहीं बरोबर मग मी एकटी कशी येऊं?' असं निराशेन इंदुमतीनं तिला सांगतांच ती म्हणाली, ती नाहीं, हें एका अर्थी बरंच झालें!— इंदुमतीची समजूत पटली. भानुमतीनेंहि तिला 'मी नाहीं म्हणून तुला जायला काय झालं इतकी ती तुला प्रेमानं बोलविते, मग तूं जात कां नाहींस?' अशी भर देताच इंदुमती तयार झाली. गाडींतून पोरीला फिरायला मिळतं, मग आईनं तरी का आडकाठी आणावी? तिनंहि जाण्याची परवानगी दिली. दोघी गाडींत बसल्या आणि निघाल्या. ठराविक स्थळीं येतांच गाडी उभी राहिली आणि त्या दोघी त्या म्हाताऱ्या पारशिणीच्या घरीं म्हणजे अनीतीच्या–पातकाच्या घरांत शिरल्या. शिरीन त्या म्हातारीबरोबर थोडा वेळ बोलल्या नंतर त्या थेरडीनं इंदुमतीकडं पाहिलं आणि हांसत हांसत ती म्हणाली, "ठीक ठीक बेन! तुमने येवो माणस आपुं छूं, के तमें पण खुशी थशो!" नंतर शिरीन एका खोलींत गेली आणि इंदुमतीला त्या थेरडीनं दुसऱ्या खोलींत नेलं! ह्यावेळीं तिच्या विवेकाला पूर्ण फांटा मिळाला होता. षड्रिपूंपैकीं पहिल्याच रिपूनें तिची मती काबीज केली होती. आपण हें काय करीत आहोंत; याचं तिला भानच नव्हतं. इतकी ती बेफाम झाली होती. त्या खोलींत जाऊन थोडा वेळ झाला. इतक्यांत बाजूचा दरवाजा उघडून एक मनुष्य आंत गेला. परस्परांची दृष्टि एक झाली, त्याबरोबर इंदुमतीनं जोराची किंकाळी फोडली! आणि जागच्या जागींच बेशुद्ध पडली!"

"हा काय प्रकार झाला बुवा? बापूनें मध्येंच विचारलें, "तो मनुष्य तिच्या ओळखीचा होता कीं काय?"

"होय. तो तिच्या ओळखीचा, नेहमीं त्यांच्या घरीं जाणारा. इंदू आणि भानू ह्या दोघींना आपल्या 'भगिनी' म्हणून मानणारा होता! आतां ओळखा पाहूं तो कोण होता?" दादासाहेब म्हणाले, मी ही गोष्ट एखाद्या कादंबरीसारखी रचून सांगितली आहे, तरी तो मनुष्य कोण होता, हें सहज ओळखतां येईल!"

"तुमचा रंगेल गडी कृष्णरावच!" गजाभाऊनें उत्तर दिलें.

" होय तोच होता ! माझ्याकडे जेव्हां तो आला, त्यावेळीं त्याची चर्या मला इतकी भयभीत झालेली दिसली, कीं मीही गोंधळूनच गेलों. नेहमींचा त्याचा तो हांसरा चेहरा मला आज इतका भेसूर आणि कलाहीन दिसला कीं प्रथम मला त्याला ओळखतांच आलं नाहीं. मी त्याला विचारलं, " अरे कृष्णराव, आज तुझी चर्या अशी कां ? आणि इतका घामाघूम होऊन धांवपळ करीत आलास कोठून ?—वाघ का लागला होता तुझ्या पाठीस, कीं एखाद्या राक्षसानं तुला पकडलं होतं, कीं पिशाचानं तुला मिठी मारली होती ?"—बैस, थोडा शांत हो ! "

" दादासाहेब, ह्या तिन्ही गोष्टी एकदम जरी झाल्या असत्या तरीहि हा कृष्णराव इतका गडबडला नसता ! पण दादासाहेब, आतां मी एक अतिशय विलक्षण, चमत्कारिक, कधींहि स्वप्नांत नसलेली अशी गोष्ट पाहिली. आणि तुम्ही माझ्या जिवाचे खरे हितचिंतक म्हणून मी तुमची सल्ला घेण्याकरितां हा असा धांवत आलों आहें ! "

" थांब कृष्णराव, जरा शांत हो. तुझं बावरलेलं चित्त ठिकाणावर येऊं दे. आणि विचारहि जरा संकलित होऊं दे, मग मला सावकाश सांग ! तुझ्यावर जर कांहीं प्रसंग आला असेल, तर तुला मदत करीन, ही खात्री ठेव ! " मी म्हणालों, " तेव्हां खरोखरीच तो दहा मिनिटं अगदीं शांत बसला. नंतर तो बोलूं लागला, " दादासाहेब, मी तुमच्याकडून कांहीं एक लपवून ठेवीत नाहीं, हें तुम्हांला माहितच आहे. माझे बरे-वाईट धंदे तुम्हांला ठाऊकच आहेत. आज पांच वाजण्याच्या सुमारास मी कांहीं कामानिमित्त ग्रांटरोडवर गेलों होतों. तिथं एक माझ्या ओळखीची बाई आहे ती आहे जातीनं पारशीण. ती पूर्वी नवसारीला होती. तेथून आज आठ वर्षे झालीं, ती मुंबईत येऊन एक सभ्य धंदा घालून बसली आहे. तिथले सर्व व्यवहार अतिशय खासगी असतात. असे सभ्य धंदे या मुंबईत बऱ्याच ठिकाणीं आहेत. भुलेश्वर, गुलालवाडी, कांदेवाडी, चंदनवाडी, गिरगांव अशा ठिकाणीं ह्या परोपकारी बायां बसल्या आहेत, नवरा बाहेर शेण खातों, तेव्हां बायकांनीं किती दिवस रडत रहायचं ! त्या बायकांची सोय ह्या ठिकाणीं होते. आज मी तुम्हांला हें इतकं उघड कां सांगतों, हें तुमच्या लक्षांत नसेल आलं, पण आज जो प्रकार घडला, त्याबरोबर माझे डोळे खाडकन् उघडले ! जिला मी बहिण मानली, तिच्यापुढं मी आज अजाणतेपणीं

जाऊन उभा राहिलों ! 'अरे दुष्टा—अधमा—पातक्या !' असं म्हणून त्यानं ताड् ताड् तोंडांत मारून घेतल्या !"

"तो प्रसंग त्याच्या उपरतीला कारण झाला, यांत शंकाच नाहीं!" राजा म्हणाला.

"होय—कृष्णरावाला खरी उपरती झाली! तो पुढें काय म्हणाला, तें ऐका—'आजपासून जगातील सर्व स्त्रिया ह्या कृष्णरावाला बहिणीसमान आहेत. ह्यापुढें हा कृष्णराव आजन्म अविवाहित राहून ब्रह्मचर्य व्रतानं आयुष्य घालविणार!" दादासाहेब म्हणाले.

"ही भीष्मप्रतिज्ञाच केली म्हणायची! पण अशा रंगेल गड्यांकडून ती कितपत पाळली जाणार ही शंकाच आहे!" बापू म्हणाला.

"तुमची ही कल्पना साफ चुकीची आहे! कृष्णरावानं आजपर्यंत तर आपली प्रतिज्ञा पाळली आहे आणि तो पुढेंहि पाळील, अशी माझी पूर्ण खात्री आहे!" दादा म्हणाले. "नंतर कृष्णराव मला पुढें सांगूं लागला, 'दादासाहेब त्या ठिकाणीं आज मी गेलों. मला पाहतांच त्या थेरडीला मोठा आनंद झाला. ती मला म्हणाली, 'कृष्णराव तुम्ही मोठ्या भाग्याचे आहांत! आजपर्यंत कधींहि मिळाला नसेल, असा माल मी तुम्हाला आज देतें. पण त्याला पैसाहि तसाच द्यावा लागेल!' मी हुरळलों आणि गुजराथींतच म्हणालों कीं, 'मला दाखविल्याशिवाय मोल काय ठरवितेस? माल पाहून मोल देईन?'-नंतर तिनं मला एका खोलींत जावयास सांगितलें. दरवाजा उघडून आंत पाऊल टाकलं तों काय सांगूं दादासाहेब? डोक्यावर भयंकर वज्राघात होऊन मी जागच्या जागींच दगडासारखा उभा राहिलों! मी त्या खोलींत कोणाला पाहिलं?—जिला मी माझी प्रत्यक्ष बहिण मानली, जिचं वर्तन मला देवतेप्रमाणं पूज्य वाटत असे, जिच्याविषयीं माझ्या मनांत अत्यंत आदर ती इंदुमती तिथं उभी! मला पाहतांच तिनं किंकाळी फोडली आणि एखाद्या मोडलेल्या केळीप्रमाणं ती जागच्या जागीं कोलमडून पडली! एक क्षणभरसुद्धां मी तिथं उभा राहिलों नाहीं. इंदूमतीची किंकाळी ऐकून ती थेरडी दरवाजांतून घाईघाईनं आत येत होती, तिला जोराचा धक्का मारून बाहेर पडलों. माझ्या धक्क्यामुळं ती इथं थेरडी बाजूच्या भिंतीवर धाडकन् आपटली! मी जो तेथून निघालों, तों हा उभा आहे!–दादासाहेब, सांगा–मी आतां काय करूं तें सांगा?–मी आतां कोणतं प्रायश्चित्त घेऊं तें सांगा!–तुम्हीं सांगत असाल तर असाच धांवत

परत जातों, आणि त्या चांडाळ म्हातारीच्या नरडीचा घोंट घेतों !–अरेरे ! इंदुमती, माझ्या पवित्र भगिनी ! तूं अशा ठिकाणीं कशी आलीस ? '–असं म्हणून कृष्णरावानं दोन्ही हातांनीं आपलं डोकं घट्ट धरलं ! मी त्याला परोपरीनं शांत करण्याचा प्रयत्न केला. त्याच्या एकंदर वर्तनावरून तो वेडाच होणार असं मला वाटलं ! "

" खरंच ! वेडा होण्यासारखीच परिस्थिती उत्पन्न झाली होती यांत शंकाच नाहीं ! " राया म्हणाला, ' अशा मंडळींना जपायचं असतं तें ह्याच वेळीं ! अशा वेळीं जपणाऱ्या मनुष्याच्या हातून किंचित हलगर्जीपणा होताच भयंकर परिणाम होतात. सांगा दादासाहेब, तुम्ही त्याला कोणती सल्ला दिलीत ? तुमच्या सल्ल्यावरच कृष्णराव आणि इंदुमती ह्या दोघाचं आयुष्य अवलंबून होतं आणि त्यांच्या घराण्याचा लौकिकहि अवलंबून होता ! "

" बाळासाहेब, तूं म्हणतोस, तोच विचार त्यावेळीं माझ्या डोक्यांत आला, " दादासाहेब पुढें म्हणाले, " कृष्णराव मला सल्ला विचारायला आला होता, हें मी विसरलों नाहीं. मी त्याला शांत करून खोलींत नेऊन आपल्या बिछान्यावर निजविलें, त्याचं डोकं अत्यंत भडकलेलं होतं. त्या डोक्याला पूर्ण विश्रांतीची आवश्यकता होती. कृष्णराव बिछान्यावर पडतांच त्यानें डोळे मिटले. त्याच्याजवळ बसून मी विचार करूं लागलों. त्याला झोंप लागली होती किंवा नाहीं, मला कांहींच सांगतां येत नाहीं परंतु तो बिछान्यावर जसा जाऊन पडला त्याच स्थितींत त्यानें डोळे मिटून मध्यरात्रींपर्यंत हालचाल केल्याशिवाय स्तब्ध होता. त्या दिवशीं मी माझ्या दुकानाचं कांहीं एक काम केलं नाहीं. पुढं काय करावं, हें मला सुचेना, तेव्हां मी हिला विचारलं ! " असें म्हणून दादासाहेबांनीं बाजूला असलेल्या आपल्या पत्नीकडे पाहिलें. " नंतर आम्ही दोघांनीं मिळून पुष्कळ विचार केल्यावर ' इंदुमतीसारखी मुलगी अशा ठिकाणीं कशी आली ? ' याचा शोध करण्याचं आम्ही ठरविलं परंतु कृष्णरावाला काय सल्ला द्यावा, याविषयीं आम्हाला कांहींच सुचेना. शेवटीं तिनं कृष्णरावाची सर्व जबाबदारी आपणाकडे घेऊन मला पूर्वी ठरल्याप्रमाणें शोध करण्यास सांगितलं. मी चौकशीला सुरवात केली, इंदुमती कोणाबरोबर गेली, हें कळतांच मी त्या शिरीनच्या घोडेवाल्याला पकडलं. त्याच्या हातावर पांच रुपयांची नोट ठेवतांच त्यानं मला सर्व गोष्टी स्पष्ट करून सांगितल्या. तेव्हां मीं तर्कानं बरीच मजल गांठली, आणि दुसऱ्या

दिवशीं संध्याकाळीं इंदुमतीच्या वडिलांची ओळख नसतांहि मी त्यांच्या घरीं गेलों. तेथें पहातों तों सर्वच गडबड दिसूं लागली. इंदुमतीचे वडील बाबासाहेब यांनीं माझी भेट घेतली तेव्हां मी म्हणालों,' बाबासाहेब एक मनुष्य माझ्या घरीं मनाच्या अत्यंत विलक्षण स्थितींत जवळ जवळ बेशुद्ध असा पडला आहे. त्याला येऊन तुम्ही पहा.–' माझं ऐकून बाबासाहेब एकदम म्हणाले, ' मी पाहून काय करूं ? सध्या माझ्या घरांत माझी मुलगी बेभान आजारी स्थितींत पडलेली आहे. तिला सोडून मी येऊं तरी कसा ? काल चांगली फिरायला गेली होती, तों एकाएकीं गाडींतल्या गाडींतच बेशुद्ध झाली, म्हणून तिच्या मैत्रिणीनं तिला तात्काळ घरीं आणून पोंचविली. तेव्हांपासून ती त्याच स्थितींत आतांपर्यंत आहे ! ' "

" ' मग मला दाखवितां का तिला ?' असें मी म्हणालों. "

" ' तुम्हाला जर कांहीं उपाय सुचला तर सांगा. मोठे उपकार होतील ! " बाबासाहेब म्हणाले आणि माझा हात धरून त्यांनीं मला पलीकडच्या खोलींत नेलें. इंदुमती बिछान्यावर झोंपली होती. मी कृष्णरावाची चर्या पाहिलीच होती. त्यामुळं मला आतां तिची चर्याहि कृष्णरावासारखी भेसूर आणि कलाहीन दिसली. मी इंदुमतीच्या मुखाकडे पहात आहें, असें पाहून बाबासाहेब केविलवाण्या मुद्रेनें अगदीं दीन स्वरांत म्हणाले, ' पहिलीत माझ्या पोरीची ही अवस्था ! तुम्हाला काय उपाय सुचतो का हो ? कालपासून तीनचार मोठमोठे डॉक्टर आणले परंतु तिला अजून आराम नाहीं ! '— खरोखरीच त्यावेळीं मला वाईट वाटलं. इतका बडा मनुष्य परंतु अपत्य प्रेमामुळं कसा दीन झाला होता ! ही त्यांची अशी स्थिती व्हायला कारण त्यांचे तेच होते, असंच मी म्हणतों !"

" वाः दादासाहेब, हें तर तुमचं चमत्कारीकच मत आहे ! ' बापूनें म्हटलें.

" तुम्हाला माझं मन चमत्कारिक वाटेल; परंतु जरा सूक्ष्म विचार करा ! " दादासाहेब म्हणाले. " मी तर असं म्हणतों कीं, बाबासाहेब आपल्या कर्तव्यांत चुकले म्हणूनच त्यांच्या मुलीची ही गोष्ट इतक्या परिणामाला आली ! "

" ती कशी दादासाहेब ? " राजानं विचारलें.

" आपल्या मुलीला मोकाट सोडलं, त्याचाच हा परिणाम ! " दादासाहेब म्हणाले. " आपली मुलगी कोणाबरोबर कोठें जाते, याबद्दल त्यांनीं अगोदर चौकशी केली असती, आणि योग्य ती खबरदारी घेतली असती, तर असा परिणाम कधींहि न होता ! "

" दादासाहेब, माझंहि मत आपल्यासारखंच आहे ! " राया म्हणाला, " कारण मुंबईत असतांना मीहि अशीच एक चमत्कारिक गोष्ट ऐकली आहे. त्या गोष्टीवर मी पुष्कळ विचार केला आणि शेवटीं तुम्हीं सांगतां असंच माझं मत बनलं ! "

" कोणीहि विचारी मनुष्य असंच सांगेल ! " दादासाहेब म्हणाले, " मात्र त्यानं चालू मन्वंतरांचं सूक्ष्म निरीक्षण केलं पाहिजे ! मी इंदूमतीची स्थिति पाहिल्यावर बाबासाहेबांना म्हणालों, ' बाबासाहेब हा माझा पत्ता मी तुमच्या-जवळ देऊन ठेवतों. तुमची मुलगी जेव्हां शुद्धीवर येईल, तेव्हा क्षणाचाहि विलंब न करतां मला बोलवायला पाठवा. कारण त्यांत तुमच्या लौकिकाचाच प्रश्न आहे ! ' असें म्हणून मी त्यांची रजा घेऊन निघालो. घरीं येऊन पाहातों, तो कृष्णराव त्याच स्थितींत बेहोष पडलेला होता आणि ही त्याच्याजवळ बसून पहारा करीत होती. मला परत आलेला पाहताच ही म्हणाली, ' कृष्णरावचं चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं ! एखाद्या चांगल्या डॉक्टराला तरी बोलवा ! तो अशा स्थितींत मधून मधून दचकतो. '—हिच्या सांगण्याप्रमाणं मी एक उत्तम नांवाजलेला गोरा डॉक्टर आणला. त्यानं कृष्णरावाला फारच बारकाईनं तपासून मत दिलं कीं—' कोणतीतरी अकल्पित गोष्ट घडल्यामुळं ह्याच्या डोक्यांत रक्त चढलं आहे आणि त्यामुळं त्याची ही अशी स्थिति झाली आहे ! हें रक्त उतरल्याशिवाय हा केव्हांहि शुद्धीवर यावयाचा नाहीं आणि हें डोक्यांत चढलेलं रक्त खालीं उतरविण्यास उपाय म्हणजे याच्या डोक्यावर सतत पाण्याची धार सोडली पाहिजे ! " डॉक्टर निघून गेल्यावर आम्हीं तो उपाय करण्यास सुरवात केली. लगेच एक बाज आणून ती मोरीवर ठेवली. आणि त्यावर हळूच उचलून कृष्णरावाला निजविलं. मी दुकानावरील सर्वांना आंत बोलावून त्यांना पाणी आणावयास सांगितलं आणि तांब्यानं स्वतः त्याच्या डोक्यावर पाण्याची धार धरली. सर्व पाणी खालीं मोरींत सांडत होतें. सतत पांच तासपर्यंत किंचितहि खंड पडूं न देतां डोक्यावर पाण्याची धार धरल्या-नंतर योग्य तोच परिणाम झाला आणि कृष्णरावानं डोळे उघडले ! त्यावेळीं पहाटेचे चार वाजले होते. कृष्णराव शुद्धीवर आला, हें पाहून मला आणि हिला अतिशय आनंद झाला ! "

" ' दादासाहेब, मला तुम्ही साफ भिजवून किं हो टाकलंत ! " कृष्णराव म्हणाला. ' "

" ' कृष्णराव, तुम्हाला आतां कसं वाटतं ? ' मी विचारलं. "

" ' माझं डोकं आतां शांत झालं ! ' कृष्णराव म्हणाला. ' दादासाहेब—वहिनी मी तुम्हाला अतिशय त्रास दिला, असं दिसतं पण आतां मला फार बरं वाटतं ! ' "

" ' मग आतां बिलकुल न बोलतां असंच पडून रहा ! ' ही म्हणाली. "

" आमच्या सांगण्याप्रमाणं कृष्णराव पुनः तसाच पडून राहिला. मी त्याचं डोकं पुसून अंगातील भिजलेले कपडे काढले आणि नवे कपडे त्याच्या अंगावर घातले. कांहीं एक न बोलतां मी जस केलं तसं त्यानं करूं दिलं नंतर त्याला दूध प्यावयास देऊन गादीवर निजावयास सांगितलं, तो झोपला असं पाहतांच मी उठलों आणि कपडे करून तडक बाहेर पडलों, मी रस्त्यावर आलों, त्यावेळीं रस्त्यावर नुकतीच रहदारी सुरू झाली होती. ती पहाटेची वेळ होती, तरी सर्वत्र काळोखच होता. मी झपझप् पावलं टाकीत बाबासाहेबांच्या घरीं आलों आणि दरवाजा ठोकून त्यांना बाहेर बोलावलं. त्यांच्या घरांत कोणालाहि झोंप नव्हती. सर्वजण इंदुमतीच्या बिछान्याजवळ बसून जागत होते. दरवाजा उघडून बाबासाहेब पुढं आले होते. त्यांना इंदूची हकीकत विचारली. परंतु उत्तर देण्याऐवजीं त्यांनीं मला इंदूच्या खोलींतच नेलं. कृष्णरावाप्रमाणंच तिची स्थिति होती. मी म्हणालों, ' उठा—मी सांगतो तसं करा ! जा—घरात जेवढं पाणी असेल, तेवढं इथं घेऊन या आणि एखादी बाज असल्यास ती तत्काळ घेऊन या. ' त्यावेळीं माझ्या सांगण्यांत बराच हुकमीपणा होता. मी सांगितल्याप्रमाणें बाबासाहेबांनीं तात्काळ केलं. त्या खोलींत मोरी नव्हती, म्हणून मी बाजेखालीं परात ठेवण्यास सांगून इंदूमतीला हळूच उचलून त्या बाजेवर निजविलं आणि तिच्या डोक्यावर पाण्याची धार सुरू केली. सहा वाजले, सात वाजले आणि आठ वाजले, तरी सारखा पाण्याचा वर्षाव करीत होतों. यश येईपर्यंत प्रयत्नांत कसूर करावयाची नाहीं, असा मी निर्धार केला होता. शेवटीं तुकाराम बुवांच्या म्हणण्याप्रमाणं ' निश्चयाचें बळ ' या सिद्धांताप्रमाणं मला यश आलं आणि इंदूनं डोळे उघडले ! सर्वांना अतिशय आनंद झाला ! मी लगेच तिचे केस वगैरे पुसून तिच्या अंगांत असलेला पोलका आणि पातळ बदलावयास सांगितलं. त्याप्रमाणं तिच्या आईनं आणि आत्येनं करतांच तिला ' आतां तुला कसं वाटतं ? ' असा प्रश्न केला. तेव्हां तिनं ' बरं वाटतं ! ' असा जबाब दिला.

मग मी बाबासाहेबांना घेऊन त्याच्या दिवाणखान्यांत गेलों. माझा हात दाबून ते अत्यंत आपलेपणान मला म्हणाले, ‘ दादासाहेब, आज तुम्ही माझ्या मुलीला जीवदान दिलें ! ह्या पूर्वी माझी तुमची ओळख नसताना तुम्ही माझ्यावर जे अगणित उपकार—”

“ मी उपकार केले, अस जर तुम्हाला वाटत असेल आणि त्या उपकाराची फेड व्हावी अशी जर तुमची इच्छा असेल, तर मी जें सांगेन तें तुम्ही अत्यंत शांत मनानं ऐकून घेतल पाहिजे ! किंचितहि विकारवश न होता मी जे सांगेन त्याप्रमाणंच तुम्हाला केलं पाहिजे, तरच तुमची अब्रू, लौकिक आणि घराण्याची इभ्रत कायम राहील ! ’ माझ हे भाषण ऐकून बाबासाहेबानीं मला मी सांगेन त्याप्रमाणच वागण्याचं वचन दिलं. तेव्हा मी त्यांना दुपारीं आपल्या घरीं येण्याविषयीं विनती केली. त्याप्रमाणं बिनचूक ते दुपारीं माझ्या घरीं आले. कृष्णराव माझ्या घरींच होता. तो आतां चांगला शुद्धींत असल्यामुळं बाबासाहेबांना पाहताच कावराबावरा झाला. परतु मी त्याची समजूत करून बाबासाहेबाच्या कानावर सर्व गोष्टी सरळ घातल्या आणि म्हणालो, ‘ बाबासाहेब, या बाबतींत तुम्हाला कृष्णरावाला दोष देता येत नाहीं. त्याचं सर्व गेल चरित्र तुम्हाला माहितच आहे. असं असूनहि त्यानं तुमच्या मुलीला आपली ‘ बहीण ’ म्हणून मानली होती. त्याच्या मनांत खरोखरींच जर कांहीं कपट असत तर त्याची अशी स्थिति होती ना ! तशीच तुमची मुलगी इंदूमतीहि निर्दोषीच आहे. तिच्या डोळ्यापुढें कामोत्तेजक गोष्टी आल्यामुळं तिचा विकार भडकला. आणि तेंहि स्वाभाविकच आहे ! वयपरत्वे ह्या अशा गोष्टी व्हावयाच्याच ! आपल्या जुन्या मंडळींनी अशा बालविधवांचं मीठ तोडल्याबद्दल अलिकडील सुधारक लोक टाहो फोडीत आहेत. परंतु मी असच म्हणतों कीं, आपल्या जुन्या बालविधवाच्या बाबतींत जे नियम घालून दिले आहेत, ते अत्यंत दूरदर्शीपणाचे आणि हितावहक आहेत. विकार उद्यपित करणाऱ्या ह्या गोष्टी तोडल्यामुळं त्याचा विकार मारला जातो. आणि तो मरावा हीच त्यांची इच्छा आहे. कारण पुनर्विवाहाचा प्रतिबंध असल्यामुळे त्यांना इतकी खबरदारी घेणं योग्यच होतं, असं नाहीं का तुम्हाला वाटत ? समाजानं बालविधवांना पुनर्विवाहाची मोकळीक द्यावी आणि पूर्वीच्या लोकानीं घातलेले हे नियम मोडून टाकावे परंतु मौज अशी आहे कीं, समाज

पुनर्विवाहाला मोकळीक देण्यास धजत नाहीं आणि जुन्या निर्बंधावर तोंडसुख मात्र घेतो. तुम्ही आपल्या इंदूमतीला तिच्या स्थितीला योग्य तेंच शिक्षण देत होतां हें मला कबूल आहे. त्या शिक्षणानं तिच्या मनावर दाब बसला तरी तो क्षणिकच होता. कारण तुम्ही आहारविहारांत पूर्ण मोकळीक दिली होती. त्यामुळं शिरीनसारख्या मैत्रिणीची सोबत होताच तिच्या विकारानं तात्काळ उचल घेतली आणि तिच्याकडून असं वर्तन घडलं! बिचारीचं पुण्य थोर म्हणूनच कृष्णराव तिच्यापुढं उभा राहिला. त्यावेळीं दुसरा जर कोण मनुष्य तिथं असता तर काय प्रसंग ओढवता याची तुम्हीच कल्पना करा! जुन्या चालीरीतींवर सर्व बाजूंनीं योग्य विचार न करता एकच बाजू उचलून त्याची आपण सुधारणा करूं इच्छितों, आणि त्याचा परिणाम शेवटीं हा असा होतो!"

"दादासाहेब, तुमचं म्हणणं मला पटलं!" बाबासाहेब म्हणाले. 'आता पुढं मी काय करूं तें मला सांगा. माझ्या लाडक्या इंदूला मी निःसत्व अन्न घालीन म्हटलं, तर तें मला शक्य आहे का? आम्ही घरात सर्वजण चमचमीत अन्न खाणार आणि त्या वैधव्यानं होरपळलेल्या पोरीनं पुचट, पुळपुळीत आणि निःसत्व अन्न खावं काय? तिला मी न्हाव्याजवळ बसवून विद्रूप करूं काय? सांगा—मला ह्या गोष्टी कधींतरी सहन होतील काय?"

"बाबासाहेब, आपल्या पूर्वजानीं सांगितलेली गोष्ट करण्यास जर तुमचं मन धजत नसेल तर तिचा पुनर्विवाह करून टाका! तुम्ही स्वतःला सुधारक म्हणविता मग असे कचरता का? चालू मन्वतराकडं लक्ष देऊन ही पुनर्विवाहाची चाल तरी पूर्णपणें अंमलात आणा आणि ही चाल अंमलात आणण्याचं जर धैर्य नसेल तर एखाद्या बाबतींतच कुरकुर करून पूर्वजांनीं घालून दिलेल्या अत्यंत शहाणपणाच्या गोष्टींना नावं तरी ठेवूं नका!" मी म्हणालों. हें माझं म्हणणं बाबासाहेबानीं पूर्णपणें मान्य केलं. ते विचारी होते. शेवटीं ते म्हणाले, 'दादासाहेब, आम्हीं स्वतःला सुधारक म्हणवितों परंतु खरोखरीच आम्ही सुधारक नसून समाजाचे खरेखुरे शत्रुच आहोंत! सर्व गोष्टी करण्याची आमच्या अंगात शक्तीच नाहीं. पूर्वजानीं केलेल्या गोष्टींपैकीं एखादीच गोष्ट घेऊन त्या एकाच गोष्टीवर आकाडतांडव करतों आणि अर्धवट अशिक्षित अशा आमच्या अनुयायांना त्या सर्वच गोष्टीचा बागुलबुवा करून दाखवितों, दादासाहेब, माझ्या सर्व अडचणी आता तुमच्या लक्षांत आल्याच आहेत. आणि मी

कोणत्या परिस्थितींत सापडलों आहे, हेंहि तुम्ही जाणतच आहांत. तेव्हां मीं इदूच्या बाबतींत काय करू तें तुम्ही मला सांगा म्हणजे त्याप्रमाणं मी करतों !"

" बाबासाहेबांचें हें भाषण ऐकून मी बराच वेळ विचार केला आणि म्हणालों, ' बाबासाहेब, आतां ह्या गोष्टीला एकच तोड आहे, इदूची प्रकृति जरा सुधारतांच तिला हवाबदल करण्याच्या उद्देशानं पंढरपूरला घेऊन चला मग पुढ काय करावयाचं तें मी तुम्हाला सांगेन. "

" आपण सांगाल त्याप्रमाणं मी करतों !" असे म्हणून दादासाहेब निघून गेले. मी पुष्कळ विचार करून ठरविलेली योजना हिला मान्य झाली. पुढें एक महिन्यानतर इंदूमतीला पूर्ण आराम पडला. आणि ती घरात हिंडू फिरू लागली. तेव्हा हवाबदल करण्याच्या उद्देशान बाबासाहेबानीं तिला पुण्यात आणलें. मी आठ दिवस मागाहून पुण्यास गेलों. ' मला पंढरपूरास जावयाचं आहे, तुम्ही येता का ? ' अस मी बाबासाहेबाना आगाऊ ठरल्याप्रमाण विचारल. ह्या वेळपर्यंत इदूमतीला तिच्या हातून घडलेल्या गोष्टीबद्दल बाबासाहेबानीं मुळींच ओळख दाखविली नव्हती. इतकंच नव्हे तर त्यानीं आपल्या कुटुंबाला एक ब्रहि कळू दिला नव्हता. माझ्याबरोबर ती सर्व मंडळी पढरपूरास निघाली. तिथं भागेचं स्नान करून आम्ही सर्वानीं विठोबारायाच दर्शन घेतल आणि त्या दिवशीं सध्याकाळीं ' इथ काय फाय पाहण्यासारखं आहे ! ' असा माझ्याच सुचनेप्रमाण बाबासाहेबानीं प्रश्न केल्यावर ' इथं एक अनाथ बालकाश्रम आहे. इच्छा असल्यास चला आपण पाहायला जाऊं ! ' अस म्हणून सर्वाना बरोबर घेऊन आम्ही निघालों. मी पुढें जाऊन तेथील सुपरिंटेन्डन्टला भेटलों. त्या परोपकारी संस्थेवर जसा पाहिजे तशाच स्वभावाचा तो सुपरिंटेन्डट होता. मी थोडक्यांत त्याला ओळख करून देताच सर्व गोष्टी त्याच्या लक्षात आल्या. नतर आम्ही आश्रमांत गेलों. त्या आश्रमाची सर्व माहिती त्यानं आम्हाला दिली. आणि आश्रमाची एकदर व्यवस्था दाखविली. तो म्हणाला, ' हीं मुलं पहा ! ह्या अर्भकांपैकीं कित्येकांच्या आईबापांची आम्हाला मुळींच माहिती नाहीं. ही बाहेर टोपली ठेवली आहे, ह्या टोपलींत ह्या अर्भकाना—नाळ सुद्धां कापली नाहीं, अशा स्थितींत ठेऊन यांचे आई म्हणा, बाप म्हणा किंवा इतर कोणी म्हणा, गेले आहेत. ज्या अर्थी आपलं नाव गांव कळूं नये, अशी इच्छा

असणाऱ्या आईबापासून ह्या मुलाचा जन्म झाला, त्याअर्थी हीं मुळं त्यांच्या दुर्वर्तनाचं, आणि पापाच फळ आहे, असं सिद्ध होतं. भाग्य इतकंच कीं, दुर्लौकिक टाळण्याकरितां स्त्रियांनीं ह्या मुलांच्या नरडीला नख मात्र लाविल नाहीं, आणि त्या मुलांना गुपचुप इथं आणून ठेवलं! हे असे प्रकार का होतात, याची मी मीमांसा करीत नाहीं. परंतु एखाद्या स्त्रीच वयपरत्वे वाकड पाऊल पडतं किंवा एखादी स्त्री फसली जाते, त्यावेळीं भावी परिणामाची तिला कल्पना सुद्धा नसते. परतु काहीं महिन्यानीं खरी वस्तुस्थिति लक्षात येतांच आपल्या हातून घडलेल्या गोष्टीबद्दल तिच्या मनाला यमयातना होऊ लागतात. आता आपला दुर्लौकिक होईल ह्या भीतीनं ती गर्भाचा नाश करण्याच्या प्रयत्नाला लागते. परतु त्यात जर तिला यश आल नाहीं, तर ती पुढें बालहत्या करते. अगर आत्महत्याहि करून घेते. हा एवढा भयंकर परिणाम केवळ एका गोष्टीमुळच होतो. बालविधवाचीं अशीं किती तरी उदाहरण आहेत—"

"नका—नका, तें भेसूर चित्र आता पुढं सांगू नका! मला तें ऐकवत नाहीं!' इंदुमती हुंदके देत स्फुंदत म्हणाली. सुपरिंटेन्डन्टनें सांगितलेल्या गोष्टींचा तिच्या मनावर चागलाच परिणाम झाला. आपल्या हातून चुकी झाली असती, तर त्याचा पुढें काय परिणाम झाला असता, हें आतां तिला प्रत्यक्षच पहावयास मिळाल होत! सांगून समजावून किंवा धाकदपटशा देऊन जी गोष्ट करता आली नसती, तीच गोष्ट ह्या आश्रमातील तीं प्रत्यक्ष मुलं पाहून तिच्या मनावर परिणाम झाला! इतक्यात आंतल्या दालनांत एक लहान मूल—दोनच दिवसांपूर्वी त्याची नाळ कापली आहे, अस अर्भक रडू लागलं! स्वमातेच्या दुधाकरिता त्या मुलानं तो टाहो फोडला होता! 'तू आपल्या क्षणिक वासनेला बळी पडून मला लाजीरवाणा जन्म दिलास,' अस टाहो फोडून तें मूल आपल्या आईला सागत होतें! त्या मुलाचं तें रडणं ऐकून सुपरिंटेन्डन्ट म्हणाला, 'ऐका—हा ह्या अर्भकाचा टाहो ऐका!' 'आई, तुझ्या पापाचं मी फळ आहें!' असं हें मूल ओरडून सागत आहे. पण ती आई कुठं आहे! मुलाला अशा निर्दयपणानं टाकून गेलेली ती आई ह्या वेळीं इथून कितीहि योजन दूर असली, तरी हा टाहो तिला खात्रीनं ऐकूं जात असेल. आतां ह्या वेळीं तिच्या अंगावर भीतीचे, लज्जेचे, शोकाचे आणि त्या बरोबरच अपत्य प्रेमाचेहि शहारे येत असतील—!'"

" ' बाबा मी तुमच्या पायां पडतें मला इथून न्या ! हें मला सहन होत नाहीं ! त्या बाळाचं रडणं मला ऐकवत नाहीं हो ! " असं म्हणून इंदुमतीनं दोन्ही हातांनीं आपले कान घट्ट बंद करून घेतले ! ' "

" अगदीं योग्य तोच परिणाम झाला ! " राया म्हणाला.

" नंतर आम्ही इंदुमतीला तिथं फार वेळ न ठेवतां परत बिऱ्हाडीं नेलं आणि दुसऱ्या दिवशीं लगेच आम्ही पुण्यास गेलों. आता त्या इंदुमतीविषयीं केव्हां तरी शंका घ्यायला जागा राहिली आहे काय ? तिच्या चारित्र्याची तुम्हाला योग्य कल्पना यावी म्हणून तुम्हाला मी राजा रविवर्मानें काढलेलं महाश्वेतेचं चित्र डोळ्यापुढें आणण्यास सागतों. चित्रकारानं कल्पनेनं काढलेल्या त्या महाश्वेतेच्या चित्रात ती आपणास गभीर, सात्विक आणि तेजःपुंज देवता दिसते, तसें आतां इंदुमतीचें चरित्र आहे. त्यानतर काहीं दिवसांनीं कृष्णराव तिथं गेला. त्यानं स्वतःची प्रतिज्ञा तिला सागितली आणि आतां ते बहिण-भावंडाच्या नात्यानं मोकळ्या नात्यान वागतात ! "

" राया, दादासाहेबांसारखं तुझंहि मन बनलं म्हणून तू म्हणतोस, पण तूं तशी कोणती गोष्ट पाहिलीस तें तरी साग ? " थोड्या वेळानें बापू म्हणाला.

" माझी गोष्ट आतां दादासाहेबांनीं नुकतीच सागितलेल्या गोष्टीपासून अगदीं भिन्न आहे, तरी फार महत्वाची आहे ! " राया म्हणाला. " या स्त्रीशिक्षणाच्या शाळा निघाल्यापासून आपल्या आर्यसंस्कृतीवर मोठा घाला पडला आहे ! समाजाचं भयंकर नुकसान होत आहे ! "

" राया, तूं ह्या स्त्रीशिक्षणावर फार जहाल शेरा देत आहेस ! " राजा म्हणाला. " वर्तमानपत्रातील सुधारकाचे अग्रलेख वाचून स्त्रीशिक्षण चांगलं म्हणून टिऱ्या बडविणारापैकीं तूं नाहींस, असं दिसतं ! "

" राजा, मी काय म्हणतों तें ऐकून घे आणि मग बोल ! " राया म्हणाला. " दादासाहेब आहेतच ! ते आपणापेक्षां वडील आहेत, अनुभवी आहेत आणि त्यानीं या गोष्टीवर चागला विचार केलेलाहि आहे. माझं मत ऐकून तेहि आपलं मत देतील. ह्या चालू स्त्रीशिक्षणानं समाजाचं भयंकर नुकसान केलं आहे, असं जें मी म्हणतों, याचं सविस्तर कारण सांगण्यापूर्वी आपण रायगडावर जात असतां वाटेंत आपल्या काय गोष्टी झाल्या, त्या लक्षांत आण ! घर बसल्या सर्व गोष्टी आपणांस मिळूं लागल्यामुळें आपण ऐदी बनलों, हें माझं म्हणणं तुझ्या स्मरणांत आहे काय ? "

" होय—माझ्या चांगलं लक्षांत आहे ! " राजा म्हणाला. " त्या रायगडाच्या ट्रिपमध्यें आपण आपल्या एदीपणावर फार कडाक्याच्या वादविवाद केला नाहीं का ? "

" हा आपला ऐदीपणाच ह्या स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत आपणास पूर्णपणें नडला आहे, हें लक्षात ठेव ! " राया म्हणाला. " ह्या शाळांतून मुलींना शिक्षण देण्याची सुरवात होण्यापूर्वी आपल्या स्त्रिया सुशिक्षित नव्हत्या काय ? आमची आजी तर रामायण महाभारतावर शेकडों बायका जमवून पुराण सांगत असे. पण ती कधीं शाळेंत गेली नव्हती ! मग तिला हें शिक्षण कोठून मिळालं ?—तिला मिळालेलं गृहशिक्षण होय ! अलिकडच्या शाळांतून सुरू असलेल्या शिक्षणाप्रमाणं तिला व्हिक्टोरिया राणीच्या गोष्टी माहीत नव्हत्या, ही गोष्ट खरी ! परंतु धर्म नीति, सदाचार, आरोग्य या विषयात शिक्षण मिळवून ती सुशिक्षित झाली होती. ही गृहशिक्षणाची चाल शाळांतून शिक्षण देण्याची पद्धत सुरू होतांच बंद पडली, आणि त्याच कारण आमचा ऐदीपणा ! मुलगी शाळेंतून शिकते, मग घरीं शिकण्याचा खटाटोप कशाला करा, असा प्रकार सुरू झाला. त्यामुळं समाजांत किती घोटाळे झाले ते पहा ! शाळेंत जाण्यायेण्यामुळं मुलींच्या अंगीं धीटपणा येऊं लागला आणि त्याबरोबरच त्यांच्या विनयाची फारकत होऊं लागतांच आपल्या देहधर्माची त्यांना विस्मृति होऊं लागली. मास्तरसारख्या परपुरुषाकडून शिक्षणाबरोबर त्याच्या मतलबाच्या गोष्टी कानीं पडू लागल्यामुळं पापपुण्याची भीति त्यांच्या मनांतून कमी होऊं लागली आणि इंग्रजी शिक्षणामुळं धार्मिक शिक्षण अजिबात नष्ट झालं ! "

" बाळसाहेब, तू हा विषय योग्य रीतीनं प्रतिपादन केलास ! " दादासाहेब म्हणाले, " तरी देखील ह्याहि गोष्टीला कांहीं अपवाद आहेत हें विसरूं नकोस ! "

" तें मलाहि कबूल आहे ! " राया म्हणाला. " आपली मुलगी शाळेंत जाते, आता ती सहाव्या यत्तेंत आहे, पुढल्या वर्षी ती सातव्या यत्तेंत जाऊन म्याट्रिकला बसेल, ह्या आनंदात बापाला मूठभर मांस आल्यासारखा अभिमान वाटतो. तो आपल्या मुलीचे नाना प्रकारचे चोचले पुरवितो त्यामुळें फ्याशनेबल बनण्याकडं मुलीचा कल वळतो. मुलगी सातव्या यत्तेंत गेल्यावर तिला कोणतं पातळ घ्यावं आणि कोणत्या फ्याशनचा बूट घ्यावा, याविषयीं

बापाला काळजी असते. परंतु मुलीच्या वर्तनाकडे लक्ष देण्याची त्याला काळजीच वाटत नाहीं. त्यामुळें सुशिक्षित, पदवीधर आणि समाजात ज्याचा लौकिक वाढला आहे, अशा वडिलांना कित्येक प्रसंगीं गुढग्यात मान खुपसण्याची कशी पाळी येते, त्याचं एक उदाहरण मी देतें.—मुंबईंत एका शाळेंत दोन मुली सातव्या यत्तेंत अभ्यास करीत होत्या. एकीचे वडील डॉक्टर आणि दुसरीचे वडील ब्यारिस्टर! अशा सुशिक्षिताच्या ह्या मुली शाळेंत जातांना दृष्टीस पडल्या कीं, त्याची 'ती अप-टु-डेट फ्याशन' पाहून जाणाऱ्या येणाऱ्यांची दृष्टि टकमका होऊं लागे, यात काही नवल नाहीं! म्याट्रिकपर्यंत त्याची मजल गेली असल्यामुळं घरांत तर त्याना पूर्ण स्वातंत्र्य मिळाल होतंच, परंतु शाळेतहि स्वातंत्र्य मिळाल होत शाळेंत हजेरी देऊन एकदोन तास अभ्यास केल्यावर,' परीक्षेचा अभ्यास करावयाचा आहे, असं सांगून ह्या मुली खुशाल घरीं निघून जात. एकदा ह्या मुली अशाच शाळेंतून घरीं जात असतांना बाजूला उभी असलेली एक मोटार पाहून 'अशी मोटार रोज आपल्याला बसायला मिळाली असती तर—?' असे उद्गार एका मुलीनं दुसऱ्या मुलीजवळ काढले. हे उद्गार बाजूच्या मोटारमध्यें बसलेल्या व्यक्तीन ऐकले. त्याबरोबर ती व्यक्ति पुढें होऊन म्हणाली, 'मोटार मिळाली असती तर, अशी शंका का घेतां? ही मोटार आपलीच आहे! बसा. तुम्हाला मी झटकन् घरीं पोचवितो. उन्हांतून रखडत जाण्यापेक्षां अवघ्या पाच मिनिटांत तुम्ही घरीं जाल!—हें त्याचं भाषण ऐकून त्या दोघी मुली एकमेकीकडे टकमका पाहूं लागल्या. तें पाहून ती व्यक्ति पुढें म्हणाली, 'असा संकोच कां बाळगतां? मी खरोखरीच तुम्हाला घरीं नेऊन पोंचवितो उन्हांतून जाण्यापेक्षां मोटारनं जाणं चागलं नाहीं का?'—असें म्हणून त्यान दरवाजासुद्धां उघडला! तें पाहून 'नको बाई! आपण पायींच चालत जाऊं चल कशी!'—असें म्हणून एक मुलगी दुसरीला ओढूं लागली. त्यावर 'त्यांत काय झालं? आपण हां हां म्हणतां घरीं जाऊन पोंहोंचू! चल मोटारमध्यें तरी बसून पहा!'—शेवटीं त्या दोघी मुली मोटारमध्यें बसल्या. त्या मनुष्यानं कोठें जावयाचें तें विचारून मोटार बिनचूक त्यांच्या घरीं आणून उभी केली. दुसऱ्या दिवशींहि तोच प्रकार! जणूं काय आपलीच मोटार आहे, असं त्या मुलींना वाटूं लागलें. तिसऱ्या दिवशीं मोटारमध्यें बसल्यावर त्या दोघींतून एक म्हणाली, 'आपण मोटारमध्यें

बसतों न बसतों तोंच घर येतं. कशी भरकन् येते, कळत देखील नाहीं! मोटरमध्यें बसल्यासारखंसुद्धां वाटत नाहीं!'—ती असं म्हणाली, तेव्हां त्या ड्रायव्हरनें 'मग तुम्हाला लांब फिरायाची इच्छा आहे का?'—असं म्हणून मोटार मोठ्या रस्त्यावर काढली, आणि जोरांत चालविली. हा हा म्हणता वाळकेश्वर आलं. मुलींना मोठी मौज वाटली वाळकेश्वरी आल्यावर —'आमच्या शेटचा इथ बंगला आहे. रिकामाच असतो, कधीं कधीं शेट इथं येत असतात. आतां थोडा वेळ त्या बंगल्याजवळ थाबूं आणि परत जाऊ'—असें म्हणून त्यान मोटार बंगल्यावर आणून उभी केली. मुली खालीं उतरल्यावर ड्रायव्हरनें त्याना बंगल्यात नेलें. बंगल्यांतील तें वैभव पाहून दोघींनाहि आनंद झाला. इतक्यात त्या ड्रायव्हरानें टेबलावर कोल्ड्रिंकचीं दोन ग्लासें आणून ठेवलीं. ज्या मुली इतक्या सहजासहजीं मोटारमध्यें बसल्या, त्या मुली इतर गोष्टीहि सहजासहजी करतील, अशी त्यानं मोटारमध्यें फिरविणाऱ्या व्यक्तीनं अटकळ केली ती मुळींच चुकीची नव्हती. ती मोटर एका गर्भश्रीमत तरुणाची होती आणि आपल्या तरुण धन्याची इच्छा पाहूनच वागणारा तो मोटार ड्रायव्हर होता. त्या मुलींनीं कोल्ड्रिंक घेतल्यावर त्यानं सर्व बंगला त्याना दाखविला आणि आपल्या धन्याचा फोटो दाखवून त्याच्या श्रीमंतीचं, मोकळ्या मनाचं आणि रंगेलपणाचं अवास्तव वर्णन केलें आणि तो म्हणाला, 'आमच्या शेटजींची आणि तुमची ओळख झाली तर तुम्ही ह्याच हॉलमध्यें त्याच्याशी तासच्या तास बोलत बसाल, इतके ते गोड स्वभावाचे आहेत!'—आतां मुलींची व मोटार ड्रायव्हरची चांगलीच ओळख झाली असल्यामुळं त्याहि मोकळ्या मनानंच बोलूं लागल्या होत्या. थोडक्यात सांगायचं म्हणजे त्या मुलींना मोटारमध्यें फिरण्याची चटक लागताच शाळेंत एक तास बसून बाकीचा सर्व वेळ त्या दोघी या बंगल्यावर घालवूं लागल्या. शेटची आणि त्याची ओळख झाली आणि पुढं त्या बंगल्यावर नाच रंग उडूं लागले! असा प्रकार सतत एक महिनाभर चालला होता. एके दिवशीं दुपारीं डॉक्टरसाहेबाच्या घरीं काहीं आकस्मित कारण उपस्थित होऊन मुलीला शाळेंतून बोलावून आणण्याकरतां स्वतः डॉक्टरसाहेब शाळेंत गेले. तेथें त्यांना कळलं कीं, 'मुलगी ब्यारिस्टर-साहेबांच्या मुलीबरोबर बारा वाजताच घरीं गेली. आणि ती अशी परिक्षेचा अभ्यास करण्याकरता, महिना झाला, रोज घरीं जात असते, शाळेंतून अशी

माहिती मिळाल्यावर डॉक्टरसाहेब आपल्या मोटारमध्यें बसले आणि मुलीला आणण्याकरितां ब्यारिस्टरसाहेबाच्या घरीं गेले. त्यावेळीं ब्यारिस्टरसाहेब कोर्टांत जाण्याकरितां तयार होत होते. डॉक्टरसाहेबाना पाहून त्यांच्या येण्याचं कारण विचारताच ' मुलीला नेण्याकरतां आलों, तुमच्या मुलीबरोबर तुमच्या घरीं आली आहे. असं कळलं !—अलिकडे परीक्षा आहे, म्हणून दोघींनीं जारीन अभ्यास चालू केला आहे असं दिसतं ! '—असं सांगितलं. तेव्हां बॅरिस्टर-साहेब म्हणाले, ' माझी मुलगी काहीं घरीं नाहीं. ती शाळेंतच गेली आहे. दुपारीं ती कधींच लवकर घरीं येत नाहीं. संध्याकाळीं ती तुमच्याच मोटार-मधून घरीं येते ! ' "

" ' माझ्या मोटारमधून घरीं येते ? ' डॉक्टरसाहेब आश्चर्यानं म्हणाले. ' मुलीला शाळेंतून घरीं आणण्याइतका माझ्या मोटारला वेळ कुठं आहे ? ' "

" झालं !— दोघांच्याहि संशयाला सुरवात झाली ! महिना झाला दोघी मुली शाळेंतून घरीं येतात असं डॉक्टरसाहेबांना कळलं आणि मुलगी संध्या-काळीं पांच वाजता मोटारमधून घरीं येते असं बॅरिस्टरसाहेबांना कळलं. दोघानींहि चौकशीला सुरवात केली. मुली संध्याकाळीं मोटरमधून परत येत, त्यावेळीं डॉक्टरसाहेबांच्या मोटार ड्रायव्हरनें त्यांना दोन चारदां पाहिलं होतं. ती मोटार कोणाची आहे, हेंहि त्यानं ओळखलं होतं. डॉक्टरसाहेबांनीं त्याच्याजवळ चौकशी करतांच ' वाळकेश्वरीं राहणाऱ्या अमुक अमुक गृहस्थाची ती मोटर आहे ' असें त्यानं सागितलं. तेव्हा सर्व उद्योग बाजूला ठेवून डॉक्टर आणि बॅरिस्टर तसेच मोटारमध्ये बसले आणि वाळकेश्वराच्या बंगल्यावर येऊन धडकले. त्यावेळीं पूर्ण रंगांत असलेल्या त्या मुलींना आपले वडील इथं येतील, अशी कल्पनाहि नव्हती. त्यामुळं त्या दोघी ' रेड ह्यान्डेड ' —मुद्देमालासह पकडल्या गेल्या ! हे आपल्या अब्रूचे धिंडवडे स्वतःच्या डोळ्यानीं डॉक्टरसाहेबानीं आणि बॅरिस्टरसाहेबांनीं पाहिले. परंतु करतात काय ! मनांतल्या मनांत जळफळून एकमेकांकडं पहात ' तेरीबी चूप ' आणि ' मेरीबी चूप ' म्हणून त्या दोघांनाहि गप्प रहावं लागलं ! "

" मग त्या मुलींचं पुढं काय झालं ? " चिंतामणीनं विचारलं.

" जें व्हावयाचं तेंच झालं ! त्या दोघी मुलींविषयीं सर्व शाळेंत आणि त्यांच्या जातींत बभ्रा झाला ! " राया म्हणाला.

" अशीच एक दुसरी गोष्ट आहे ! " दादासाहेब म्हणाले. " तूं आता

मोटारनं फिरणाऱ्या मुलीविषयीं ही गोष्ट सांगितलीय, पण माझे पेन्शनर मोरे फौजदार यांनीं मला कितीतरी गोष्टी सांगितल्या आहेत."

"मग दादासाहेब, त्यांपैकीं एखादी तरी गोष्ट आम्हाला सांगा!" बापू म्हणाला. "अशा गोष्टी ऐकलेल्या असाव्यात!"

"फौजदारसाहेबानीं मला जी गोष्ट सांगितली ती अशी—" दादासाहेब म्हणाले "एकदां संध्याकाळच्या गाडीनं मुंबईचें एक जोडपं पुण्यास येऊन उतरल, मुलगी सोळा सतरा वर्षाची होती आणि तो मनुष्य तीस बत्तीस वर्षांचा होता. फौजदारसाहेब त्यावेळीं तळेगावाहून त्याच गाडीनं आले होते. हें जोडपं त्यांच्यापुढेंच चालत होतं. 'आतां तुम्ही मला नेणार कुठं?' हा त्या स्त्रीनं पुरुषाला विचारलेला प्रश्न फौजदारसाहेबानीं मागून ऐकताच 'ता' म्हणजे 'ताकभात' ओळखणाऱ्या त्यांच्या मनाला चटकन् कळला. इथं काहीं तरी पाणी मुरतं, असं त्यांनीं ताडलं. स्त्रीचा हा प्रश्न ऐकून तो मनुष्यहि क्षणभर गोंधळांतच पडला होता. तो आजूबाजूला पाहूं लागताच फौजदारसाहेब त्याच्या दृष्टीस पडले. त्यावेळीं फौजदारांचा पोषाख साधाच असल्यामुळं ते एक आपल्यासारखेच पुण्यास जाणारे उतारू आहेत अस समजून त्यानं विचारल—'इथं जवळपास उतरण्याची काहीं सोय आहे का हो?—' हा त्याचा प्रश्न ऐकून फौजदारांनीं समोर बोट दाखवून म्हटलें, 'ती मुरारजीची धर्मशाळा आहे. एक दोन रात्रीं तिथ राहतां येत'—नंतर त्या मनुष्यानं फौजदाराचे आभार मानून त्या स्त्रीसह आपला मोर्चा धर्मशाळेकडे वळविला. त्याच्याजवळ काहींहि सामान नव्हतं. अर्थातच फौजदारसाहेबाचा संशय दृढ झाला. त्यानीं नाक्यावर येतांच एका पोलीसाला जवळ बोलावलं आणि तें जोडपं दाखवून सांगितलं. 'ती बाई आणि तो पुरुष त्या धर्मशाळेंत जात आहेत. त्यांच्यावर नजर ठेव. मी आतां गांवांत जाताच एक मनुष्य पाठवून देतों. त्याला हीं दोन माणसं दाखीव म्हणजे मग तो त्यांच्यावर नजर ठेवील!' असं म्हणून फौजदारसाहेब एका टांग्यांत बसून निघून गेले. इकडे धर्मशाळेंत आल्यावर त्या मनुष्यानं तेथील व्यवस्थापक नोकरांकडून एक खोली मागून घेतली आणि बाहेर जाऊन त्यानें फराळाच आणि चहा घेऊन तो आंत गेला. त्या स्त्रीनं कसाबसा चहा घेतला. एखाद्या चुकलेल्या पाडसाप्रमाणं तिची स्थिती झालेली दिसत होती. ती म्हणाली "आतां पुढें तुम्ही काय करणार? मला बाई सारखी भीति वाटते!'"

" ' लीले, तूं फार भित्री आहेस बुवा ! आतां इथं तुला इतकं भ्यायला काय झालं ! ' त्या मनुष्यानं चहा घेत घेत त्या स्त्रीला म्हटलं. ' आतां मी गावांत जातों. एकाद घर भाड्यानं पाहतों आणि येताना कांहीं कामचलाऊ वस्तू घेऊन येतों. एकच रात्र आपल्याला थोडा त्रास होईल. उद्यां एका दिवसांत मी आपलं घर असं सजवितों कीं, तुलाहि आपला नवीन संसार पाहून आनंद होईल ! '—असं म्हणून व तिला ' मी आता येतों, तू मुळींच काळजी करू नकोस ! ' असा धीर देऊन तो मनुष्य बाहेर पडला त्यान टांगा केला आणि ' गांवांत घेऊन चल, ' असं त्यानं टांगेवाल्याला सांगितलं. परंतु ' गावांत तुम्हाला कुठं जायच आहे ? कुठल्या पेठेंत तुम्हाला नेऊ ? '—असा टांगेवाल्यान उलट प्रश्न करताच तो मनुष्य म्हणाला, ' मला ह्या पुण्याची मुळींच माहिती नाहीं. भाड्यानें एखाद्या घराचा तपास करण्या-करतां मी आलों आहें. मला घर पाहिजे ते भर वस्तींत नको. असं एका बाजूला विशेष कोणाची वर्दळ नाहीं आणि पाण्याची वगैरे सोय चांगली आहे अस घर पाहिजे ! "

" त्या टांगेवाल्याला वाटलं कीं, एखाद्या आजारी मनुष्याला हवा बदलण्याकरतां तथं आणावयाच असेल म्हणून तो अशा घराची चौकशी करतो. त्यानं आपल्याला माहीत असलेली गावातील काहीं घरं त्याला दाखविलीं. परंतु तीं बहुतेक सर्व घरं भरवस्तींतीलच होतीं. शेवटीं दिवे लागण्याच्या सुमारास गणेश पेठेत एक घर त्याला पसंत पडलं. त्याला पाहिजे होतं, तसंच तें घर एकातात होतं घर लहान असून नळहि होता. त्या घरात आज बरींच वर्षे कोणाची वस्ती नसल्याकारणानं ते उजाड पडलं होतं. तें घर भुताटकीचं आहे, अशी वदंता असल्यामुळं कोणीहि त्या घरांत रहात नसे, तो मनुष्य नवीनच असल्यमुळं घराविषयीं घराविषयीं भुताटकीची वदंता त्याला कोठून कळणार ? चौकशी केल्यावर मालक जवळच्याच आळींत रहातो, अस कळताच तो मनुष्य मालकाला जाऊन भेटला आणि भाडं ठरवून तें अगाऊ देऊन मुद्दां चुकला ! दरमहा तीन रुपयांच्या भाड्यांत आपणास स्वतंत्र घर भाड्यानं मिळालं म्हणून त्या मनुष्यास आनंद झाला. आणि इतकीं वर्षे ओसाड पडलेल्या घराचं तीन रुपये भाडं आलं, म्हणून त्या घरवाल्यालाहि आनंद झाला ! इतका प्रकार होऊन तो मनुष्य धर्मशाळेंत परत आला, तेव्हां बरीच रात्र झाली होती. लीला त्याची सारखी वाट

वाटच पहात होती. ' आपणास तीन रुपयांत उत्तम घर मिळाल. सोई सर्व उत्तम आहेत. आताच तिथं आपण गेलों असतों परतु तें घर झाडून सारवून स्वच्छ करायचं आहे म्हणून उद्या सकाळींच आपण तिकडे जाऊं आणि एखादा मजूर लावून स्वतःच्या देखरेखीखालीं घर स्वच्छ करून घेऊ ! '— असं तो तिला म्हणाला. नंतर त्यानं बाहेर जाऊन दुकानावरून थोडया पुऱ्या आणि भाजी आणली आणि फराळ करीत असताना तो म्हणाला, ' लीले, उद्यांपासून तुझ्या हातचं गोड अन्न मला मिळणार म्हणून किती आनद झाला आहे म्हणून सागू ? आपण सकाळीं तिकडे गेल्यावर मी बाजारांत जातों आणि चार भाडीं, थोड धान्य घरात आणून टाकतो. तुझ्याकरता दोन लुगडीं, दोन पातळें, तसच मला लागणाऱ्या कांहीं जिनसा, एखादी चटई अगर सतरंजी, गादी दिवा वगैरे सर्व कांही आणून एक दोन दिवसांतच घर तुझ्या मनासारख सजवतो. ' "

" होय, त सर्व तुम्ही कराल—" लीला म्हणाली, " परतु विवाहाच कस काय ? "

" विवाह तर करूच ! परतु घर ठाकठीक लागायला नको का ? आणि मी म्हणतो आता लग्नाच तरी काय इतक महत्त्व राहिल आहे ? आपण आता असेच राहिलों तरी या पुण्यात आपणाला कोण ओळखणार आहे ? '—हे त्याच भाषण ऐकून लीला अगदीं गप्प राहिली गोड गोड थापाना भुलून आपण घर सोडल आणि अखेर लग्नाशिवाय आपणास रहाव लागणार, हा विचार तिच्या डोक्यात येताच तोडात घालण्याकरता हातात घेतलेला पुरीचा तुकडा तिच्या हातातून सुटून खालीं पडला ! त पाहून आपण विवाहाबद्दल इतक्या लवकर असे उगाच बोललों, अस त्याला वाटल आणि समजूत करीत तो म्हणाला, " लीले विवाह करावयाचा नाहीं, अस नाहीं मीं म्हणत ! परतु आपला इथला काहींतरी जम नको का बसायला ? बरं आता झोंपायची कशी काय व्यवस्था ? हे माझ उपरण देऊ का तुला ? ' "

" नको ! लीला म्हणाली, तुम्ही घ्या तें ! तुम्ही तरी कशावर झोंपाल ? इथं कोपऱ्यांत भिंतीला टेकून मी बरी आहे ! ' "

त्यानं ते उपरणं एका बाजूला अंथरल, आणि त्यावर तो आग टाकून पडला. बराच वेळ दुसऱ्या दिवशीं काय काय गोष्टी करावयाच्या याबद्दल त्याच्या गोष्टी चालल्या होत्या. गोष्टी करतां करता त्याला झोप लागली.

धर्मशाळेतील नोकरान दिलेल्या दिव्यातील तेलहि सपत आल होतं. लीलेन दिवा बारीक करून एका बाजूला ठेवला आणि ती एका कोपऱ्यात भिंतीला मान टेकून बसली. सबंध रात्र तिला झोंप कशी ती लागली नाहीं. आपण जें केलं, ते सुखाला कारण होईल कीं, दुःखाला कारण होईल, हा एकच प्रश्न ती कोपऱ्यात बसून सोडवीत होती. त्या गृहस्थाला मात्र श्रम झाले असल्यामुळं चांगली झोप लागली. सकाळीं पाच वाजतां तो उठला. शौचमुखमार्जन करून त्यान बाहेरच्या दुकानावरून चहा आणला. नतर तिला घेऊन तो आपल्या नवीन घरीं जाण्याकरतां निघाला. आधल्या दिवशीं त्यानं रस्ता नीट ध्यानात ठेवला असल्यामुळं तो आतां बिनचूक नवीन भाड्यान घेतलेल्या घरीं आला. लीलेला घर पसत पडलं. परंतु घरात वर खालीं सर्वत्र अतिशय घाण पडली होती. ठिकठिकाणीं जमीन उखळलेली होती. ज्या खोलींत स्वयंपाक करायचा तिनं ठरविल त्या खोलींत घुशींनीं जागजागीं मोठ-मोठी बिळ पाडली होती. घर साफ करण्याकरतां त्यानीं मजुराचा बराच शोध केला. परंतु तें घर साफ करण्यास कोणी मजूरच तयार होईना। शेवटीं त्या दोघाना स्वतःच तें काम कराव लागलं. प्रथम त्यानं माडी साफ केली. आणि लीला खालच्या खोल्या साफ करूं लागली. तास दोन तासात त्या दोघांनाहि बरेच श्रम झाले. ते पाहून तो म्हणाला, "लीला, ही एकच खोली तूं साफ करून ठेव इतक्यात मी भाडीं, चहा, दूध आणि साखर घेऊन येतों प्रथम चहा घेऊं. इतक्यांत मी बाकीचं सामान आणून टाकतो. मग दुपारीं बाकीच साफ करूं, असें म्हणून तो कपडे करून बाहेर पडला. तास दीड तासाच्या आत त्यानें टांग्यांत बरेंच सामान आणलें. तोंपर्यंत लीलानें एक खोली साफ करून तिथें धोंडे माडून ठेवले होते. 'तुझ्याकरतां दोन पातळ आणलीं आहेत. तू प्रथम स्नान करून घे तोंपर्यंत लाकडाच्या जुड्या घेऊन येतों आणि मी चूल पेटवतों!' तो मनुष्य म्हणाला."

"लीलेनं स्नान केल आणि त्या दोघांनीं चहा घेतला. नंतर त्यानें जाऊन काहीं धान्य, डबे वगैरे सामान खरेदी केलं. पिठलं भात होऊन त्याच जेवण होईपर्यंत दोन प्रहर उलटून गेले. पुनः तो मनुष्य राहिलेल्या जिनसा आणण्याकरतां बाहेर पडला आणि लीला राहिलेलं काम आटोपण्याच्या उद्योगाला लागली. मागील खोली प्रथम साफ करावी आणि त्या खोलींत चूल मांडावी ह्या उद्देशानं तिनं तीच खोली साफ करायला घेतली. ती खोली

सर्वात जास्त उखळलेली होती. एका कोपऱ्यात तर ढोपरभर मातीचा ढीग भरून ठेवला होता. ती माती इतर खळग्यात भरून सर्व जमीन सारखी करावी ह्या उद्देशान पशापशानं ती माती उकरू लागली. आजुबाजूचे दोन चार खळगे तिनं भरले. तरी कोपऱ्यात मातीचा ढीग बराच होता. ती माती बाहेर खळींत नेऊन टाकावी या उद्देशान तिन सूप आणल. ते सूप नुकतंच बाजारातून आणल होतं. तीन चार पसे माती सुपात टाकल्यावर तिच्या हाताला एक फडका लागला. तो ती ओढू लागली परंतु मातीत पुरलेला तो फडका निघेना म्हणून तिनं हातानीं ती माती उकरण्यास सुरवात केली. वितभर माती बाजूला केली तरी फडका वर येईना. बराच खोल तो गाडलेला असावा, असं वाटून हातानीं ती माती उकरू लागली होतां होता दोन अडीच विती तिन खळगा केला, आणि फडक्याचा शेवट धरून तो जोरान वर ओढला. त्याबरोबर पोकळ झालेल्या त्या मातींतून फाटत फाटत एक अर्धवट बोजकं बाहेर आल. नें काय असेल याची किंचितहि कल्पना नसल्यामुळं तिनं हातान बाहेर काढल. त्याबरोबर एक किंकाळी फोडून ती माग सरकली ! "

" त्या बोचक्यांत काय होतं ? " बापूनें उत्कठेन मध्येंच विचारल.

" मेलेल मूल ! " दादासाहेबानीं मध्येंच उत्तर दिलं.

" अरे बापरे ! " बापूनें उद्गार काढले !

" पण तें मूल तिथं कस आलं ? " गजाभाऊनं विचारल.

" दोनच दिवसापूर्वी एका दुष्ट बाईन आपल पाप छपविण्याकरता तीं बालहत्या केली होती. आणि त्या ओसाड घरांत त्या मुलाला पुरलं होतं. आतां तें मूल लीलेन बाहेर काढलं. प्रथम ती भ्याली ! परंतु क्षणार्धात तिच्या मनातील भीति जाऊन ती त्या मातींत लोळत पडलेल्या मृत बालकाकडे एक चित्तान पाहू लागली तिच्या डोक्यांत विचार येऊं लागले. ' हे बालक अशा रीतिनं इथ गाडल आहे, पण तें का ? ' असा पहिला प्रश्न तिच्या डोक्यात उत्पन्न झाला. ' बालक आपल्या मरणान न मरतां त्याला मारल आहे, कारण फडक्यावर रक्ताचे डाग आहेत, तर त्याला का मारलं ? ' हा दुसरा प्रश्न तिच्या डोक्यात उत्पन्न झाला. असे एका मागून एक प्रश्न तिच्या डोक्यात उद्भवू लागले. आणि त्याचीं उत्तरेंहि तिला मिळू लागलीं. ती त्या बालकाकडे एकाग्र दृष्टीनं पहात होती, त्यावरून जणुं काय तें बालकच तिच्या प्रश्नाना उत्तर सुचवीत होतं. अखेर तिच्या

डोक्यांत जे विचार आले ते हे—' मी इकडे पळून आलें. पण रात्रीच्या बोलण्यावरून ते माझ्यापाशीं विवाह करतीलच, असं चिन्ह दिसत नाहीं. आणि त्यांनीं विवाह न केला तरीहि मला त्याच्याजवळच रहावं लागणार ! कारण आता घरीं जायला मला तोंड कुठं आहे ?—मग मला मूल होईल त्या मुलाची मला अशीच विल्हेवाट लावावी लागेल काय ?—' ह्या शेवटच्या प्रश्नावर ती विचार करीत आहे तोंच तो गृहस्थ काही सामान घेऊन आला. आत येताच ' माझ्या लाडक्या लीले काय करतेस ?—आज तुला फार श्रम झाले !–पण–अरे हे काय ? हें मेलेलं मूल—! ' जागच्या जागीं थबकून तो म्हणाला. "

" हे मूल पहा ! आणि मला आताच्या आता इथून परत घरीं घेऊन चला ! मी आता इथं एक क्षणभरहि राहणार नाहीं. चला, आतांच्या आता चला ! मला लग्न करायचं नाहीं. मी ही अशीच परत घरीं जाणार. बाबानीं मला मारल, आईन मला भाजल, काय वाटेल तं केलं, तरी चालेल पण मी घरींच जाणार ! चला —"

" लीला, हें काय बोलतेस ? हे मुलाच प्रेत पाहून—"

" ह–दूर व्हा ! माझ्या अंगाला आता स्पर्श करू नका. खबरदार जवळ याल तर—चला, मला आतांच्या आता मुंबईस न्या ! ' "

" लीला—"

" खबरदार !—तुम्ही माझ्याहि मुलाची पुढं हीच स्थिति करणार—खात्रीन त्याचा गळा दाबून तुम्ही त्याला असच मातींत पुरणार !—आई—बाबा, मी हं काय केल !—चला, मला घेऊन चला ' असे म्हणून लीला झपाट्यानं बाहेर आली, तोंच फौजदार आपल्या बरोबर दोन शिपाई घेऊन आत आले. त्याना पहाताच लीला दरवाजात थबकली. तिच्या मागून तो मनुष्यहि बाहेर आला आणि तोहि शिपाई पाहून गडबडला ! त्याला पाहताच फौजदार म्हणाले, " विनायक वामन काळे, तुमचच नाव ना ? '—त्यान उत्तर देण्यापूर्वीच लीलेनं ' होय ' म्हणून उत्तर दिल "

" तुमच्या करता हं वारंट आणलं आहे ! फौजदार म्हणाले. ' तुम्ही परवा जान-जोन कपनीच्या नावाचा हजार रुपयाचा खोटा चेक वटविला आहे. नाईक, ह्या गृहस्थाच्या हातात बिड्या घाला ! "

" मग मला घरीं कोण पोंचवणार ? " लीला दिनवाण्या स्वरान म्हणाली.

" मला लग्न करतों असे सागून यानीं इथं आणलं. देवा, देवा! याच्या मोहाला मी कशी बळी पडलें. आईबापाना सोडल, तें हे मुखसोहळे पहाण्याकरतां का ?–माझ्या मुलाला ते मारतील हो! ठार मारतील आणि त्या खोलींत तें मूल पुरलं आहे तसं त्या मुलाला पुरतील हो! मला घरीं न्या! मला वाचवा, मी तुमच्या पाया पडतं!

' त्या खोलीत मुल पुरलं आहे, ' हे लीलेच्या तोंडचे शब्द ऐकताच मोरे फौजदार विचारात पडले. ही स्त्री काहींतरी बरळत असेल, असं त्यांना प्रथम वाटल. परतु खोलींत जाऊन पाहताच त्या उकीरड्यावर पडलेल मूल खरोखरीच त्याच्या दृष्टीला पडल! अर्थातच त्या मुलाची चौकशी करण भाग पडल. ते मूल कोणी टाकल असाव? वगैरे क्षुल्लक प्रश्न सोडवीत ते उभे राहिले नाहीत. चटकन् ते बाहेर आले आणि रस्त्यावर आजुबाजूला पाहूं लागले. त्यावेळीं एक मनुष्य समोरच्या बाजूला रस्त्याच्या कडेला उभा राहून पाहात होता. फौजदारानीं त्याला पाहिल आणि जवळ बोलावल. परतु तो त्याच्याजवळ येण्याऐवजीं पळू लागला त्याबरोबर फौजदारानीं शिपायाला त्याच्या माग धावायला सागितल. थोड्या वेळानं शिपायान त्या मनुष्याला पकडून आणल. तेव्हा फौजदारांनी पहिल्या तडाख्याला त्याच्या फाटकन तोंडात मारली आणि ' हं पोर तूं इथ येऊन पु लस ना ? ' असा प्रश्न केला. तेव्हां तो मनुष्य ' मी–मी–मी ' असं करू लागला. पुनः दुसरी तोंडात मारताच तो मनुष्य सर्व कबूल झाला. "

" पण त्यानच ते मूल पुरल होत, हं फौजदाराला कस कळल ? " बापून विचारल.

" हीच तर मुळीं मौज आहे ! " दादासाहेब म्हणाले, " मोऱ्यांना जेव्हा ते मूल पाहिल, तेव्हा एक दोन दिवसातच ते तिथ पुरलेल असाव, असं त्याच्या लक्षात आल. बोलून चालून त्याच फौजदारी डोक! मुतावरून स्वर्गावर जाणारे हे लोक! आपण आज दुसऱ्या काहीं कामाकरतां ह्या घरात अकल्पित रीतीन आलों. परतु ज्या मनुष्यान हे मूल इथ येऊन पुरल तो आठ पधरा दिवस रात्रदिवस ह्या घरच्या टेहळणीवर असणारच ही त्याना खात्री होती. कारण ' भित्या पाठीमाग ब्रह्मराक्षस ' असतोच! फौजदार आज त्या घरात गेले, तेव्हा ते तिथ काय करतात, हे पाहण्याकरतां गुन्हेगार मनुष्य त्या टेहळणीवर होता. तो खरा अपराधी होता म्हणूनच शिपायाचा पाठलाग होतो,

असं पाहून पळूं लागला. एक दोन तोंडात मारतांच तो मनुष्य सर्व गोष्टी कबूल झाला. त्या आळींत यमुना नावाची एक तरुण ब्राह्मण विधवा बाई होती. तिच्याकडे वपन करण्याकरिता मुरलीधर नावाचा एक न्हावी आठ दहा दिवसांनीं जात असे. त्यानेंच हा सर्व प्रकार केला होता. फौजदाराला त्या सर्व गोष्टी कळताच त्यानं त्या मुरलीधरला आणि त्याबरोबर त्या यमुनाबाईला कैद करून फरासखान्यात नेलं, आणि लीलेच्या वडिलांना तार करून पुण्यास बोलाविलं. दुसऱ्या दिवशीं लीलेचे वडील येताच फौजदारसाहेबांनी एकंदर हकीकत त्यांना सांगितली आणि लीलेला त्यांच्या स्वाधीन केलं. पुढं त्या न्हाव्यावर आणि यमुनेवर रीतसर खटला चालू झाला. मुद्देमालासह सर्व पुरावा हातीं असल्यामुळं त्याच्यावर गुन्हा शाबीत झाला आणि दोघांनाहि दहा दहा वर्षांची सक्त मजुरीची सजा झाली. आणि विनायक वामन काळे या व्यक्तीला मुंबई पोलीसच्या स्वाधीन करण्यात आलं. तेथं त्याच्यावर खटला होऊन त्याला तीन वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा मिळाली!"

"दादासाहेब, इंग्रजींत 'खुनाला वाचा फुटते' अशी एक म्हण आहे, ती यावेळीं चांगली प्रत्ययाला येते!" राजा म्हणाला. "कित्येक वर्षं ओसाड पडलेल्या त्या घरात आपलं पाप छपविण्याकरिता यमुनेनं आपलं बालक मुरलीधराकडून विल्हेवाटेला लावलं आणि आपण जगाच्या डोळ्यांत धूळ फेकली, असं समजून तिला कृतकृत्य वाटलं. परंतु खून—मग तो लहान बालकाचा असो, स्त्रीचा असो किंवा पुरुषाचा असो, केव्हाहि चव्हाट्यावर बोंबलल्याच ग्हाणार! केवळ त्या बालकाला बोलावयाचं होत म्हणूनच लीला आणि विनायक काळे यांनीं तें घर भाड्यानं घेतलं. वास्तवीक पाहिलं असतां तें घर भुताटकीचं म्हणून इतकीं वर्षं ओसाड पडलं होतं. मग आताच त्यांच्यात भाडोत्री कां यावा?—याचं कारण दुसरं तिसरं कांहीं नसून ते भाडोत्री म्हणजेच ती खुनाची वाचा होती, असं नाहीं का?"

"तुमचं म्हणणं बरोबर आहे!" दादासाहेब म्हणाले. "बाळासाहेब, अशीं डोक्यांचीं माणसं तुझ्या परिवाराला आहेत याबद्दल मला आनंद वाटतो. बरं आता फार वेळ झाला. आतां आपण ह्या गोष्टी बंद करू या! उद्यांपासून मला माझ्या उद्योगाला लागलं पाहिजे. लग्न जवळ आलं आहे आणि मलाहि कांहीं महत्त्वाच्या कामाकरतां मिरजेला जायचं आहे. तेव्हा गोष्टींत वेळ न दवडितां मला माझा उद्योग पाहिला पाहिजे!"

" दादासाहेब, तुम्ही त्याची मुळींच काळजी करू नका ! " राजा म्हणाला. " आमच्या रायाचं लग्न अगदीं साध—किंचित्‌हि डाम डौल न करतां झालं पाहिजे, अशी आमची इच्छा आहे. हे लक्षात ठेवून काय तयारी करावयाची ती आम्हाला सांगा म्हणजे आम्ही ती बिनचूक पार पाडूं ! "

रात्रीं बसून दादासाहेबांनी लग्नाच्या सामानाची एक यादी तयार केली. मोठ्या किंमतीचा सर्व माल दादासाहेबांचे पुण्याचे अडते शेट रामनारायण याच्याकडून आणावयाचा असल्यामुळं आमच्या मडळींना किरकोळ वस्तु आणि धान्याचा साठा खरेदी करावा लागला. तिसऱ्या दिवशीं दादासाहेब आपल्या कामाकरिता मिरजेस परत गेले. आणखी दोन दिवसानीं रायाची मातुःश्री, दुसरे बंधु भाऊसाहेब आणि त्यांचे कुटुंब, आणि दोन चार नातेवाईकांची खटली कोल्हापुराहून आलीं. आता तें लग्नघर दिसू लागल. हळूहळू लग्न दिवस जवळ येऊ लागला. आणि अशा रीतीन तो दिवस जवळ येतां येता तो निर्विघ्नपणं पार पडूनहि मागे गेला. आणि राया चतुर्भुजहि झाला !

लग्नघरच ते ! अर्थात् त्या घरीं लग्नसमारंभात अनेक गोष्टी घडल्या. त्या सर्व गोष्टींची सविस्तर हकीकत सांगत बसण्यापेक्षा आमच्या कथानकाला—रायक्लबला पोषक गोष्टी त्या समारभांत कोणत्या घडल्या, त्याचा येथें उल्लेख करणें अवश्य आहे. प्रथम ही गोष्ट येथें सांगितली पाहिजे कीं, मुन्सफ-साहेबांना आपले जांवई कल्पनातीत आवडले ! प्रथम दादासाहेबांनीं आपल्या धाकट्या बंधूकरितां म्हणजे आमच्या क्लबनायकाकरिता बिंदूची मागणी घातली, त्यावेळीं मुन्सफ साहेबांनीं सर्व चौकशी केली होती. आपले भावी जामात पुण्यास कॉलेजात शिकतात, इतकीच माहिती दादासाहेबांकडून त्याना कळली होती. परंतु लग्नाच्या अगोदर बिंदूला आपले पतिराज कॉलेजमध्ये नसून कोणता उद्योग करतात, त्याविषयीं बरीच हकीकत कळली असून आपल्या पतिराजांचे सर्व उद्योग रहस्यमय आहेत, याचा तिनें स्वतःहि अनुभव घेतला होता. वाचकांना तो सर्व वृत्तांत माहीत आहेच ! पुढे ती सर्व हकीकत मुन्सफ साहेबांच्या कानावर जाताच त्याना काळजी वाटूं लागली. त्यानीं पुनः कसून चौकशी चालविली. परंतु बिंदूला जेव्हां ही गोष्ट कळली, तेव्हा तिनं आपले स्पष्ट विचार त्यांना कळविले.—माझ्याकरितां जी वरयोजना झाली आहे, ती माझ्या मनपसंत असून आता कोणत्याही प्रकारें जास्त चौकशी करण्याची मुळींच आवश्यकता नाहीं ! ' असें ती निर्भिडपणें

आपल्या वडिलाना म्हणाली. मुलीचें स्पष्ट मत कळताच मुन्सफसाहेबांना गप्प बसावं लागल. तरीहि स्वतःची शका फेडून घेण्याकरिता लग्नापूर्वी चार दिवस दादासाहेब कांहीं कामाकनिमित्त त्यांना भेटण्याकरिता गेले असतां ते म्हणाले, "दादासाहेब, तुमचा आमचा संबध आतां जुळला आहे तो मोडण शक्य नाहीं, हें जरी खरं आहे, तथापि मी काहीं विचारतों, त्याबद्दल तुम्हाला राग नाहींना येणार ?"

"छे ! छे ! भलतच !" दादासाहेब म्हणाले, "तुमच्या विचारण्याचा मला राग ?"

"मला विचारावयाच म्हणजे तुमच्या बाळासाहेबासबधानच !" मुन्सफ साहेब म्हणाले. "आमचे भावी जामात काय उद्योग करतात, हं एकदा मला कळलं असत म्हणजे बर ! बाहेरून मी काहीं गोष्टी ऐकतों त्यामुळ मनात नाना तऱ्हेचे तर्ककुतर्क उत्पन्न होतात !"

"स्वाभाविक आहे. मनांत कोणतीहि शका राहिली कीं, ती परिणामाला बाईटच ! मलाहि आमच्या बाळासाहेबासबधीं हा वेळ पावेतों कांहीं विशेष माहिती नव्हती. तुमच्या मनात आता जसे तर्ककुतर्क आले आहेत म्हणता तसेच माझ्याहि मनांत आले. परवाच माझ्या सर्व शकाचें निरसन झालं ! आमचा बाळासाहेब काय उद्योग करतो, हे मी सागण्यापेक्षां त्याच्याकडून तुम्हाला कळलेल बर ! तेव्हा उद्या आपण सर्वजण बसू आणि त्या गोष्टीची बाळासाहेबाकडूनच शहानिशा करून घेऊ म्हणजे झाल ! बाकी, तुम्ही आमच्या बाळासाहेबाचे उद्योग ऐकाल, तेव्हा आश्चर्यान थक्क होऊनच जाल, आणि शाबासकीहि द्याल अशी माझी खात्री आहे !"

घरीं आल्यावर दादासाहेबानीं सर्व हकीकत रायाला सांगितली. आपल्या भावी श्वशुरसाहेबांना आपल्या वर्तनाविषयी आणि उद्योगाबद्दल शका आली आहे, हें कळताच रायाला मुळीच आश्चर्य वाटल नाही. आपल्या उद्योगाकडे वरवर पाहणाराला—'रायक्लबची मडळी म्हणजे एक सोनेरी टोळीच आहे, अशी शंका यावयाचीच, हें तो जाणत होता. इतर कोणी अशी शका घेतली असती तर त्या शकेचं निरसन करण्याकरिता रायान मुळींच प्रयत्न केले नसते. परंतु प्रत्यक्ष आपल्या श्वशूरसाहेबाची शका तशीच कायम ठेवणं चागलं नाहीं, असा विचार करून दुसऱ्या दिवशीं आपल्या क्लबच्या मडळीसह श्वशूरगृहीं जाण्याचा त्यानं विचार ठरविला.

दुसऱ्या दिवशीं ठरल्याप्रमाणें ती सर्व मंडळी मुन्सफसाहेबांच्या घरीं गेली. प्रथम त्यांचं औपचारीक भाषण झाल्यावर राया मुन्सफसाहेबांना म्हणाला. " बाबासाहेब, तुम्हाला माझ्याविषयीं कांहीं शंका आली आहे, असं काल दादासाहेब मला सांगत होते. मी कॉलेजात शिकत आहे, ह्याच समजुतीवर जर तुम्ही मला आपला जांवई करीत असाल, तर ती समजूत चुकीची आहे. कारण आज जवळ जवळ पांच वर्षं झालीं मी कॉलेज सोडलं आहे. तेव्हा ह्या पांच वर्षांत मी कोणकोणते उद्योग केले, ते सर्व बारीक सारीक आणि चांगली वाईट अशी एकहि गोष्ट न वगळता तुम्हाला सांगतों. सुदैवानं तुमचे चार स्नेहीहि इथं आहेत. तेव्हा माझी साद्यंत हकीकत ऐकून काय तो निर्णय करा. सर्व ऐकून झाल्यावर तुमच्या मनात काहीं किल्मिष राहिल्यास जर आमचा संबंध तोडण्याची—"

" छे छे ! संबंध तोडण्याची आता गोष्टच बोलू नका ! " मुन्सफसाहेब म्हणाले " माझ्या मित्रांनी आपल्या पतीची निवड तावून सलाखून केली आहे."

रायानं आपली हकीकत सांगण्यास सुरवात केली. प्रथम मुंबईंत रायक्लबची स्थापना होण्यास काय कारण झालं, त्यावेळीं ती मंडळी कोणत्या स्वडतर परिस्थितींत होती आणि त्यानीं सुरवातीला कोणते उद्योग आरंभिले, ते सर्व क्रमाक्रमानें तो सांगूं लागला. आमच्या रायक्लबचा सुरवातीपासूनचा इतिहास वाचकांना चांगला अवगत आहेच. राया आपली हकीगत सांगत असताना कित्येकदा मंडळी पोट धरधरून हासली. रायाची सांगण्याची शैली चित्तवेधक असल्यामुळं सर्व मंडळी अगदी तटस्थ वृत्तीनं ऐकत होती. रात्रीं दोन वाजे-पर्यंत त्यानें एकदर गोष्टी सांगितल्या. शेवटीं तो म्हणाला, " आमच्या रायक्लबचं ध्येय काय आहे, हे आता आपणास कळलंच आहे. आता आपला काय निर्णय असेल तो सांगा ! "

" निर्णय तो काय असायचा ! " मुन्सफसाहेब म्हणाले, " तुमच्या क्लबचं ध्येय उच्च आहे, तुमची जूट अवर्णनीय आहे आणि कार्य करण्याची हातोटी बिनतोड आहे, हें कोणीही कबूल करील. तुम्ही आजपर्यंत मिळविलेली रक्कम एक लाखाच्यावर गेली आहे. सरकारी कायद्याच्या दृष्टीनं पाहिलं तरीहि तुमच्या उद्योगाला नाव ठेवता येणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. का अण्णासाहेब तुमचं काय मत आहे ? " बाजूला बसलेल्या स्नेह्याकडे वळून मुन्सफसाहेबांनीं विचारलं.

" कायद्याच्या दृष्टीनं मलाहि त्यात काहीं दोष ठेवता येणार नाहींत ! " अण्णासाहेब म्हणाले. हे अण्णासाहेब वऱ्हाडात एक नावाजलेले वकील असून मुन्सफसाहेबांचा आणि त्यांचा अत्यंत घरोबा असल्यामुळं ते मुद्दाम लग्नाला आले होते. आपले वकिलीमत दिल्यावर ते म्हणाले, " बाळासाहेबांनी चाल-विलेला उद्योग खरोखरीच प्रशंसनीय आहे, यांत शंकाच नाही आपले बुद्धिचातुर्य खर्च करून त्यांनीं हा परोपकाराचा स्वतंत्र धंदाच सुरू केला आहे असं म्हटलं पाहिजे. ह्या त्यांच्या धंद्यामुळं त्यांना द्रव्य मिळत. लोकांवर परोपकार होतो नीच, पाजी आणि हरामखोर लोकांना शासन होत आणि अप्रत्यक्ष रीतीनं सरकारलाहि मदत केल्यासारखी होते. थोडक्यात सांगावयाचं म्हणजे ध्येय उच्च असल्यामुळं बाळासाहेबांची 'रायक्लब' ही संस्था प्रशंसनीय असून अशी संस्था समाजात असणं अवश्य आहे. आज इतके पदवीधर युनिव्हर्सिटीच्या चरकातून बाहेर पडतात परंतु बुद्धिचातुर्याच्या अभावीं त्यांच्या कपाळीं खर्डेघाशीच येते.—बर का बाळासाहेब, हा उद्योग तुम्ही असा चालू ठेवणार ना ? "

" होय ! काहीं विवक्षित मर्यादेपर्यंत ! " रायानें उत्तर दिले.

" म्हणजे काय ? "

" आम्ही जसं आमच्या क्लबचं ध्येय ठरविलं आहे, तशीच त्या क्लबची मर्यादाहि ठरविली आहे. प्रत्येकाच्या वांटणीला बारा बारा हजार रुपये आले म्हणजे मग आम्ही हा क्लब मोडणार आहोंत. मग प्रत्येकानं आपापल्या इच्छेनुरूप वाटेल तो स्वतंत्र उद्योग करावा, असं आम्ही ठरविलं आहे ! " राया म्हणाला.

" हें नाहीं बुवा चांगलं ! अण्णासाहेब म्हणाले. " तुमचा क्लब अत्यंत आवश्यक आहे. समाजांत होणारी कितीतरी अनुचित कृत्यं टाळणारा हा क्लब तुम्ही बंद करणार म्हणतां ? "

" होय ! कारण प्रत्येक कामांत आम्हाला कितीतरी जोखम शिरावर घ्यावी लागते याचा तुम्ही विचार करा. एखाद्या वेळीं भलताच प्रसंग जर उद्भवला तर परिणाम काय होईल याचा नको का विचार करायला ? "

" तेंहि खरंच आहे ! " अण्णासाहेब म्हणाले, " मग बाळासाहेब माझी तुम्हाला एक आग्रहाची सूचना आहे. तुम्ही हा क्लब बंद केल्यावर एक खासगी सी. आय. डी. खातं सुरू करा. तुम्ही आतांपर्यंत सांगितलेल्या

गोष्टीवरून गुप्त पोलिसाला असणारे सर्व गुण तुमच्या अंगीं पूर्णपणें आहेत, हें सिद्ध होत. इंग्लडात असे खाजगी डिटेक्टिव्ह पुष्कळ आहेत. धाडस, चातुर्य आणि समयसूचकता हे तुमचे गुण पाहून मला वाटत सरकार-सुद्धा तुम्हाला सी. आय. डी खात्यात मोठी हुद्याची जागा देईल."

"पण स्वतन्त्रता गमावून मी कधींहि— प्राण गेला तरी सेवावृत्ति पत्करणार नाहीं!" राया टासून म्हणाला.

"म्हणूनच मी तुम्हाला खाजगी सी. आय. डी. खात सुरू करा म्हटल! अण्णासाहेब म्हणाले. "अस जर तुम्ही खाजगी खात सुरू कराल, तर मी तुम्हाला सरकारची सहानुभूति मिळवून देईन. इतकच काय पण सरकारच्या सी. आय डी. खात्याला जशा सवलती आहेत, तशा तुम्हालाहि मी प्रयत्नान मिळवन देईन,—नेर्साम कशा मिळतील याची काळजी नको. आम्हा वकील लोकाकडे कित्येक प्रसगी असे चमत्कारिक खटले येतात की, आमची मति गुग होऊन जाते. असे खटले आम्ही तुमच्याकडे पाठवूं. मुबई पुण्यात माझे बरेच स्नेहि आहेत. म्हणून म्हणतो तुम्ही हा उपक्रम अवश्य सुरू करा. रायक्लब बद करताच '**राया घी डिटेक्टिव्ह**' या नावान तुम्ही प्रसिद्ध व्हा!"

अशा रीतीने गोष्टी बोलता बोलता दोन वाजून गेलेले पाहून मुन्सफसाहेब म्हणाले, "आता फार गप्पा झाल्या. उद्यांपासून दोन चार दिवस सतत जाग्रण होणार आहे. तेव्हां आता उठावं हें चागलं!"

मुन्सफसाहेबाच्या घरीं झालेल्या गोष्टीवर आमच्या मंडळीपैकीं फक्त तिघेचजण विचार करीत आपल्या बिऱ्हाडीं आले. अण्णासाहेब वकीलनीं केलेल्या नम्र सूचनेचं इतरास कांहीं विशेष महत्त्व वाटलं नाहीं. फक्त राया, राजा आणि गोप्या हे तिघे ह्या सूचनेचा सारखा विचार करीत होते बिछान्या-वर तळमळत असताना राजा म्हणाला. "कायरे राया, तुलाहि झोंप येत नाहीं वाटत?—मला वाटतं त्या वकीलसाहेबांनीं सागितलेल्या गोष्टीचाच तूं विचार करीत असशील खरं ना?"

"होय!" राया म्हणाला, "ती वकिलसाहेबांची आग्रहाची सूचनाच आता मला झोप येऊ देत नाहीं."

"मीहि तोच विचार करतो आहे. आतां आपल ठरल्याप्रमाण ह्यापुढं छत्तीस हजाराची क्लबला प्राप्ति झाल्यावर प्रत्येकाच्या वाट्याला बारा हजार

रुपये येतील, आणि मग स्वतंत्र रीतीनं प्रत्येकजण वाटेल तो उद्योग करण्यास मोकळा होईल. मग अशा रीतीनं आपल्या मंडळींत फूट झाल्यावर अर्थातच आपल्या रायक्लबचं अस्तित्वहि नाहींसं होईल !"

"नाहीं—राजा, तू म्हणतोस त्याप्रमाणं आपल्या रायक्लबच अस्तित्व नाहींसं होऊं द्यायच नाहीं, अशी तर माझी इच्छा आहे !" राया म्हणाला, "आतां बाकी राहिलेले रुपये मिळविण्याकरता आपणास किती काळ लागेल हं कांहीं निश्चित् सांगतां येत नाहीं. कदाचित् दोन वर्षं लागतील, नाहींतर दोन महिन्यातहि आपण छत्तीस हजार रुपये मिळवू ! कोणी सांगावं ? तरीहि माझी इच्छा अशी आहे, आपण ठरविल्याप्रमाण आपण स्वतंत्र होऊन जो तो आपापल्या उद्योगाला लागला तरी प्रत्येक विजयादशमीला आपण सर्वांनी एकत्र जमून रायक्लबचा वार्षिक उत्सव साजरा करावयाचा !"

"हा विचार मलाहि पसंत आहे ! राजा म्हणाला. "मला वाटतं राया आपल्या रायक्लबचा वार्षिक उत्सव साजरा करण्याकरता योग्य ठिकाण जर कोणतं असेल तर ते मुंबईतील झावबाच्या वाडींत ज्या ठिकाणी आपण आपला रायक्लब प्रथम स्थापन केला ती खोलीच होय !"

"होय—असं तर खरच ! पण ती खोली आपल्याला आता पुनः मिळणार कशी ?" राया म्हणाला. "वास्तविक ती खोली सोडून चार वर्षं होऊन गेली. कदाचित् आता त्या खोलीन दुसरा कोणी भाडेकरी आलाहि असेल !"

"त्याचा विचार करता येईल. तीच खोली आपल्या क्लबच्या नावान घ्यावयाची असं ठरल्यास वाटेल त्या रीतिनं आपण घेऊं. भाडं सहा रुपयेच आहे. तेव्हा आपणास प्रत्येकाला या खोलीप्रीत्यर्थ वर्षास सहा रुपयेच द्यावे लागतील. तू सांगत असशील तर हे लग्न आटोपताच मी मुंबईस जाऊन ती खोली आपल्या क्लबाकरतां तुझ्या नावें गुंतवून टाकतो. आणि संबंध वर्षाच भाडं आगाऊ देऊन खोलीला आपलं टाळं मारून येतो. आणि राया खर पाहिलं असता आपणाला त्या खोलीविषयीं आदरच वाटला पाहिजे. परवा आपण महाडास गेलो होतों, तिथं त्या कुंवरजी मारवाड्याचा तो टोलेजंग राजवाडा आपण पाहिला, त्याची हकीकत तुझ्या लक्षात असेलच !"

"होय असेल म्हणजे !" राया म्हणाला. "प्रथम त्या जागेवर त्यान दुकान घातलं. पुढं हळू हळू वाढत जातां जाता त्यानं ती यशस्वी जागा म्हणून विकत घेतली आणि मग तो बंगला बांधला."

"मग राया, मघा वकीलसाहेबानीं केलेल्या सूचनेबद्दल तुझं काय मत पडत ?"

"आज रात्रीं त्यावर मी विचार करतों मग सर्व मंडळींचं मत घेऊन आपण काय ते ठरवू !"

"यात मंडळींचं काय मत घेणार राया तू ? हा रायक्लबच्या नंतरचा स्वतंत्र उद्योगाचा प्रश्न आहे !"

"ते काहीं जरी असल तरी जोपर्यंत आपण मंडळीत आहोत, तोंपर्यंत मंडळींत होणारी प्रत्येक गोष्ट बहुमतानंच झाली पाहिजे, असं नाहीं का तुला वाटत ?"

राजाला काहींच बोलता येईना. क्लबच्या ध्येयाप्रमाणे राया म्हणाला ती गोष्ट बरोबर आहे, असंच त्याला शेवटीं कबूल करावं लागलं. दुसऱ्या दिवशीं आमची सर्व मंडळी एकत्र बसली असता रायानं तो प्रश्न काढला तो म्हणाला, "आपण रात्रीं सर्वजण मुन्सफसाहेबाच्या घरी गेलो होतो. तिथं काय काय गोष्टी झाल्या त्या सर्व तुम्हाला माहीत आहेतच. अण्णासाहेब वकीलांनीं एक सूचना सुचविली तीहि तुम्हाला माहीत आहेच. त्यावर कोणी विचार केला आहे काय ? आणि विचार केला असल्यास कोणी काय विचार केला आहे, तो आता सांगावा."

सर्वजण एकमेकांच्या तोंडाकडे पाहू लागले. वर उल्लेख केल्याप्रमाणं राया, राजा आणि गोप्या ह्या तिघांशिवाय कोणीहि विचार केला नव्हता. खाजगी सी. आय. डी. चे खातं सुरू करावयाचं म्हणजे काय, आणि त्यात कोणत्या गोष्टी कशा करावयाच्या याविषयीं एकालाहि नीटशी कल्पना झाली नाही. आणि तेहि बरोबर आहे. क्लबमध्ये खरंखुर डोक्याचं काम करणारा फक्त रायाच होता. त्याच्या खालोखाल राजा असून गोप्याहि अलीकडे तयार होता. बाकी सर्व मंडळी सांगकाम्यांपैकीच होती. कोणीच काही बोलत नाहीं, असं पाहून गोप्या म्हणाला, "काल वकीलसाहेबानीं सांगितलेल्या गोष्टीचा मी विचार केला आहे. त्यांनी सांगितल्याप्रमाणं नवीन उपक्रम सुरू करावयास साहस, बुद्धीचातुर्य आणि प्रसंगावधान हे भांडवल आपल्या मंडळीत रायाशिवाय दुसऱ्या कोणाजवळहि नाही. तेव्हा त्यानं एकट्यानंच हा उद्योग करावा, असं माझं मत आहे."

सर्वांनीं गोप्याप्रमाणंच आपलं मत दिलं, तेव्हा शेवटीं राया म्हणाला,

" तुमच्या सर्वांच्या मनात हा नवीन उद्योग करण्यास मीच एकटा लायक आहें, असं दिसत. तेव्हा आता ह्या गोष्टीचा जास्त विचार करूं नये हेंच चांगल ! हा माझ्या पुढच्या उद्योगाचा प्रश्न आहे, तेव्हा तो मी जेव्हा स्वतंत्र होईन तेव्हा करीन ! "

" ठीक आहे ! " राजा म्हणाला, " जेव्हा करशील तेव्हा कर, पण करताना माझी आठवण ठेव म्हणजे झाल ! "

" आणि माझीहि ठेव ! " गोप्याहि म्हणाला.

" बरं आहे. दोघांचीहि आठवण ठेवीन ! "

रायाच्या लग्न समारंभात दुसरी एक नमूद करण्यासारखी गोष्ट घडली ती ही कीं, लग्नाच्या दुसऱ्या दिवशीं मुन्सफसाहेबाच्या घरीं म्हणजे रायाच्या श्वशूरगृहीं चोरी झाली. लग्नघरच ते ! त्यातून वधूपक्ष असल्यामुळं घरांत सर्वत्र गडबड होती. दुपारीं बायका आपापल्या उद्योगांत होत्या. त्यांच्या कामाचा तपशील कोठवर द्यावयाचा ? पुरुषमंडळीं–कोणी जेवून वामकुक्षी करीत होते. तर कोणी पान खात गप्पागोष्टी करीत होते आणि मुलें सर्वत्र खेळत होतीं. लग्नघरीं एकत्र जमलेल्या मुलामुलींच्या खेळाला अशा प्रसगीं मोठा ऊत येत असतो. दुपारीं अडीच तीन वाजण्याचा सुमार झाला होता. अशा वेळीं वऱ्हाडी मडळींतील एक बाई मुले खेळत होतीं, तेथे जाऊन आपल्या ' बाबू ' ची चौकशी करीत होती. मुलांत आपला मुलगा नाहीं हें पाहून तिनं वर खालीं सर्व घर धुंडाळलं, परंतु बाबूचा काहीं पत्ता लागेना. तेव्हां ती बाई घाबरली, ते पाहून इतर बायका तिला धीर देत–' अशा घाबरता का ? असेल त्या मुलातच कुठं तरी खेळत ! मुलाची जात एका ठिकाणीं थोडीच खेळणार आहे ! ' असें म्हणून तिची समजूत करीत होत्या. परंतु आईच ती, तिला कोठून चैन पडणार ! तिचा सारखा शोध सुरूच होता. शेवटीं अमुक अमुक बाईचं मूल हरवलं, ही गोष्ट पुरुष मंडळींच्या कानीं गेली. तेव्हा मात्र खऱ्या चौकशीला सुरवात झाली. हरवलेल्या मुलाच वय साडेतीन वर्षांच असून त्याच्या अंगावर शेंदीडशें रुपयाचे दागिने होते. मुलगा चपळ आणि बोबडा बोलत असल्यामुळं तो सर्वांच्या परिचयाचा झाला होता. काहीं मंडळीं मुलाच्या शोधाकरता बाहेर पडली तों अंगणाच्या बाहेर रस्त्यावर एका बाजूला तो मुलगा आपल्याच नादात काहीं खात उभा असलेला त्याच्या दृष्टीस पडला. लगेच त्याला मंडळींनीं उचलून घरांत

आणलें. त्याला पाहून आईला आनंद झाला! परंतु त्याबरोबरच मुलाच्या अंगावर दागिने नाहींत हे दृष्टीस पडताच तिला दुःख झालं. 'तूं कुठं गेला होतास?–तुला कोणी नेलं होतं?–तुझी चाची कुठं आहे?–तुला खाऊ कुणीं दिला?' असे अनेकानीं त्या मुलाला अनेक प्रश्न विचारले. परंतु तें मूल काय उत्तर देणार?—'माज्या गो गो गोल गोल!' असें आपल्या बोबड्या बोलांत तो मुलगा प्रत्येकाला एकच उत्तर देई. शेवटीं मुलाची गोष्ट मुन्सफ-साहेबांच्या कानावर गेली. कोणीतरी भामट्यानं मुलाला पळवून नेऊन त्याला खाऊ दिला आणि त्याच्या अंगावरील सर्व दागिने काढून घेतल्यावर त्याला घराजवळ आणून सोडून दिलं असावं, असा प्रत्येकानं तर्क केला. अर्थातच तो भामटा मनुष्य आतां आपण चौकशी करून हातीं लागणें शक्य नाहीं. तेव्हां पोलिसांत वर्दी द्यावी, असें मुन्सफसाहेबांनीं ठरविलें, आणि त्याप्रमाणें फौजदाराला बोलावून आणण्यासाठीं ते मामासाहेबांना फरासखान्यावर पाठवू लागले. तें पाहून अण्णासाहेब म्हणाले, "फरासखान्यांत पाठवून फौजदाराला बोलावण्यापेक्षां ह्याह्याच्या घरीं मनुष्य पाठवून जांवईबुवांना बोलावून आणाल तर ते सहज चोराला हुडकून काढतील!"

"वाः अण्णासाहेब! आमचे जांवईबुवा म्हणजे तुम्ही—"

"तसं नव्हे मुन्सफसाहेब!" अण्णासाहेब मध्येंच म्हणाले. "हें पोलीसचं काम त्यांना सांगून बाळासाहेबांचा अपमान करावा, अशी माझी मुळीच इच्छा नाहीं, किंवा हें काम सांगून त्यांच्या बुद्धिमत्तेची परीक्षा पहावी असाहि माझा उद्देश नाहीं. केवळ प्रसंगानं ही गोष्ट घडून आली, तेव्हां प्रथम ही गोष्ट त्यांच्या कानावर घालावी आणि मग त्यांच्याच सल्ल्यानं पुढं जे काय करावयाचं तें ठरवावं!"

"पण अशाकरतां बाळासाहेबांना इथं बोलावून आणणं चांगलं दिसेल का?" मुन्सफसाहेबांनीं विचारलं. "त्यांचे बंधु आणि इतर मंडळी काय म्हणतील!"

"काय म्हणणार!" अण्णासाहेब म्हणाले. "एखादं कोर्टाचं काम असलं कीं कुळं वकिलाकडे धांवतात ना? एखाद्या रोग्याला घेऊन मंडळी डॉक्टरकडे जातात ना! त्याचप्रमाणं ही गोष्ट! तुमचे बाळासाहेब ह्या कामाचे दर्दी आहेत--जाणते आहेत, ह्या वेळीं त्यांचाच सल्ला घेणं अवश्य आहे, असं मी म्हणतों."

मुन्सफसाहेबाना ती गोष्ट पटली, आणि त्यानीं जावईबुवांना बोलावून आणण्याकरतां मामासाहेबाना पाठविलं. त्यावेळीं राया आपल्या मंडळीबरोबर बोलत बसला होता. आधल्या दिवशीं लग्नाच्या अक्षता पडल्यापासून त्याच्या वृत्तींत पडलेला फरक मंडळींच्या लक्षांत आला होता आणि त्या विषयावरच ती मंडळी आता बोलत होती.

" तूं कांहीं म्हण राया पण कालपासून तुझी चर्या गंभीर झाली आहे. इतकच नव्हे तर तुझ्या वर्तनातहि मोठा गंभीरपणा आला आहे ! " राजा बोलत होता.

" एखाद्या पोक्त, अनुभवी वृद्धाचार्यासारखा तू सकाळपासून वागत आहेस ! " बापू म्हणाला, " जणूं काय लग्न झाल्याबरोबर आपण कोणी मोठे शिष्ट बनलों असं वाटून आमच्यात पोरांत काय बसायचं—उठायचं असंच तुला वाटत असलं पाहिजे. "

" बापू, अगदीं चुकलास ! " राया म्हणाला. " काल माझं लग्न झालं आणि त्याबरोबर माझ्या वृत्तींत फरक पडला, ही गोष्ट मी प्राजलपण कबूल करतों. परंतु लग्न होतांच आपण कोणीतरी शिष्ट झालो आणि तुमच्यात बसण्या उठण्यांत कमीपणा आहे, असा विचार चुकूनहि माझ्या मनात आला नाहीं ! "

" मग सकाळपासून तुझं हे असं वर्तन का ? " बापून विचारलं. " लग्न होतांच वृत्तींत फरक पडला असं म्हणतोस, तो फरक कोणता ? आपल्या मडळींत तुझेच लग्न हें प्रथम होत आहे, आणि आपल्या रायक्लबचा तू ' चीफ ' असल्यामुळ तुझं सर्वांच्या अगोदर झालं, हेंहि ठीकच आहे. तेव्हा तुला ह्या लग्नाचा काय अनुभव आला तो आम्हाला तरी सांग ! लग्न होताच अंगीं गंभीरपणा येणं ही गोष्ट सर्वसाधारण आहे कीं काय ?

" ते मी काय सांगूं ? " राया म्हणाला. " परंतु काल माझ्यावर तुम्ही सर्वांनीं अक्षता टाकताच आणि उपाध्यानीं गंभीर शब्दात ' सावधान ' शब्द उच्चारतांच माझी वृत्ति गंभीर झाली इतकी गोष्ट मात्र खरी ! "

" इतक्यावरच गोष्ट थाबली हे आम्ही भाग्य समजतो. " राजा म्हणाला. " वृत्ति गंभीर होण्याऐवजीं ' सावधान ' शब्दाबरोबर तूं जर का रामदास-स्वामीसारखा पळ काढतास तर मात्र आम्हांवर मोठा प्रसंग येता खरा ! "

" राजा, ही गोष्ट थट्टेची नव्हे ! " राया म्हणाला. " तुम्हालाहि हा

प्रसग अनुभवणं आहे. काल लग्नामुळ माझी वृत्ति गंभीर बनली त्याचं कारण माझ्यावर एक मोठी जबाबदारी येऊन पडली हेंच होय !"

"त्यात कसली आली आहे जबाबदारी ?" बापूनं विचारलं बिंदूसारखी मनपसंत बायको मिळाली म्हणून तू खुषींत आणि आनंदांत असावयास पाहिजे !"

"होय मी आनंदांत आहें—खुषींत आहे ! परतु त्या आनदाबरोबर मला माझ्यावर पडलेल्या जबाबदारीची जाणीव झाली आहे, ही गोष्ट मात्र तुम्ही विसरूं नका. आणि अशी जाणीव तुम्हाला तुमच्या लग्नाबरोबर व्हावी अशीं माझी इच्छा आहे !"

"होईल ! आमचं लग्न झाल म्हणजे आम्हालाहि अशी जाणीव होईल !"

"बापू चुकतोस !" राया म्हणाला. "अशी जाणींव जर प्रत्येकाला त्याच्या लग्नाच्या वेळीं होती तर खरोखरीच आपला हा हिंदुस्थानदेश आज आहे ह्या स्थितींत कधींच दिसला नसता !"

"म्हणजे ?—ह्या लग्नाचा आणि हिंदुस्थानचा काय बुवा सबंध ?" आश्चर्यानं बापूनं विचारलं.

"संबंध फार निकटचा आहे. आजपर्यंत मी सडा होतों. मला कोणत्याहि प्रकारची काळजी नव्हती परंतु ह्या लग्नाबरोबरच माझ्यावर मोठी जबाबदारी पडली. मनपसत बायको मिळाली खरी पण तिच्याबरोबर माझ्या मागं संसार लागला. लग्न होण्याबरोबरच मी समाजाचा एक घटक बनलों. आणि समाज हा देशाचा घटक असल्यामुळं पर्यायानं माझ्या संसाराची व्यापकता देशापर्यंत जाऊन भिडली आहे. आता तुम्हीच सागा लग्नामुळ ह्या थोर जबाबदारीची जाणीव होतांच माझी वृत्ति गंभीर बनली म्हणून तुम्ही आता आश्चर्य कराल का ?

अशा रीतीनं मंडळी लग्नाच्या गंभीर विषयावर बोलत बसली असतां रायाला बोलाविण्याकरितां मामासाहेब आले. आपणास मुद्दाम मुन्सफसाहेबांनीं बोलाविलं आहे, हें ऐकून मामासाहेबाजवळ रायानं चौकशी केली. तेव्हां त्यानीं थोडक्यांत सर्व प्रकार सागितला. क्षणभर विचार करून राया म्हणाला, "एकूण आमची परीक्षा पाहण्याकरतां मुन्सफसाहेबांनीं आम्हांला बोलावलं आहे म्हणायचं !—राजा, आणि तूं गोप्या, तुम्ही दोघं

माझ्या स्वतंत्र उद्योगात मला मदत करणार आहात, तेव्हां चला आता माझ्याबरोबर !

" आणि आम्ही नको का येऊं ! बापूनें विचारल.

" तुझं काय लेका काम आहे तिथं !—रायाच्या लग्नाचे लाडू इथंच बसून तुम्ही खा. हे लाडू खाण्याचं काम नाहीं, डोक्याच काम आहे समजलास ? "

मामासाहेबाबरोबर ते तिघेजण मुन्फसाहेबांच्या घरीं आले. काल लग्न झाल नाहीं, तोंच आपण जावईबुवांना असें काम सागावयाचं त्याबद्दल मुन्फसाहेबांना चमत्कारिक वाटत होतें. परतु अण्णासाहेबांच्या आग्रहामुळे त्याना काहींच बोलता येईना. ते स्वतः मुन्सफ असल्यामुळें फौजदाराला बोलावयास पाठवून ' ह्या चोरीचा ताबडतोब तलास लावा ' असा अधिकारानें त्यांना हुकूम फर्मावितां आला असता. परंतु आमच्या कथानायकाजवळ आता तोंड उघडण्यासहि याना संकोच वाटूं लागला. मुन्सफसाहेबांच्या मनाची ही चमत्कारिक परिस्थिति अणासाहेबानीं जाणली, आणि त्यानी मुन्सफसाहेबांचं म्हणणं काय होतं आणि त्यावर आपण कोणता युक्तिवाद केला तो सर्व रायाला सागितला. तेव्हां राया क्षणभर विचार करून म्हणाला, " मी ' राया धी डिटेक्टिव्ह ' म्हणून उपक्रम करावा, अशी अण्णासाहेबाची आग्रहाची सूचना आहे, त्याप्रमाणें त्या उपक्रमाचा हा ' श्रीगणेशा ' आहे, असं मी समजतो. मी ही केस हातीं घेतों. त्यांतून जर तुम्हाला ही केस पोलीसाकडे द्यावयाची असेल तर मात्र माझं काहींच म्हणणं नाहीं ! "

" बाळासाहेब, हा रागावण्याचा किंवा रुसण्याचा प्रश्न नाहीं—" अण्णासाहेब म्हणाले, " केवळ ही तुमच्या लाईनमधील गोष्ट असल्यावरून तुमच मत घ्यावं, म्हणून मुद्दाम बोलावल ! "

" ते मी समजलों आणि म्हणूनच मी सागतों कीं, ही केस जर आपण मजकडे सोंपविली तर उद्या ह्याच वेळीं चोर आणि त्यानं चोरी केलेला ऐवज मी इथं हजर करीन ! "

" काय म्हणता ? " आश्चर्यानं अण्णासाहेब म्हणाले. " चोर आणि चोरीचा ऐवज उद्या ह्याचवेळीं इथं हजर कराल ?—पहा मुन्सफसाहेब, मी सुचविल तें खरं ना ! "

परंतु मुन्सफसाहेबांनीं काहीं उत्तर दिलं नाहीं. ते आपल्या जांवईबुवाकडे कौतुकानं पाहात राहिले. क्षणभरान अण्णासाहेबानीं विचारलें, " पण

बाळासाहेब, तुम्ही ही चोरी आणि तो चोर कसा काय पकडणार तें आम्हाला तरी कळूं द्या ! मला तर हें मोठं गुढच दिसत आहे. मुलाच्या अंगावरील दागीने काढून घेणारा चोर असा सहजासहजीं तुमच्या हातीं लागेल असें नाहीं मला वाटत ! मग या उपर तुम्ही आपल्या बुद्धिचातुर्यानं काहीं तोड काढली तर मात्र काहीं सागतां येत नाहीं."

"मी हा चोर कसा पकडणार, ह्या गोष्टीचं रहस्य जर मी तुम्हांला पूर्वीच सागितल, तर त्यात काहींच स्वारस्य वाटणार नाहीं !" राया म्हणाला, "इतकंच काय पण मी इथ—आपल्या जवळ बसून त्या चोराला मुद्देमाला-सह आपल्या पुढें आणून उभा करतों. मग त्याला जी काय शिक्षा करावयाची ती तुम्ही करा. वाटेल तर त्यावेळीं पोलीस अधिकारीहि इथं बोलवा. कारण माझ्या अधिकारांतील शिक्षा मी त्या चोराला करीनच पण अशा गुन्ह्याला सरकारी रित्या होणारी शिक्षा योग्य मार्गानच झालेली बरी !"

मंडळींना मोठे गूढ पडलें ! 'मीं इथ बसून चोर आणि चोराचा ऐवज हजर करितों,' असें रायानें खात्रीपूर्वक सांगताच मंडळींत बसून बाहेर असणाऱ्या चोराला चोरीसह कसा पकडणार हेंच त्यांना कळेना. परंतु रायाने आपण पुढें काय करणार याबद्दल काहींच खुलासा न करतां बाबूला— ज्या मुलाच्या अंगावरून चोरानें दागिने नेले होते, त्या मुलाला आपणाजवळ बोलाविलें आणि संध्याकाळपर्यंत त्या मुलाबरोबरच तो खेळत राहिला. आपल्या मुलाचे दागिने गेले म्हणून त्या आईला दुःख झालं होतं. तरीहि आपल्या मुलाला घेऊन जावईबुवा खेळतात म्हणून त्या आईला आनंदच होत होता. जांवईबुवांच्या ह्या कृतीचं इतरानाहि कौतुकच वाटलें. मुलाबरोबर हा खेळ चालला असताना पुढें काय करावयाचं त्याविषयीं रायानें राजा आणि गोप्या यांना सर्व सूचना दिल्या. संध्याकाळच्या सुमारास तो एकटाच बाबूला घेऊन अंगणांत आला. तें लग्नघर असल्यामुळं अंगणाच्या दरवाजावर काहीं भिकारी अन्न मिळावं म्हणून अद्यापि धरण धरूनच बसले होते. रायानें एकदां त्या सर्वांकडे न्याहाळून पाहिलें. भिकाऱ्यांत संशय घेण्यासारखा कोणी मनुष्य त्याला दिसला नाहीं. नाहीं म्हणायला एक मनुष्य रस्त्यावर एका बाजूला उभा होता. त्याच्या पेहरावरून कोणतीहि शंका घेण्यासारखी नव्हती. परतु किंचित्काल टेहेळणी केल्यावर त्या मनुष्याचा रायाला संशय येऊं लागला. तेव्हा मनाची खात्री करून घेण्यासाठीं तो बाबूला घेऊन बाहेर येऊं लागला. तें पाहून

तो मनुष्य तेथून निसटला. कोपऱ्यांत गोप्या उभा होताच. रायानें खूण करतांच गोप्या त्या मनुष्याच्या मागें टेहेळणी करीत निघाला.

दिवे लागण्याच्या सुमारास गोप्या परत बिऱ्हाडीं आला, आणि केलेल्या कामाचा त्यानं तपशील दिला. ' आपण त्या मनुष्याच्या मागे बराच वेळ फिरल्यावर तो मनुष्य शेवटीं शुक्रवार पेठेंत एका माडीवर चढला. बऱ्याच वेळानं ती माडी एका नायकिणीची आहे असें आपल्या दृष्टीस पडलें. ' असे गोप्यानें सांगितलें. तेव्हां रायाचा संशय दृढ झाला. नंतर त्यानें बाप्याला आणि चाऱ्याला कांहीं सूचना करून पुढें काय करायचें तें सागितल. दुसऱ्या दिवशीं सकाळींच तो आपल्या श्वशूरगृहीं आला. येतांना त्यानें आपला हंटर बरोबर घेतला होता.

" कां बाळासाहेब, लागला का कांहीं चोराचा तपास ? " अण्णासाहेबानीं विचारलं.

" छे ! तपास करून चोर पकडण्याचें काम पोलिसाचं आहे ! " राया म्हणाला. " आणि इथंच बसून तपास न करता चोर चोरीसह आणणं हे काम माझं आहे ! "

" छे बुवा ! तुम्ही चोरी कशी पकडणार हे कांहींच लक्षात येत नाहीं. एखादं कर्णपिशाच तर तुम्हाला साध्य नाहीं ना ? "

" होय—मला कर्णपिशाचच साध्य आहे. " असें म्हणून रायानें आपल्या हातांतील चाबूक दाखवीत पुढें म्हटलें, " त्या कर्णपिशाचाला बोलतं करण्याचं हें साधन पाहा ! " असें म्हणून हांसण्यावर त्यानें ती गोष्ट घालविली. दुपारीं बाबूच्या अंगावर आदल्या दिवसाप्रमाणेंच एक दोन ठळक दागिने घालण्यास सांगितलें. परंतु ही गोष्ट त्यानें बिंदू आणि त्या मुलाची आई ह्या दोघींशिवाय कोणाच्याहि लक्षांत येऊं दिली नाहीं. नंतर राजा बाहेर जाऊं लागला. ते पाहून राया बाबूला म्हणाला, " जा बाबू, ते दादा तुला गो गों देतात जा ते पाहा चालले—जा, नाहींतर दादा जातील ! "

बाबू धांवत धांवत अंगणांत गेला. परंतु राजा त्याला चुकवून केव्हाच निसटला. त्याच वेळीं रस्त्यावर दुसरा एक मनुष्य टेहेळणी करीत होता. भिकाऱ्यांचीहि दरवाजावर दाटी झाली होती. अंगणांत घरांतील मंडळीपैकीं दुसरे कोणी नाहीं, असें पाहून तो मनुष्य हळूच पुढें झाला. आणि ' तुला

खाऊ पाहिजे ना ! काल तुला मी खाऊ दिला ना ? ' असें म्हणत त्यानें बाबूला उचललें. गोप्या त्याच्या टेहळणीवर होताच. तो मनुष्य रस्त्यावर येऊन उभा राहिला आहे हे पूर्वी सांगितल्यावरून रायाने बाबूला राजाच्या मागे खाऊच्या निमित्तानें पाठविल होत. थोड्या वेळानें रायाला गोप्यानें रस्त्यावरून वाजविलेली शिटी ऐकू आली तेव्हा तो दिवाणखान्यात येऊन म्हणाला, " अण्णासाहेब, चोर आणि चोरीचा माल आता इतक्यांत अर्ध्या तासाच्या आत इथं हजर होतील. तेव्हा तुम्ही फौजदाराना बोलावण्याची व्यवस्था करा.—माझ्या सर्व कृतीचा तुम्हाला चमत्कार वाटत आहे, परतु चमत्कार वाटण्यासारख त्यांत काहींच नाहीं ! "

" चोर इथ हजर होईल म्हणतां, परतु मकोळपासून तुम्ही इथन हल्ला देखील नाहीं ! चोर आपल्या पायानीं इथं चालत येईल म्हणता, याबद्दल आम्हाला चमत्कार का वाटूं नये ? " मुन्सफ साहेब म्हणाले. परतु त्याचा आपल्या जावयाच्या बुद्धीचातुर्यावर विश्वास होता. त्यानीं लगेच एक पत्र लिहिलें आणि ते फरासखान्यात पाठविलें. थोड्या वेळानें त्यांच्या बोलण्याप्रमाणे फौजदार राणे तेथें आले.

इकडे बाबूला घेऊन तो मनुष्य निघाला. तो सरळ शुक्रवार पेठेंत गोप्यान सांगितलेल्या माडीवर गेला. पधरा मिनिटांनीं पुनः तो बाबूला घेऊन बाहेर आला. त्यावेळीं त्याच्या अगावर दागिने नव्हते. मात्र बाबूच्या हातांत काहीं खाऊ होता आणि तो खाऊ खाण्यात दंग होता. त्याला खेळवीत खेळवीत त्या मनुष्यान घरापर्यंत आणलें आणि अंगणाच्या दरवाजाजवळ त्याला सोडून ' जा हं बाबू ! उद्या मी तुला दुसरा खाऊ देईन अं ! ' अस म्हणून तो मनुष्य मागें वळला तोच बाजूच्या बोळात दबा धरून बसलेले राजा, बाप्पा आणि चाच्या एकदम पुढें होऊन त्या तिघानीहि त्याला पकडल. सुटून जाण्याकरितां त्यानं धडपड केली. परंतु तिघांनींहि त्याला मुष्टीप्रहार सुरू करताच त्याची धडपड बंद झाली. ती त्यांची मारामारी पाहून बाबू रडूं लागला. तेव्हां त्याला उचलून राजानें घरांत आणल. चाच्या आणि बाप्पा ह्या दोघानीं त्या मनुष्याला धक्या मारीत माडीवर आणताच राया पुढें झाला. आणि त्यानें त्या मनुष्यावर आपल्या हंटरचा प्रयोग सुरू केला. पहिल्या सपाट्यांत दहाबारा तडाखे दिल्यावर तो म्हणाला, " फौजदारसाहेब, हा चोर तुमच्यापुढ उभा केला आहे. ह्यानं मुलाच्या अंगावरून काल आणि आज काढलेले

दागिने मी इथंच आणणार होतों. परंतु ते दागिने ह्या हलकट मनुष्याच्या रडीजवळ आहेत तेव्हां अशा हलकट बाईला इथं आणणं चागलं नाहीं. म्हणून ते दागिने आणण्याचं काम तुम्ही करा. आणि ह्या चोराला तुमच्या कायद्याच्या दृष्टीनं जी काय शिक्षा करायची ती करा !—अण्णासाहेब, माझं काम आटोपलं ! मी म्हटल्याप्रमाण ही चोरी चोरासह पकडली हे तुम्ही आतां कबूल कराल ना ? ”

“ आहे -कबूल आहे ! ” अण्णासाहेब आमच्या क्लब नायकाची पाठ थोपटीत म्हणाले. “बाळासाहेब, तुमच बुद्धीचातुर्य खरोखरीच अवर्णनीय आहे. ह्यापुढें ‘ राया धी डिक्टेक्टिव्ह ’ म्हणून सी. आय्. डी. च खाजगी खातं तुम्ही सुरू कराच ! ”

एका तासाच्या आत फौजदारानें चोरीला गेलेले सर्व दागिने आणून दिले, आणि पुढे रीतसर त्या चोरावर फौजदारी होऊन त्याला सहा महिन्यांची सक्त मजुरीची शिक्षा झाली. असो. त्या रात्रीं सर्व मंडळी एकत्र बसून गोष्टी बोलत असतांना अण्णासाहेब म्हणाले, “ बाळासाहेब, मी म्हणतों त्याप्रमाणें खाजगी सी. आय्. डी. खात सुरू करण्यास तुमच क्लबच बंधन आड येत म्हणतां ? तुमच्या क्लबच्या ठरावाप्रमाणें प्रत्येकाला बारा बारा हजार रुपये मिळे-पर्यंत ह्या तुमच्या रायक्लबचं अस्तित्व राहणार असंच ना ? मग आता किती हजार रुपये तुम्हास मिळावयास पाहिजेत म्हणजे तुमच्या रायक्लबची समाप्ति होईल ? ”

“ आमच्या रायक्लबची समाप्ति व्हावयाचीच नाहीं ! जरी ठरल्याप्रमाण प्रत्येकाच्या वांटणीला बारा हजार रुपये आले आणि आम्ही बाराहि जण स्वतंत्र झालों, तरी पुढें प्रत्येक विजयादशमीला आम्ही सर्वजण एकत्र जमून आमच्या रायक्लबचा वार्षिक उत्सव साजरा करणार ! ” राया म्हणाला.

“ तो उत्सव तुम्ही आनंदानें साजरा करा, त्याविषयीं माझं मुळींच म्हणण नाहीं ! परंतु मी असं म्हणतों कीं, तुमची ठराविक रक्कम पुरी होण्यास किती हजार कमी आहेत ? ”

“ ह्या चार साडेचार वर्षांत आमच्या क्लबनें खर्चवेंच जाऊन जवळजवळ एक लक्ष दहा हजार रुपये मिळविले. आतां आणखी पसतीस हजार रुपये मिळवले कीं आम्ही आपापल्या मताप्रमाणें स्वतंत्र उद्योग करण्यास मोकळे होऊं ! ” राया म्हणाला.

" धन्य आहे तुमची ! " स्तंभित होऊन अण्णासाहेब म्हणाले. ह्या चार साडेचार वर्षांच्या अवधींत तुम्ही आपल्या बुद्धिबलावर ही लाखाच्यावर रक्कम मिळविली, हें ऐकून माझी तर मति अगदीं गुंग झाली. त्या मानानं विचार केला असता हे राहिलेले पसतीस हजार रुपये तुम्ही खात्रीनं हां हां म्हणता मिळवू शकाल !—मुन्सफसाहेब तुम्हाला नाहीं का असं वाटतं ? "

" वाटत का नाहीं ! " मुन्सफसाहेब म्हणाले, " बाळासाहेब आमचे जावई म्हणून त्यांची मी प्रशंसा करतो, अशातला भाग नव्हे ! आजच्या चोरीची हकीकत तुम्हाला माहितच आहे. तेव्हां आमच्या बाळासाहेबांच्या बुद्धि-चातुर्याविषयीं मी जास्त काय सागूं ? "

" बाळासाहेब, तुम्हाला पस्तीस हजार रुपयेच मिळवावयाचे आहेत ना आतां ? " अण्णासाहेब एकदम म्हणाले, " मी एक तुम्हाला मार्ग सुचवितो. पण पैसे मिळविण्याकरिता बुद्धिचातुर्य कस खर्च करायचं ते तुमच तुम्ही पहा ! आमच्या वऱ्हाडात कापसाच दाडगं पीक आहे, हे तुम्हाला माहितच आहे. तेथें अमेरिकन, इंग्लंड, जपान इत्यादि परराष्ट्रातील कंपन्याचे एजंट्स आहेत. दर वर्षाला लाखों रुपयाचा कापूस खरेदी करून ह्या कंपन्या कोट्यावधी रुपये मिळवितात. आमच्या एकट्या अमरावतीस चार महिने हा कापसाचा व्यापार चालतो. रोज हजारों कापसाच्या गासड्या बाजारांत येत असतात. आणि रोजच्या चढउतर होणाऱ्या दराप्रमाणें हे एजट लोक कापसाच्या गासड्या खरेदी करतात. माझी खात्री आहे, ह्या गोष्टींत जर तुम्ही मन घालाल तर पस्तीस हजार रुपये आठ दिवसात देखील तुम्हाला मिळतील ! "

राया विचार करीत राहिला. त्याच्या डोक्यात विचाराचें चक्र सुरूं झालें. वकिलसाहेबांच्या सांगण्याप्रमाणें आपण हा कापसाचा सट्टा केला, तर कदाचित् आपलें इच्छित ह्या एका व्यवहारांतच पूर्ण होईल, असे त्याला वाटूं लागलें. तो विचारात आहे, असें पाहून अण्णासाहेबांनीं विचारलें, " मग काय विचार होतो आहे ? "

" आपण सागतां तसा कापसाचा सट्टा करावा असं वाटतं ! " राया हासत म्हणाला, " पण ह्या बाबतींत आपण मला जास्त कांहीं माहिती देऊं शकाल ना ?—उमरावतीला परदेशाच्या कंपन्यांचे एजन्टस् आहेत म्हणतां, त्यांचीं नावं तुम्हाला माहिती आहेत ? "

" एकाच नाव वेडेकर आहे, " अण्णासाहेब म्हणाले. " स्टेशनजवळ कापूस दाबण्याचा प्रेस आहे, त्या प्रेसच्या मालकाच नाव माधव घरमसी आहे. आता कापूस बाजारात येण्यास सुरवात झाली. चार महिने हा व्यापार जोरात चालेल. ह्या ' रॅली ब्रदर्स-वॉलकार्ट ' वगैरे इंग्रजी कंपन्याजवळ मुबलक पैसा असल्यामुळ त्याना ही कापसाची खरेदी करण्यात मनस्वी फायदा होतो. रोखीच्या धंद्यात फायदा हा असायचाच ! ह्या कंपन्यानीं शेतकऱ्यावर विलक्षण छाप बसविली आहे. अमूक एकर जमीनींत अमुक कापूस उत्पन्न होतो, त्याचा अंदाज करून ह्या कंपन्या आगाऊच रक्कम देतात. अशा रीतीनें ह्या कंपन्यानीं बहुतेक सर्व शेतकरी बांधूनच टाकलेले असतात. परतु ह्या वर्षी मात्र आमच्या वऱ्हाडात बरीच चळवळ उडाली आहे. ह्या इंग्लिश कंपन्याविषयीं शेतकरी वर्ग जरा साशंक झाला आहे ! "

" कारण ? " रायान विचारल.

" मुंबईत ग्याडम नावाची एक मोठी कंपनी होती. ती कंपनी लाखो रुपयाच्या गासड्या खरेदी करीत असे. पण गेल्या वर्षी ह्या कंपनीनं दिवाळ काढलं. त्यामुळें ह्या इंग्रजी कंपन्याबरोबर व्यवहार करण्यास ह्या वर्षी आमच्या वऱ्हाडांतील शेतकऱ्याचीं मन कचरलीं आहेत ! "

ती सर्व रात्र रायानें विचार करण्यात घालविली. केवळ पैशाचा जोर असल्यामुळें ह्या कंपन्या कापसाच्या धंद्यांत अलोट पैसा मिळवितात, यांत त्यांचें बुद्धिकौशल्य काहींच नाहीं, ही गोष्ट रायाच्या लक्षात आली. परतु आपण जर पैसा आणि बुद्धि ह्या दोन भांडवलावर ह्या धंद्यात हात घातला तर खात्रीनें आपणहि पैसा मिळवू, अशी त्याची ठाम समजूत झाली. त्यानं दुसऱ्या दिवशीं उठताच आपल्या वडील बंधूंना विचारलें, " दादासाहेब, आपल्या पेढीवर माझे आता दहा हजार रुपये आहेत, ह्याशिवाय चार महिन्यांच्या मुदतीन आपण मला आणखी पचवीस हजार रुपये व्याजीं देऊ शकाल काय ? "

" हो–न द्यायला काय झाल ? " दादासाहेब म्हणाले, " पण एवढी रक्कम घेऊन तूं काय करणार ? "

" कापसाचा व्यापार ! " रायानें आपला सर्व विचार दादासाहेबाना सांगितला. आपला भाऊ भयंकर धाडस करतो, हें जरी त्यांना स्पष्ट दिसत तरी त्याला ह्या कामांत अखेर यशच येईल, अशी त्याना खात्री होती. त्यानीं

रक्कम देतों, असें कबूल करताच राया तसाच श्वशुरगृहीं जाऊन अण्णासाहेबांना भेटला आणि त्याना आपला सर्व विचार स्पष्ट रीतीनें सांगितला. तो म्हणाला, "अण्णासाहेब माझे दहा हजार पेढीवर रोख आहेत, दादासाहेब मला पंचवीस हजार व्याजीं देत आहेत. शिवाय आमच्या क्लबचे तेरा हजार रुपये मजजवळ शिल्लक आहेत. शिवाय आमच्या मंडळींतून ह्या दोन दिवसात दहा बारा हजार सहज उभे राहूं शकतील. एकंदरीनें साठ हजारापर्यंत आमच्याजवळ आज भांडवल तयार आहे. मी आतां मुंबईस जाऊन ह्या धंद्याची थोडी माहिती मिळवून तात्काळ परत येतों. मग आपणाबरोबरच वऱ्हाडात जाऊं!"

"तुमची इतकी जय्यत तयारी असल्यावर मग काय पाहिजे? मी तुम्हाला अमरावती, अकोला, खामगाव, सावनेर तसच खानदेशांत एक दोन ठिकाणीं शिफारस पत्र देतों.'

रायाला दैव अनुकूल होतें. गतवर्षी बुडालेल्या ग्याडम कंपनींतील एक दलाल त्याला सुदैवानें मुंबईत भेटला. त्यानें रायाला पाहिजे होती ती सर्व माहिती दिली. मुंबईच्या बाजरात कापसाचे भाव एका दिवसात कसे चढ उतर होतात, व्यापाऱ्याना खामगी रीतीनें हे कमी होणारे अधिक दर कसे आगाऊ कळतात, आणि हे व्यापारी गावोगावीं असलेल्या आपल्या एजन्टाना 'कोडवर्डस्'—धंद्याच्या सांकेतिक शब्दानें ते भाव कसे कळवितात, ही सर्व माहिती घेऊन राया पुण्यास आला. आणि त्याच रात्रीं ती सर्व मंडळी अण्णासाहेबांबरोबर अमरावतीस जाण्याकरितां निघाली. दादासाहेबांच्या पेढीवरून रक्कम आणण्याकरिता बाप्याला मागें ठेऊन बाकी सर्व रायक्लब अमरावतीस आला. अण्णासाहेबानीं त्यांना फारच चांगली मदत केली. 'इंग्रजी कंपन्या दिवाळीं काढतात, म्हणून त्याच्यावर विश्वास टेऊ नका,' अशी दवंडी पिटण्याची जरूरीच पडली नाहीं. एका कंपनीनें दिवाळें काढलें असल्यामुळें अमरावती, अकोला वगैरे चारपाच ठिकाणच्या व्यापाऱ्यानीं गेल्या दहा दिवसांत कापसाची मुळींच विक्री केली नाहीं. इतर कंपन्याच्या एजन्टानीं ही कापसाच्या बाजाराची वस्तुस्थिति मुंबईत आपापल्या हेड ऑफिसात कळविली. तेव्हा त्या कंपन्यानींहि ओढूनच धरलें. कारण त्याना पूर्णपणें माहिती होतें कीं, आपण गप्प बसतांच हीच चढेल मंडळी आपण होऊन मुठींत नाक धरून येतील. तेव्हा मवलतीच्या दरानें आपणास वाटेल

तितका कापूस खरेदी करता येईल. परंतु हे त्याचें धोरण चुकलें. रायक्लब तेथे जाताच वऱ्हाडातील कापसाच्या विक्रीची परिस्थिति काय आहे, हे रायाच्या लक्षात आलं. दिवसेंदिवस कापसाचा भाव उतरत चालला हें पाहून कापसाचे मळेवाले गडबडले. आपण करावयास गेलों एक आणि परिणाम भलताच होऊं पहात आहे, असे त्याना वाटलें. कंपन्याचे एजन्टसुद्धि स्तब्धच होते. त्यानीं व्यापाऱ्याची मनःस्थिति किती नाजुक झाली आहे, त्याबद्दल मुंबईतील आपापल्या कंपन्याना लिहून कळविलें. परंतु त्या कंपन्यानीं 'कापसाचा भाव अजून उतरण्याचा संभव आहे, करिता स्वस्थ असावें. कोणीहि मळेकऱ्याबरोबर कापसाच्या खरेदीबद्दल बोलणें करूं नये. पुढे ते चांगले टेकीस आल्यावर भाव पाडून कापूस खरेदी करतां येईल,' असें आपल्या एजंटाना कळविलें. रायक्लब तेथे गेला, त्यावेळीं कापसाचा भाव साडेतीनशें वरून उतरत उतरत दोनशे साठावर आला होता. ते पाहून रायानें राजाला अकोल्यास, बापूला अमळनेर आणि गजाभाऊला सावनेर येथे अण्णासाहेबांचीं शिफारसपत्रें घेऊन पाठविलें. प्रत्येकाजवळ त्यानें दहा दहा हजार रुपये दिले होते. ह्या चौघांनीं ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं दोनशे साठाच्या भावाने त्या त्या बाजरांत आलेला सर्व कापूस एकदम खरेदी केला. अमरावतीला रायानें शंभर गांसड्या, अकोल्यास राजानें पन्नास अमळनेरास बापूनें पन्नास आणि सावनेर येथे गजाभाऊनें पन्नास अशा अडीचशें गांसड्या दोनशें साठाच्या भावानें त्यानी एका दिवसात खरेदी केल्या. त्या सर्वांची किंमत पासष्ट हजार रुपये झाली. सर्वांनी रुपये रोख मोजले. सर्व कापसाचे व्यापारी आनंदी झाले. तेव्हा राया आणि त्याच्या मंडळींनीं—"आम्हीं यंदा सर्व वऱ्हाडातील कापूस खरेदी करणार आहोत. एक गांसडी देखील इतराच्या हातीं लागूं देणार नाहीं. आमचे मालक कोट्याधीश आहेत, रकमेबद्दल भीति बाळगण्याचे कारण नाहीं,' अशी बातमी सर्व व्यापाऱ्यांत पसरविली. ही सर्व हकीकत ठिकठिकाणच्या एजन्टांनीं आपापल्या कंपन्याना तात्काळ तारेनें कळविली. तेव्हां मात्र त्या कंपन्या सावध झाल्या. आपणास कोण प्रतिस्पर्धी उत्पन्न झाला आहे, त्या बद्दल त्यानीं कसून चौकशी सुरू केली. परंतु काहींच पत्ता लागेना. रायानें एका दिवसात पासष्ट हजाराची खरेदी केली, हें कळताच अण्णासाहेबहि आश्चर्यचकित झाले.

" बाळासाहेब, हें तुम्ही फारच मोठ धाडस केलें आहे ! " अण्णासाहेब म्हणाले.

" अस एकदम धाडस केल्याशिवाय ह्या परदेशी कंपन्यावर केव्हांहि छाप बसावयाची नाही ! " राया म्हणाला, " मी मुंबईत जाऊन जी माहिती मिळविली, त्यावरून माझी खात्री आहे कीं, यंदा कापसाचा भाव फार तेजीला जाईल ! "

" वर आता ह्या खरेदीच काय करणार ? "

" काय करणार म्हणजे ? —तुमच्या माधव धरमसीच्या प्रेसामध्यें हे गठ्ठ साठवून ठेवणार ! आणि उद्या जर भाव पुनः उतरला तर आणखी खरेदी करणार ! "

परंतु दुसऱ्या दिवशीं भाव न उतरता चढू लागला. पधरा दिवसांत भाव चारशें दहापर्यंत सारखा चढला. तरीहि राया स्वस्थच होता. कंपन्याचे एजन्टस् मात्र जो कापूस बाजारात येईल, तो सर्व रोखीने भराभर खरेदी करीत. आपल्या प्रतिस्पर्ध्याला एक गासडी देखील खरेदी करू देऊं नका, असा त्याना कपनीकडून हुकूम आला होता. रायाने चारशे दहा भाव झालेला पाहताच आपल्या अडीचशे गासड्या एकदम विकून टाकल्या. त्याचे एक लाख पंचवीसशें रुपये आले. मूळ खरेदी पासष्ट हजाराची असल्यामुळें ह्या एका पधरा दिवसाच्या व्यवहारात त्यास सदतीस हजार पाचशें रुपये निव्वळ नफा मिळाला !

" अण्णासाहेब ही आमची कमाई पाहा ! " नोटाचें पुडके अण्णासाहेबांच्या पुढे ठेऊन राया म्हणाला, " आमच मूळ भाडवल किती होत, तें तुम्हाला माहिती आहेच ! त्या पासष्ट हजाराच्या भाडवलावर आम्ही सव्वा लाखाचा धदा केला आणि पंधरा दिवसात नफा मिळविला सदतीस हजार ! "

" धन्य आहे तुमची ! " अण्णासाहेब म्हणाले, " खर जर म्हणाल बाळासाहेब, तर मी मोठ्या काळजींत होतों. कारण काल मला तशीच चिताजनक बातमी कळली. मी लगेच तुमच्याकडे मनुष्य पाठविला पण तुमच्यापैकीं कोणीच भेटला नाहीं ! "

" काल आम्हीं सर्वजण अकोल्याला गेलों होतों. पण तुम्हाला कोणती बातमी कळली ! "

" तुम्ही खरेदी करून ठरलेला कापूस विकत घ्यावयाचा नाहीं, असा परदेशी कंपन्यांनीं कट केला आहे. असं काल बेडेकर एजण्ट म्हणत होता."

" मला ही कटाची बातमी अकोल्यास कळली तेव्हा मी फार बारकाईनें चौकशी केली. परंतु कळलेल्या बातमीचा खरेखोटेपणा कळेना. बहुतकरून त्या कंपन्यांच्या अडत्यांनींच ही हूल उठविली असावी, अशी मला शंका येते. विषाची परीक्षा पाहू नये. लगेच अकोल्याहून निघालो आणि आज सकाळच्या बाजाराला सर्व कापसाची विक्री करून मोकळा झालों! आणखी थोडे दिवस थांबलों असतो तर पांच पंचवीस हजार जास्त फायदा झाला असता. पण म्हटलं नको कदाचित् बाजू उलटली तर गळयात धोंगड यायच!"

" यालाच म्हणतात प्रसंगावधान!" अण्णासाहेब म्हणाले, " नाही तर आशेला गुंतून सर्वस्वाचा नाश करून घेणारे थोडे का असतात! उस गोड लागला म्हणून मुळापर्यंत खावू नये म्हणतात, ते काहीं खोटं नाहीं!—बर आतां पुढला काय विचार?"

" उद्यां पुण्यास जावयाच म्हणतों?"

दुसऱ्या दिवशीं सर्व मंडळी पुण्यास आली. दादासाहेबांचे पंचवीस हजार रुपये व्याजासह परत केल्यावर क्लबच्या मंडळींनीं आपापली रक्कम वाटून घेतली. त्यांच्या ध्येयाप्रमाणें प्रत्येकाच्या वाटणीला बारा बारा हजार रुपये आले. सर्वत्राना अत्यानंद झाला!

" आजपासून आपण प्रत्येकजण स्वतःच्या इच्छेप्रमाणें वाटेल तो उद्योग करण्यास स्वतंत्र झालों!" राया सर्वांना उद्देशून म्हणाला. " आता ज्यानें त्यानें आपल्या आवडीप्रमाणें उद्योग करावा. परंतु प्रत्येक विजयादशमीला मुंबईत झावबाच्या वाडींत आपली खोली होती, तेथें आपल्या रायक्लबच्या वार्षिक उत्सवाला प्रत्येकानें हजर राहिलें पाहिजे. म्हणजे वर्षांतून एकदा सर्वांच्या एका ठिकाणीं भेटी होऊन वर्षभर काय उद्योग केला, वगैरे सर्वत्राना प्रत्येकाची हकीकत कळेल. तेव्हा आता तुम्ही प्रत्येकानें पुढें काय काय करावयाच योजिलं आहे. तें ठरवा!"

रात्रीं एकत्र बसून प्रत्येकजण 'पुढें काय उद्योग करावा?' याबद्दल विचार करीत असताना गोप्याला काहीं आठवण होऊन तो बिंदूला म्हणाला, " बिंदू वहिनी, आता आम्ही आपल्या घरीं जाणार अर्थात् तुमच्या हातचं सुग्रास जेवण कांहीं आम्हांला मिळत नाहीं! रायानं तर तुमच्या स्वयंपाकाची

अशी कांहीं तरी तारीफ केली होती कीं, आम्ही सर्वजण जिभल्या चाटीत राहिलो! आम्हाला वाटलं होतं कीं आमच्या ध्येयाप्रमाणें प्रत्येकाचे बाराबारा हजार रुपये जमेपर्यंत बराच अवकाश लागेल. तोपर्यंत आम्हांला तुमच्या हातचा स्वयंपाक—"

"मग त्यांत काय आहे मोठंस!" बिंदू म्हणाली, "मी उद्यां करणारच आहे स्वयंपाक!"

"खर का?" आनदानें मनोहर म्हणाला, "मग वहिनी, उद्यां अगदीं साधा बेत ठेवा बुवा! ह्या तुमच्या लग्नात गोड गोड पक्वान्न खाऊन मन कस कंटाळल आहे!"

"तुम्ही सांगितल तरी मी पक्वान्न करणार नाहीं! मला पक्वान्नच करतां येत नाहींत. उद्याचा बेत अगदीं साधा—फक्त पिठल भात करून मी तुमच्या पानावर वाढणार!"

"आणि वहिनी, पोळ्या नाहींत का?" बापूनें मध्येंच विचारलें.

"वहिनी काहीं पोळ्या नाहींत लेका पण तू मात्र पोळ आहेस! राजा म्हणाला.

"नाहीं वर भावोजी"—बिंदू हासत म्हणाली, "मी उद्या पोळ्या सुद्धां करणार आहे हो!"

"भलतच काहींतरी!" राजा म्हणाला, "बाराजणांकरिता तुम्ही पोळ्या करणार म्हणजे झाल काय? ही आमची मडळी इतकी खादाड आहे कीं विचारूं नका! त्यातून तुमच्या हातच्या पोळ्या मग काय विचारतां! एक एक जण पांच पाच सहा सहा सुद्धा उठवील!"

"मग त्यात काय झाल!"

असो. पुष्कळ खल केल्यावर गजाभाऊ, श्रीपाद आणि गोपाळ, तात्या, बापू आणि बाप्या यानीं आपापल्या गावीं पिठाची गिरण घालण्याचें ठरविलें अण्णानें किराणा मालाचें दुकान, मनोहरानें कापडाचें दुकान, चाच्यानें चादीसोन्याची पेढी आणि भाऊनें शिंप्याचें दुकान घालण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं मुंबईत येऊन रायानें झावबाच्या वाडीतील आपल्या क्लबची मूळ खोली प्रथम भाड्यानें घेतली. सुदैवानें ती रिकामीच होती. वर्षाचें एकदम भाडें भरून ती रायक्लबच्या नावं त्यानें गुतवून टाकिली. खोली लहानच होती, तरी सर्वांना ती खोली भाग्यशाली आहे असाच सर्वांचा

ग्रह झालेला होता. गजाभाऊ आणि बापू यानी एक दिवस खपून खोलीला रंगचुना दिला. नंतर सतरंजीं, गाद्या, दिवा चार भांडीं, स्टो आदिकरून सामान आणून ती सजविली, राजानें एक हार्मोनियम आणि तबला आणून ठेविला. रायानें ठरल्याप्रमाणें पांच गिरण्या तीन तीन हजारांच्या विकत घेतल्यानंतर मनोहराच्या दुकानाकरितां कापड खरेदी केलें. भाऊकरिता शिवण्याचें सिंगर मशिन घेतलें.

" आता तुम्ही आपापल्या गावीं गेल्यावर उद्योगाला प्रारभ करा ! " राया म्हणाला, " आपल्या क्लबचं ध्येय नेहमीं लक्षांत असू द्या ! जो उद्योग कराल, तो सचोटीनं करा ! कोणत्याहि इतर भानगडींत तुम्ही पडू नका. आपण एकत्र होतों, तेव्हा एकमेकाच्या हिमतीवर आपण वाटेल ते असाध्य व्यवहार आणि उलाढाल्या केल्या, परंतु तुम्ही तशा कोतत्याहि फंदात पडू नका. तसच बाकी राहिलेल्या रकमेतून शेतजमीन घ्या. मालकीच घर करा आणि चालू धंद्यावर सचोटीनं आपला उदरनिर्वाह करा ! "

" पण तू आणि राजा काय करणार ? " गोप्याने विचारले, आमची दहाजणाची व्यवस्था लागली पण तुमची काय ? "

" राजाबद्दल मी काय सागूं ? राया म्हणाला, " पण माझ्याविषयीं म्हणाल, तर माझं अद्यापि कांहींच निश्चित ठरल नाहीं. "

सर्व मंडळी एकमेकाचा प्रेमानं निरोप घेऊन आपापल्या घरीं निघून गेली. येथें रायक्लब बंद झाला परंतु त्याचें नाव मात्र कायम राहिलें. पुढच्या विजयादशमीला पुनः सर्व मडळी ठरल्याप्रमाणें आपल्या खोलींत एकत्र झाली. सर्वांचा उद्योग उत्तम प्रकारें चालला होता. प्रत्येकानें आपापली हकीकत सांगितली. ती ऐकून राया म्हणाला, " एकूण तुमचं उत्तम चालल आहे, हे ऐकून मला अत्यानद होत आहे ! "

" पण राया, तू काय उद्योग केलास ते नाहीं सागितलेंस ? "

" मी ठरविल्याप्रमाणें खासगी सी. आय. डी. खात सुरू केलं आहे. " राया म्हणाला. " पहिले दोन महिने कोल्हापुरास काढल्यानंतर मी पुण्यास आलों. एक महिना बराच उद्योग केला, नतर मुंबईत आलों. आता येथ स्थायिक होण्याच्या मी विचारांत आहें. राजा आणि गोप्या ह्या दोघानीं एकदा मला कबूल केल होत. "

" मग आम्ही नाहीं कुठं म्हणतों ? " राजा म्हणाला. " तू हा नवीनच

उपक्रम केलास, हें मला कळविलं असतस तर मी मोठ्या आनंदानं एका क्षणाचाहि विलंब न करता धावत आलों असतों. उगाच घरीं माशा मारीत बसलों आहे!"

"आणि मी तरी केव्हा नाहीं म्हटलें?" गोप्या म्हणाला.

अण्णासाहेबांच्या सूचनेप्रमाणें रायानें खरोखरीच "राया दी डिटेक्टिव्ह" म्हणून हा नवीन उपक्रम केला होता. आता राजा आणि गोप्या त्याला मदतनीस झाले. त्यांनीं अनेक रहस्यें उलगडलीं, कित्येक चोऱ्या पकडल्या, अनेक गुह्य गोष्टींचा स्फोट केला, विलक्षण साहस केलें आणि कितीतरी धाडसाचीं कामें केलीं.



# शरत्साहित्यमालेचें आतांपर्यंत प्रसिद्ध झालेलें आमचें प्रकाशन

| | | |
|---|---|---|
| १ | श्रीकांत भाग १ ला ... .. | १-८-० |
| २ | ,, भाग २ रा .... .... | २-०-० |
| ३ | ,, भाग ३ रा .... .... | २-०-० |
| ४ | ,, भाग ४ था .... .... | २-०-० |
| ५ | देवदास आणि बिंदुचें बाळ ... .. | ४-०-० |
| ६ | भारती .. .. . | ६-०-० |
| ७ | गांवगंगा ... ... ... | २-०-० |
| ८ | शुभदा .. ... ... | ३-०-० |
| ९ | काशीनाथ .. ... .. | १-८-० |
| १० | माधवी .. . ... | १-८-० |
| ११ | भैरवी .. ... .... | ३-८-० |
| १२ | विजया ... . .... | ३-८-० |
| १३ | चंद्रनाथ, दर्पचूर्ण, हेमांगिनी .... .... | ३-०-० |
| १४ | चार मिनार ... ... | १-८-० |
| १५ | विराज-वहिनी ... ... | २-८-० |
| १६ | ब्राह्मणाची मुलगी .. ... | २-०-० |
| १७ | विप्रदास .... .... .... | ४-०-० |
| १८ | परिणीता .... .... .... | ३-१२-० |
| १९ | पंडित महाशय .... .... | ३-१२-० |
| २० | चरित्रहीन भाग १ ला .... .... | ४-०-० |
| २१ | ,, भाग २ रा .... .... | ४-०-० |
| २२ | शेवटचा परिचय .... .... | ७-०-० |

नवभारत प्रकाशन-संस्था, मुंबई नं. ४